# शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास




स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.

ज्ञानतीर्थ, विष्णुपूरी, नांदेड-४३१६०६.

## मानव्य विद्याशाखे अंतर्गत 'इतिहास' विषयाच्या पीएच.डी पदवीसाठी सादर करण्यात आलेला शोधप्रबंध.

संशोधक

अमोल विजयराव कर्णेवार

(एम.ए. (इतिहास, इंग्रजी ), एम.लिब.ॲड आय.एससी., एम.फिल., बी.एड.)

मार्गदर्शक

प्रा.डॉ.राजाराम रामा पिंपळपल्ले

(एम.ए.(इतिहास), बी.एड., पीएच.डी.)

इतिहास विभागप्रमुख, आदर्श महाविद्यालय, हिंगोली.

डिसेंबर-२०१८




# स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड .

## सामाजिक शास्त्र विभाग.

### प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, **श्री अमोल विजयराव कर्णेवार** यांनी **"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास"** या विषयावरील शोधप्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या सामाजिक शास्त्रे विद्याशाखातंर्गत इतिहास विषयात पीएच.डी पदवीसाठी सादर केला आहे. या आजपावेतोच्या दुर्लक्षित तसेच उपेक्षित अशा विषयावर त्यांचे हे संशोधन मौलिक आहे.

**अमोल विजयराव कर्णेवार** यांनी माझ्या मार्गदर्शनाखाली सदर शोधप्रबंध सादर केला असून हे कार्य त्यांनी स्वतंत्रपणे केलेले आहे. त्यांनी कोणताही संशोधन प्रबंध, निबंध अथवा प्रकाशित साहित्याची नक्कल केलेली नाही शिवाय तो इतर कोणत्याही विद्यापीठातील कुठल्याही अन्य पदवीसाठी सादर केलेला नाही.

**मार्गदर्शक,**

**डॉ.राजाराम रामा पिंपळपल्ले**

**स्थळ** :- **नांदेड.** | **इतिहास विभागप्रमुख,**

**दिनांक** :-27/12/2018. | **आदर्श महाविद्यालय, हिंगोली.**




# स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड .

## सामाजिक शास्त्र विभाग.

## प्रतिज्ञापत्र

मी **अमोल विजयराव कर्णेवार** प्रतिज्ञापूर्वक असे नमुद करतो की, **"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास"** या विषयावरील शोधप्रबंध स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या सामाजिक शास्त्रे विद्याशाखातंर्गत इतिहास विषयात पीएच.डी. पदवीसाठी सादर केला आहे.

हा शोधप्रबंध मी स्वत: माझे संशोधन मार्गदर्शक डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले सरांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपूर्वक लिहिलेला आहे. त्यातील सर्व मजकुर माझ्या अभ्यासावर व संशोधनावर आधारलेला आहे. कुठल्याही प्रकाशित अथवा अप्रकाशित संशोधन साहित्याची नक्कल केलेली नाही.

मी हा शोधप्रबंध या व्यतिरिक्त इतर कोणत्याही विद्यापीठात कोणत्याही पदवी अथवा परीक्षेसाठी सादर केलेला नाही.

**संशोधक,**

**स्थळ :- नांदेड.**

**दिनांक :- २७ /१२/२०१८.** **अमोल विजयराव कर्णेवार**

# ऋणनिर्देश

मी श्री. अमोल विजयराव कर्णेवार स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड अंतर्गत सामाजिक शास्त्रे या विद्याशाखेतंर्गत पीएच.डी. (इतिहास) ही पदवी संपादन करण्यासाठी **"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास"** या विषयाची निवड करण्यात आली. आदर्श महाविद्यालय, हिंगोली या महाविद्यालयातील इतिहास विभागप्रमुख डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले सरांनी शोधप्रबंध अहवाल लेखनासाठी व हा विषय निवडण्याची मला परवानगी दिली याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. **"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास"** या विषयावरील शोधप्रबंध मी स्वत: माझे संशोधन मार्गदर्शक आदर्श महाविद्यालयातील इतिहास विभागप्रमुख डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले सरांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपूर्वक लिहिलेला आहे. शोधप्रबंध अहवाल करतांना मला जेव्हा-जेव्हा अडचणी आल्या तेव्हा त्या अडचणी त्यांनी मला सोप्या भाषेत मार्गदर्शन करून माझ्या शोधप्रबंध अहवाल लेखनासाठी सहकार्य केले त्या बद्दल मी त्यांचे मन:पुर्वक आभारी आहे. त्याचप्रमाणे माझ्या या निरूत्साहाच्या परिस्थितीत मला प्रेरणा देणारे माझे काका ॲड. सुरेश राधाकिशन कर्णेवार यांनी मला प्रबंध पुर्ण करण्यासाठी नेहमी प्रेरणा दिली, त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. तसेच माझे एम.फील. चे मार्गदर्शक डॉ. जगदिश व्यंकटराव भेलोंडे सर, इतिहास विभागप्रमुख, शिवाजी महाविद्यालय, कन्नड जि. औरंगाबाद यांनी मला वेळोवेळी प्रेरणा दिली. माझे पदवी चे प्राध्यापक व मला इतिहास विषयाची गोडी लावणारे डॉ. रामभाऊ आर. मुटकूळे सर, इतिहास अभ्यास मंडळ सदस्य, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड, तसेच इतिहास विभागप्रमुख, बर्हिजी स्मारक महाविद्यालय, वसमत जि.हिंगोली यांनी मला पीएच.डी. करण्यासाठी वेळोवळी प्रेरणा दिली व महाविद्यालयातील आवश्यक साहित्याची मदत व सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

शोधनिबंधाच्या विषयनिवडीसाठी मदत करणारे कै.डॉ.पी.जी.व्यास सर, माजी प्राचार्य, तोष्णीवाल महाविद्यालय, सेनगाव जि.हिंगोली यांचा मी आभारी आहे. तसेच तोष्णीवाल महाविद्यालयातील इतिहास विभागातील प्राध्यापक व स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड येथील इतिहास अभ्यास मंडळ सदस्य डॉ.गोविंद भालेराव यांनी शोधप्रबंधासाठी जे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. अहवाल लेखनासाठी आवश्यक साहित्य मिळवित असतांना मला पुणे येथील श्री. तारासिंग गोरोवाल यांनी गुरूग्रंथसाहिबाची मराठी प्रत उपलब्ध करून दिली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुणे विद्यापीठातील नामदेव अभ्यासन केंद्राचे संचालक डॉ. कामत सर यांनी संत नामदेव महाराज यांच्या बद्दल आवश्यक साहित्याची माहीती दिली, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. हुजूर साहिब खालसा लायब्ररी, नांदेड येथील ग्रंथालयातील ग्रंथपाल व इतर कर्मचाऱ्यांनी मला शोधप्रबंध लिखानासाठी आवश्यक असणारे साहित्य

दिले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. माझे मार्गदर्शक डॉ.राजाराम रामा पिंपळपल्ले सरांनी स्वत: जवळील अमुल्य संदर्भसाहित्य व आदर्श महाविद्यालयातील ग्रंथालयातून आवश्यक असणारी संदर्भ ग्रंथ दिले त्याबद्दल मी मार्गदर्शक सरांचा व ग्रंथालय कर्मचाऱ्यांचा आभारी आहे. कृषी उत्पन्न बाजार समिती, हिंगोली चे संचालक डॉ. जब्बार पटेल साहेब यांनी संत नामदेव महाराज यांच्यावर पीएच.डी. केली हे मला मार्गदर्शकांनी सांगीतल्यावर मी स्वत: डॉ. जब्बार पटेल यांना भेटण्यासाठी गेल्यानंतर त्यांनी मला मार्गदर्शन केले त्याचप्रमाणे प्रश्नावली भरून दिली, व त्यांच्या जवळील पीएच.डी. चे संदर्भग्रंथ मला वापरण्यासाठी दिले. डॉ. जब्बार पटेल यांच्या ज्ञानाचा मला खुप फायदा झाला, वेळोवेळी त्यांनी मला मार्गदर्शन केले, त्याबद्दल मी डॉ. जब्बार पटेल सरांचा आभारी आहे. नांदेड गुरूव्दारातीत काही प्रमुख व्यक्तींनी मला गुरूग्रंथसाहिब ह्या धर्मग्रंथावर कार्य करत असल्यामुळे मला बरीच मदत केली. आवश्यक प्रश्नावली भरून दिली व त्याचप्रमाणे शिखांचे दहा गुरू यांचे काही छायाचित्र दिले व त्यांच्या जीवनाबद्दल आवश्यक ती माहीती सांगीतली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

माझे प्रेरणास्थान माझे वडील श्री विजय राधाकृष्ण कर्णेवार यांनी शिक्षणासाठी माझ्यावर केलेला खर्च व वेळोवेळी शिक्षणासाठी दिलेली प्रेरणा त्याबद्दल मी त्यांचा जीवनात ऋणी आहे. आई सौ.उषा विजय कर्णेवार यांच्या प्रेरणेमुळे मी हा शोधप्रबंध पूर्ण केला आहे त्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे, व ज्यांच्या त्यागातून आज मी व माझे कुटूंब आज जे आनंदाचे दिवस पाहत आहेत असे माझे आदरनिय काका ॲड. सुरेश राधाकृष्ण कर्णेवार, काकु सौ.चंद्रकला सुरेश कर्णेवार व माझे भाऊ डॉ.प्रविण कर्णेवार, सचिन कर्णेवार, डॉ.कैलास कर्णेवार, त्याचप्रमाणे माझे पुतणे चि.यश, हर्ष, वैष्णवी, मनु, अक्षरा, श्रीनिधी, व माझी सुविद्य पत्नी सौ.सोनाली अमोल कर्णेवार, व ज्यांच्यासाठी मी शिक्षण घेत आहेत अशी माझे चिमुकले चि. विश्वजीत व चि. अजिंक्य यांच्या खेळाचा वेळ मी माझ्या पीएच.डी. कार्यासाठी वापरला व मागील तीन वर्षापासून मी त्यांना आवश्यक तो वेळ देऊ शकलो नाही त्याबद्दल मी त्यांचा क्षमस्थ आहे, व त्यांच्या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

माझे काका ॲड. सुरेश रा. कर्णेवार यांनी मला इंग्रजी साहित्याचे मराठी भाषांतर करण्यास मार्गदर्शन केले त्यामुळे मी हा शोधप्रबंध लिहू शकलो त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. माझे आदरणिय काका ॲड.सुरेश राधाकृष्ण कर्णेवार यांना हा शोधप्रबंध अर्पण करीत आहे. माझ्या कुटूंबाला आपले सर्वस्व अर्पण करणारे, सतत कुटूंबाच्या प्रगतीचा विचार करणारे, मला शिक्षणात नेहमी प्रेरणा देणारे, कुटूंबासाठी स्वत: वयाच्या १७ व्या वर्षी इंडीयन आर्मी मध्ये नौकरी करून आपल्या भावा-बहिणीच्या गरजा पूर्ण करून त्यांना शिक्षण देणारे, व संपूर्ण कुटूंबातील सदस्यांना निरक्षरतेतून साक्षरतेकडे नेणारे, नौकरी करीत असतांना स्वत: रात्र कॉलेजकरून कानपूर विद्यापीठातून एल.एल.बी. ही बॅरीस्टरची पदवी व डी.एम.ई. ही इंजिनिअरींगची पदवी व एम.ए. अर्थशास्त्र ही पदवी मिळवणारे, व जीवन जगत असतांना LIVE LIKE A

KING प्रमाणे जीवन जगा असे सांगणारे व त्याप्रमाणे जीवन जगणारे, राजाचे मन व मनाचा राजा असणारे, दांडगी इच्छाशक्ती व आत्मविश्वास असणारे, माझे आदरणिय अंकल ॲड.सुरेश राधाकृष्ण कर्णेवार यांना हा माझा पीएच.डी. चा प्रबंध अर्पण करीत आहे व त्यांच्या सहकार्याबद्दल आभारी आहे.

संत नामदेव महाराजांचे जन्मस्थान नर्सी (नामदेव) ता. सेनगाव जि.हिंगोली येथे भेट दिल्यानंतर मला मंदीर संस्थानाकडून संत नामदेव महाराज यांच्याबद्दल बरीच माहीती मिळाली व मंदीराबाहेरील स्टॉल वर मला संत नामदेव व इतर संताच्या बद्दल आवश्यक संदर्भ ग्रंथ मिळाले, त्याबद्दल मी मंदीर प्रशाषनाचा आभारी आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील ग्रंथालयातील कर्मचारी त्याचप्रमाणे स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड येथील कर्मचाऱ्यांच्या व विद्यापीठातील ग्रंथपाल डॉ. कुलकर्णी सर यांनी मला शोधप्रबंध लेखनाबद्दल माहिती दिली व आवश्यक ते संदर्भसाहित्य वापरण्याची परवानगी दिली त्याबद्दल मी त्यांचा व ग्रंथालयातील इतर कर्मचाऱ्यांच्या प्रत्यक्ष अप्रत्यक्ष सहकार्याबद्दल मी त्याचा आभारी आहे.

माझ्या सोबत पीएच.डी करणारे माझे मित्र पंकज खंडारे, प्रा. बनसोडे सर, यांचे मला वेळोवेळी सहकार्य मिळाले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. माझे मित्र बर्हिजी स्मारक महाविद्यालयाचे प्रा.बालाजी सवंडकर सर यांचे मला वेळोवळी सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. तसेच अर्थशास्त्र विषयाचे मार्गदर्शक डॉ.परशूराम पाटील सर यांनी मला वेळोवळी दिलेली प्रेरणा व सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. माझे पीएच.डी. शोधप्रबंध टंकलेखन करणारे माझे मित्र श्री अमोल रापतवार व श्रीनिवास माळे यांनी माझा शोधप्रबंध टंकलेखन केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे त्याचप्रमाणे श्री विजय पती सर यांनी मला वेळोवेळी टंकलेखनाबद्दल व शोधप्रबंधाची सेटींग करून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. व शोधप्रबंधाच्या झेरॉक्स साई झेरॉक्स, श्रीनगर नांदेड व ए१ झेरॉक्स, नांदेड व शोधप्रबंध बांधणी करणारे हिंद प्रेस, नांदेड यांच्या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. तसेच शोधप्रंबध मुद्रीत करून देणारे व शोधप्रबंधात प्रत्यक्ष अप्रत्यक्ष मदत करणारे सर्वांचे मी आभारी आहे.

**संशोधक**

**अमोल विजयराव कर्णेवार**

# अनुक्रमणिका

## सारणी सुची

## आलेख सुची



## नकाशा सुची

# प्रकरण १

# प्रस्तावना

**१.१ प्रस्तावना :-**

जगाला मानवतेचा व धर्माचा संदेश देवून अमिट धार्मिक व सांस्कृतिक वारसा देणारी उर्जा भारताच्या भूमीत प्राचीन काळापासून आहे. वैदिक धर्म हा जगाच्या इतिहासातील प्राचीनतम धर्म होय. वैदिक धर्माचे तत्त्वज्ञान अतिशय विस्तीर्ण, गहन व चिरंजीवी स्वरूपाचे आहे. बदल निसर्गाचे प्रमुख तत्त्व आहे कारण बदल स्विकारल्यामुळे स्थितीमुळे स्थितीकरण टळून धर्माचे नित्यनूतन स्वरूप धारण करून वैदिक धर्मात कालानुरूप स्वरूप येऊन सतत वैचारिक मंथन चालू राहिले. यामुळे कधी त्याच्या स्वरूपात बदल झाला तर कधी त्यातील उणिवांचा हवाला देणारे मतप्रवाह वेगळ्या तत्त्वज्ञानाला जन्म देवू शकले. वेद, वेदांगे, सूत्रे, ब्राम्हणे, अरण्यके, उपनिषदे जन्मली तर कधी वेदपरंपरा न माननारी वैचारीक बैठक उदयाला आली. इ.स.६ वे शतक या संदर्भात मोठेच क्रांतीकारी शतक गणले गेले. विविध मत प्रणालींनी चिंतनावर आधारीत वेगवेगळ्या तात्त्विक अधिष्ठांनाना जन्म दिला. जैन धर्म, बौध्द धर्म, चार्वाक दर्शन इ. पंथ, उपपंथ दिसू लागले यातून पूर्वीच्या धर्मप्रणाली जीवन जगण्याचे तत्त्वज्ञान मांडत होती त्यातील विकसीत झालेले दोष वा त्याज्य बाबींमुळे सामान्यांना त्याऐवजी नवीन तत्त्वप्रणाली आकृष्ट करू लागल्या.

महाराष्ट्राच्या भूमीच वैशिष्ट्य असे की, तिच्यात दशकानुदशकांपासून, शतकानुशतकांपासून अनेक धर्म, पंथ, त्याचे अनुयायी गुण्यागोविंदाने नांदत आहेत. हे धर्म, पंथ त्यांचे अनुयायी यांच्यामधील महत्त्वाचा दुवा म्हणजे त्या त्या धर्माचे वा पंथाचे संत होय. संतांची ही परंपरा कुठलाही खंड पडू न देता बाराव्या-तेराव्या शतकापासून आजच्या एकविसाव्या शतकापर्यंत जनसामान्यांशी अविरत, अव्याहत हृदसंवाद करीत आहे. त्यांना मार्गदर्शन करीत आहे. इहलोकांत कस राहावे नि प्रपंच करीत करीत परमार्थसाधना कशी करावी, याचा जणू वस्तुपाठच देत आहे. धर्माच्या व पंथाच्या तत्त्वज्ञानातील क्लिष्टता काढून टाकून त्यात सुलभीकरण आणीत आहे. त्यांना लोकभाषेत ज्ञानमार्ग, कर्ममार्ग, भक्तीमार्ग इ.साधनेचे विविध मार्ग सांगत आहे. काम, क्रोध, मोह, मद, मत्सरादी षड्रिपूंपासून अलिप्त राहायला सांगत आहे. जनमानसातील सदसद्विवेकबुध्दी जागृत करीत आहे. आचार-विचारातील शुचितेचा, पावनत्वाचा, पावित्र्याचा संदेश देत आहे. आपले धर्म नि पंथ वेगवेगळे असले, तरी विश्वातील सर्व मानवच नव्हेत तर प्राणिमात्रही एक आहेत, हा विश्वबंधुत्वाचा विचार प्रतिपादून विश्वकल्याणाबरोबरच विश्वशांतीचे उद्दिष्ट प्राप्त करण्याची प्रेरणा देत आहे.

परिवर्तन हा निसर्गाचा नियम आहे. हा नियम बऱ्याच प्रमाणात समाजालाही लागू होताना दिसतो. कारण समाजाने अस्तित्वात मोठ्या प्रमाणात निसर्ग तत्त्वांनी प्रभावित होत असते. प्राचिन काळापासूनच्या जगातील विविध देशांतील परीवर्तनाच्या चळवळींचा इतिहास अभ्यासला तर हे लक्षात येते की,

समाजव्यवस्था, अर्थव्यवस्था, धर्मव्यवस्था व राजकीय व्यवस्था ह्या व्यक्तीच्या कल्याणाकरिता निर्माण झ ाालेल्या आहेत. परंतु मनुष्याच्या स्वार्थी स्वभावानुरूप ह्या व्यवस्थाही सर्वाच्या नव्हे, तर फक्त विशिष्ट मूठभर लोकांच्याच हितासाठी उपयोगी आणण्याच्या प्रयत्न नेहमीच होत आलेला आहे. त्यामुळे या व्यवस्थेची जी आदर्श ध्येये आहेत, ती बाजूला जाऊन या स्वार्थामुळेच अशा प्रकारच्या व्यवस्थेत अनेक समस्या अथवा दोष निर्माण झालेले आहेत. विशेषत: धर्म आणि समाजव्यवस्थेतील समस्या, दोष हे मात्र सर्वसामान्यांच्या हिताच्या दृष्टीने अत्यंत अडचणीच्या ठरल्या आहेत. यामुळे जवळपास प्रत्येक काळात सर्वसामान्य लोकांचे जीवन असह्य बनत आलेले आहे. ज्या ज्या वेळी सामान्यजनांचे जीवन असहाय्य बनले, सामाजिक, धार्मिक व इतर स्थिती स्फोटक बनते, जीवनमूल्ये ज्या वेळी रसातळाला जातात, त्या वेळी समाज व देशाच्या अस्तित्वाला मोठा धोका निर्माण होत असतो. अशा वेळी एखाद्या व्यक्ती अथवा समूहाला पुढाकार घेऊन अशी दोषास्पद व्यवस्था बदलण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा लागतो. जगाच्या इतिहासाने हे दाखवून दिले आहे की, सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि धार्मिक व्यवस्थेने विशिष्ट मर्यादा ओलांडल्यानंतर या समस्याग्रस्त व्यवस्था बदलण्याचा अनेक महामानवांनी प्रयत्न केला आहे. त्यातून क्रांतीचा वणवा भडकून व्यवस्था परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न संत मंडळीनी मध्ययुगीन काळात केला आहे.

आज आधुनिक काळामध्ये स्वातंत्र्य, एकता, बंधुत्व, स्त्रीमुक्ती, लोकशाही, उद्योगशीलता, श्रमिकांचा गौरव, नीतीमूल्य, सामाजिक न्याय, मानवाधिकार, बुध्दिप्रामाण्यवाद व मानवतावादी धर्म यासारख्या अनेक बाबी व्यक्ती, समाज व देशाच्या हितासाठी अत्यंत महत्त्वाच्या मानल्या जात आहेत. संपूर्ण जगभर या मुल्यांच्या प्रतिष्ठापणेसाठीच मोठे लढे सुरू आहेत. जवळपास ही सर्व तत्वे बाराव्या शतकासारख्या अत्यंत कर्मठ, प्रतिगामी व राजेशाहीचे प्रभुत्व असलेल्या काळात संत मंडळींनी प्रत्यक्ष कृतीमध्ये आणून समाजाला नवी दिशा देण्याचे क्रांतिकारी कार्य केले. त्यानुसार सामाजिक, आर्थिक व धार्मिक व्यवस्थेच्या परिवर्तनासाठी विशेष योगदान दिले. परंतु त्यांच्या या सामाजिक व आर्थिक व्यवस्थेच्या संदर्भातील योगदानावर आजपर्यंत पाहिजे त्याप्रमाणे प्रकाश टाकला गेला नाही. संत मंडळींनी आपल्या हिंदू धर्मासाठी कार्य केले त्याचप्रमाणे त्यांच्या कार्याची महिमा इतकी चांगल्या प्रकारे होती की त्यांचे विचार इतरही धर्मांतील महान व्यक्तींनी आपल्या धर्मग्रंथात स्थान दिले.

निसर्गातील अत्यंत पवित्र, संपूर्ण मानवी भवितव्याशी संबध्द, जीवन व विश्व अथवा निसर्ग यांची नियंत्रक अशा अलौकिक शक्तीवर किंवा अशा शक्तींवर माणसाची श्रध्दा असते; त्या शक्तीचा स्वत:शी अनुकूल, पवित्र व घनिष्ठ संबंध स्थापित करणारी वैयक्तिक अथवा सामाजिक मन:प्रवृत्ती व त्यातून निघणारी आचरणाची पध्दती म्हणजे 'धर्म' होय. धर्म या शब्दाला इंग्रजी मध्ये 'रिलिजन' असे म्हणतात. त्या शक्तीशी प्रतिकूल मन:प्रवृत्ती व आचरण म्हणजे 'अधर्म' होय. काही धर्मचिंतक तत्वज्ञांचे असे मत आहे की, धर्माच्या मुळाशी वर वर्णिलेल्या उच्चतम शक्तीकडे वळलेली मानवाची संपूर्ण मन:प्रवृत्ती असते. भावना, इच्छा आणि

ज्ञान या प्रवृत्तीतूनच निर्माण होतात; उच्चतम शक्तीचा विशिष्ट अनुभव काही माणसांना येत असतो, या अनुभवामध्ये या शक्तीबद्दल आश्चर्य, विलक्षण भय, नितान्त प्रेम, अपरंपार शांती, नम्रता, शरणागती, अहंकारनिवृत्ती म्हणजे आपण क्षुद्र किंवा कोणी नाही अशी वृत्ती इ. भावना निर्माण होतात. त्या शक्तीला मनुष्य अनुकूल किंवा वश करण्याचा प्रयत्न करतो किंवा तन्मय होण्याकरिता किंवा त्या शक्तीत आत्मविसर्जन व्हावे म्हणून प्रयत्नशील असतो; किंवा शाश्वत सलगी व्हावी म्हणून झटत असतो. त्याकरिता ध्यान, जप, प्रार्थना, यज्ञ, पूजा, व्रतपरिपालन इ. प्रकारचे आचरण मनुष्य व्यक्तीश: किंवा सामुदायिक रीतीने करतो आणि प्रतिकूल मनोवृत्ती व आचरण टाळतो. थोडक्यात सांगायचे, म्हणजे इष्टप्राप्त्यर्थ व अनिष्टनिवारणार्थ अलौकिक शक्तीची साधना किंवा आराधना म्हणजे 'धर्म' होय.[१] अलौकिक म्हणजे निसर्गातील, निसर्गाचे व जीवनाचे नियमन करणारी, निसर्गाला अंतर्बाह्य व्यापणारी शक्ती होय. म्हणूनच तिला परमसत्य मानतात. अलौकिक म्हणजे अतींद्रिय असाही अर्थ करता येतो. ती शक्ती दृश्य वस्तुरूप आणि व्यक्तिरूपही असते आणि केव्हाकेव्हा इंद्रियगम्य किंवा मनोगम्यही होऊ शकते, अशी श्रध्दा धार्मिक आचरणाच्या मुळाशी असते. ती शक्ती हे शाश्वत आणि उच्चतम सत्य होय, असे धर्मसंकल्पनेत गृहीत धरलेले असते. मानवाचे उच्चतम ध्येय किंवा आदर्श आणि परम अंतिम शाश्वत सत्य हे त्या शक्तीचेच स्वरूप होय, असे जगातील उच्च धर्म मानतात; त्या शक्तीच्या संपूर्ण अनुग्रहाने किंवा कृपेने उच्चतम शाश्वत ध्येयाची प्राप्ती होते, असेही उच्च धर्म मानतात. म्हणून जागतिक उच्च धर्माची व्याख्या अशी करता येते. जीवन परिपूर्ण व कृतार्थ करणारी, हे अपरिपूर्ण, दोषमय, अशांत जीवन बदलून टाकणारी, उच्चतम ध्येयाच्या म्हणजे दिव्यत्वाच्या प्राप्तीची पध्दती म्हणजे धर्म मानतात. एकेश्वरवादी धर्मांच्या अनुसार परमपवित्र ईश्वर, अव्दैतवादाप्रमाणे परमात्मा आणि प्राथमिक बौध्द धर्माप्रमाणे निर्वाण म्हणजे शाश्वत सत्य व उच्चतम ध्येय होय.[२]

तेराव्या शतकात जन्मलेल्या संतश्रेष्ठ नामदेवांनी चौदाव्या शतकाचा पूर्वार्ध पूर्ण होईपर्यंत जे जे कार्य केले ते तत्कालीन संतांच्या परंपरेचा उज्वल वारसा जोपासणारे असे होते म्हणूनच त्यांची आठवण पुढील काळात राहून नवीन समन्वयवादी धर्मविषयक तत्त्वज्ञानाचा आधार त्यातून जन्मला. शिख धर्म पंथाच्या उदयाच्या दोन-तीन शतकापूर्वीच्या पार्श्वभूमीत संत नामदेवांनी रूजविलेले तत्त्वज्ञान सुप्त स्वरूपात होते याची प्रचिती 'गुरूग्रंथसाहिब' या शीख धर्म ग्रंथातील संत नामदेवाच्या ६१ पदांवरून व या धर्म तत्त्वज्ञानाच्या एकतावादी, एकेश्वरवादी, निर्गुण ईश्वरवादी व मानवतावादी संकिर्तनप्रेमी भूमिकेवरून येते. संत नामदेव महाराज वारकरी कीर्तन संस्थेचे आद्यप्रवर्तक होते.[३] संत नामदेवांचे पंजाबातील दिर्घकालीन वास्तव्य व आजतागायत त्यांच्या शीख धर्मपंथीयांना असलेल्या आठवणी याचा अभ्यास करूनच गुरूग्रंथसाहिबमधील शीख धर्मांचे तत्त्वज्ञान व चिंतन उलगडता येवू शकते. भारताचा पाच हजार वर्षांचा इतिहास असून जगातील अतुलनीय उज्वल परंपरेत भारतीय संस्कृतीचा अव्वल क्रमांक लागतो. हिंदू धर्म हा जगातील सर्वच धर्मांला मार्गदर्शक ठरलेला दिसतो. कालक्रमानुरूप अनेक आघात हिंदू धर्मांवर होऊनही तो अधिक चिरंजीवी इ

ालेला दिसतो. माणसाच्या मूलभूत गरजांची पूर्तता झाल्यानंतर मानव जातीमध्ये धर्म ही संकल्पना रूढ झाली असावी असा सर्वसामान्य विचारप्रवाह आहे. हिंदू धर्मातील तत्त्वज्ञान, रूढी परंपरा बोजड बनत आहेत असे सुजाण माणसांच्या लक्षात आल्यानंतर वेगवेगळे पंथ निर्माण व्हावयास सूरूवात झाली. मुस्लीम धर्मीय राज्यकर्त्यांकडून होणाऱ्या अत्याचाराला सामान्य जनता कंटाळलेली होती. सामाजिक वातावरण बरेच दोषपूर्ण झाले होते. प्रामुख्याने हिंदू धर्मांचा विचार केल्यावर असे लक्षात येते की, समस्त हिंदू चार वर्णात विभागलेले होते. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण असून गुणवत्तेवर आधारीत असलेल्या वर्णाचे रुपांतर जाती व्यवस्थेत झालेले दिसून येते.[४] हिंदू धर्मियांना एकाच वेळी दुहेरी संकटांना सामोरे जावे लागत होते. एक उच्च वर्णीय मंडळीकडून होणारा त्रास तर दूसरे म्हणजे मुस्लिम राज्यकर्त्यांकडून धर्मांतरासाठी केली जाणारी बळजबरी यामुळे सर्वसामान्य माणुस भरडला गेला. आणि या त्रासातूनच जनतेला वेगळ्या धर्मांची आवश्यकता वाटू लागली व ती शिख धर्माची गुरू नानक यांनी स्थापना केली व या धर्मांत सर्वांना प्रवेश होता. त्यामूळे लोकांना हा शिख धर्म आपला वाटू लागला. शिख धर्मातील गुरूंनी इतर जातीतील लोकांना आपल्या धर्मात सामावून घेतले. मुस्लिम राज्यकर्त्याकडून होणाऱ्या छळातुन इतर धर्माच्या व स्वधर्माच्या लोकांची सुटका केली व वेळप्रसंगी आपल्या प्राण त्याग केला. शिख धर्मातील गुरूंनी धर्मासाठी बलीदान दिले. मुगल साम्राज्याच्या शासनात शिखांना खुप धार्मिक छळ सहन करावा लागला. इ.स.१६०६ पाचवे गुरू गुरू अर्जुन देवजी ला सम्राट जहाँगिरानी अटक करून मृत्युदंड दिला.[५] त्यांचे उत्तराधिकारी गुरू हर गोविंदानी शिखांना योध्दा बनवुन ऐहिक जीवनाबद्दल अधिकार व आध्यात्मिक अधिकार परस्पर पुरक असल्याचे सांगून 'मिरी-पीरी' या तलवारीचा स्विकार केला.[६] इ.स. १६७५ मध्ये शिखांचे नववे गुरू आणि गुरू गोविंद सिंगाचे वडिल गुरू तेग बहाद्दुर यांना गैर-मुस्लिमांचा छळ करण्याच्या विरोधात व मुस्लिम धर्मांतर न करण्यास नाकारल्याबद्दल मुगल सम्राट औरंगजेबाने शिरच्छेद केला होता.[७] पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात उत्तर भारतात मुसलमानी राजसत्ता जवळजवळ सर्वत्र स्थिरपद झालेली होती. हे शासक स्थानीय सामान्य जनतेशी अत्यंत असहिष्णु वृत्तीने वागत. त्यांची न्यायव्यवस्था आणि धर्मशीलता त्यांच्या सहधर्मियांच्या पुरतीच मर्यादित होती.[८] मध्ययुगीन उत्तर भारतीय धर्मसाधनेच्या इतिहासात आपल्या विराट प्रभावाने शिख समाजाचे संघटन करणाऱ्या गूरू नानक देवांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आणि महत्त्वसंपन्न आहे. भक्ती, कर्म आणि ज्ञान यांचा सुयोग साधण्याचा प्रयत्न गुरू नानकदेवांप्रमाणेच संत कबीरदास, संत रविदास, गोस्वामी तुलसीदास यांच्यासारख्या अन्य उत्तर भारतीय संतांनी अथवा कवींनीही केला.[९]

वारकरी संप्रदायाला जन्म देण्याचे काम संत ज्ञानेश्वरांनी केले. संत ज्ञानेश्वरांनी कल्पलेल्या स्वप्नाला मूर्तरूप संत नामदेवांनी दिले. संत नामदेव हे सुरवातीला सगुण उपासक होते. एकुण परिस्थितीचे अवलोकन केल्यावर त्यांनी जनजागृतीसाठी हिंदुस्थानभर भ्रमण करण्याचे निश्चित केला. पहिल्या तिर्थाटनाच्या वेळी त्यांच्यासोबत ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, गोरोबा काका इ.मंडळी होती. संत ज्ञानेश्वरांच्या निर्वाणानंतर संत नामदेवांना एकाकीपणा जाणवू लागला त्यातूनच त्यांनी महाराष्ट्र सोडून

पंजाबात वास्तव्य करण्याचे ठरविले. संत ज्ञानेश्वराचे पहिले अधिकृत चरित्रकार संत नामदेवच होते.[१०] हिंदू धर्म जो मुस्लिम आक्रमणामुळे भांबावलेला होता व संपूर्ण आत्मविश्वास गमावून बसलेला होता त्याचा आत्मविश्वास वाढविण्याचे काम संत नामदेवांनी केले.

संत नामदेवांना निर्गुण उपासनेचे अग्रदूत मानले जाते. संत कबीरानी निर्गुण उपासनेचा पुरस्कार करून अनेक रचना तयार केल्या. या रचनांच्या माध्यमातून हिंदू-मुस्लिम ऐक्य साधण्याचा कसोशीने प्रयत्न केला. संत रविदास, संत भिखन इ. भक्तांनी संत नामदेवांच्या पावलांवर पाऊल ठेवून रचनांची निर्मीती केली. शिख धर्मांचे संस्थापक व पहिले गुरू नानक देवजी हे भक्ती संत प्रणालीच्या हिंदू कुटूंबात संगोपण झाले. सुरूवातीला गुरू नानक व शिख धर्मांवर मध्ययुगीन भारतातील भक्ती चळवळ शाखेच्या निरगूणी निराकार देव कल्पनेचा प्रभाव होता.[११] गुरू नानकदेव अवतारपूजक नव्हते. त्यांनी नामदेव - कबीरदासांचा मार्ग अनुसरला होता. उत्तरेत सगुणमूर्ती वा अवतारपूजक सत्पूरूषास भक्त म्हटले गेले. जे बहुजन समाजामधून आले आणि प्रस्थापितांविरूध्द ज्यांनी कालोचित मूल्यांसाठी लढा दिला, त्यांना संतमताचे मानले गेले. गुरू नानकदेव या उत्तरभारतीय संतमताचे साग्रही आणि साक्षेपी समर्थक आहेत.[१२]

शिख धर्माच्या इतिहासाची सुरूवात भारतीय उपखंडातील पंजाब भागात १५ व्या शतकात होउन गेलेले शिख धर्माचे पहिले गुरू नानक देवजी यांच्यापासुन होते. धर्माचे रीतरीवाजाची स्पष्टपणे आखणी १३ एप्रील १६९९ ला गुरूगोविंद सिंगाने केली. गुरू गोविंद सिंगानी खालसा पंथाची स्थापना करून शिख समाजाला लढाऊ बनविले. १६व्या शतकातील भारतीय उपखंडाच्या उत्तर-पश्चीम भाग पंजाबच्या सामाजिक, राजकीय परिस्थीती इतिहासाशी जवळून संबंधीत आहे. गुरू नानकदेवांनी सर्वत्र धर्मस्थापना करण्यापेक्षा आपला एक पंथ निर्माण करण्याचा अनाग्रही प्रयत्न केला असे म्हणावे लागते. त्यांचे अनुयायी सर्व समाजाच्या वर्गातील होते. त्यांपैकी काही थोडेच मुसलमान होते. मरदाना हा त्यांपैकी सर्वप्रथम आणि सर्वश्रेष्ठ अनुयायी होता. त्यांच्या जीवनचरित्रात कोणतेही स्वतंत्र असे मुसलमानीपण आढळत नाही. तो सतत गुरूबरोबर होता. बहुधा तळवंडीहून नानकदेव सुलतानपूरला स्थायिक झाल्यावर जे जुने गावाकडील मित्र त्यांच्याबरोबर राहू लागले. त्यांपैकीच मरदाना हा एक मुसलमान होय. या जुन्या मित्रमंडळीत अन्य मुसलमान दिसुन येत नाही. पुढेही निकट शिष्यांत मुसलमानांपेक्षा हिंदूच अधिक आढळतात. ज्या हिंदूनी नानकदेवांना साथ दिली त्यांना 'सिक्ख' म्हणजे गुरूजीचे शिष्य म्हटले गेले. पुढे समाजामध्ये नानकदेवांनी दीर्घ यात्रा करून स्वत:चे विचार मांडले. त्या वेळी त्यांच्या अनुयायांना नानकपंथी अशी संज्ञा रूढ झाली. सिक्ख दीक्षाविधी नानकदेवांच्या काळी सुरू झाल्याचेही प्रमाण मिळत नाही. जे सहज गुरूबरोबर आले ते सिक्ख वा शिष्य झाले. दीक्षाविधी पुढील गुरूंच्या काळात सुरू झाला. तोही फार वैशिष्ट्यपूर्ण आणि वेगळा नाही. हिंदूमध्ये फार पुर्वीपासून 'चरण पाहूल' अथवा गुरूंच्या पाद्यपुजेचा विधी दिसतो. सिक्ख गुरूंनी याचेच सुलभ अनुकरण केले. गुरूंचे पाय धुऊन झाल्यावर त्यांच्या स्वच्छ पायाच्या अंगठ्याचे टोक पाण्याला नाममात्र लावून ते पाणी पवित्र मानले जाते. आणि ते प्राशन करणाऱ्याने दीक्षा घेतली असे मानण्यात येते.[१३]

इ.स.१५५६ ते इ.स.१७०७ च्या दरम्यान भारतातील मुगल राजवटीत, शिख धर्मीयांचे मुगल साम्राज्याशी संघर्ष चालत राहीला. मुगल काळात शिख गुरूंनी इस्लाम धर्म स्विकारण्यास नकार दिल्याबद्दल त्यांची हत्या करण्यात आली. शिखांच्या दहा गुरूपैकी सहा गुरूंचा छळ करण्यात आला.[१४] शिखांचे दोन गुरू गुरू अर्जुन आणि गुरू तेगबहाद्दुर यांचा छळ करून देहदंड देण्यात आला. आणि गुरूंच्या नातेवाईकांची क्रुरपणे हत्या करण्यात आली. इतर अगणीत शिख धर्मातील व्यक्तींना छळ करून त्यांना मारण्यात आले. इस्लामी राज्यकर्त्यांकडुन इस्लाम धर्म न स्विकारल्याबद्दल आणि शिख आणि हिंदुवर होणाऱ्या अत्याचाराचा विरोध केला गुरू तेगबहाद्दूर यांची हत्या करण्यात आली. शिखांचे दहावे गुरू गुरू गोविंद सिंग यांच्या कारकिर्दीत खालसा पंथाच्या द्वारे शिखांनी शस्त्र हाती घेतले व प्रतिकार करण्यास सुरूवात केली.

गुरू नानक यांच्या शिख धर्मांतील निरगुणी निराकार भक्ती त्यांच्या बालपणातील हिंदू कुटूंबातील सहवासामूळे झाला. त्याचप्रमाणे त्या काळात असलेली भक्ती चळवळीचा देखील त्यांच्यावर चांगला परीणाम झालेला दिसून येतो, हे खालील वाक्यावरून दिसून येते.

I. "Historically, Sikh religion derives from this nirguni current of bhakti religion."[१५]

II. "Technically this would place the Sikh communitys origins at a much further remove than १४६९, perhaps to the dawning of the Sant movement, which possesses clear affinities to Guru Nanaks thought sometime in the tenth century. The predominant ideology of the Sant parampara in turn corresponds in many respects to the much wider devotional Bhakti tradition in northern India."[१६]

III. "In its earliest stage Sikhism was clearly a movement within the Hindu tradition; Nanak was raised as Hindu and eventually belonged to the Sant tradition of northern India."---{Sikhism,Encyclopaedia Britannica,२०१४}.

गुरू नानकांनी शीख अनुयायांचा नवा संप्रदाय प्रचलित केला. आपल्या चार महायात्रांच्या निमित्ताने त्यांनी अनेक तिर्थक्षेत्रांना भेटी दिल्या. मक्का, मदिना, श्रीलंका, तिबेट,इ. देशांना भेटी देऊन भाई मरदानाच्या मदतीने कीर्तनाच्या मार्ग अवलंबला. आपल्या जीवनात गुरू नानक यांनी खुप दुरवर प्रवास केला. इ.स.१४९६ साली वयाच्या २७ व्या वर्षापासून पुढे ३० वर्ष सतत प्रवास करुन त्यांनी तिबेट, दक्षीण एशीया, अरबियाला भेट दिली.[१७] गुरू नानकांनी अनेक भक्तांच्या वाण्या संग्रहीत केल्या होत्या. त्यात विशेष करून १५० वर्षापूर्वी होवून गेलेल्या संत नामदेवांच्या रचनाचा समावेश होतो. शीख संप्रदायाला समन्वयवादी विचारांची परंपरा लाभली तसेच वंशपरंपरेने गुरूपद द्यावे हाही प्रघात नव्हता. जातीचांही श्रेष्ठ नि कनिष्ठ असा आधार न घेता गुरूपद ठेवले. शिख धर्मांची सुरूवात अल्प प्रमाणात झाली असली तरी शक्तीशाली व दिव्य शक्ती प्राप्त शिख गुरू नानक देव शिख धर्म प्रमुख स्थापण्याचे श्रेय जाते. ग्यानरत्नावती दशमगुरू

गोविंदसिंह यांच्या ज्ञानवंत दरबारचे अभ्यासू शिष्य भाई मणिसिंह यांनी तयार केली. इ.स.१७५१ मध्ये बाबा किरपालसिंगानी महिम प्रकाश हे आद्य गद्य नानकचरित्र लिहिले.[१८]

श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये वाणींची संख्या ५८७३ असून सहा गुरूंची वाणीसंख्या ४९४९ एवढी आहे. पंधरा भक्तांची वाणीसंख्या ७८४ व निकटवर्तीयांची १७ एवढी आहे तर भाटांच्या वाणींची संख्या १२३ आहे. श्री गुरूग्रंथसाहिबाला ११ वा शेवटचा गुरू मानल्या जाते. शिख धर्मांचे संस्थापक व पहिले गुरू नानक देव यांच्या ९७४ पदांचा समावेश गुरूग्रंथसाहिबामध्ये आहे.[१९] सामान्यत: गुरू अर्जुनदेवजीच्या पूर्वीपासूनच गुरू मंडळीत रचना लिहून ठेवण्याची प्रथा प्रचलित होती. गुरू अर्जुनदेवांनी संकलित, संपादित केलेल्या गुरूवाणी संग्रहाचे मूळा नाव 'पोथी साहिब / बीड साहिब' असे होते. गुरू अमरदासांच्या नातवाने संकलित केलेल्या 'गोविंदवाल पोथी/मोहनपोथी' चेच परिवर्द्धित संस्करण होय.[२०] शीख बांधवांसमोर ठेवण्यात आलेला पहिला मोठा ग्रंथ म्हणून त्याला आदिग्रंथ अशी संज्ञा रूढ झाली. गुरू अर्जुनदेवांनी भाई गुरूदास यांच्या मदतीने रचनेला पोथी स्वरूप दिले. अर्जुनदेवांनी गुरू मंडळींच्या वाणींचे संकलन करून लिखारी संतराम, हरिआ, सुखा आणि मंसाराम यांच्याकडून रचना लिहून घेतल्या व भाई गुरूदास यांना देवून ग्रंथात समाविष्ट केल्या. गुरू अर्जुनदेवांची वाणी संगीतात्मक असून कवीतांना त्यांनी छंदोबध्द केले. संगीताच्या सर्जनेसाठी छंदाचा उपयोग प्राचीन काळापासून होत होता. मांत्रिक छंद आणि वर्ण छंद हे दोन प्रकारचे छंद असतात.

परिश्रमपूर्वक गुरू अर्जुनदेवांनी वाणीचे संकलन केले. गुरू अर्जुन यांची सर्वांत मोठी उपलब्धी म्हणजे त्यांनी शिखांचा पवित्र धर्मग्रंथ गुरुग्रंथसाहिब चे केलेले संकलन होय.[२१] रामसर येथे सूर्योदयापासून ते सूर्यास्तापर्यंत बसून भाई गुरूदासजी यांच्या कडून वाणीचे लिखाण करून श्री 'गुरूग्रंथसाहिब' ग्रंथ तयार केला. ग.वि.गाडगीळ यांच्या मते, आदिग्रंथ म्हणजे शीख आणि अन्य धर्मीय साधुसंतांच्या भक्तीमय वाणीचे संमेलन आहे. ग्रंथात कुठेच चमत्कार पहावयास मिळत नाही. तात्विक विवेचनापेक्षा श्रध्दांचे स्पष्टीकरण केले आहे. गुरू अर्जुनदेवजीद्वारे संकलित केलेला आदिग्रंथ जो पांडू लिपीत होता तो करतारपूर येथे सुरक्षित आहे असा मतप्रवाह आहे, परंतु त्यात सत्यता आढळत नाही. गुरूजींच्या उपस्थितीत सवंत १६६२ मध्ये आदिग्रंथाची एक प्रतिलिपी तयार केली गेली. त्या प्रतिलिपीला 'बुढे संधु किंवा बीड' या नावाने संबोधले जाते. पाकिस्तान निर्मितीच्या पूर्वी रावळपिंडी मोहल्ला सय्यदपुरी दरवाजा भल्ले बावियाँ च्या डेऱ्यात ही प्रत होती. करतारपूर येथे सुरक्षित असलेली 'बीड' ही गुरू अर्जुनदेवजीद्वारे संपादित केलेली मूळ प्रत आहे असे मत मांडले आहे.

३६ वाणीकारांच्या रचनेचे महत्वपूर्ण स्वरूप म्हणजे 'गुरूग्रंथसाहिब' होय. 'गुरूग्रंथसाहिब' हा गुरूतूल्य धर्मग्रंथ होय. गुरू नानकांनी आपला उत्तराधिकारी म्हणून आपल्या कुळांची निवड न करता आपल्या आवडत्या शिष्याची म्हणजेच गुरू अंगदाची गुरूपदासाठी निवड केली. गुरू अगंदांनी 'गुरूमुखी'

लिपी प्रचलित करून नानकांनी सुरू केलेल्या 'लंगर' व्यवस्थेला सार्वजनिक स्वरूप प्रदान केले. शिख गुरूद्वाराच्या प्रांगणात लंगरचा व्यवस्थापणात गुरू अंगदानी खुपच सुधारणा केली, त्याठिकाणी दुर-जवळचे तिर्थयात्री सामुदायीक प्रणालीत मोफत जेवण भेटते.[२२] गुरू अंगदानंतर गुरू परंपरा प्रवाहित राहिली. गुरु अंगदांनी 'माल बनारा' ही परंपरा सुरू केली, त्यात शारीरीक आणि आध्यात्मिक योग क्रिया केल्या जातो. शिखांचा धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबामध्ये गुरू अंगद यांनी ६२-६३ पदांची रचना केली.[२३] गुरू परंपरा टिकवीत असतांना अनेक संकटांना गुरूंना सामोरे जावे लागत होते. म्हणून गुरू गोविंदसिंग यांनी ४ ऑक्टोंबर १७०८ रोजी गुरू परंपरा खंडित केली. त्यांनी सर्व शिख धर्मीयांना 'गुरू मानीयो ग्रंथ' हा आदेश देऊन देहरूपी गुरू परंपरा समाप्त केली. 'गुरू मानीयो ग्रंथ' याचा अर्थ असा होतो की यानंतर शिखांचा गुरू हा 'गुरूग्रंथसाहिब' हा असेल. सर्व शीख अनुयायांनी ग्रंथालाच गुरू मानावे असे सांगितले त्याप्रमाणे आजही हा आदेश मानला जातो. पंचककारच्या द्वारे या संप्रदायाने आपले अस्तित्व टिकवून ठेवले. मानवतावाद वैश्विक समानता मानून संत नामदेवांनी आपले धर्मविषयक चिंतन प्रगट केले होते म्हणूनच जातीवाद, धर्मभेद, वर्णभेद इ.च्या पलिकडे जावून त्यांनी प्रेम, सहिष्णुतेचा व एकतेचा संदेश दिला जो शीख परंपरेने उचलला.

गुरूग्रंथसाहिबामध्ये संत नामदेव महाराज यांनी ६१ पदे,[२४] संत त्रिलोचन महाराज यांनी ४ पदे व संत परमानंद यांची १ पदांचा समावेश आहे. गुरूग्रंथसाहिबामध्ये संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद या तीन मराठी संतांचा समावेश आहे. लुइस फेनेच यांच्या मताप्रमाणे, "शिख परंपरेचे मुळ भारतीय संत परंपरेची विचारधारा विस्तृत होऊन भक्ती पंथात सापडतात."

नानकदेवांचे हे सारे कार्य संत नामदेव आणि संत कबीर यांच्या पध्दतीचेच आहे. नामदेवांनी भक्तीसाधनेला नवे विचार दिले. कबीरदासांनी ते विचार अत्यंत परखड शैलीत मांडले. नानकदेवांचे काव्य नामदेवांप्रमाणे सौम्य आहे. पण कार्यपध्दती कबीरदासांपेक्षा अधिक प्रभावी आहे. ते भारतीय संत आंदोलनाचा पुढचा टप्पा गाठणारे मध्यकालीन हिंदू धर्मसूधारक ठरतात.[२५]

## १.२ विषय निवडीचा हेतू :-

शिख धर्म पंथाच्या उदयाच्या २-३ शतकापूर्वीचा पार्श्वभूमीत संत नामदेवांनी रूजविलेले तत्त्वज्ञान सुप्त स्वरूपात होते याची प्रचिती 'गुरूग्रंथसाहिब' या शीख धर्मग्रंथातील संत नामदेवांच्या ६१, संत त्रिलोचन यांच्या ४, संत परमानंद यांच्या १ पदांवरून व या धर्म तत्वज्ञानाच्या एकतावादी, एकेश्वरवादी, निर्गुण ईश्वरवादी व मानवतावादी संकिर्तनप्रमी भूमीकेवरून येते. संत नामदेवांचे पंजाबातील दिर्घकालीन वास्तव्य व आजतागायत त्यांच्या शीख धर्मपंथीयांना असलेल्या आठवणी याचा अभ्यास करूनच 'गुरूग्रंथसाहिब' मधील शीख धर्मांचे तत्त्वज्ञान व चिंतन उलगडता येवू शकतो यासाठी "शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील

मराठी संताचे योगदान - एक अभ्यास" यासाठी हा विषय निवडण्यात आला त्याचप्रमाणे शिख धर्मांत मराठी संतांच्या पदांना जे स्थान देण्यात आले त्याचा उलगडा करण्यासाठी हा विषय निवडण्यात आला. शिख धर्मग्रंथ 'गुरूग्रंथसाहिब' यामध्ये सर्वधर्मसमभावाच्या तत्त्वानुसार वेगवेगळ्या जाती-धर्मांच्या महान विद्वान संत महापूरूषांच्या पदांना स्थान देण्यात आले त्यामागचे कारण शोधून काढणे. शीख धर्म व इतर धर्म यांतील साम्य शोधून काढणे व त्याचा अभ्यास करणे. शीख धर्मांतील धर्मग्रंथाच्या तत्वाचा अभ्यास करणे. शीख धर्मांतील गुरूपरंपरा अभ्यासणे. शीख धर्मग्रंथाची निर्मीती कशी झाली याचा अभ्यास करणे. शीख धर्मातील कोणत्या तत्वांमुळे हा धर्म जगात लोकप्रिय होत आहे याचा अभ्यास करणे. शीख धर्मांतील धर्मग्रंथाची निर्मीती व त्यातील ३६ वाणीकारांचा अभ्यास करणे. शीख धर्मांतील चालीरीती, रूढी, परंपरा, आचार-विचार धर्मकल्पना याचा अभ्यास करणे. मराठी संतांचे भारतीय धर्म परंपरेतील योगदानाचे अध्ययन करणे. भारतीय भक्ती चळवळीतील मराठी संतांचे योगदानाचे आकलन करणे. भारतीय प्रमूख धर्मांपैकी शीख धर्माच्या धर्मग्रंथातील मराठी संतांच्या भूमिकेचे आकलन करणे. शीख धर्मग्रंथाच्या अध्ययनातून मराठी संतांचे साहित्य अभ्यासणे. भारतीय धर्मपरंपरेतील समन्वयवादी भूमिका अभ्यासणे. शीख धर्मग्रंथातील संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद या मराठी संताचे योगदान अभ्यासणे. मराठी संतांच्या कार्याला उजेडात आणणे. भारतीय राष्ट्रीय, धार्मिक व सांस्कृतिक विकासात मराठी संतांची भूमिका विषद करणे.

**१.३ संशोधन पध्दती :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" हा शोधप्रबंध कार्यात प्राथमिक व दुय्यम साधनांच्या आधारे वर्णनात्मक व विश्लेषनात्मक संशोधन पध्दतीचा वापर करण्यात आला आहे. नामदेवगाथा, गुरूग्रंथसाहिब, नामदेवांची माहिती देणारे प्राथमिक पुरावे व त्यांच्याविषयीच्या ग्रंथाशी प्राथमिक संकलित माहितीची जुळवणी करून अन्वयार्थ प्राप्त केले आहेत.

I. **सर्वेक्षण :-** संत नामदेवांच्या पदस्पर्शाने पुनीत व त्याच्या आठवणी जोपासण्याच्या तसेच शीखांच्या केद्रांचे सर्वेक्षण केले आहे व त्यांचे आधार वापरलेले आहेत. सर्वेक्षण पध्दती विषयी ब्लॅक स्टॉम आणि हर्ष म्हणतात की, "Gathering informations about a large number of people by interviewing a few of them" ही माहीती ग्रंथिक माहितीशी जुळवून तिचा वापर केला आहे.

II. **स्थळ भेटी - संत नामदेव पदस्पर्श पुनीत स्थळास भेटी :-** संत नामदेवांनी ज्या ज्या ठिकाणी भेटी दिलेल्या आहेत त्या ठिकाणी उपलब्ध असलेल्या साहित्यांनी मूळ साहित्यासोबत तुलना करणे. त्यांचा मार्ग, जनसंपर्क, व त्याचे स्थायी स्वरूपाचे पुरावे जनमानसातून पंजाब, नांदेड, बिदर,पतियाळा व नव्याने उभारलेल्या नर्सी नामदेव , पंढरपूर इ. ठिकाणचे गुरूव्दारे व धर्मस्थळे पाहून त्यांचे संदर्भ जुळविले आहेत.

III. **नामदेवांच्या भ्रमण मार्गाचा अभ्यास करणे** :- तेराव्या व चौदाव्या शतकात नामदेवांनी ज्या मार्गाने परिक्रमण केले त्या मार्गांचा अभ्यास करून, नकाशा तयार करून ऐतिहासिक मूल्यांचा शोध घेतला आहे.

IV. **व्यक्ती व संस्था भेटी :-** संत नामदेवांच्या तत्त्वज्ञान व परंपरेशी निष्ठ असलेल्या संस्था, ज्या गावात त्यांनी अधिक काळ व्यतित केलेला आहे त्या ठिकाणच्या संबंधितांच्या भेटी घेवून माहितीची जमवाजमव केली आहे.

V. **मौखिक माहितीचे संकलन :-** संत नामदेव व संत त्रिलोचन व संत परमानंद या संताविषयीच्या लोकमानसातील मौखिक माहितीचे संकलन करून तत्कालिन संत साहित्याशी त्याची जुळवणी करून ऐतिहासिक तथ्ये जमविली आहेत.

VI. मराठी संत (संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद) यांचा पंजाबमधील किंवा शीख विचार परंपरेशी आलेला संबंध येण्यास कारणीभूत ठरणाऱ्या घटनांचा आढावा घेतला आहे.

VII. **ग्रंथाचे आधार :-** संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद यांचा शीख धर्मांशी संबंध येण्याच्या पूर्वीची सामाजिक परिस्थिती व आगमनानंतर झालेला सुधारणांचा साहित्यातून आढावा घेतला आहे.

VIII. **उपेक्षित व अप्रकाशित साहित्य** :- आजपर्यंत अध्ययनातून उपेक्षित राहिलेल्या साहित्याची व अप्रकाशित हस्तलिखीते, विखुरलेले साहित्याचा संशोधनपूर्ण अभ्यासातून स्वतंत्र अन्वयार्थ व स्पष्टीकरणे देऊन सामान्यीकरण दिली आहेत.

IX. **आधुनिक तंत्र व साधनांचा वापर :-** आधुनिक संशोधन पध्दतीचा व तंत्राचा वापर करून इतिहास लेखनशास्त्राच्या वस्तुनिष्ठ मांडणीसाठी व संशोधनातून गृहितके सिध्द करण्यासाठी संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद व शीख धर्मांचा अभ्यास करण्यासाठी प्रश्नावलीतून व्यक्तीभेटीच्या वेळी प्रश्न विचारून त्या माहितीचे इतर साधनांशी दुवे जुळविले आहेत.

X. **प्रश्नावली :-** शीखांच्या विविध संस्था, प्रमुख व्यक्ती, इ.शी अनेक वेळा भेटून तोंडी प्रश्न विचारून व नोंदी घेऊन व ध्वनीमुद्रित स्वरूपात माहिती मिळविली आहे.

**१.४ साहित्य :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संताचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधाचे प्राथमीक साहीत्य म्हणून श्री 'गुरूग्रंथसाहिब' व 'नामदेव गाथा' याचा वापर करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे आधूनिक इतिहासामध्ये लिहील्या गेलेली इतर साहित्याचा देखील वापर करण्यात आला आहे. तसेच संशोधन ही एक कौशल्यपूर्ण व व्यावसायीक कृती असल्याने संशोधकाला आधारसामग्रीचे संग्रहण, मापण करण्यासाठी काही संशोधन साधनांचा वापर करावा लागतो. तसेच संशोधनातून नव-नवीन ज्ञान निर्मीती होत असते.

**I. प्राथमिक साधने :-**

a) मंदिरे व मूर्त्या यांचा अभ्यास करून शीखांची गुरूद्वारे (प्रार्थना मंदिरे) पाहून संत नामदेवांची मंदिरे व मूर्त्या अभ्यासण्याच्या दृष्टीने भेटी घेवून माहिती संकलित केली आहे. गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत (संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद) यांची पदे अभ्यासून त्यांचा अर्थ संकलित केला आहे.

b) श्री गुरू ग्रंथ साहिब, नामदेव गाथा, नामदेवांच्या जीवनाविषयी माहिती देणारी मुळ कागदपत्रे, हस्तलिखीते, पोथ्या, मुलाखतीव्दारे संकलित केली आहे. त्याच्या जुळवणीतून सत्यशोध घेतला आहे.

c) आधुनिक संशोधनाला पूरक साधने कॅसेट, फोटो, इंटरनेट इ. चा वापर करून माहिती मिळवली आहे.

d) स्थळभेटी (नर्सी नामदेव जि. हिंगोली, औढा (नागनाथ), पंढरपूर व घुमान पंजाब), व्यक्तीभेटी, शीख धर्म व संत नामदेवांविषयी माहिती देणारी धर्मस्थळे, यात्रास्थळे अभ्यासून ऐतिहासिक तथ्याची पडताळणी व सत्याचा शोध घेतला आहे.

**II. दुय्यम साधने :-**

मुळ साहित्याला आधार मानून तयार करण्यात आलेली साधने उदा.श्री 'गुरूग्रथसाहिब' च्या विषयी माहिती देणारे ग्रंथ, स्थानिक भाषेत लिहीलेले साहित्य उदा. जोशी श.पु.- पंजाबातील नामदेव, तुळपुळे श.गो.- पाच संतकवी, नामदेव दर्शन-स. इनामदार या व इतर अनेक ग्रंथातील माहितीचा उपयोग करून घेतला आहे. नियतकालिके, वर्तमानपत्रे इ. मधील लेख, नामदेवांचे चरित्र मांडणारे ग्रंथ अभ्यासून त्यामागील मूळ आधार शोधले आहेत. संत त्रिलोचन, संत परमानंद यांच्या विषयी माहीती एकत्र करण्यासाठी ग्रंथाचा वापर करण्यात आला आहे. सेलटीज या पध्दतीस Literary Review Research मूळ असे म्हणतो. सर्व साधनांचा वापर करून, पडताळणी करून योग्य माहितीचे संकलन केले आहे. सदर अंतिम शोध प्रबंध लिखानासाठी वापरलेले संदर्भग्रंथसूची ही जोडण्यात आली आहे.

**१.५ संशोधनाची व्याप्ती :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या प्रबंधाचे संशोधन करत असतांना श्री 'गुरुग्रंथसाहिब' आणि त्यातील मराठी संत (संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद) या तीन संतांना समोर ठेवून संशोधन करण्याचा प्रयत्न केला आहे. संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद या तीनही संताची पदे श्री 'गुरूग्रंथसाहिब' मध्ये घेण्यात आली अशी एकून ६६ पदांचा समावेश अभ्यास सदरील संशोधनात करण्यात आला आहे. "शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या संशोधन विषयात संशोधन करत असतांना गुरूग्रंथसाहिबामध्ये असलेली प्रमुख तीन मराठी संतांचा परिचय, त्यांची गुरूग्रंथसाहिबातील हिंदी पदे, त्याचप्रमाणे श्रीगुरूग्रंथसाहिबाची निर्मीती कशाप्रकारे झाली हे सुध्दा सदर संशोधनात घेण्यात आले आहे. शीख धर्माची निर्मीती, गुरू परंपरा, गुरुग्रंथसाहिबाची निर्मीती, गुरूग्रंथसाहिबातील ३ मराठी संत व त्यांची पदे याचा अभ्यास करण्यात आला आहे.

**१.६ संशोधनातील मर्यादा:-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या प्रबंधाचे संशोधन करत असतांना अनेक मर्यादा आल्या आहेत. ३६ वाणीकारांच्या मदतीन गुरू अर्जुन देवानी गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती केली आहे. त्यापैकी मराठी संताची माहिती व पदे शोधतांना संशोधकाला बऱ्याच मर्यादा आल्या आहेत. व 'गुरूग्रंथसाहिब' ही पंजाबी व गुरूमुखी भाषेत असल्यामुळे संशोधनात बऱ्याच अडचणींनां तोंड द्यावे लागले. संशोधन करत असतांना मिळालेली साहित्य हे देखील पंजाबी व गुरूमुखी भाषेत मिळाल्यामुळे संशोधन करत असतांना त्याचे मराठी भाषेत भाषांतर करतांना संशोधनात अडचणी आल्या आहेत. तरी नांदेड येथील गुरूद्वाऱ्यात भाषांतरकांच्या मदतीने सदर दस्ताऐवज भाषांतरीत करून घेण्यात आली आहेत.

**१.७ संशोधनाची गृहितके :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या विषयाचे संशोधनाची गृहितके खालील प्रमाणे आहेत.

१. संत नामदेवांची ६१ पदे, संत त्रिलोचनाची ४ पदे, संत परमानंदाची १ पद श्री गुरूग्रंथसाहिब या शीखांच्या पवित्र ग्रंथात आहेत. यावरून शीख धर्मांच्या दृष्टीने मराठी संत (संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद) हे ईश्वराचे दूत ठरतात.

२. शीख संप्रदाय मराठी संताचे अध्यात्मिक श्रेष्ठत्व मान्य करतो.

३. संत नामदेवांचे, संत त्रिलोचन, संत परमानंदाचे जीवनकार्य शीख संप्रदायाच्या जीवनमूल्यांशी सुसंगत आहे.

**१.८ पुर्व संशोधनाचा आढावा :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या विषयाचे संशोधन करत असतांना पुढील प्रमाणे पुर्व संशोधनाचा आढावा खालील प्रमाणे आहे.

"संत नामदेवाचे शिख धर्मातील योगदान" या विषयावर डॉ. गोविंद भालेराव यांनी शोधप्रबंध सादर केला आहे. या प्रबंधाचा आढावा घेण्यात आला आहे. सदर शोध प्रबंधात संत नामदेव महाराज यांच्या शिख धर्मांतील कार्यावर माहिती घेण्यात आली आहे परंतु संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद या तीन मराठी संतांच्या कार्याची माहितीवर प्रकाश टाकण्यासाठी अथवा मराठी संतांची माहिती घेण्यासाठी मराठी संतांची माहिती प्रबंधात घेण्यात आली आहे.

**१.९ प्रकरण नियोजन :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधाचे नियोजन करतांना अध्ययनाच्या दृष्टीकोनातून ७ प्रकरणात प्रबंधाची विभागणी करण्यात आली आहे. ती प्रकरणे खालीलप्रमाणे आहेत.

१) **प्रकरण पहिले :- प्रस्तावना**

प्रस्तूत प्रकरणात प्रबंधाची प्रस्तावना करण्यात आली असून, त्यामध्ये संपूर्ण प्रबंधातील संशोधनाची पार्श्वभूमी, संशोधनातील विविध पैलूंची माहिती थोडक्यात देण्यात आली आहे. धर्म म्हणजे काय ? याची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. प्राचिन काळापासून ते आधुनिक काळापर्यंतची धर्मांची माहिती देण्यात आली आहे. त्यानुसार शीख धर्मांच्या स्थापनेपूर्वीची पार्श्वभूमी, समकालीन धर्म पंथाचा शीख धर्मावर पडलेला परीणाम, बौध्द धर्म, जैन धर्म, चार्वाक संप्रदाय, वारकरी संप्रदाय, भक्ती चळवळ इ. धर्मांची माहिती, शीख धर्मांची स्थापना कशी झाली ? याचा धावता आढावा घेण्यात आला आहे. मराठी संत व वारकरी संत यांची माहिती घेण्यात आली आहे. संत नामदेव महाराज यांचे माहिती यात घेण्यात आली आहे. शीख धर्मांच्या इतिहासाची सूरूवात भारतीय उपखंडात केव्हा झाली याची माहिती घेण्यात आली आहे. गुरू नानक यांचा हिंदू कुटूंबातील सहवासामूळे शिख धर्मातील निरगुणी, निराकार भक्तीचा परीणाम झाला याची माहिती देण्यात आली आहे. शीख धर्मातील गुरू परंपरा, शीख धर्मांचा धर्मग्रंथ 'गुरूग्रंथसाहिब' या ग्रंथाची निर्मीती कशी झाली याची देखील धावता आढावा घेण्यात आला आहे. त्याचप्रमाणे गुरूग्रंथसाहिबात ३६ वाणीकारांची माहिती थोडक्यात घेण्यात आली आहे. 'गुरूग्रंथसाहिब' या ग्रंथात मराठी संतांची माहिती घेण्यात आली आहे. याचा धावता आढावा घेण्यात आला आहे.

या प्रकरणात विषय निवडीचा हेतू घेण्यात आला आहे. शिख धर्मग्रंथ 'गुरूग्रंथसाहिब' यामध्ये सर्वधर्मसमभावाच्या तत्त्वानुसार वेगवेगळ्या जाती-धर्मांच्या महान विद्वान संत महापूरूषांच्या पदांना स्थान देण्यात आले त्यामागचे कारण शोधून काढणे. शीख धर्म व इतर धर्म यांतील साम्य शोधून काढणे व त्याचा अभ्यास करणे. शीख धर्मातील धर्मग्रंथाच्या तत्वाचा अभ्यास करणे. शीख धर्मातील गुरूपरंपरा अभ्यासणे. शीख धर्मग्रंथाची निर्मीती कशी झाली याचा अभ्यास करणे. शीख धर्मातील कोणत्या तत्वांमुळे हा धर्म जगात लोकप्रिय होत आहे याचा अभ्यास करणे. त्याचप्रमाणे कोणती संशोधन पध्दती वापरण्यात आली याची माहिती घेण्यात आली आहे. त्याचप्रमाणे संशोधनासाठी कोणते साहित्य वापरण्यात आले याची माहिती घेण्यात आली आहे. संशोधनाची व्याप्ती मध्ये मराठी संत नामदेव, त्रिलोचन, परमानंद यांची माहिती घेण्यात आली आहे. संशोधनातील मर्यादा यात समावेश करण्यात आला आहे. संशोधन कार्य करत असतांना कोणती गृहितके वापरण्यात आली आहेत याची माहिती देण्यात आली आहे. व या प्रकरणात संशोधन शोधप्रबंधात कशाप्रकारे प्रकरण नियोजन करण्यात आले आहे याची माहिती देण्यात आली आहे.

**२) प्रकरण दुसरे :- शीख धर्मांचा इतिहास**

प्रस्तूत प्रकरणात धर्म म्हणजे काय? धर्माची निर्मीती कशामुळे झाली ? त्याचप्रमाणे हिंदु धर्माची सविस्तर माहीत यात घेण्यात आली आहे. हिंदु धर्म, निर्मीती, हिंदु धर्मातील देवस्थाने, हिंदु धर्माची तत्वे, हिंदु धर्माचा विकास कसा झाला याची माहीती घेण्यात आली आहे. त्याचप्रमाणे जैन धर्माची निर्मीती कशी झाली ? जैन धर्मात तीर्थकार परंपरेचा अभ्यास, जैन धर्मातील धार्मिक स्थळे याची माहीती त्याचप्रमाणे जैन धर्माची

माहिती यात घेण्यात आली आहे.  शीख धर्मांची स्थापनेपूर्वीची माहिती घेण्यात आली आहे.  शीख धर्म गुरू नानक यांनी स्थापन केली त्या मागील उद्देश काय होता याची माहिती यात घेण्यात आली आहे. शीख धर्मांचा इतिहास या प्रकरणात घेण्यात आला आहे. प्रस्तूत प्रकरणात धर्म म्हणजे काय ? धर्माची निर्मीती कशामुळे झाली ? त्याचप्रमाणे हिंदु धर्माची सविस्तर माहीत यात घेण्यात आली आहे. हिंदु धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? त्याचप्रमाणे जैन धर्माची निर्मीती कशी झाली ? जैन धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? जैन धर्मांत तीर्थकार परंपरेचा अभ्यास, जैन धर्मातील धार्मिक स्थळे याची माहीती त्याचप्रमाणे जैन धर्मांची माहिती यात घेण्यात आली आहे.  शीख धर्मांची स्थापने पूर्वीची माहिती घेण्यात आली आहे. बौध्द धर्मांची निर्मीती कशी झाली ? बौध्द धर्मांचे संस्थापक कोण होते ? बौध्द धर्मांचा विकास कसा झाला ? बौध्द धर्मांतील महत्वाची स्थळे कोणती ? बौध्द धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? बौध्द धर्मांची माहिती घेण्यात आली आहे. त्यानंतर मुस्लीम धर्मांबद्दल माहिती घेण्यात आली आहे. मुस्लीम धर्मांची निर्मीती कशी झाली ? मुस्लीम धर्मांतील पवित्र स्थानांची नावे कोणती ? मुस्लीम धर्मांचा विकास कसा झाला ? मुस्लीम धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? मुस्लीम धर्मांची माहिती घेण्यात आली आहे. ख्रिश्चन धर्मांचा विकास कसा झाला ? ख्रिश्चन धर्मांचा विकास कसा झाला ? ख्रिश्चन धर्मांतील पवित्र स्थळ कोणती आहेत ? ख्रिश्चन धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? ख्रिश्चन धर्मांची माहिती घेण्यात आली आहे. पारशी धर्मांची शीख धर्मांची स्थापना कोणी केली ? पारशी धर्मांचा संस्थापक कोण आहे ? पारशी धर्मांची प्रमुख पवित्र स्थळे कोणती? पारधी धर्मांचे धर्म चिन्ह कोणते ? पारशी धर्मांची माहिती घेण्यात आली आहे.

गुरू नानक यांनी शिख धर्मांची स्थापना केली त्या मागील उद्देश काय होता याची माहिती यात घेण्यात आली आहे. शीख धर्मांचा इतिहास या प्रकरणात घेण्यात आला आहे. शीख धर्मांची स्थापना कशी झाली ? शीख धर्मांचा विकास कसा झाला ? शीख धर्मांतील प्रमुख संकल्पना घेण्यात आल्या आहेत. शीख धर्मांच्या उदयाची कारणे कोणती याची माहिती घेण्यात आल्या आहेत. शीख धर्मांची शिकवण कोणती ? शिख धर्मांतील गुरू परंपरेचा विकास कसा झाला ? गुरू नानक यांनी इतर धर्मांचा अभ्यास करून कशा प्रकारे सर्व धर्मांतील चांगल्या गोष्टीचा समावेश शीख धर्मांत केला. शीख धर्मांच्या उदयाची कारणे कोणती आहेत. शीख धर्मांची शिकवण कोणती आहे. शीख धर्मांचे तत्वज्ञान कोणते आहे. शीख धर्मांत 'गुरू' या संकल्पने बद्दल माहिती, गुरूग्रंथाची निर्मीती कशी झाली, गुरूवाणी म्हणजे काय ? गुरूद्वारा म्हणजे शीखांचे उपासना मंदीर याबद्दल माहीती घेण्यात आली आहे. भारतातील काही प्रमुख गुरूद्वाऱ्याची माहीती घेण्यात आली आहे. शीख धर्मांतील ईश्वर ही संकल्पना कशा प्रकारे आहे याची माहीती घेण्यात आली आहे. शीख धर्मांतील 'शबद्' या संकल्पनेबद्दल माहीती घेण्यात आली आहे. ईश्वरभक्ती व नामस्मरण म्हणजे काय ? शीख धर्मांतील मोक्ष, माया, याबद्दल माहीती घेण्यात आली आहे. शीख धर्मांतील वैयक्तीक जीवन व सामाजीक जीवन कशाप्रकारे असते याची माहीती घेण्यात आली आहे. कारसेवा, अखंड पाठ, साधारण पाठ म्हणजे काय याची माहीती घेण्यात आली आहे.

'अरदास' म्हणजे काय ? 'किरतन' म्हणजे काय ? शिख धर्मातील धार्मिक सण कसे साजरे केले जातात. नामकरण, अम्रीत संचार, आनंद कारज, अंतम संस्कार म्हणजे काय याची माहीती घेण्यात आली आहे. 'गुरू का लंगर' या सेवेबद्दल माहीती घेण्यात आली आहे. त्याचप्रमाणे शीख धर्मात कोणत्या गोष्टीची निषेधता मानली जाते याची माहीती घेण्यात आली आहे. शिख धर्मातील खाद्य पध्दती कोणती आहे याची माहीती घेण्यात आली आहे. शीख धर्मांचे तीन आधारस्तंभ कोणते याची माहीती घेण्यात आली आहे. सिमरण, किरात करो, वा-चाक्को, दसवंत, इ. ची माहीती घेण्यात आली आहे. शिख धर्मांची लिपी, 'गुरूमुखी ' याबद्दल माहिती घेण्यात आली आहे, शिख धर्मांचे प्रतिक चिन्ह, खंडा याबद्दल माहिती देण्यात आली आहे. शिख धर्मातील काही संकल्पना घेण्यात आले आहे. जापजी साहीब, चौपाइ, रेहरास, तव प्रसाद सवाइये, सोहिला, कारसेवा, अकाल तख्त, निशान साहिब, इ. ची माहीती घेण्यात आली आहे.

**३) प्रकरण तिसरे :- शीख धर्मातील गुरूपरंपरा**

प्रकरण तिसरे या प्रकरणात शीख धर्मांचा विकास ज्या कारणामूळे झाला तो म्हणजे त्या धर्मांची गुरू परंपरा होय. या गुरू परंपरेचा अभ्यास या प्रकरणात करण्यात आला आहे. शीख धर्मांचे एकूण १० गुरूंची माहिती यात घेण्यात आली आहे. गुरू परंपरेमूळे या धर्मांचा खऱ्या अर्थाने विकास झाला आहे. गुरू परंपरा ही या धर्माला लाभलेली एक देणगीच आहे, त्यामुळेच हा धर्मांचा विकास झालेला दिसून येतो.

गुरूपरंपरेमुळेच मूळच्या संतमतापासून शिख मत स्वतंत्र होत गेले. त्याला प्रथम संघटनेचे, नंतर संप्रदायाचे रूप प्राप्त झाले. पुढे तर अकाल अर्थात तात्कालिकाचा कालातीतात विलय करणाऱ्यांचा पंथ अथवा स्वतंत्र धर्म म्हणूनच शिख धर्माला मान्यता मिळाली. याचे श्रेय गुरूपरंपरेलाच द्यावे लागते.

शिख धर्मांचे संस्थापक गुरू नानक यांचा कार्यकाळ इ.स.१४६९ ते इ.स.१५३९ असा होता. आद्यगुरू गुरू नानक देवजीने शिख धर्मांचा पाया घातला. सर्वांना समान लेखनारा व सर्वांसाठी अत्यंत सुलभ उपासना पध्दती सांगणारा, मूर्तीपूजेला अमान्य करणारा, ज्ञानाची पुजा करणारा हा धर्मग्रंथ पंधराव्या शतकापासून आजपर्यंत विकसीत झाल्याचे दिसून येते. गुरू नानक देवजी आजपर्यंतच्या काळात होऊन गेलेल्या मोठ्या धार्मिक संस्थापकापैकी अग्रगण्य मानले जातात. गुरू नानक यांनी शिख धर्मांचा प्रचार व प्रसारासाठी २४ वर्षे वेगवेगळ्या चार तीर्थयात्रा केल्या, शिख धर्मात या यात्रांना विशेष महत्व आहे त्या यात्रेला 'उदासिज' असे म्हणतात. गुरूनानकांच्या कार्यामूळे त्यांना लड्डाख व तिब्बत या भागामध्ये 'लामा' या नावाने ओळखले जातात. गुरू नानक ह्यांना संगीताचे चांगले ज्ञान होते त्याचप्रमाणे ते कवी देखील होते. गुरू नानक यांना फारसी, मुल्तानी, पंजाबी, सिंधी, खडी बोली, अरबी, संस्कृत आणि ब्रजभाषेचे चांगले ज्ञान होते. गुरू नानक यांची ९७४ पदे गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट आहेत. गुरू नानक यांनी जपजी, सिंध घोस्ट, सोहिला, दखनी ओंकारी, आसा-दी-वार, पत्ती, बारह माह यांचे लिखाण केले. विशेषत: शिख धर्माला महाराष्ट्रातील वारकरी सांप्रदायाप्रमाणे सलग सुमारे २४० वर्षे अत्यंत प्रभावी असे गुरू लाभले. दहा गुरूंनी शीखांना उत्तम असा

आचरण मार्ग दाखविला. शीख धर्मातील दहा गुरूंनी या धर्मांच्या विकास आणि वाढीसाठी जे अतोनात परिश्रम घेतले त्यातूनच या धर्माचा चौफेर विकास घडून आला. गुरू नानकदेवजी पासून गुरू गोविंदसिंगापर्यत लाभलेल्या दहा गुरूंनी शीख धर्मीयांना एक नवीन जीवनमार्ग दाखवून दिला.

गुरू अंगद यांचा कार्यकाळ इ.स.१५०४ ते इ.स.१५५२ असा होता. गुरू अंगद देवजी यांनी ईश्वरप्राप्तीसाठी संस्कृत देववाणी असावीच लागते हे अमान्य केले. सर्वसामान्यात बोलली जाणारी भाषा ईश्वराची आराधना करण्यास सोपी व सरळ असते यावर त्यांनी भर दिला. 'गुरूमूखी' लिपीचा शोध लावला. गुरूमूखी लिपी लोकप्रिय झाली. गुरू अंगद यांनी गुरूमुखी लिपी ही शिखांची परंपरागत भाषा बनवली. गुरूमुखी ही भारतीय पंजाबी लिहिण्याची मानदण्ड लिपी आहे. शिख धर्म ग्रंथ व ऐतिहासीक साहित्य हे गुरूमुखी लिपीत लिहील्या जाते. गुरू अंगद यांचे ६३ श्लोक गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत. गुरू अंगद यांनी मल्ल-आखाडा प्रथा सूरू केली. 'गोविंदवाल' नावाचे शहर निर्माण कार्य केले. शिख देवळ प्रागंणात लंगरच्या व्यवस्थापणात गुरू अंगदानी खुपच सुधारणा केली. गुरू अंगद यांनी 'माल बनारा' ही परंपरा सुरू केली, त्यात शारीरीक आणि आध्यात्मिक क्रिया केल्या जात असे. गुरू गोविंद सिंग यांनी गुरू अंगद बद्दल सांगितले की, "सिक्ख नहीं कोई अंगद जैसा".

गुरू अमरदास यांचा कार्यकाळ इ.स.१४७९ ते इ.स.१५७४ असा होता. गुरू अमरदास यांनी मानवामध्ये एकता निर्माण करण्यासाठी जात, पात, स्पृश्य-अस्पृश्यता यांचा प्रमुखपणे विरोध केला. गुरू अमरदास हे शिख बनण्यापुर्वी विष्णु केंद्रीत वैष्णव हिंदु धर्मावलंबी होते. त्यांनी हिमालयात व गंगातिरी हरीद्वारला २० वेळा तिर्थ यात्रा केली. गुरू अमरदास यांनी ८६९ शब्द अथवा श्लोक १७ रागांमध्ये गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत. अनंद, पटी, ४ वारें(राग गूजरी, राग सूही, राग रामकली, राग मारू), हे त्यांच्या प्रमुख रचना आहेत. गुरू अंगद यांनी वसवलेल्या नव्या गोविंदवाल या गावी त्यांनी आपले मुख्यालय स्थापण केले. 'गोविंदवाल' हे शिखांचे प्रमुख केंद्र बनवले. गुरू अमरदास यंनी २२ उपदेश केंद्र अथवा मंजी स्थापण करून शिख धर्मांचा प्रचार व प्रसार केला. शिख धर्म प्रसारासाठी त्यांनी १४० धर्म प्रसारक नेमले, त्यात ५२ स्त्रियांचा समावेश होता. शिख धर्मांमध्ये 'लंगर' प्रथेची सुरूवात गुरू अमरदास यांनी केली. गुरू अमरदास हे भेटीसाठी येणाऱ्या सर्वांनाच प्रथम जेवण करण अत्यावश्यक केले, गुरू अमरदास म्हणत, "पहले पंगत फीर संगत" याचा अर्थ पहिले लंगर ला भेट द्या नंतर गुरूंना भेटा. 'मंजी आणि पिरी' या धार्मिक कार्यांची सुरूवात त्यांनी केली. सम्राट अकबराशी बोलून हिंदू व शिख धर्मांवरील जिजीया कर कमी केले. गुरू अमरदास यांनी सती प्रथेला विरोध करून विधवा पूर्नविवाहास त्यांनी समर्थन दिले. गुरू अमरदास हे सती प्रथेविरोध करणारे पहिले समाजसुधारक होते. स्त्रियांना पडद्यात ठेवणेही त्यांना मान्य नव्हते.

गुरू रामदास यांचा कार्यकाळ इ.स. १५३४ ते इ.स.१५८१ असा होता. गुरू रामदास यांनी समाजाला ही शिकवण दिली की, प्रत्येकातच ईश्वराचा अंश असतो. विशिष्ट व्यक्तींना मंदिर प्रवेश देणे निषीध्द असल्याचे मत त्यांनी मांडले, कोणत्याही प्रार्थना स्थळांना मंदिरांना सर्व मानव जातीला मुक्त प्रवेश असावा, अशी त्यांची धारणा होती. गुरू अमरदासांच्या निवडलेल्या 'गुरू-दा-चाक' ह्या जागी त्यांनी आपले कार्यालय चालविले. नव्याने स्थापलेले हे गाव 'रामदासपूर' म्हणवल्या गेले. ह्याचीच वाढ होत नंतर अमृतसर (शिखांचे पवित्र शहर) म्हणून नावारूपाला आले. शिखांच्या परंपरेत पवित्र शहर 'अमृतसर' वसवण्याच श्रेय गुरू रामदासांना दिल जात. गुरू रामदास यांनी 'मंजी-पध्दती' परीवर्तन करून 'मसंद पध्दती' सूरू केली या पध्दतीमूळे शीख धर्माची खूप प्रगती झाली. शिखांच्या लग्नात नवरा-नवरी क्लॉकवाइज फेऱ्या घालत रामदासांची 'लावण' ही पद म्हणत असतात. 'आनंद आणि लावण' सुही प्रकारातील वेगवेगळ्या भागाची रचना करण्याच श्रेय गुरू रामदास आणि गुरू अमरदास यांना जाते. गुरू रामदास यांचे ६३८ शब्द अथवा वाणी ३० रागांमध्ये गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहे. गुरू रामदास यांनी ८ वारे(सिरी रागु, गउड़ी, बिहागड़ा, वडहंस, सोरठि, बिलावल, सारग व कानड़ा), त्याचप्रमाण आनंद कारज ची लावा वाणी ही प्रमुख रचना त्यांची आहे. गुरुग्रंथसाहिबात ३० राग, ६३८ शबद् , २४६ पौउडी, १३८ श्लोक, ३१ अष्टपदी आणि ८ बारांचा समावेश आहे.

गुरू अर्जुन देवजी यांनी कर्मकांडापेक्षा व यज्ञयागापेक्षा ज्ञानाला विशेष महत्व दिले. प्रत्येक व्यक्तीस आत्मज्ञान प्राप्त करता यावे. म्हणून गुरूमूखी लिपीत गुरूग्रंथसाहिबांची रचना केली. गुरू ग्रंथसाहिबात आत्मानुभव असल्यामुळे त्याच्या आधाराने संसारातील आणि व्यवहारी जीवनातील दु:खाचे निराकरण करता येते. गुरू अर्जुन देवांच्या काळात 'अकाल तख्ताची' अथवा शिख सिंहासनाची पायाभरणी झाली. गुरू अर्जुन देवजी यांनी गुरूग्रंथसाहिबामध्ये २३१२ शब्द, ३० रागांमध्ये आहेत. गुरू अर्जुन यांनी सुखमनी, बारह माहा, बावन अखरी, गुणवंती, अंजुलीआ, बिरहड़े व ६ वारे(राग गउड़ी, गूजरी, जैतसरी, रामकली, मारू व बसंत राग) या प्रमुख रचना आहेत. गुरू अर्जुन यांचे जन्मस्थान हे आता स्मारक 'गुरूद्वारा चौबारा साहिब' म्हणुन प्रसिध्द आहे. गुरू अर्जुन देवजींनी सतीच्या चालीला विरोध करून शिख गुरूंनी स्त्रियांवरील अत्याचारांना एक प्रकारे आव्हानच दिली. गुरू अर्जुन देवाची क्रांतिकारकता विधवाविवाहाला उत्तेजन देण्यात विशेष दिसून येते.

शिखांचे सहावे गुरू हरगोविंद यांचा कार्यकाळ इ.स.१५९५ ते इ.स.१६४४ असा आहे. गुरू हरगोविंद यांनी असे सांगितले की, जर कोणी पुरातन रूढींना चिकटून राहण्यासाठी व स्व-स्वार्थासाठी दुसऱ्यांच्या धर्म आचरणाविरूध्द वर्तन करीत असेल तर अशा व्यक्तींचा नायनाट करणे हे आपले कर्तव्यच आहे. अशा प्रवृत्तीच्या लोकांचा नायनाट करण्यासाठी शस्त्र बाळगण्याची भुमिका प्रतिपादन केली आहे. गुरु हरगोविंद

यांनी अमृतसर मधील हरमंदीराच्या समोर 'अकाल तख्त' ची निर्मीती केली. अकाल तख्त म्हणजे अनन्त काळाचे सिंहासन होय. गुरु हरगोविंद 'मीरी पीरी' ची स्थापना केली. ५२ नंबरचा आकडा त्याच्या जीवनात विषेश प्राधान्याचा होता. त्यांच्या सेवकदारांत ५२ सशस्त्र सैनिक होते. त्याचप्रमाणे गुरु हरगोविंद यांनी 'किरतारपूर' शहर स्थापन केले. शिख प्रार्थना स्थळांना 'गुरूद्वारा' नाव देण्याचे श्रेय गुरूहरगाविंद यांना जाते. गुरू हरगोविंद यांनी मल्लशाळा आणि शस्त्रविद्येचे आखाडे वाढवीत तरूण शिखांना सैनिक बनविले.

शिखांचे सातवे गुरू हरराय यांचा कार्यकाळ इ.स.१६३० ते इ.स. १६६१ असा होता. पुरातणवादी विचारप्रणालीच्या लोकांविरुध्द आवाज उठविण्यासाठी जरी आपण शस्त्र धारण करीत असतो तरी या शस्त्रांचा वापर शीख धर्मीयांनी संयमाने करावा. कोणत्याही परिस्थितीत शस्त्राचा गैरवापर करू नये ही भूमिका त्यांनी मांडली. गुरु हरराय यांनी शिख सैन्य दलाचे पूनर्गठन केले. शिख गुरूंनी एकत्र केलेल्या मोठ्या सैन्याचा सांभाळ करण्यासाठी त्यांची किर्ती होती तरी पण सशस्त्र संघर्ष टाळण्याचा त्यांचा प्रयत्न असे. ते एक आध्यात्मिक पूरूष त्याचप्रमाणे एक यौध्दा देखील होते. गुरु हरराय यांनी किरतपूर येथे एक आयुर्वेदीक जडी-बूटी औषधी दवाखाना आणि संशोधन केंद्र स्थापन केले. गुरु हरराय यांच्या दवाखान्यात 'दारा शूकोह' याला मृत्यूच्या दाढेतून परत आणले. गुरू हर राय यांनी आज्ञा दिली की,"लंगरसाठी शिखांना वेळेचे बंधन घालू नये. कुणी केव्हाही आला तरी त्याचे तेथे स्वागत व्हावे".

शिखांचे आठवे गुरू हरकिशन यांचा कार्यकाळ इ.स.१६५६ ते इ.स. १६६४ असा होता. समाजातील वाईट प्रवृत्तीविरूध्द केवळ शस्त्रास्त्रांचा वापर केला पाहिजे, असे नव्हे तर त्यासाठी प्रत्येक व्यक्तीने आत्मिक शक्तीच्या बळावर मानवास नवीन शक्ती निर्माण केली पाहीजे. गुरु हरकिशन यांनी दिल्लीतील रोगग्रस्त लोकांशी सेवा केली. मूस्लीम लोक या कार्यामूळे त्यांना 'बाला पीर' म्हणू लागले. रोगग्रस्त लोकांची सेवा करत असतांना गुरु हरकिशन यांना तेज ज्वर झाला आणि ३० मार्च १६६४ रोजी त्यांचा मृत्यू झाला.

शिखांचे नववे गुरू तेगबहाद्दुर यांचा कार्यकाळ इ.स.१६२१ ते इ.स. १६७५ असा होता. शीख धर्मीय व्यक्तीने इतरांच्या कल्याणासाठी प्राणाची आहुती देण्यासाठी मागे पुढे पाहू नये. मानव जातीच्या भलेपणासाठी आणि उत्कर्षासाठी शीख धर्मीयाने आत्मसमर्पण करण्याची सदैव तयारी ठेवली पाहीजे. गुरु तेग बहाद्दूर यांची ११५ पदे गुरुग्रंथसाहिबामध्ये आहेत. गुरू तेगबहाद्दुरांनी ११६ शबद्, १५ रागांची रचना केली व त्यांच्या भक्तांनी ७८२ कडवे रचल्याचे श्रेय आहे, शिख संप्रदायाच्या बाणी मध्ये तो भाग आहे. गुरू तेगबहाद्दुरांनी मुगल साम्राज्याच्या विविध भागात प्रवास केला आणि भक्त समुदायांनी बऱ्याच ठिकाणी शिख मंदिर बाधण्याचा प्रस्ताव केला. गुरु तेग बहाद्दूर यांनी आनंदपूर साहीब शहराची निर्मीती केली. संपूर्ण भारतभर प्रवास केला. गुरुग्रंथसाहिबातील स्लोक महाल ९ खूप प्रसीद्ध आहे. त्यांच्या कार्याचा गुरूग्रंथसाहिबात समावेश आहे. गुरूग्रंथसाहिबात वेगवेगळया विषयाचा समावेश आहे. उदा. ईश्वराचा स्वभाव, मानविय

अनुराग, शरीर, मन, दुःख, सन्मान, सेवा, मृत्यु, मुक्ती इत्यादी. शिखांचे नववे गुरू तेगबहाद्दुर यांना 'भारताची ढाल', 'तलवारीची शक्ती असणारा', 'नववे गुरू', 'खरा राजा' या नावाने सुध्दा ओळखले जाते.

शिखांचे दहावे गुरू, गुरू गोविंद सिंग यांचा कार्यकाळ इ.स. १६६६ ते इ.स. १७०८ असा होता. गुरू गोविंद सिंग यांनी शीख धर्मात 'खालसा पंथाची' स्थापना केली. पंचप्यारे ज्यांनी धर्म रक्षणसाठी बलिदान दिले ते हुतात्मे यांची परीक्षा घेतली. तसेच खालसा पंथ स्थापन करण्याचे श्रेय गुरू गोविंद सिंग यांना जाते. त्यांनी गुरूग्रंथसाहिबालाच गुरू मानावे असे सांगून मानवी गुरू परंपरा बंद केली. गुरू गोविंद सिंग यांची तिसरी पत्नी साहिब देवान ह्यांचा शिख धर्मात प्रभावी सहभाग होता. गुरू गोविंद सिंगानी तिला 'खालसाची आई' म्हणुन जाहीर केले. गुरु गोविंदसिंग हे अध्यात्मीक गुरु, योद्धा, कवी व विचारवंत होते. गुरु गोविंद सिंग यांनी जाप साहिब, चांदी-दी-वार, तव-प्रसाद, सावैये, झाफरनामह, बाचीत्तर नाटक, अकाल उस्तात, चौपाई, इ. चे लेखन केले. इ.स.१६८४ मध्ये त्यांनी पंजाबी भाषेत चांगल आणि वाईट ह्यातील युध्दाबद्दल 'चंडी-दि-वार' दंत कथा लिहीली.

शिखांचे दहावे गुरू गोविंदसिंग यांनी इ.स.१६९९ मध्ये खालसा पंथाची स्थापना केली. खालसा याचा शब्दशा अर्थ 'शुध्द जन' असा होतो. गुरू गोविंद सिंगानी गुरूग्रंथसाहिबात केलेल्या साऱ्या रचनाचा विषय 'मानवी मन' हाच आहे. गुरू गोविंद सिंग हे उच्च प्रतिचे कवी होते. गुरू गोविंद सिंगांनी देहरूपी गुरूंची परंपरा बंद करून गुरूग्रंथसाहिबालाच गुरू मानावे असा शिख बांधवाला संदेश दिला. प्रकरण तिसऱ्यामध्ये गुरू परंपरा व तीचा विकास कसा झाला याची माहिती देण्यात आली आहे.

### ४) प्रकरण चवथे :-गुरुग्रंथसाहिबाची निर्मीती

प्रस्तूत प्रकरणात गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती कश्या प्रकारे झाली याची माहिती घेण्यात आली आहे. शिखांचे पाचवे गुरू अर्जुन देव यांनी गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती केली यासाठी त्यांना ३६ वाणीकारांची मदत घेतली होती या वाणीकारांमध्ये इतर धर्मांतील सुध्दा व्यक्तींचा समावेश होतो. गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती कश्याप्रकारे झाली याचा पुर्ण उहापोह या प्रकरणात घेण्यात आला आहे. त्याचप्रमाणे गुरूग्रंथसाहिबातील वेगवेगळ्या संकल्पना यात स्पष्ट करण्यात आल्या आहेत. गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती कश्याप्रकारे झाली हे या प्रकरणात घेण्यात आले आहे. गुरू अर्जुन यांनी शिखांचा गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती कश्याप्रकारे केली याची माहीती घेण्यात आली आहे. गुरूग्रंथसाहिबामध्ये ५८७३ वाणींची संख्या आहे याची माहीती घेण्यात आली आहे. त्याचप्रमाणे गुरूग्रंथसाहिबाचे महत्त्व घेण्यात आले आहे.

गुरू अर्जुन देवजी यांनी संपादीत केलेल्या गुरूग्रंथसाहिबाचे स्वरूप सगळ्यांना समजावे म्हणुन ही गुरूग्रंथसाहिबा तीन भागात विभागली आहे याची माहिती देण्यात आली आहे. गुरूग्रंथसाहिबामध्ये प्रथम शिख गुरू यांची वाणी क्रमानुसार, संतांची वाणी, भट्टांची वाणी, गुरशिखांची वाणी असा क्रम देण्यात आला आहे,

याची माहिती देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे गुरूग्रंथसाहिबातील मुलमंतर याची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. गुरूग्रंथसाहिबातील पदे व त्यांचे लेखक याची माहिती देण्यात आली आहे. गुरूग्रंथसाहिबातील संतांची अथवा भक्तांची चरित्रे घेण्यात आली आहेत. बाबा फरीद यांची ११६ पदे, संत रविदास यांवी ४० पदे , संत नामदेव यांची ६१ पदे, संत कबीर यांची ५३२ पदे, संत भक्त धन्ना यांची ३ पदे, संत श्री सेना महाराज यांची १ पदे, भक्त पीपाजी यांची १ पदे, भक्त सूरदास यांची १ पदे, भक्त जयदेव यांची २ पदे, स्वामी रामानंद यांची १ पदे, भक्त परमानंद यांची १ पदे, संत त्रिलोचन यांची ४ पदे, भक्त साधना यांची १ पदे, भक्त भीखनजी यांची २ पदे, भक्त वेणीजी यांची ३ पदे, इ. इतर भाषीक संतांच्या पदे व त्या संताची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे.

गुरूग्रंथसाहिबामधील शिख गुरूंची पदे यामध्ये गुरू नानक यांची ९७४ पदे, गुरू अंगद यांची ६३ पदे, गुरू अमरदास यांची ८६९ पदे, गुरू रामदास यांची ६३८ पदे, गुरू अर्जुन यांची २३१२ पदे, गुरू तेगबहाद्दुर यांची ११६ पदे यांची माहीती याप्रकरणात घेण्यात आली आहे.

गुरूग्रंथसाहिबातील भाटांच्या पदे यामध्ये भट हरिबंसजी यांची २ पदे, भट बल्हजी यांची ५ पदे, भट मथुराजी यांची १४ पदे, भट गयंदजी यांची १३ पदे, भट नल्हजी यांची १६ पदे, भट भल्हजी यांची १ पदे, भट सल्हजी यांची ३ पदे, भट भिखाजी यांची २ पदे, भट किरतजी यांची ८ पदे, भट जालपजी यांची ५ पदे, भट कलसहारजी यांची ५४ पदे अशी एकून १२३ भाटांची पदे घेण्यात आली आहेत, याचे सविस्तर वर्णन या प्रकरणात घेण्यात आले आहे.

गुरूग्रंथसाहिबातील गुरसिक्खांच्या पदे यामध्ये राय बलवंड यांची ५ पदे, भाई सत्ताडूम यांची ३ पदे, बाबा सूंदरजी यांची १ पदे, भाई मरदाना यांची १ पदे, अशी एकून १० गुरसिक्खांची पदे घेण्यात आली आहे, याची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. त्याचप्रमाणे गुरूग्रंथसाहिबातील पदांचे राग कोणते आहेत याची देखील माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे.

**५) प्रकरण पाचवे :-गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत व त्यांचे योगदान**

प्रकरण पाचवे हे गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत व त्यांचे योगदान याबद्दल आहे. या प्रकरणात गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांची माहिती देण्यात आली आहे. मराठी संतांमध्ये संत नामदेव महाराज, संत त्रिलोचन, संत परमानंद या तीन संतांचा समावेश आहे. संत नामदेव महाराज यांची ६१ पदे गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत. संत त्रिलोचन यांची ४ पदे, तर संत परमानंद यांची १ पद गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहे. या पदांचा व संतांचा अभ्यास सदर प्रकरणात करण्यात आला आहे. मराठी संतांनी लिहलेल्या पदांची माहिती, अर्थ, विश्लेषण अन्वयार्थ इ. ची माहिती या प्रकरणात घेतली आहे.

संत नामदेव महाराज व त्यांचे गुरूग्रंथसाहिबातील ६१ पदे यांची माहीती व त्या पदांचा अर्थ आणि त्या पदांची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. संत नामदेव महाराज यांच्या जीवन चरीत्राबद्दल माहिती यात घेण्यात आली आहे. संत त्रिलोचन महाराज यांची ४ पदे व त्या पदांचा अर्थ आणि त्या पदांची माहिती

या प्रकरणात घेण्यात आली आहे. संत त्रिलोचन महाराज यांचे जीवन परीचय यांत घेण्यात आला आहे. संत परमानंद यांचे १ पदे व त्या पदांचा अर्थ आणि त्या पदांची माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. संत परमानंद यांची देखील माहिती या प्रकरणात घेण्यात आली आहे. या प्रकरणात गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत व त्या संतांची पदे व त्यांचे योगदान याबद्दल माहिती घेण्यात आली आहे.

**६) प्रकरण सहावे :- उपसंहार , निष्कर्ष आणि शिफारशी , परिशिष्ट्ये, व संदर्भग्रंथ सूची**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधाचे प्रकरण सहावे हे प्रबंधातील शेवटचे प्रकरण आहे. यामध्ये संपूर्ण शोधप्रबंधाच्या लिखानातून काही निष्कर्ष उत्पन्न झाले आहेत याचा समावेश या प्रकरणात केला गेला आहे. प्रस्तूत प्रकरणात संपूर्ण शोधप्रबंधाचा उपसंहार घेण्यात आला आहे. गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत समोर ठेवून त्यांचे अवलोकन करण्यात आले आहे. गुरूग्रंथसाहिबात मराठी संतांची पदे घेण्यात आली आहेत. संत नामदेव महाराज यांची ६१ पदे घेण्यात आली आहे त्या पदांचा अर्थ घेण्यात आला आहे ती पदे या महान धर्मांच्या धर्मग्रंथात का घेण्यात आली आहे याचे सविस्तर विवेचन घेण्यात आले आहे. संत त्रिलोचन महाराज यांची ४ पदे गुरूग्रंथसाहिबात घेण्यात आली आहेत त्या चार पदांचा अर्थ सविस्तर घेण्यात आला आहे. त्याचप्रमाणे संत परमानंद महाराज यांची १ पद घेण्यात आले आहे, ह्या पदाचा अर्थ घेण्यात आला आहे. या मराठी संतांची पदे व त्याचा अर्थ घेण्यात आला आहे व त्यावरून उपसंहार काढण्यात आला आहे. शीख धर्मांच्या धर्मग्रंथात गुरूग्रंथसाहिबात मराठी संतांचे स्थान का मिळाले ? याचे सविस्तर विवेचन या प्रकरणात घेण्यात आले आहे. गुरूग्रंथसाहिबात मराठी संताचे स्थान व योगदान यांचे महत्त्व अधोरेखित करण्यात आले आहे.

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधात निष्कर्ष देखील काढण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे गृहितकृत्याची सिध्दता देखील सिध्द करण्यात आली आहे. व संशोधना अंती काही शिफारशी दिल्या आहेत.

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधात परीशिष्टये या भागात शीख गुरू, मराठी संत व गुरूद्वारा यांची छायाचित्रे घेण्यात आली आहेत.

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधात मराठी संतांची जी पदे आहेत त्या पदांतील कठीण शब्द देखील वेगळ्या टेबलच्या सहाय्याने घेण्यात आली आहेत.

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधात शेवटी संशोधन करतांना वापरण्यात आलेले साहित्याची यादी म्हणजेच संदर्भग्रंथाची यादी देण्यात आली आहे.

**<u>संदर्भ ग्रंथ :-</u>**

१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१७.

२. कित्ता, पृ.क्र.१७.

३. लोखंडे शशिकान्त, (२००८). संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास,प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली, पृ.क्र.५.

४. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, पृ.क्र.१९४.

५. Jayapalan N., (२००१). History of India, Atlantic Publication, p.no.१६०.

६. Singh H.S., (२००५). Sikh Studies, Book ७, Hemkunt Press, p.no.१९.

७. Singh Pashaura ; Louis E.Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Oxford University Press, Oxford, p.no.२३६-२३८.

८. बॅनर्जी इंदुभूषण, (१९३६). इव्होल्यूशन ऑफ दि खालसा, भाग एक, कलकत्ता विश्वविद्यालय प्रेस, कलकत्ता, पृ.क्र.२९.

९. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.४७.

१०. Louis Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Editors:Pashaura Singh, Louis E.Fenech, Oxford University Press, p.no.३४.

११. Ibid, p.no.३४.

१२. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.३३४.

१३. कित्ता, पृ.क्र.३०७.

१४. Gandhi Surjit, (२००७). History of Sikh Gurus, Lotus Press Publication, p.no.१२४.

१५. David Lorenzen, (१९९५). Bhakti Religion in Norht India: Community Identity and Political Action, State University of New York Press, New York. p.no.१-२.

१६. Louis Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Editors:Pashaura Singh, Louis E.Fenech, Oxford University Press,Oxford. p.no.३५.

१७. Jagbir Johal, (२०११). Sikhism Today, Bloomsbury Academic, p.no.१२५.

१८. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.४७.

१९. Chistophar Shackle ; Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus: Selections from the Sikh Scriptures, Routledge, p.n.xvii-xix, ISBN ९७८-१-१३६-४५१०८-९.

२०. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५).संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, पृ.क्र.३४.

२१. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.११७.

२२. Singh Pashaure ; Louis E.Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Oxford Unversity Press, p.no.३१९.

२३. Shackle, Christopher, Mandair, Arvind Pal Singh, Teachings of the Sikh Gurus: Selections from the Sikh Scriptures, United Kingdom, Routledge, p.no.xviii.

२४. लोखंडे शशिकान्त, (२००८).संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास,प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली, पृ.क्र.५.

२५. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.३१८.

## प्रकरण २

# शीख धर्मांचा इतिहास

**प्रस्तावना :-**

सर्वच प्राथमिक वा उच्च धर्म अलौकिक शक्तीचे दोन प्रकार मानतात. (१) पवित्र तारक वा उपकारक. उदा. माना, कॅरिझ्म, पुण्य, तीर्थंकर, बोधिसत्व, प्रज्ञापारमिता, देव, अहूर मज्द, ताओ, परमात्मा, अल्ला इ. आणि त्याच्या उलट, (२) अपवित्र, पतनकारक अथवा अपकारक. उदा. असुर, राक्षस, पाप, सैतान, मार इ. शब्दांनी त्यांचे वर्णन करतात. अपवित्र शक्तींचा संसर्ग होणार नाही असे वर्तन करणे, हे माणसाचे कर्तव्य ठरते. सर्व उच्च धर्मांचे तीन महत्वाचे विषय सांगता येतात.

(१) सत्याचा वा अस्तित्वाचा संपूर्ण अर्थ व त्यात जीवनाचे स्थान; अंतिम सत्य व ध्येय यांची एकरूपता.

(२) जीवनाचे सत्यस्वरूप आणि जीवनाची धार्मिक परिणती किंवा रूपांतर.

(३) जीवनाच्या उच्चतम उद्देशाचे साधन व जीवनातील अन्य उद्देशांची आणि त्या उद्देशांची आणि त्या उद्देशांच्या साधनांची अंतिम उद्देशाची आणि त्याच्या साधनांशी संगती घालणे आणि विसंगती टाळणे. विसंगती अपवित्र शक्तीशी संबंध आल्याने उत्पन्न होते.[१]

वर जी धर्माची सामान्य व्याख्या व उच्च धर्माची विशेष व्याख्या अशा दोन व्याख्या सांगितल्या, त्या सर्वसंमत होतील असे म्हणता येत नाही. त्याचे कारण असे की, भूतकालीन अस्तंगत मानवी समाज संस्कृतीच्या अनेक पातळ्यांवर जगत होते व त्यांच्यामध्येही निरनिराळ्या पातळीवरच्या धर्मसंस्था होत्या, असे इतिहासपूर्वकालीन संस्कृतीच्या अभ्यासकांनी म्हटले आहे. गेल्या दोनशे वर्षात पृथ्वीवरील संस्कृतीच्या उच्चनीच पातळ्यांवर जगणाऱ्या विद्यमान मानवी समाजांमध्येही धर्म या संज्ञेस पात्र अशा संस्था आणि मानवी प्रवृत्ती आढळून येतात; त्या सर्व धर्मांची व्यापक, समर्पक, सर्वसंमत व्याख्या करणे कठीण आहे. जे. एच्.ल्यूबा यांनी धर्मांच्या निरनिराळ्या व्याख्या सांगून स्वत:च्याही अधिक दोन व्याख्या सांगितल्या आहेत. त्या सर्वांचा विचार करत विल्यम जेम्स याने असे म्हटले आहे, की यांपैकी कोणतीही व्याख्या अपुरीच पडते; धर्म हा जगातील सर्व धर्मांचा केवळ समष्टिबोधक अस्पष्ट अर्थाचा शब्द आहे. भिन्नभिन्न मानवी प्रवृत्तींप्रमाणे आणि संस्कृतीच्या उच्चनीच स्तरांप्रमाणे धर्मांची सामान्य व्याख्या त्याने सांगितली. त्याच्या मते, धार्मिक जीवनातील श्रध्देचे पुढील पाच भाग होत.

(१) दृश्य जगत हा उच्च अशा चैतन्यमय विश्वाचा भाग असून त्या विश्वाकडूनच या जगताला मुख्य अर्थ प्राप्त झाली आहे.

(२) त्या उच्चतम विश्वाशी निगडित करणारा संवादी संबंध स्थापित करणे, आपले वास्तव्य ध्येय आहे.

(३) त्या चैतन्याशी-त्याला ईश्वर म्हणा वा नियामक तत्व म्हणा - प्रार्थनेने किंवा अंतरंगाचा संबंध स्थापण्याने पूर्ण समाधान प्राप्त होते आणि त्यामुळे चैतन्यशक्तीचा या दृश्य विश्वात प्रवाह दिसू लागतो; मानसिक व भौतिक अशी इष्ट फले प्राप्त होतात, ती अशी :

(४) नवीन उत्साह प्राप्त होतो, दिव्य सौंदर्यानुभवाने मन भारले जाते किंवा धैर्य व शौर्य निपजते.

(५) पूर्ण सुरक्षिततेचे आश्वासन मिळते, शांत मन:स्थिती प्राप्त होते आणि इतरांबद्दलच्या शुध्द प्रेमाने मन भरून जाते.

जेम्सने धर्मांचा वरील जो निष्कर्ष काढला, तो ऋषी, संत, प्रेषित, गूढानुभव घेणारे योगी इत्यादिकांच्या वैयक्तीक धर्मानुभवांच्या आधारे काढला आहे, संघटित संस्थारूप सामाजिक धर्माचे निष्कर्ष त्याने काढण्याचे टाळले आहे.[२]

**२.१ समकालीन इतर धर्म व शीख धर्म :-**

**२.१.१) हिंदू धर्म :-**

हिंदु धर्माला वैदिक धर्म किंवा सनातन धर्म असे देखील म्हटले जाते. वेद व वैदिक तत्वज्ञानावर आधारलेल्या आर्याच्या धर्मसंकल्पनेला 'वैदिक धर्म' असे म्हणतात. नंतरच्या सुधारलेल्या परावर्तित धर्माला हिंदु धर्म व सनातन धर्म अशी नावे आहेत. सनातन शब्दाचे अति प्राचीन, पुरातन, अजरामर, सार्वकालिक व सर्वश्रेष्ठ असे अनेक अर्थ आहेत. वैदिक धर्म हा भारतातील व जगातील प्राचीन धर्म आहे. जगातल्या यहुदी, कॉन्फ्युशियस व ख्रिश्चन धर्मांच्या मालिकेल वैदिक धर्माची गणना होते. आणि राष्ट्रात वैदिक हिंदु धर्माचा फार मोठा प्रभाव आहे. हा धर्म संख्यात्मकतेपेक्षा गुणात्मक दृष्ट्या श्रेष्ठ आहे. वेद, ब्राम्हण्यके, उपनिषदे, गीता, सूत्रे, स्मृती व धर्मशास्त्रामधुन वैदिक धर्मांची माहिती मिळते. सार्वकालिकता, वैश्विकता, सहिष्णुता, भौतिकता, परिवर्तनशीलता, अध्यात्मिकता व वैचारिक स्वायत्तता ही वैदिक धर्माची वैशिष्ट्ये आहेत. जीवनाच्या सर्व अंगोपांगांना व्यापून टाकण्याचे सामर्थ्य ह्या धर्मात आहे. समाज जीवनाला स्थैर्य देण्याची शक्ती त्यात आहे. वैदिक धर्मांची व्याख्याच 'सा धारयसी धर्म।' समाजाची धारणा करणारा (स्थैर्य) धर्म अशी केलेली आहे. म्हणूनच वैदिक धर्माचे आधुनिक भाष्यकार डॉ.राधाकृष्णननी ह्या धर्माचे वर्णन हिंदु जीवनाचा राजमार्ग अशा शब्दात केलेले आहे. वैदिक धर्माने भारतीय समाज व राष्ट्राचा राजनैतिक, सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक उन्नतीचा मार्ग अधोरेखित केला. धर्म, विज्ञान व मानवी जीवनाची उत्तम सांगड घालण्याचा प्रयत्न वैदिक ऋषिमुनींनी केला. मानवी जीवन सर्वोन्न्त व सर्वांगसुंदर बनविण्याचा आदर्श त्यांनी घालून दिला. जीवनाची व्यापकता व कृतार्थता त्यांना उमगलेली होती. वेद-निर्माते आर्यच जीवनाचे श्रेष्ठ भाष्यकार होते. स्थूलमानाने इ.स.पू.१५००- इ.स.पू.५०० हा वैदिक संस्कृतीचा कालखंड मानला जातो, ह्याच काळात वैदिक धर्माचा उदय व विकास झाला.[३] ह्या धर्मात समाविष्ट असलेल्या देवता, उपासना,

कर्मकांड, वर्णाश्रम धर्म, पुरूषार्थ, संस्कार, ऋणे व वैदिक संकल्पनाचा येथे आढावा घेतलेला आहे. 'ओम व स्वस्तिक' हे चिन्ह हिंदू धर्माचे प्रतिक मानले जाते.[४]

आर्यांनी सनातन वैदिक धर्माची स्थापना केली. वेद, ब्राम्हण्यके, उपनिषदे व धर्मशास्त्रांमधून त्यांचे स्वरूप स्पष्ट केले. यज्ञविधी, तपाचरण, चिंतन, ज्ञानमार्ग, व धर्मविधी इत्यादी उपासना पध्दती निर्माण केल्या. इंद्र, वरूण, विष्णु, रूद्र, प्रजापती, ब्रम्हदेव व ब्रम्ह ह्या प्रमुख देवता होत्या.[५] संस्कृत भाषेचा धर्मासाठी उपयोग केला परंतु कालौघात वैदिक धर्मांत अनेक दोष निर्माण होऊन तो क्लिष्ट बनला. तशातच जैन व बौध्द धर्मांमूळे त्याची पिछेहाट झाली. अशा स्थितीत वैदिक धर्मियानी त्यात परिवर्तन करण्यास आरंभ केला. पूर्वीची धार्मिक क्लिष्टता नाहीशी करून व त्यात नवीन संकल्पनांची भर घालून तो जास्त लोकाभिमुख करण्याचा प्रयत्न सुरू झाला. अशा रीतीने वैदिक धर्मांच्या पुनरूज्जीवन प्रक्रियेमधून गुप्तकालीन हिंदूधर्माची भरभराट झाली. वैदिककालीन विष्णु, शिव, शक्ती, सूर्य, राम, कृष्ण, स्कंद, गणपती इत्यादी देवतांची आराधना सुरू झाली. प्रत्येक देवतांची स्वतंत्रपणे उपासना करणाऱ्या शैव, वैष्णव, शाक्त व सौरपंथाचा उदय झाला. ईश्वराच्या सगुण साकार स्वरूपाला प्राधान्य दिल्याने मूर्तीपूजेस आरंभ झाला. विविध देवतांची मंदिरे बांधण्यात आली. महाकाव्य, गीता व पुराणांनी प्रचीन वैदिक धर्माचे स्वरूप सुबांध पध्दतीने सांगितले. संस्कृतबरोबरच इतर प्रादेशिक भाषांमधून धर्मग्रंथ रचण्यात आले. अनेक लहान मोठे पंथेपंथ निर्माण होऊन त्यांनी बहुजन समाजापर्यत धर्म पोहोचविण्याचे कार्य केले. असंख्य विव्दान आचार्य व संतांनी धर्म ग्रंथाची निर्मिती करून पंथप्रसाराची धुरा सांभाळली. राज्यकर्त्यांनी मोठमोठे यज्ञ केले. परंतु पूजाअर्चा, व्रतवैकल्ये, धर्मोत्सव, धर्मयात्रा व पुराण वाचन इत्यादी सगुण भक्तीचा सोपा उपासना मार्ग बहुजन समाजासाठी सांगितला. आचारधर्म व नीतीमूल्यावर भर दिला. सर्वसामान्य माणसाला कल्याणाचा मार्ग दाखविणारा असा हिंदू धर्म गुप्तकाळात अत्यंत लोकप्रिय झाला.[६]

वैदिक धर्म हिंदूधर्माचा पाया होता. तो वेदप्रामाण्यवादी होता. वेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, गीता, धर्मशास्त्र व पुराणे हे प्रमुख आधार ग्रंथ होते. अनेक आचार्य व संतांनी धर्मग्रंथात भर घातली. शिव, विष्णु, रुद्र, वरूण, इंद्र, सूर्य, ब्रम्हदेव, राम, कृष्ण, पार्वती, अंबा, लक्ष्मी, जगदंबा, सत्ती, चामुंडी, कार्तिकेय, स्कंद व गणपती ह्या प्रमुख देवता होत्या. विष्णुच्या दशावताराला प्राधान्य होते. कर्मकांड व ज्ञानमार्गाऐवजी सगुण साकार भक्ती हा प्रमुख उपासना मार्ग होता. ऋग्वेदकाली दुय्यम स्थानी असलेल्या विष्णूने पुढील पौराणिक हिंदुधर्मात देवत मंडलांतील सर्वश्रेष्ठ स्थान मिळविले. त्याच्या मोठेपणाची बीजे ऋग्वेदात सापडतात.[७] विविध देवतांची सगुणरुपात भक्ती करणे, पूजा करणे, अनन्यभावे शरण जाणे व परमात्म्य स्वरूप होणे हा मानवी कल्याणाचा व जीवनमुक्तीचा अथवा मोक्षाचा सुबोध मार्ग होता. ईश्वराच्या मूर्ती पूजेला अनन्यसाधारण महत्व होते. विविध देवतांची स्वतंत्र भक्ती करणाऱ्या शैव, वैष्णव, शाक्त, सौर, तांत्रिक, भागवत, चैतन्य, लिंगायत, अलवार व नायनार इत्यादी संप्रदायांच्या उदय झाला.[८] ह्या धर्मपंथांनी हिंदू धर्माच्या अभिवृध्दीस फार मोठा हातभार लावला. विविध पंथांचे धर्म पंडित, आचार्य, संत, महात्मे, साधू व

धर्म सुधारकांनी धर्म प्रसाराची धुरा नेटाने सांभाळली, त्यांच्या निस्वार्थी कार्यामुळेच हिंदूधर्म भारतातील सर्वसामान्य माणसापर्यंत पोहोचू शकता. नंतरच्या काळातील शंकराचार्य, रामानुजाचार्य, माधवाचार्य, निंबार्क, चैतन्य महाप्रभु, ज्ञानेश्वर, तुकाराम, मीराबाई, सुरदास, कबीर, नरसी मेहता, नायनार व अल्वार ह्या विद्वान संतांनी हिंदूधर्माचा पताका भारतभर फडकावली.[९] त्यांच्याच प्रयत्नामुळे परकीयांपासून भारतीय धर्मांचे रक्षण होऊ शकले. त्यांनी प्रादेशिक भाषेत धर्मग्रंथाची रचना केली. ह्या विभुतींनी हिंदुधर्माची इमारत भक्कम केली. नवोदित हिंदूधर्माने आचार धर्मावर भर दिला. निवृत्तीमार्गाऐवजी प्रवृत्ती मार्गाला प्राधान्य दिले. वैदिक यज्ञविधी व कर्मकांडाला विरोध न करता धर्माचरणाचा सोपा मार्ग सांगितला. चार पुरूषार्थांना महत्व दिले परंतु संस्कार गौण मानले. प्रपंचात राहून परमार्थ करण्याचा राजमार्ग बहूजन समाजाला सांगितला.[१०] आदर्शवार, नीतीमूल्ये, धर्मरक्षण, सदाचरण, पितृभक्ती , गुरूसेवा, पातिव्रत्य, राजनिष्ठा, लोकसेवा, दृढभक्ती आणि दुष्टांचा नाश, सद्‌गुणांची वृध्दी, योग्य संस्कार व आत्मकल्याण ह्या उच्च मानवी मूल्यांना धर्मात अग्रस्थान दिले. मूर्तीपूजा, ईश्वरभक्ती, भजन-कीर्तन, व्रतवैकल्ये, तीर्थयात्रा, धर्मविधी, धर्मोत्सव व पुराण श्रवण ह्या उपासना मार्गाचा हिंदुधर्माने स्वीकार केला. थोडक्यात भक्ती पंथावर आधारलेला परावर्तीत वैदिक धर्म व्यापक हिंदू धर्माच्या रूपाने गुप्तकाळात अस्तित्वात आला. लवचिकता व सहिष्णुता हिंदू धर्माचे गुण विशेष आहेत.[११]

हिंदू महत्वाची तीर्थक्षेत्रे - त्रिस्थळी यात्रा: प्रयाग, काशी व गया या तीन तीर्थांच्या अत्यंत पुण्यकारक यात्रेला हिंदू लोक त्रिस्थळी यात्रा असे म्हणतात.[१२] प्रयाग येथे गंगा, यमुना आणि सरस्वती यांचा त्रिवेणी संगम होतो. या संगमातील स्नानाचे महत्व ऋग्वेदातही सांगितले आहेत. पुराणांनी प्रयागला तीर्थराज म्हटले आहे. येथे सालंकृत कपिलेचे दाने करणे पुण्यकारक मानले जाते. येथील संगमावर व महाभारत यांचे मत आहे. अक्षयवट हा येथील अनेक उपतीर्थापैकी प्रमुख होय. माघ महिन्यात त्रिवेणी संगमावर स्नान करणे हे अत्यंत पुण्यकारक मानले जाते.

काशी हे हिंदूंना सर्वात पूज्य वाटणारे क्षेत्र आहे. हे गेली तीन हजार वर्षे पवित्र मानले जात आहे. काशी ही सप्त मोक्षदायक पुऱ्यांपैकी पहिली असून येथील विश्वेश्वर बारा ज्योतिर्लिंगापैकी एक आहे. काशीला वाराणसी, बनारस, अविमुक्त, रूद्रावास, आनंदकानन, महाश्मशान अशी इतर नावे असुन लोक अंत्यकाळी येथे येऊन देहत्याग करतात. विश्वेश्वर किंवा विश्वनाथ ही येथील सर्वात महत्त्वाची देवता होय. दशाश्वमेध, लोलार्क, भैरव, धुंडिराज वा ढुंढिराज, केशव, बिंदुमाधव आणि मणिकर्णिका यांचे दर्शन येथे आवश्यक असते. काशीची पंचक्रोशी हे पवित्र तीर्थ आहे. यात्रेकरू तेथे जाऊन आल्यावर स्नान करून साक्षिविनायकाच्या दर्शनाला जातात.

गया - गया येथे 'गय' नावाच्या असुराने ब्रह्मदेवाच्या यज्ञासाठी आपले शरीर दिले म्हणून या तीर्थाला गया हे नाव प्राप्त झाले. येथे 'आदिगदाधर' हा देव आहे. पितृश्राध्दासाठी हे अत्यंत प्रसिध्द आहे. गयेची यात्रा सात दिवस चालते.[१३] धर्म, कर्म, मोक्ष आणि पुर्ण जन्मावर विश्वास त्या संकल्पाना हिंदु धर्मात फार महत्वपुर्ण

आहेत. हिंदु धर्मात जन्म आणि मृत्यु पुन्हा-पुन्हा घेत राहुन ह्या चक्रातुन मुक्ती व मोक्ष नंतरच ह्यावर विश्वास ठेवतात.[१४]

चार धामांची यात्रा : भारताच्या चार टोकांची चार धामे पुढीलप्रमाणे आहेत. बद्रीनाथ हे धाम हिमालयात आहे. व्दारका हे धाम पश्चिमेस समुद्रकिनारी गोमतीवर आहे. ही भगवान कृष्णाची नगरी होती. जगन्नाथपुरी पुर्वेस ओरिसातील समुद्रकिनाऱ्यावर जगन्नाथपुरी हे पुरूषोत्तमतीर्थ हे धाम आहे. येथील मंदिरात कृष्ण, बलराम व सुभद्रा यांच्या मूर्ती आहेत. जगन्नाथमंदिरात जातिभेद मानला जात नाही. येथे पोर्णिमेच्या दिवशी समुद्रस्नान करणे विशेष पुण्यकारक मानले जाते. रामेश्वर-दक्षिणेस समुद्रकिनाऱ्यावर असलेले हे धाम बारा ज्योतिर्लिंगामध्ये गणले जाते. रामाच्या स्मृतीशी निगडित असलेली अनेक तीर्थे येथे आहेत. काशी - रामेश्वराची यात्रा ही हिंदूंची सर्वात महत्त्वाची यात्रा मानली जाते.[१५] काशी, कांची, मायापुरी अथवा हरिव्दार, अयोध्या, व्दारावती अथवा व्दारका, मथुरा आणि अवंतिका अथवा उज्जैन अथवा उज्जयिनी या सात क्षेत्रांना हिंदू मोक्षदायक सप्तपुऱ्या मानतात.[१६] कांची - दक्षिणेतील हे विख्यात वैष्णव क्षेत्र, शाव क्षेत्र व शाक्त क्षेत्र आहे. येथील विष्णूचे 'वैकुंठ पेरूमल मंदिर' आणि 'शिवाचे कैलासनाथ मंदिर' अत्यंत प्रसिध्द आहे. हिंदू धर्मात शिवलिंगे अनंत असली, तरी त्यांपैकी बारा शिवलिंगे प्रधान मानली जातात व त्यांनाच ज्योतिलिंगे म्हटले जाते.[१७] शिख धर्म आणि हिंदु धर्म यातील समानते मध्ये दोघेही शिख आणि हिंदु मृत्युनंतर शवाचे अग्नी दहन करतात. दोघेही कर्म आणि पुर्णजन्मावर विश्वास ठेवतात. हिंदु आणि शिख गुरू पध्दतीचा आदर करतात. हिंदु आणि शिख 'स्व आणि आत्मा' यांचे वर्णन करण्यासाठी आत्मा ह्या शब्दाचा वापर करतात.[१८]

**२.१.२)जैन धर्म :-**

इ.स.पु.सहाव्या शतकात जैन व बौध्द धर्मांचा उदय झाला. ही एक मोठी धार्मिक क्रांती होती. जैन धर्मांची पूर्व परंपरा असल्याने बौध्द धर्माच्या तुलनेत तो जास्त प्राचीन मानला जातो. परंतु जैन विचारांना धर्माचा आकार प्राप्त करून देण्याचे कार्य महावीरानेच केले. वैदिक धर्म हा कर्मकांड, ईश्वर व आत्मा मानणारा होता. परंतु ह्या धर्माविरोधी प्रतिक्रियेला प्रारंभ होऊन निरीश्वर व अनात्मवादी संप्रदायाचा उदय झ ााला. त्यापैकी जैन, बौध्द, व चार्वाक पंथ प्रमुख होते. जैनधर्मीय विचारसरणी बऱ्याच प्रमाणात वैदिक तत्त्वज्ञ ाानाशी जुळणारी आहे. फक्त त्यांनी देवता व कर्मकांडाला विरोध केला. जैन धर्माने खडतर तपाचरण, चिंतन, साधुवृत्ती, नि:स्वार्थीपणा, नयसिध्दांत व स्यादवादाच्या रूपाने शिकवणूक व तत्वज्ञानाचा फार मोठा वारसा भारतीय संस्कृतीला बहाल केलेला आहे. भारतीय दर्शनशास्त्रात जैन तत्वज्ञानाला असाधारण महत्त्व आहे.[१९] 'ओम, स्वस्तिक' हे चिन्ह जैन व हिंदू धर्माचे प्रतिक मानले जाते.[२०] जैन धर्मात महावीर वर्धमानाच्या उदयानंतर जैन धर्म नावारूपास आला तरीही जैन विचारांची परंपरा बरीच प्राचीन आहे. ह्या धर्मात एकूण २४ तीर्थकर झाले आणि महावीर हा शेवटचा तीर्थकर होता. त्यामुळे वर्धमानास जैन धर्माचा संस्थापक मानता येत

नाही. तो जैन धर्माचा 'अध्वर्यु' होता. जैन परंपरेप्रमाणे तर हा धर्म सिंधू संस्कृती इतका पुरातन असल्याचे मानतात. अर्थात त्यात अतिशयोक्ती बरीच आहे. काही विव्दान जैन धर्माची सुरूवात वैदिक काळापासून असल्याचा दावा करतात. जैन ग्रंथात चोवीस तीर्थंकरांची परंपरा दिलेली आहे. ऋषभदेव, अजिननाथ, संभवनाथ, अभिनंदन नाथ, सुमतीनाथ, सुपदमनाथ, सुपार्श्वनाथ, चंद्रप्रभु, पुष्पदंत, शीतलनाथ, श्रेयांसनाथ, वसूपद्य, विमलनाथ, अनंतनाथ, धर्मनाथ, संतनाथ, कुंमनाथ, अरनाथ, मविनाथ, मुनीसव्रतनाथ, नृमिनाथ, नेमीनाथ, पार्श्वनाथ व वर्धमान महावीर हे चोवीस तीर्थकर असल्याचे सांगतात अनेक ग्रंथात विसंगत नावे आढळतात. वैदिक वाङ्मय व पुराणात ऋषभदेव आणि अरिष्टनेमी ह्या तीर्थकरांचे उल्लेख आलेले आहेत. जैन धर्माला वेदप्रामाण्य मान्य नाही.[२१] डॉ. जेकोबी पार्श्वनाथाला जैन धर्मांचा संस्थापक मानतात. थोडक्यात महावीरापूर्वी जैन परंपरा मोठ्या प्रमाणात असल्याने तो शेवटचा तीर्थकर होता. त्यास संस्थापक मानणे विपर्यस्त ठरेल. महावीराने पूर्वीच्या विविध जैन परंपरांना सुसूत्र करून आणि त्यात आपल्या तत्त्वज्ञानाची भर घालून जैन विचाराला धर्माचा आकार प्राप्त करून दिला. धर्मप्रसाराची जबाबदारीही त्याने मोठ्या प्रमाणात पार पाडली. म्हणून महावीर वर्धमान हा जैन धर्मांचा प्रणेता मानला पाहिजे.[२२] जैन तत्त्वज्ञानात पाच प्रकारचे ज्ञान मानलेले आहे. ते प्रकार मतिज्ञान, श्रुतज्ञान, अवधिज्ञान, मन:पर्यायज्ञान आणि केवलज्ञान, या पाच ज्ञ ानाचा उल्लेख आढळतो.[२३]

जैन महात्म्याचे दोन प्रकार आहेत. जो जैन अनुयायी प्रापंचिक बंधनातून मुक्त होऊन विकार व इंद्रियांवर विजय मिळवून केवळपदाला पोहाचतो आणि जो आत्मोव्दार करून घेतो त्यास 'निर्ग्रंथ' असे म्हणतात. जो जैन साधु खडतर तपर्श्येव्दारे प्रापंचिक बंधने तोडून, इंद्रियदमन करून भवसागर पार करतो, स्वत: निर्माण केलेल्या सिध्दांत, नियम व विधीव्दारे इतरांनाही मोक्षपदाला जाण्यासाठी मार्गदर्शन करतो अशा जनकल्याणकारी महात्म्यास 'तीर्थकर' असे म्हणतात. जैन साधू, साध्वी, श्रावक व श्राविका यांच्या संघाची स्थापना करून तो धर्मप्रसार करतो. 'तीर्थ' म्हणजे गणाचा संघ होय. जैन धर्मात असे चोवीस तीर्थकर असल्याचे मानतात. तीर्थकरांची स्थिती फार थोड्या विभूतीना प्राप्त होते. महावीर वर्धमान असे शेवटचे तीर्थकर होते. जैन परंपरेनुसार ऋषभदेव हे पहिले तीर्थकर होत. मनुष्य रानटी अवस्थेत असतांना ऋषभदेवाचा अयोध्येत जन्म झाला. ते महान सम्राट होते. त्यांनी आपल्या राज्यात कल्याणकारी सुधारणा करून लोकांना सुसंस्कृत बनविले. शेवटी संसार त्याग करून तपश्चर्येच्या बळावर ज्ञान प्राप्त केले आणि लोकांना उपदेश केला. हा उपदेश म्हणजे प्रारंभीचे जैन तत्त्वज्ञान होते. काही विव्दान ऋषभदेवांनाच जैन धर्माचे संस्थापक मानतात.[२४] जैन धर्मामध्ये अनेक धर्मसंस्थापक प्रेषित किंवा द्रष्टे मानले आहेत. अशा युगपुरूषांना 'तीर्थंकर' अशी संज्ञा जैन धर्मात आहे. 'तीर्थकर' म्हणजे तीर्थ उत्पन्न करणारा. तीर्थ या शब्दाचे पुढे दिल्याप्रमाणे अनेक अर्थ जैन ग्रंथांत आढळतात. १)धर्म, २) संसारसागराच्या पैलतीरावरील मोक्षमंदिराकडे नेणारा पाण्याचा उतार वा बंदर, ३) जैन साधू, साध्वी, श्रावक, श्राविका यांचा संघ, ४) जैनांचे

१२ अंगग्रंथ इत्यादी. या अर्थावरून तीर्थकर म्हणजे धर्माध्यक्ष, जैन संघप्रमुख, मोक्षमार्ग दाखविणारा असे या संज्ञेचे अर्थ होतात. 'तीर्थकरालाच जिन' म्हणजे इंद्रिये जिंकणारा.[२५] जैन धर्मात यती आणि उपासक आढळतात.[२६]

महावीरांपूर्वी सुमारे अडीचशे वर्षे इ.स.पू.७९० च्या सुमारास पार्श्वनाथ ह्या तेविसाव्या तीर्थकारांचा उदय झाला. त्यांच्या काळात जैन धर्माचा मोठ्या प्रमाणात प्रसार झालेला होता. वामादेवी व बनारसचा राजा अश्वसेनाच्या उदरी पार्श्वनाथाचा जन्म झाला. प्रभावतीशी विवाह झाला तरीही त्याचे प्रपंचात मन रमत नव्हते. शेवटी संसार सुखाचा त्याग करून समवेत पर्वतावर ८४ दिवसांच्या घोर तपश्चर्येनंतर त्यास केवल ज्ञान प्राप्त झाले. त्याने सत्तर वर्षापर्यत धर्मप्रसाराचे कार्य केले. उत्तर पूर्व भारतात जैन धर्माचा विस्तार केला. 'केशी' हा प्रमुख शिष्य असून त्याचे आठ गणघर होते. ४,९१,००० स्त्री-पुरूषांची फार मोठी शिष्य परंपरा पार्श्वनाथाने निर्माण केली. अहिंसा, सत्य, अस्तेय व अपरिग्रह ह्या प्रमुख चार जैन तत्वांचा त्याने उपदेश केला. अनुयायास श्वेतवस्त्र परिधान करण्यास सांगितले. त्यातूनच पुढे श्वेतांबर पंथांची सुरूवात झाली. वयाच्या शंभराव्या वर्षी पारसनाथ पर्वतावर पार्श्वनाथाची प्राणज्योत मावळली. ह्या सर्व पूर्वेतिहासावरून वर्धमानापूर्वी जैन परंपरा प्रभावीपणे अस्तित्वात असल्याचे सिध्द होते.[२७] जैन धर्मांचे लोक इतर धर्मीयांच्या सहवासाने आणि सामाजिक रूढींमुळे इतर काही सण साजरे करीत असले, तरी त्यांचे काही विशिष्ट्य धार्मिक सण आहेत. 'चातुर्मास' हा त्यांचा एक पर्वकाल आहे. या वेळी जैन साधू विहार न करता एके ठिकाणी राहून धर्माचरण आणि धर्मोपदेश करतात. 'पर्युषण पर्व' हा एक वैशिष्ट्यपूर्ण असा पर्वकाल आहे. 'दशलक्षण पर्व' असेही त्याचे नाव आहे.[२८] आत्मशुध्दी करण्याला अतिशय अनुकूल असा हा पर्वकाल असल्याने, तो पर्वराज म्हणूनही ओळखला जातो. या पर्वाच्या समाप्तिकाली 'क्षमापण' हा समारंभही केला जातो. त्या वेळी समाजातील लहानथोर सर्वजण एकमेकांना भेटून एकमेकांची क्षमा मागतात.[२९] जैन धर्मग्रंथात एकंदर दहा प्रायश्चित्तांचा उल्लेख येतो. ती प्रायश्चित्ते पुढीलप्रमाणे आहेत. आलोयणा, पडिक्कमण, तदुभय, विवेग, विउसग्ग, तव, छेय, मूल, अणवट्ठप्पा, पारंचिय.[३०]

जैन धर्माने भारतीय तत्त्वज्ञानात फार मोठी भर घातली. आगम ग्रंथामधून जैन धर्माच्या शिकवणुकीची व तत्त्वज्ञानाची माहीती मिळते. जैन धर्मात केवळ ज्ञानप्राप्ती व मोक्षासाठी जैन त्रिरत्ने, पंचशील तत्वे व सुक्ष्म अहिंसावाद सांगितलेला आहे. सम्यकदर्शन, सम्यकज्ञान व सम्यक चरित्र ही त्रिरत्ने होती. जैन श्रमणासाठी पंचमहाव्रते व श्रावकासाठी अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह व ब्रम्हचर्य ही पंचशील तत्त्वे सांगितलेली होती. ह्या धर्माने सुक्ष्म व व्यापक अहिंसा सांगितली. जैनाचा कर्म व पुनर्जन्मावर विश्वास असून मूक्त आत्म्यास ते ईश्वर मानतात. वैदिक देवता, यज्ञविधी, कर्मकांड, वंदवाङ्मय व वर्णव्यवस्थेला त्यांचा विरोध होता. जीव व अजिवाची विस्तृत चर्चा करून स्यादवाद व नयसिध्दांताचे विवेचन महावीराने केले. सृष्टीची निर्मीती परमेश्वर करीत नाही व तो प्रयोजनरहित आहे. कठोर देह दंड व इंद्रिय दमनाने

मोक्षप्राप्ती होते. अहिंसा, त्याग, तपाचरण व ज्ञानप्राप्ती हे मोक्षासाधनेचे मार्ग आहेत, असे ह्या धर्मांचे मत होते महावीराचे बरेच विचार वैदिक धर्माशी जुळणारे होते.[३१] जैन पुराणकथांवर हिंदू कथांचा प्रभाव असून त्यांनी सरस्वती, कुबेर, इंद्र, शंकर, विष्णू, लक्ष्मी, गणपती, यक्ष, यक्षिणी इ. देवता व अतिमानवी शक्तींचा स्वीकार केलेला आहे. एवढेच, की त्यांनी या देवदेवतांना तीर्थकरांचे सेवक मानले आहे. भूत, वर्तमान, आणि भविष्य यांतील प्रत्येक काळात चोवीस तीर्थकर होतात, असे त्यांनी मानले आहे. त्यांपैकी ऋषभदेव अथवा आदिनाथ हा पहिला तीर्थकर असून महावीर वर्धमान हा चोविसावा तीर्थकर होय. वर्धमान महाविरांना ज्ञातपुत्र असे मानतात. महाविरांचा पिता वंशातील क्षत्रिय असल्याने त्यांना हे नाव प्राप्त झाले असावे.[३२] त्यांच्याविषयी अनेक पुराणकथा आहेत. त्यांना तीन प्रकारची ज्ञाने उपजतच प्राप्त असतात, ते मातेच्या गर्भात असताना तिला १६ प्रकारची स्वप्ने पडतात, त्यांच्या पायाखाली सोन्याची कमळे उमलतात इ. कल्पना करण्यात आल्या आहेत.[३३] जैन धर्मात भिक्षुक अथवा मुनी, स्त्री भिक्षुक अथवा आर्थिका, श्रावक आणि श्राविका असे स्तर आढळतात. जैन धर्मीय निर्मीतीच्या अविष्कारालाही ईश्वरच जबाबदार असलेल्या संकल्पनेला नाकारतात. ते ब्रम्हाण्ड हे चिरस्थायी आहे ह्यावर विश्वास ठेवतात. ह्याची सुरवातही नाही आणि अंतही नाही, आणि सर्व जे काही घडते ते सर्व स्वयंशासीत पध्दतीचे असते. त्यासाठी सुत्रसंचालक वा ईश्वराची आवश्यकता नाही. जैन आपल्या मंदीरात आपल्या तिर्थकारांच्या मुर्त्या असतात. जैन धर्मात निर्वाणाची कल्पना सापडते.[३४]

जैन धर्मात तीर्थकरांचे मोठे माहात्म्य आहे, ते तीर्थांची स्थापना करतात म्हणूनच त्यांना तीर्थकर म्हटले जाते. स्वत: तीर्थाचे प्रवर्तक असूनही ते तीर्थाला नमस्कार असो असे म्हणून आपल्या प्रवचनाच्या आरंभी तीर्थाविषयी आदरभाव व्यक्त करतात. ज्या ज्या ठिकाणी तीर्थंकरांचा जन्म झाला, त्यांनी दिक्षा घेतली, तपश्चर्या केली, पूर्ण ज्ञान प्राप्त केले किंवा मोक्ष प्राप्त केले, ती स्थाने जैनांनी तीर्थक्षेत्रे म्हणून पूज्य मानली आहेत. सम्मेद शिखर किंवा पार्श्वनाथ पर्वत हे बिहारमधील अत्यंत प्रसिध्द असे जैनतीर्थ आहे. येथे वीस तीर्थकरांना व इतर अनेक साधूंना मोक्ष प्राप्त झाला. येथील वेगवेगळ्या शिखरांवर मोक्षास गेलेल्या तीर्थंकरांच्या पावलांचे ठसे असून हजारो यात्रेकरूत्यांच्या दर्शनासाठी येतात. बिहारमध्ये नालंदाजवळ असलेल्या पावापूर या गावात भगवान महावीरांचे निर्वाण झाले होते. बिहारमधील राजगृह/राजगीर येथे एका पर्वतशिखरावर महावीराने प्रथम धर्मोपदेशास प्रारंभ केला. सौराष्ट्रात जुनागढ जवळील गिरनार पर्वतावर बावीसावे तीर्थकर नेमिनाथ यांनी तपश्चर्या करून निर्वाणाची प्राप्ती करून घेतली होती. राजस्थानातील अबू या ठिकाणी विमलशाह यांनी बांधलेली ऋषभदेव आणि नेमिनाथ यांची मंदिरे विश्वविख्यात आहेत. काठेवाडात पालिपाणापासून जवळच असलेल्या सिध्दनाथ पर्वतावर शत्रुंजय हे सिध्दक्षेत्र आहे. श्रवणबेळगोळ येथील विंध्यगिरीवर गोमटेश्वर बाहुबलीची सुमारे १८ मीटर उंचीची विशालकाय मूर्ती आहे. कैलासावरून ऋषभदेवांचे निर्वाण झाले. मेहसाणाजवळील तारंगाजी या ठिकाणी अनेक जैनमंदीरे आहेत, हे एक सिध्द क्षेत्रही आहे.[३५] जैन धर्मात २४ अधिकारी पुरूष मानले जातात. त्यांना 'तीर्थकर' असे नाव दिले जाते.[३६]

**२.१.३)बौध्द धर्म :-** मौर्यपूर्व काळातील महत्त्वाची ऐतिहासीक घटना म्हणून बौध्द धर्माच्या उदयाचा उल्लेख करता येतो. त्यामुळे धार्मिक क्षेत्रात क्रांतिकारी परिवर्तन घडून आले. वैदिक ब्राम्हण धर्माला विरोध करण्याच्या पार्श्वभूमीवर बौध्द धर्माचा उदय झाला. ह्या महत्त्वपूर्ण घटनेमुळे आर्यसंस्कृती नंतरच्या मौर्यपूर्व कालखंडास बौध्दकाळ म्हणून संबोधिले जाते. बौध्द धर्माची, बुध्द, संघ व धर्म ही तीन वैशिष्ट्यपूर्ण अंगे आहेत.[३७] बौध्दांच्या पाली त्रिपीटकांतील ब्रम्हजालसुत्त ह्या नावाच्या एका सुत्रावून तर निरनिराळ्या तऱ्हेचे ६२ दृष्टिवाद समाजात प्रचलित होते असे सविस्तर वर्णन आहे.[३८]

"बुध्दं शरणम् गच्छामी। संघंम् शरणम् गच्छामी। धम्मम् शरणम् गच्छामी।।"

हे बौध्दधर्माचे ब्रीदवाक्य आहे. उपासक किंवा उपासिका बनणाऱ्यांनाही बुध्दाला शरण जातो, धर्माला शरण जातो व संघाला शरण जातो, अशी त्रिवार घोषणा करावी लागते. उपासक आणि उपासिका वर सांगितलेल्या पंचशीलाचा स्वीकार केल्याची घोषणा वरचेवर एकत्र येण्याचे धार्मिक प्रसंग असतात, त्या त्या वेळी केली जाते.[३९] त्रिपिटिका, जातककथा, धम्मपद, बुध्दचरित्र, ललितविस्तार, मिलिंदपन्हा, दीपवंश, महावंश, दिव्यावदान व इतर ग्रंथांमधून बौध्दधर्माचा इतिहास उपलब्ध होतो.[४०] 'धर्मचक्र, ओम, स्वस्तिक' हे चिन्ह बौध्द धर्मांचे प्रतिक मानले जाते.[४१] बौध्द धर्मात भिक्षू व उपासक धर्माचा उपदेश करणारे सामान्यजन आढळतात.[४२]

क्षात्रवंशी सिध्दार्थ गौतम बौध्दधर्माचे संस्थापक होते. जातक कथांमधून बुध्दाच्या पूर्वजन्मीच्या अनेक कथा सांगितलेल्या आहेत. मात्र त्यात पौराणिक पध्दतीच्या दंतकथा व काल्पनिक कथा असल्याने ती माहिती फारसी ऐतिहासिक मानता येत नाही. अश्वघोषाचे बुध्दचरित्र व अशोकाच्या रुम्मीनदेई शिलालेखामधून गौतमाच्या चरित्राची थोडीशी विश्वसनीय माहिती मिळते. प्राचीन काळी नेपाळच्या परिसरात कपिलवस्तू नावाचे गणराज्य होते. शाक्यवंशी शुध्दोधन तेथे वास्तव करीत होते. हे क्षत्रिय राजघराणे असावे. मायादेवी हे त्यांच्या धर्मपत्नीचे नाव होते. ह्या क्षत्रिय राजयुगुलाच्या उदरी इ.स.पु. ५६७ मध्ये लुंबिनी खेड्यात गौतमाचा जन्म झाला. हे ठिकाण कपिलवस्तू राज्यात होते. ह्यूएनत्संगाचे प्रवासवर्णन व रुम्मीनदेई शिलालेखातून ही महत्वपूर्ण माहिती मिळते. सिध्दार्थ हे मूळ नाव असून गौतम, तथागत, अवलोकिलेश्वर, अर्हत, बोधीसत्व व बुध्द नंतरच्या उपाधी आहेत.[४३]

सिध्दार्थाच्या जीवनाला कलाटणी मिळाली आणि त्याने अंतिम सत्य शोधनास सुरूवात केली. गौतम बुध्दानी जगातील माणसे लोभाविष्ट होऊन एकमेकांविरुध्द झगडत असून थोडक्या पाण्यात तडफडणाऱ्या मत्स्याप्रमाणे दु:खीकष्टी होत आहेत.[४४] सर्व जगात अस्तित्वात असणारे हे दु:ख पाहून त्याचे मन पिळवटू लागले व ते दु:ख नाहीसे कसे होईल हे शोधून काढण्याचा त्याला ध्यासच लागला. घरदार सोडून, निरनिराळे ध्यान मार्ग, तपश्चर्येचे मार्ग ह्यांचा अनुभव घेतल्यानंतर एके रात्री वैशाख शुध्द पौर्णिमेला त्याला ज्ञान प्राप्त झ ाले व त्याला दु:खाचे मूळ व ते नाहीसे करण्याचा मार्ग सापडला.[४५] प्रारंभी त्याने मोक्षप्राप्तीच्या तत्कालीन

साधनाची अनुभूती घेण्याचे ठरविले. वैशाली नगरीत अळकाराम ह्या विव्दान आचार्याची भेट घेतली. त्याने सांगितल्याप्रमाणे चिंतनाच्या मार्गाने तत्त्वज्ञान आत्मसात करण्यासाठी समाधी घेतली. परंतु ह्या ज्ञानमार्गाने गौतमाचे समाधान झाले नाही. त्यानंतर त्याने राजगृह/राजगीर येथील उदकरामपुत्र ह्या सिध्द पुरूषाने शिष्यत्व पत्करले. त्याच्या सल्ल्यानुसार सिध्दार्थाने हठयोग व कर्ममार्गाचा अवलंब केला. इंद्रियदमन व कठोर देहदंडनाच्या माध्यमातून खडतर तपश्चर्या केली त्याचाही उपयोग झाला नाही. कर्मकांड, देवोपासना, समाधी, योगसाधना, घोर तपश्चर्या व ज्ञानमार्ग त्यास निरर्थक वाटले. शेवटी स्वयंभूपणे स्वमार्ग, शोधण्याचा निर्धार त्याने केला. मगध राज्यातील पाटण्याजवळील गया येथे निरंजना नदीच्या तीरावर तपश्चर्या सुरू केली. शरीर अस्थिपंजर झाल्याने तपाचरणाचा त्याग करून अन्नग्रहण केले. अंतिमत: बोधीवृक्षाखाली गौतमाने सात आठवडे एकाग्र चित्ताने समाधी अवस्थेत चिंतन केले. वैशाख पौर्णिमेच्या सुमुहुर्तावर वयाच्या पस्तिसाव्या वर्षी त्यास आत्मसाक्षात्कार झाला, दिव्यज्ञानाची अनुभूती आली. ही घटना बुध्दपौर्णिमा म्हणून ओळखली जाते. हा गौतमाच्या जीवनातील अभूतपूर्व क्षण होता. त्यानंतर त्यास बुध्द म्हणजेच ज्ञानी म्हणून ओळखू लागले. सिध्दार्थाने प्राप्त झालेल्या दिव्यज्ञानाच्या प्रसाराला प्रारंभ केला. बनारसजवळील सारनाथाच्या मृगवनात, पूर्वीच्या तपश्चर्येत सहभागी झालेल्या कौडिण्य, वास्प, भद्रिक, अश्वजित व महानाम ह्या पाच ब्राम्हणांना आपल्या नवीन धर्माचा उपदेश दिक्षा दिली. हे बुध्दाचे प्रारंभीचे शिष्य होते. त्याच ठिकाणी काही दिवसांत एक हजार व्यक्तींनी बुध्दाचे शिष्यत्व पत्करले. अशाप्रकारे बुध्दाने दिव्यानुभूतीचा उपदेश करण्यात सुरूवात केली. धर्मप्रसारकार्याचा शुभारंभ करणाऱ्या ह्या मंगलमय घटनेस 'धर्मचक्रप्रवर्तन' असे म्हणतात.[४६] बौध्द धर्मात निर्वाणाची कल्पना आढळते.[४७]

गौतमाने ठिकठिकाणी केलेल्या आत्मसाक्षात्काराच्या उपदेशामृतामधूनच बौध्द धर्माचे तत्वज्ञान उदयाला आले. त्यानंतर राजगृहाचे/राजगीराचे सारीपुत्त व मोगलायन, कोशल नरेश प्रसेनजीत व राणी मलिका, वत्सराजा उदयन, गणिका, अंबापाली व मावशी महाप्रजापती गौतम बौध्द धर्माचे अनुयायी झाले. उत्तर भारतातील अनेक राज्यात प्रवास करून व पालीभाषेतून उपदेश करीत बुध्दाने धर्मप्रसाराचे पवित्र कार्य अव्याहतपणे चालू ठेवले.[४८]

गौतम बुध्दाच्या विचारसरणीत शिकवणुकीच्या आचारधर्मावर भर होता. ह्या धर्माचे विचार त्रिपिटक ग्रंथामधून मिळतात. निर्वाण प्राप्ती व अंतिम सत्याचा शोध हे बुध्दाचे प्रमुख उद्दिष्ट होते. त्यासाठी त्याने पुढील मार्ग सांगितले. प्रज्ञा, शील व करूणा ही बौध्द त्रिरत्ने बौध्दधर्माचा मूलाधार होती. मानवी जीवनातील दु:ख, दु:ख समुदाय, दु:ख निरोध व दु:ख निरोधगामिनी ही चार आर्य सत्ये आहेत. तृष्णा च दु:ख निरोधनासाठी अष्टांगिकामार्गाची आवश्यकता आहे.[४९] हे सदाचरणाचे आठ मार्ग आहेत. सत्य, अहिंसा, अस्तेय, अपरिग्रह व ब्रम्हचर्य ही पंचशील तत्त्वे आहेत. गौतम बुध्दानी चार आर्यसत्य सांगीतली. दु:ख हे तृष्णेमुळे उत्पन्न होते, तृष्णा हे दु:खाचे मूळ आहे, तृष्णा नष्ट केली तर दु:खाचा निरोध होतो, त्या दु:ख दुर करण्याचा मार्ग असतो.[५०] कमी जास्त फरकाने ती भीक्षू व उपासकासाठी मध्यममार्गी होता. बौध्दधर्माचे

अहिंसा व्यावहारिक होती. सदाचरण हा ह्या धर्माचा पाया होता. बुध्दाने सत्याचा शोध घेण्यासाठी 'प्रत्युत्तसमुपादाचा' सिध्दांत मांडून भारतीय तत्वज्ञानात भर घातली. वैदिक धर्म, धर्मग्रंथ, संस्कृत, कर्मकांड, देवता, वर्णव्यवस्था, आत्मा व विचारसरणीचा बुध्दाने त्याग केला. सुबोध अहिंसावाद, सदाचरण व मध्यम मार्ग ही बौध्द धर्माची वैशिष्टये होती. त्यामुळेच ह्या धर्माचा भारतभर व परदेशात विस्तार झाला.[५१] गृहस्थीश्रमी लोकांना पंचशील मार्ग सांगीतला आहे, म्हणजे प्राणीहत्या, चोरी, लबाडी, परस्त्रीगमन व सुरापान ह्यांपासून निवृत्ती सांगितली आहे.[५२] बुध्दाने आपल्या धार्मिक मतांचा व्यवस्थित प्रचार करून आपले अनुयायी मिळविले. त्याने कधीही भरमसाट विधाने करून किंवा प्रलोभने दाखवून आपले अनुयायी मिळविले नाहीत. माझी मते तुमच्या बुध्दीला पटली तरच ती तुम्ही ग्रहण करून माझे शिष्यत्व पतकरू शकता, असे तो स्पष्टपणे बजावीत असे. स्वत: या आणि पहा 'पाली एहि पस्सिको' असेच त्याने आपल्या धर्मासंबंधी वर्णन केले आहे. त्याचे अनुयायी चार प्रकारचे : घरदार सोडून १) भिक्षू २) भिक्षूणी झालेले किंवा गृहस्थाश्रमात राहून ३) उपासक ४) उपासिका बनलेले.[५३]

बौध्द धर्म हा भारतात सुमारे इ.स.पु. तिसऱ्या शतकापासून ते इ.स. सातव्या-आठव्या शतकापर्यत म्हणजे सुमारे हजार वर्षे ब्राह्मण धर्माचा प्रतिस्पर्धी म्हणून राहिला. आठव्या-नवव्या शतकापासून जरी त्या धर्मांला उतरती कळा लागली, तरी तो निरनिराळ्या प्रांतात संकुचित क्षेत्रात बाराव्या-तेराव्या शतकापर्यंत अस्तित्वात होता. बख्तियार खिलजीने बिहारमधील नालंदा, विक्रमशीला इ. ठिकाणची बौध्द विद्यापीठे व बौध्द मठ तेराव्या शतकाच्या सुरूवातीस उद्ध्वस्त केल्यानंतर बौध्द भिक्षूंना उत्तरेकडे नेपाळ व तेथून पुढे तिबेटात पळून जावे लागले, पण भारतीय लोकांच्या व विशेषत: राजघराण्यांच्या उदार धोरणांमुळे बौध्द देवदेवतांबद्दल व मठांबद्दल आदर दाखविण्याकरिता व तेथील पूजेकरीता देणग्या दिल्याचा उल्लेख असणारे लेख चौदाव्या शतकापर्यंत सापडतात.[५४]

गौतम बुध्दाच्या जीवनाशी संबंधित अशा स्थानांना आधी मान्यता मिळाली असावी, अशी स्थाने चार असून ती पुढील प्रमाणे आहेत. १) कपिलवस्ततू-कपिलवस्तूमधील लुंबिनी हे बुध्दाचे जन्मस्थान आहे. २) कुशिनगर - कपिलवस्तूच्या पूर्वेला कुशिनगर येथे बुध्दाचे परिनिर्वाण झाले. ३) बुध्दगया - गयेच्या दक्षिणेला नऊ-दहा किमी. वर असलेल्या या स्थानी एका पिंपळवृक्षाखाली ध्यानस्थ बसलेल्या गौतम बुध्दाला बोधी प्राप्त झाला. म्हणूनच या वृक्षाला 'बोधिवृक्ष' म्हटले आहे. सध्या त्याच वृक्षापासून परंपरेने बनलेले अनेक वृक्ष येथे आहेत. येथे अशोकाने एक विशाल बुध्दमंदिर आणि अनेक स्तूप बांधले आहेत. ४) सारनाथ - बुध्दाने प्रथम बनारसच्या उत्तरेला पाच-सहा किमी. वर सारनाथ येथे धर्माचा उपदेश करून धर्मचक्र प्रवर्तित केले. येथे अनेक स्तूप, मंदिरे, शिल्पबध्द शिला, अशोकस्तंभ आणि बुध्दमूर्ती आहेत.[५५]

**२.१.४) मुस्लीम धर्म :-** इस्लाम हा एक अरबीयन द्वीपकल्पात स्थापन केलेला अब्राहामीक धर्म आहे. 'इस्लाम' चा अर्थ 'समर्पण' अथवा 'ईश्वराच्या इच्छेला' असा होतो.[५६] हज यात्रा ही मुस्लीमांची सर्वात

महत्त्वाची तीर्थयात्रा आहे. ती इस्लामच्या पाच आधारस्तंभापैकी एक असल्यामुळे आयुष्यात एकदा तरी हाज यात्रा करणे हे प्रत्येक मुस्लिम स्त्री-पुरूषाचे धार्मिक कर्तव्य मानले जाते. 'चाँद-तारा' हे चिन्ह मुस्लिम धर्माचे प्रतिक मानले जाते.[५७] मुसलमानाने सर्वात पवित्र स्थान असलेल्या मक्केची यात्रा म्हणजेच हाजयात्रा होय. ही जिल्हेज महिन्यांच्या पहिल्या पंधरवड्यात असते. मक्का ही अरबस्तानची राजधानी आहे. मुहंमद पैगंबराचे जन्मस्थान व काबा ही वास्तू यामूळे मक्केला माहात्म्य प्राप्त झाले मक्केइतके स्वर्गालाजवळ असलेले दुसरे स्थान नाही, असे मानले जाते. मशीद-मुस्लिम जगतातील तीन पवित्र मशिदीपैकी सर्वात जुनी व सर्वात अधिक पवित्र मशीद 'अल्-मस्जिद अल्-हराम' ही मक्केत आहे. येथील प्रार्थना विशेष पुण्यकारक मानली जाते. काबा हे मुसलमानांचे प्रमुख धार्मिक आकर्षण आहे. काबा हे पृथ्वीवरचे पहिले पवित्र स्थान मानले जाते. जवळच वाळवंटात असलेल्या 'झमझम' या विहिरीला इस्माईलची विहीर असेही म्हणतात. ती देवदूताने तयार केली अशी समजूत आहे. यात्रेकरू हिचे पाणी आरोग्यदायक म्हणून पितात आणि आजाऱ्यांसाठी घरी नेतात. मृत्यूनंतर आपल्याला ज्या कपड्यात पुरावे अशी यात्रेकरुंची इच्छा असते ते कपडे यात्रेकरू मक्का सोडण्यापूर्वी झमझमच्या पाण्यात बुडवून घेतात. प्रत्येकाने हाजयात्रा करणे आवश्यक असले, तरी खर्च करण्याची ऐपत नसेल, परत येईपर्यत घरातील व्यक्तींच्या उपजीविकेची सोय करता येत नसेल आणि युध्द किंवा साथीचे रोग यामुळे मक्केला जाणे धोक्याचे असेल, तर याबाबतीत सवलत दिली जाते. स्त्रियांनी पती अथवा कुणीतरी नातेवाईक बरोबर असल्याशिवाय हाजला जाऊ नये, असे सांगितलेले आहे.[५८]

बहुतेक यात्रेकरू पवित्र मक्केत उम्रहचे विधी करून हाजयात्रेला प्रारंभ करतात. 'उम्रह' म्हणजे मक्केतील पवित्र स्थानांची छोटी यात्रा होय. हाजयात्रेच्या वेळी 'इहराम' ची पवित्र स्थिती धारण करणे, काबाभोवती 'तवाफ' म्हणजे प्रदक्षिणा घालणे. 'सफा' आणि 'मर्वा' या पवित्र स्थानांमध्ये पळत जाणे. आरफातच्या मैदानात 'वकूफ' करणे म्हणजे नुसते थांबणे, 'इफाध' म्हणजे आरफातपासून मुझ्दलिफ या स्थानापर्यत पळत जाणे, मन्ना येथे दिमारावर खडे फेकणे, मुन्ना येथेच प्राण्यांची हत्या करणे इ. धार्मिक विधी करावयाचे असतात. वेगवेगळ्या देशांतून साधूंच्या ज्या कबरी आहेत त्यांच्या यात्रा करण्याविषयी धर्मग्रंथा आज्ञा दिलेली नाही. अशा यात्रांना मुस्लिम 'झियार' असे म्हणतात. इस्लाम धर्मात एकच ईश्वर असल्याचे मानतात, आणि इस्लाम धर्मातील लोक कडक एकेश्वरवादी आहेत.[५९] इस्लाम हा एकमेव धर्म आहे हे सूफींचे कठोर तत्त्व आहे, पण ईश्वर आणि सृष्टी एकच असे मानणाऱ्या विचारसरणीची बीजे त्यांनी रूजु दिली.[६०]

मदीना-मक्केहून पळून गेल्यानंतर मुहंमद अरबस्तानातील या शहरात राहिले होते. मृत्यूच्या वेळी ते येथेच होते. त्यांची कबर आणि प्रेषिताची मशीद ही दोन स्थाने पवित्र मानली जातात. असंख्य यात्रेकरू स्थांनाना भेट देतात. हाजपूर्वी वा हाजनंतर मदीनेची यात्रा केली जाते. मक्केप्रमाणे मदीनेची यात्रा अनिवार्य नाही. मुहंमदाच्या चरित्राशी निगडित असलेली अनेक स्थाने येथे आहेत.[६१] इस्लाम धर्मात आधारस्तंभ असलेले

पाच कर्तव्य प्रत्येक मुसलमानासाठी बंधनकारक आहेत. ते कर्तव्य शहादा अर्थात शपथविधी फक्त एकाच देवता आणि मुहम्मद हा त्यांचा प्रेषित, 'सलात' अर्थात प्रार्थना, 'झकात' अर्थात दान देणे, 'सावम' अर्थात रमजान मध्ये उपवास करणे, आणि 'हाज' अर्थात मक्केची तिर्थयात्रा ही पाच रीतरीवाज सुन्नी मुसलमानासाठी अत्यावश्यक आहेत, शिया मुस्लिम आठ कर्मकांडाचे पालन करतात जे बहुतेक सर्व पाच आधारस्तंभाला धरून आहेत.[६२]

जेरूसलेम-मुस्लिमांच्या पवित्र मशिदीपैकी तिसरी मशीद 'अल्-मस्जिद अल्-अक्सा' ही जेरूसलेममध्ये आहे. त्याखेरीज डोम ऑफ द रॉक, हॅरम ऑफ हीब्रन येथील अब्राहम, इसाक आणि जेकब यांच्या कबरी ही स्थाने महत्त्वाची आहेत. 'हैफा' येथील एलिजाची गुहा हे स्थानही प्रसिध्द आहे.[६३]

करबला-इराकमध्ये बगदादपासून नव्वद किमी वर असलेले मुसलमानांचे हे प्रसिध्द तीर्थक्षेत्र आहे. येथे प्रेषिताचा नातू इमाम हुसेन याची हत्या करण्यात आली होती. त्याची कबर हे शिया पंथी मुसलमानांचे पवित्र स्थान बनले. येथे ज्यांचे दफन होते त्यांना स्वर्गात प्रवेश मिळतो, या समजुतीमूळे अनेक वृध्द व आजारी मुसलमान या पवित्र स्थानी मृत्यूच्या अपेक्षेने येतात.

अल्-कूफा - येथील मस्जिद चार पवित्र मशिदीपैकी एक असल्याचे अलीने म्हटले होते. कुबा येथील मशीदही महत्त्वाची मानली जाते. सामारा येथील अल्-मुतबक्किल याने आपल्या देशात एक काबा, मुन्ना व अरफी निर्माण करून आपल्या अमीरांना येथेच हाजयात्रा करण्यास सांगितले होते.

भारतातील इस्लामी तीर्थक्षेत्रे- भारतीय मुसलमान अजमेरला दुसरी मक्का मानतात. भारतातील इस्लामचा पहिला प्रचारक ख्वाजा मुईनुद्दीन चिश्ती याचा तेथील दर्गा प्रसिध्द आहे. तेथे रमजान महिन्यात मोठा उरूस भरतो. दिल्ली येथील निजामुद्दीन अवलियाचा दर्गा, मलंगड जि. ठाणे येथील बाबा हाजी मलंग नामक मुसलमान साधूची कबर, गोरखपूर व बहिराइच येथील गाजीमियाची स्थळे, मक्कनपूर येथील शाहमदार याचे ठिकाण इ. स्थळे पवित्र मानली जातात.[६४] इस्लाम चमत्कारावर आणि शेवटचा न्याय दिवस कियामा वर विश्वास ठेवते. इस्लाम मृत्युनंतर अखीराह ज्यांनी इस्लामला शरण गेले नाहीत, ज्यांनी इस्लामीक शिकवण नाकारली, त्यांच्यासाठी खुप कडक शिक्षा भेटते ह्यावर विश्वास ठेवतात. अशा लोकांना ते काफीर आणि भ्रष्ट संबोधतात.[६५]

### २.१.५) ख्रिश्चन धर्म :-

मध्ययुगीन ख्रिस्ती लोकांच्या जीवनात तीर्थयात्रांना खुप महत्त्वाचे स्थान होते. येशू ख्रिस्ताच्या जीवनाशी संबंधित अशी पॅलेस्टाइनमधील स्थाने आणि संत व हुतात्मे यांची स्मृतिस्थाने ही ख्रिस्ती लोकांची तीर्थक्षेत्रे बनली. 'लॅटिन क्रॉस' हे चिन्ह ख्रिश्चन धर्माचे प्रतिक मानले जाते.[६६]

पॅलेस्टाइन - मानवजातीच्या त्राता म्हणून आलेला येशू ज्या प्रदेशात वावरला त्या प्रदेशाला भेटी देण्याची इच्छा लोकांत स्वाभाविकपणेच प्रबळ झाली. विशेषत: तिसऱ्या शतकापासून तीर्थयात्रांना महत्त्व प्राप्त झाले.

अनेक व्यक्तींच्या तीर्थयात्रा इतिहासात प्रसिध्द आहेत. सम्राज्ञी हेलेना हिने जेरूसलेमला भेट दिली आणि तथाकथित खरा क्रूस शोधून काढला तेव्हा यात्रेकरूंची गर्दी तेथे जमू लागली. पाचव्या शतकापासून हजारो यात्रेकरू कष्टप्रद प्रवास करून यात्रा करू लागले. यूरोपमधल्या सर्व राष्ट्रांतून लोक जेरूसलेममध्ये ख्रिस्ती लोकांची अनेक प्रार्थना मंदिरे आहेत. त्याखेरीज माउंट ऑलिव्ह्जवरील गेत्सेमनीचे उद्यान, बेथलीएममधील चर्च ऑफ द नेटिव्हिटी आणि नॅझारेथमधील चर्च ऑफ द ॲनन्सियशन इ.स्थाने पवित्र आहेत.

इटली - जेरूसलेमच्या खालोखाल इटलीमधील रोमला यात्रेकरूंची गर्दी जमत असे. पोपची सत्ता निर्माण झ ाली आणि रोम हे ख्रिश्चनांचे तीर्थक्षेत्र बनले. रोमला सेंट पीटर व सेंट पॉल यांच्या समाधी स्थानांमुळे विशेष माहात्म्य प्राप्त झाले. हुतात्म्यांची प्रेते जेथे पुरली होती, ती स्थानेही त्यांच्या अस्थींमुळे पवित्र बनली आणि हजारो यात्रेकरू तेथे जमू लागले. प्रवासातील अडचणी, साथीचे रोग इ. कारणांनी जेरूसलेमला जाणे अवघड होऊ लागले तेव्हा लोक रोमकडे वळू लागले. इ.स. १३०० मधील पोपच्या महोत्सवाला २०,००० यात्रेकरू जमले होते. सेंट फ्रांन्सिस आणि सेंट क्लेअर यांच्याशी संबध्द असल्यामुळे असीसी हे शहर महत्वाचे तीर्थक्षेत्र बनले. सिएना हे सेंट कॅथराइनशी निगडित म्हणून प्रसिध्द होते.[६७]

इंग्लड-इंग्लडमध्ये अनेक पवित्र स्थाने आहेत. त्यापैकी सर्वात प्राचीन म्हणजे ग्लॅस्टनबरी हे होय. ते केल्टिक परंपरेतील असल्यामुळे बहुधा येशूच्याही आधीपासून प्रसिध्द होते. सेंट जोसेफ, सेंट पॅट्रिक, इ. महात्म्यांच्या सहवासामुळे या स्थानाला माहात्म्य प्राप्त झाले. तेथील मठाधिपतींनी अवशेषांचे एक मोठे भांडार तेथे जमा केले होते. त्यापैकी काही म्हणजे खरा क्रुस, पवित्र थडगे, सेंट पॉल, अस्थी इ. होत. कॅंटरबरी येथील सेंट टॉमस अ बेकेट याचे स्मृतीस्थान अत्यंत पवित्र मानले जाते. येथे इ.स.१४७० च्या महोत्सवाला एक लाख यात्रेकरू जमले होते. या खालोखाल महत्वाचे म्हणजे वॉल्सिंगम मधील अवर लेडी चे पवित्र स्थान होय. तिच्या दुधाचे काही थेंब असलेली कुपी येथे असल्यामुळे हे यात्रेकरूंचे आकर्षण बनले. सत्ताधारी लोक ज्या संतांचा राजद्रोही म्हणून धिक्कार करीत, त्यांची पूजा करणे आणि त्यांच्या समाधी स्थानांना भेटी देणे हे इंग्लिश तीर्थयात्रेचे एक वैशिष्ट्य होय. वेल्स-येथील मुख्य पवित्र स्थान म्हणजे सेंट विनिफ्रेडची विहीर होय.[६८]

**२.१.६)पारशी धर्म :-**

पारशी धर्माला 'जरथुस्त्री धर्म' असेही म्हटले जाते. जगातील प्राचीन आणि महत्त्वाच्या धर्मांत पारशी धर्मांची गणना होते. आज पारशी धर्माचे अनुयायी संख्येने थोडे आहेत, सुमारे एक ते दोन लाख लोकसंख्या आहे, तरी त्यामुळे त्या धर्मांचे महत्त्व कमी होत नाही, ह्या धर्मांच्या संस्थापकाचे नाव 'जरथुस्त्री' असे होते. ज्या अभ्यासकांनी ह्या नावाचे समीकरण संस्कृत 'जरथुस्त्री' शी मानले. त्यांनी त्याचा अर्थ 'ज्याचे उंट म्हातारे आहेत' असा होतो. ह्या नावाचे 'उत्तम स्तुती करणारा', 'उत्तम हृदय असलेला', 'ज्याचे तेज सोनेरी आहे असा' किंवा 'कुशलतेने उंट हाकणारा' असेही अर्थ करण्यात आले आहेत. प्रस्तुत लेखकाने 'जरथुस्त्री' चा अर्थ 'गायी-बैलांचा वृध्द त्राता' असा केला आहे.[६९] ग्रीक भाषेत ह्या धर्मसंस्थापकाचे नाव 'झोरोॲस्टर' ह्या

रूपात रूढ झाले आणि त्यावरून इंग्रजी भाषेत हा धर्म झोरोॲस्ट्रीयन रिलिजन ह्या नावाने ओळखला जाऊ लागला. ह्या धर्मांचा उदय इराणमध्ये इ.स.पू. सातव्या शतकात होऊन त्यांची भरभराट ससान घराण्याच्या अंतापर्यंत म्हणजे सुमारे बाराशे-तेराशे वर्षे झाली. ससान राजवटीत इ.स.२२६ ते इ.स.६५२ या काळात हा पारशी धर्म इराणचा राष्ट्रधर्म होता.[७०] पवित्र 'अग्नी' हे चिन्ह पारशी धर्माचे प्रतिक मानले जाते.[७१]

पारशी धर्मांचा उदय होण्यापूर्वी इराणमध्ये अनेक देवदेवतांवर विश्वास असणारा धर्म प्रचलित होता. ह्यांपैकी काही देवदेवता मानवी जीवनास स्पर्श करणाऱ्या निसर्गशक्ती होत्या. तसेच तत्कालीन लोकांचा मंत्र-तंत्र व जादूटोण्यावरही विश्वास होता. देवदेवतांना आणि इतर अतिमानवी शक्तींना संतोषविण्यासाठी पशुयाग करून इच्छित साध्य करून घ्यावे, अशा प्रकारचे धर्मांचे स्वरूप होते. ह्या यज्ञयागात हओमाला अथवा संस्कृत-ओम विशेष महत्व होते. पशुयागामुळे प्राण्यांना होणाऱ्या पीडेला अवेस्तातील यस्न २९ मध्ये बैलाच्या आत्म्याने केलेल्या आक्रंदनाच्या रूपात जरथुस्त्राने वाचा फोडली आहे. ह्या यस्नात गायी-बैलांचा त्राता म्हणून जरथुस्त्राचे नाव ऐकू येते.[७२]

काहीसे दक्षिणेकडे पसरले आणि आज त्यांची वस्ती मुख्यत्वे गुजरात-महाराष्ट्रात आहे. त्यांना येथे पारशी नावाने ओळखतात. ह्या धर्मात जोपाण्यासारखी काही चिरंतन तत्त्वे असल्यामुळे व त्याचे अनुयायी सत्प्रवृत्त राहिल्यामुळे हा धर्म देशांतर करावे लागले, तरी आपली उज्वल परंपरा टिकवून आजही जिवंत राहिला आहे. 'अहुर मज्द' ह्याचा अर्थ देव प्रज्ञा किंवा मघा (लॉर्ड विजडम) असा होतो. ह्या मताचे पुरस्कर्ते सारासार विवेकबुध्दी ह्या अमूर्त कल्पनेला जरथुस्त्राने देवपण दिले, असे मानतात. दुसऱ्या मताच्या पुरस्कर्त्यांच्या मते गाथांत अहुरो मज्दाऑ अशा शब्दप्रयोगाऐवजी मज्दाऑ अहुरो असा प्रयाग जास्त वेळा आढळत असल्यामुळे जरथुस्त्र देवाला संबोधण्यासाठी मज्दा आणि अहुर ह्या दोन शब्दाचा स्वतंत्रपणे उपयोग करीत असे, असे म्हणणे यथार्थ होईल. जरथुस्त्राच्या देवाचे नाव अहुर त्याला तो मज्दा ह्या नावानेही संबोधत असे. ही दोन नावे केव्हा एकत्र, पण बहुश: निरनिराळी वापरलेली आढळतात. 'मज्दाओ अहुरो' ह्याचा अर्थ 'मेधावी अहुर' अथवा 'वाइज लॉर्ड' असा होतो. जरथुस्त्राच्या शिकवणीत मनाच्या व शरीराच्या पावित्र्यरक्षणाला अतिशय महत्व आहे. शरीर कुठल्याही कारणाने विशेषत: मृतदेहाच्या संसर्गाने अपवित्र होऊ देता कामा नये, ह्यावर त्या धर्मात कटाक्ष आहे.

**२.१.७) शीख धर्म व इतर धर्मांतील समानता:-**

शीख धर्मांची निर्मीती पंधराव्या शतकात झाली. शिख धर्मांचे संस्थापक गुरू नानक देवजी यांनी संपूर्ण जगात वेगवेगळ्या यात्रा, प्रवास करून सर्व धर्मांचा अभ्यास केला व सर्व धर्मांतील चांगल्या गोष्टींचा समावेश शीख धर्मांत केला. गुरू नानक यांनी आपल्या उदासीज च्या दरम्यान सर्व धर्मांतील अभ्यास केला व धर्मप्रमुखांच्या भेटी घेतल्या व सर्व धर्मांचा अभ्यास केला.

हिंदु आणि शीख परंपरेत धर्म आणि संस्कृतीत वेगळेपणा आहे. नैतिक मुल्याचे निर्णय हे धार्मिक विश्वास आणि नितीमत्तेवर अवलंबून आहेत. दोघांचेही नितीमुल्य मुख्यमता कर्तव्यावर आधारीत आहेत. शीख धर्म व हिंदू धर्म मृत्यूनंतर शवाचे अग्नीदहन करतात. दोघेही कर्म आणि पुर्नजन्मावर विश्वास ठेवतात. हिंदु धर्म आणि शीख धर्म 'स्व आणि आत्मा' यावर विश्वास ठेवतात. शीख धर्मांत आत्मा अथवा 'आत्मन' ह्या शब्दाचा वापर करतात. धर्म, कर्म, मोक्ष आणि पुर्नजन्मावर विश्वास ह्या संकल्पना हिंदु आणि शीख दोघांनाही फार महत्वपुर्ण स्थान आहे. शीख धर्मांवर मध्यकालीन भारतातील भक्ती संप्रदायाच्या निरगुणी (निराकार देवता) परंपरेचा प्रभाव पडला. गुरू नानक देव हे एका हिंदु परीवारात वाढले आणि ते भक्ती संप्रदाय परंपरेचा त्यांच्यावर प्रभाव पडला. शीख धर्मांतील 'एक ओंकार' हे हिंदु धर्मांतील 'ओम' याशी संबंधीत आहे.

मुस्लीम आणि शीख धर्म एकेश्वरवादी आहेत. मुस्लीम सुफी संतासोबत शिख गुरूंचे आत्मीयतेचे संबंध होते. डिसेंबर १५८८ मध्ये हरमंदीर साहीब बांधण्याच्या अगोदर एका दिक्षा समारोहात लाहोरच्या सुफी संत मियॉ मिर ह्यांनी गुरू अर्जुन देवाची भेट घेतली.

जैन धर्म आणि शीख धर्म हे भारतीय उपखंडातील धर्म आहेत. दोन्ही धर्मांमध्ये दिवाळी साजरी केली जाते. जैन धर्म हा शाखाहारी आहे तर शीख धर्म शाखाहार व मांसाहार दोन्ही केल्या जातो. जैन धर्मांत जी सन्यासवृत्ती आहे ती शीख धर्मांत नाकारली आहे.

**शीख धर्म:-**

शिख शब्दाचा निश्चीत अर्थ असा सांगीतल्या जातो की कुठलाही व्यक्ती अथवा पुरूष जो एकनिष्टेने एक चिरस्थायी ईश्वर अस्तित्वात असल्यावर विश्वास ठेवतो. गुरूग्रंथसाहिब व दहा मानव गुरू आपले आध्यात्मिक गुरू मानुन त्याची शिकवन पालण करतो. दहाव्या गुरूने सुरूवात केलेल्या दिक्षा अम्रीत संचार वर विश्वास ठेवतो. इतर धर्मांशी कृतज्ञता बाळगत नाही. असा व्यक्ती म्हणजे 'शीख' होय.[७३] शीख हा शब्द मराठीत बहुदा: वापरला जातो. उत्तरेत शीख म्हणत नाहीत, 'सिक्ख' किंवा 'सिख' म्हणतात. हा शब्द उघड उघड शिष्य या संस्कृत शब्दाचे पाली प्राकृत रूप 'सिक्क' शब्दाशी जुळणारा आहे.[७४]

शीख धर्म हा सुफी आणि भक्ती संप्रदायांच्या विचारसरणीतून जन्माला आलेला आहे.[७५] शीख धर्मांची सुरूवात अल्प प्रमाणात झाली असली तरी शक्तीशाली व दिव्य शक्ती अधिकार प्राप्त शीख गुरू नानक शीख धर्म प्रमुख धर्म म्हणुन स्थापण्याचे श्रेय जाते. गुरू नानक हे मान्यता प्राप्त गुरू मधील सर्वांत पहिले गुरू होते. गुरू परंपरेत १० गुरू झाले. सगळी १० गुरू खत्री ह्या जातीत व बेदी, त्रेहान, भल्ला, व सोढी इ. गोत्र परीवारातील जन्मली होती.[७६] आधुनिक शिख धर्म आदिग्रंथ किंवा श्री 'गुरूग्रंथसाहिब' हा धर्मग्रंथ शिखांच्या गुरूंनी लिहिला ह्या ग्रंथालाच गुरू मानतात. गुरू गोंविद सिंघ शिखांचे दहावे गुरूंनी गुरूग्रंथसाहिबलाच गुरू मानावे असे सांगीतले व त्याप्रमाणे आजही शिख धर्मांतील लोक श्री गुरूग्रंथसाहिब

लाच गुरू मानतात. मुगल शासकांनी इस्लाम धर्म स्विकारण्यास नाकारल्याबद्दल व शिख हिंदुचा छळ करण्यास प्रतिकार केल्याबद्दल १० शिख गुरू पैकी शेवटच्या सहा गुरूंना खुप त्रास दिला व गुरू अर्जुन व गुरू तेग बहाद्दूर यांना देहांती शिक्षा दिली.[७७]

गुरू नानकावर भक्त कबीर आणि सूफी शेख इब्राहिम फरीद यांचा फार प्रभाव पडला.[७८] शीख धर्माचे संस्थापक गुरू नानक हे प्रामाणिक जीवन, दान व इतरांची सेवा याविषयी गुरू नानक आग्रही होते. जो आपल्या श्रमाने भाकरी मिळवतो व इतरांना वाटेकरी करून घेतो तोच खरा धर्म होवू शकतो असे ते मानत होते, काम विकारांचा पगडा असलेली व्यक्ती जातीचा विचार करीत नाही. शीख गुरूंनी मिथ्याचरणी साधूंची निंदा केली. प्रामाणिक जीवन, कर्तव्य पालन व ईश्वरभक्तीद्वारे संसारात राहूनही मुक्ती साधता येते असे गुरू नानकाप्रमाणे महाराष्ट्रीयन संतांनी मान्य केले. आश्रम व्यवस्था त्यांना अमान्य होती. चांगल्या कृत्याने मनुष्य पुण्यवान होतो व दुष्कृत्याने पापी होतो या बृहदारण्य उपनिषदातील विचारांचाच गुरू नानकांनी स्विकार केला. गुरू नानक हे गुरू व शिख धर्मांचे १५ व्या शतकातील संस्थापक होते.[७९] गुरू नानकांचे विचार 'दख्खनी ओंकार' व 'सिध्द गोष्ठ' येतात. गुरू नानकांनी पंजाबीला आपल्या वाणीची माध्यम भाषा बनविले.

गुरूनानक देवांनी शस्त्र हे धर्म निष्ठेचे एक प्रमुख लक्षण मानले. शिख धर्मांचा आधारभुत विश्वास, निर्माणकर्त्या ईश्वराची भक्ती, संपुर्ण मानव जातीचे कल्याण, निस्वार्थ सेवा, सामाजीक न्यायासाठी झटत राहणे, सर्वांची समृध्दी, इमानदार वागणूक, गृहास्तीक राहून ईश्वरी साधना ह्या बद्दल पवित्र धर्मग्रंथ श्री गुरूग्रंथसाहिब यात उल्लेख आहे.[८०] जनसेवा हिच ईश्वरसेवा मानली. त्यासाठी निष्ठा, पावित्र्य, न्याय, दया, नेमस्तपणा या नितीनियमांवर भर दिला. मूर्तीपूजा, कर्मकांडाचे अवडंबर निरर्थक आहे. वैराग्य व संन्यास निषेधात्मक आहेत हे ठरविले. सत्य हे एक उच्च तत्त्व आहे. परंतु त्यापेक्षाही सत्यमय जीवन त्याहूनही उच्च आहे. अशी भूमिका गुरू नानक देवांनी मांडली. शीख धर्मांच्या मानवतावादी आचरणामुळे, गुरू नानक देवांना बरेच अनुयायी लाभले. मूर्तीपूजा व कर्मकांडाचे अवडंबर, निरर्थक मानणारा, क्षात्रधर्मांची दिक्षा घेतलेला धाडसी, पराक्रमी, व मानवतावादी धर्म म्हणून शीख धर्मांला एक मानाचे स्थान भारतीय समाजात प्राप्त झाले आहे. सर्व मानव जातीला मानवतावादी दृष्टी देणारा, निर्भय, निर्वेर बनवणारा, गुरू-शिष्य विषयक आदरभाव निर्माण करणारा, शब्द व गुरू सत्संग व ईश्वराप्रती पूर्ण शरणागती पत्करणारा महान धर्म म्हणून भारतीय समाजात शीख धर्मीयाचे स्थान आहे. 'खंड अथवा खंडा' हे चिन्ह शीख धर्माचे प्रतिक मानले जाते.[८१]

**२.२ शीख धर्मांच्या उदयाची कारणे :-**

I. शीख धर्मांच्या उदयापूर्वीचा कालखंड हा एक परीने अंधकारमय कालखंड म्हणून ओळखला जातो. संपूर्ण समाज जीवनात एक प्रकारची मानसिक शिथिलता निर्माण झाली होती. समाज हा पूर्णत: दिशाहीन व विकास खुंटलेल्या अवस्थेत होता.

II. धर्मांच्या नावाखाली सांप्रदायिक भेदभावाचे वातावरण निर्माण झाले होते. तसेच धार्मिक कर्मकांड , पुजा-अर्चा, उरूस-जत्रा, नवस इ.चे प्राबल्य वाढले होते. धर्मांचा मूळ उद्देश दूर जावून कर्मकांडाच्या अवडंबरामध्ये सर्वसामान्य जनता अडकली होती. आध्यात्मिक जीवन पूर्णत: अंधकारमय झाले होते. धार्मिक क्षेत्रातील पुजारी व पुरोहीत वर्गाचे अनावश्यक स्तोम वाढले होते.

III. इसवी सनाच्या १५ व्या शतकातील समाज विषमतेने पोखरून निघालेला होता. जातीभेद, वर्णभेद, उच्चनीचता, गरीब-श्रीमंत यांच्यातील मतभेद पराकोटीला गेले होते. स्पृश्य-अस्पृश्यता, हिंदू-मूसलमानांतील तेढ, सावकार व सरदार वर्गाकडून होणारे सर्वसामान्य लोकांचे शोषण यासारख्या घटनांमुळे समाज ढवळून निघाला होता. या सर्व गोष्टींचा गुरू नानक यांच्यावर परीणाम झाला. त्यातूनच त्यांनी नवीन धर्मांची स्थापना करण्याचा निर्णय घेतला.

IV. इसवी सनाच्या १५ व्या शतकात भारतात कमालीची अस्थिरता निर्माण झालेली होती. राजकीय क्षेत्रात संपूर्ण भारतावर अंकुश निर्माण करणारी सत्ता नसल्यामुळे लहान मोठ्या सत्ताधाऱ्यांमध्ये संघर्षाचे वातावरण निर्माण झाले होते. संपूर्ण भारतात राजकीय अस्थिरता निर्माण झाली होती.

V. संतांच्या वाणीचा प्रभावामूळे, संतांनी जे मौलिक कार्य उत्तर भारतामध्ये केले होते, त्याची प्रेरणा गुरूनानक देवांस साह्यभूत ठरल्याचे दिसून येते. संत नामदेव, संत कबीर, या संतांनी कुसंस्कार, अंधविश्वास, अनिष्ट रूढी इ. दूर करण्यासाठी महत्वपूर्ण कार्य केले होते. संत कबीरांनी हिंदु-मुस्लीम ऐक्याच्या दृष्टीने केलेली कामगिरी विशेष उल्लेखनीय मानली जाते. संत नामदेवांनी 'ज्ञानदीप लावू जगी' या मंत्रातील ज्ञानदीप व जग ह्या शब्दाप्रमाणे संत नामदेवांच्या स्थानाची भव्यता त्यांच्या मनाची उदात्तता, त्यांच्या भक्तीची अथांगता आणि त्यांच्या किर्तीला परिमल याचे दर्शन घडते.[८२] त्याचप्रमाणे संत कबीर यांनी देखील मानवतावादी मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला. संत कबीरांचा देव देवळात, मशिदीत, मक्केत, कैलासात, कोणत्याही कर्मकांडात, भोग, संन्यासात नाही तर तो माणसांच्या श्वासोच्छवासात, माणसात ज्ञानात, ज्ञानातून प्राप्त झालेला सामर्थ्यात होतो अशी शिकवण दिली.

VI. गुरू नानकांचे प्रभावी नेतृत्व शीख धर्माला मिळाल्यामूळे या धर्मांचा विकास झपाटाने झाला. गुरू नानकांचा मूळ पिंड संवेदनशील व कनवाळू वृत्तीचा होता. मानवतावाद त्यांच्या एकूण आचार-विचारांचा पाया होता. संपूर्ण भारतभर पदयात्रा करून त्यांनी सर्व जाती, धर्मांतील लोकांची दु:खे जाणली. एकूण संपूर्ण सामाजिक परिस्थितीचे अवलोकन केले. हिंदू धर्म, जैन धर्म, बौध्द धर्म, मुस्लीम धर्म या सर्व धर्मांचा त्यांनी सखोल अभ्यास केला. गुरू नानकांनी देवांनी सत्यालाच जीवनाचे एकमात्र लक्ष्य मानले. ईश्वर हाच सर्वांचा पिता असून सर्वजण त्याची लेकरे आहेत, असा मानवतावादी दृष्टीकोन गुरू नानकांनी डोळ्यासमोर ठेवून त्याचा प्रत्यक्षात अमल केला. 'सत श्री अकाल' म्हणजेच ईश्वर सत्य आहे. हीच त्यांची श्रध्दा होती. गुरू नानक यांनी सर्व जाती, जमातीच्या पंथ-उपपंथाच्या लोकांना सामावून घेण्याचे विशाल अंत:करण नानकाजवळ होते. अशा रितीने सर्व मानव जातीस एकत्र आणणारा, सर्वांसाठी समान उपासना पध्दत देणारा

सरळ व सोप्या भक्ती मार्गाचा पुरस्कार करणारा, मूर्तीपूजेपेक्षा गुरूग्रंथालाच महत्व देणारा, गुरू-शिष्य परंपरेवर आधारलेला शीख धर्म गुरू नानकांनी स्थापन केला.

VII. इसवी सनाच्या १५ व्या शतकात सर्व सामान्य जनता अन्यायाखाली होरपळून निघाली होती. धर्मभेद, जातीभेद, कर्मकांडाचे स्तोम इ.मुळे सामान्य जनता होरपळून निघाली होती. राजकीय, सामाजिक व आर्थिक गुलामगिरीखाली दडपलेल्या लोकांचा कोणताही वाली उरलेला नव्हता. अशा परिस्थितीमध्ये मानवतावादी विचाराने प्रभावी झालेल्या गुरू नानक देवाच्या नव्या धर्मांकडे लोक आकर्षित झाल्याचे दिसून येते. या नव्या धर्मांची मांडणी धर्म, जात, पंथ, विरहित अशा विशुध्द पायावर मांडण्यात आलेली होती. ईश्वर प्राप्तीचा अत्यंत साधा व सरळ मार्ग गुरू नानक देवाने दाखवून दिला.

VIII. इ.स. १२०० पासून पंजाबवर आढळणाऱ्या इस्लामी आक्रमक टोळ्यांपुढे हिंदूना पळता भूई थोडी झ ाली होती. मुसलमानी आक्रमकांच्या छळाला कंटाळून अर्ध्या अधिक हिंदूनी मुसलमान धर्म स्विकारला होता. हा हिंदूचा छळ थांबला पाहिजे आणि त्यातून काही तरी मार्ग काढला पाहिजे असे गुरू नानकांना वाटू लागले यातूनच त्यांनी शिख धर्मांची स्थापना केली.

शीख संप्रदायामध्ये गुरू परंपरा लाभली आहे. शीख संप्रदायात १० गुरू लाभले. गुरू नानक, गुरू अंगद, गुरू अमरदास, गुरू रामदास, गुरू अर्जुन, गुरू हरगोविंद, गुरू हर राय, गुरू हरकिशन, गुरू तेगबहादूर, गुरू गोविंदसिंग असे १० गुरू शीख संप्रदायात होऊन गेले. गुरू नानक यांनी भक्तांच्या वाण्या संग्रहित केल्या होत्या. ३६ वाणीकारांच्या रचनेचे महत्त्वपूर्ण स्वरूप म्हणजे 'गुरूग्रंथसाहिब' होय. गुरू नानक शीख धर्माचे संस्थापक होते. गुरू अंगद यांनी 'गुरूमुखी' लिपी जनसामान्यात प्रचलित केली.[८३] गुरू अमरदास यांनी गोविंदवाल या मुख्य तीर्थस्थानाची निर्मिती केली. गुरू रामदास सम्राट अकबराचे मित्र होते. त्यांनी 'रामदासपूर' सध्याचे 'अमृतसर' हे शहर निर्माण केले. गुरू अर्जुन यांनी शीख धर्मग्रंथ ग्ररुग्रंथसाहिब पूर्ण केले. गुरू हरगोविंद यांनी 'अकाल तख्तची' स्थापना केली. शीख धर्माचे १० वे गुरु गोविंदसिंघ यांनी 'खालसा पंथाची' स्थापना केली. गुरु गोंविदसिंघांनी शक्तीप्राप्तीसाठी दुर्गादेवीची उपासना केली.

**२.३ शीख धर्मांची शिकवण :-**

शीख धर्माने मानवता वादावर आधारलेली अशी शिकवण साधी व सरळ असून सर्वसामान्यांना तिचे आचरण करण्यात फारसी दुर्बोधता वाटत नाही. गुरूनानकांनी प्रत्यक्ष व्यक्तीगत व सामाजिक आचरणातही सर्वधर्मी समान तत्व प्रकट केले होते. व्यक्ती व समाज यांना श्रेष्ठ मानवी मूल्यांचा संदेश देणारे तत्त्वज्ञान गुरू नानकांनी प्रतिपादन केले. म्हणुन गुरू नानकाला त्याकाळात 'धर्मसमन्वय महापुरूष' म्हणून संबोधले जाते. शीख धर्मांची शिकवण पुढील प्रमाणे आहे.

१. सर्वसृष्टीचा निर्माता, निर्भय, समर्थ, अनादी, स्वयंभू, ओंकार स्वरूप, सत्यस्वरूप, अव्दितीय असा परमेश्वर आहे. त्यांच्या कृपेने काम करणे यात खरी धन्यता आहे.

२. गुरूनिष्ठा व नामस्मरण यांना सर्वश्रेष्ठ मानावे.

३. ईश्वर एक असून तोच या अखिल विश्वाचा कर्ता व निर्माता आहे.

४. ईश्वरासमोर सारे मानव समान आहेत. ईश्वर हा दयाळू, उपकारकर्ता, पाप पुण्याचे न्याय फळ देणारा आहे. सत्य, परमात्मा, सदगुरू ही ईश्वराची प्रमुख नावे आहेत.

५. विश्व व्यापक मानव धर्म हाच ईश्वराचा शिकवणुकीचा गाभा आहे.

६. ईश्वराचे नामस्मरण करणे हेच खरे तप होय.

७. ईश्वर साधनेसाठी संन्यास, वनवास, यांची गरज नाही तर संसार व समाजसेवा यातून सुध्दा ईश्वर साधना घडु शकते.

८. अंधश्रध्दा व स्वार्थी मनोवृत्ती ठेवून ईश्वराची उपासना न करता निष्काम प्रेममय, निरहंकारी वृत्तीने ईश्वरभक्ती करावी.

९. श्रम-स्वावलंबी वृत्ती, सहकार्य, सेवा या मूल्यांना अनन्यसाधारण महत्त्व द्यावे. परमार्थ म्हणजेच स्वत:च्या सेवेने, श्रमाने ईश्वराची उपासना करण्याचा मार्ग मानावा.

१०. देहदंड, निवृत्तीवाद, यतिवाद, पलायनवाद, निराशावाद, निष्क्रीयत इ.ना शीख धर्मांत मुळीच स्थान नाही.

११. सामाजिक समतेचे मूल्य केवळ वैचारिक किंवा तात्विक पातळीवर न ठेवता त्यास व्यवहारात व आचरणात आणावे.

१२. कृत्रिमभेद, विषमता, उच्चनीचता, दैववाद, अंधश्रध्दा इ.ना मुळीच स्थान देवू नये.

१३. मनुष्याने कर्म व त्याद्वारे होणाऱ्या पाप-पुण्याच्या भोगाला त्याने स्वत:लाच जबाबदार मानावे.

१४. सर्व प्रकारच्या मोहावर व प्रलोभनावर मात केली पाहिजे.

१५. मरणाला भिऊ नका कारण मरण हे नवीन जीवनाचे प्रवेशव्दार आहे.

१६. सर्व मानवजात एक मानावी. त्यात कोणी हिंदू वा कोणी मुसलमान अथवा कोणी ख्रिचन नाही. सर्व मानवमात्रामध्ये एक मानवतत्त्व व्यापलेले आहे.

१७. शीख धर्मीयांनी नामधारी सज्जन न होता खरे सज्जन आणि सात्विक बनण्याचा प्रयत्न करावा.

१८. परमेश्वराचे, अल्लाची नावे केवळ जीभेवर न ठेवता ते अंत:करणात बाळगण्याचा प्रयत्न करावा.

१९. अवतारांना ईश्वर मानू नये.

२०. गुरू-शिष्य परंपरेला अनन्यसाधारण महत्त्व द्यावे. गुरूचे मत प्रमाणभूत मानावे, वेदप्रामाण्य मानू नये.

२१. निंदा स्तुतीपासून अलिप्त राहावे.

२२. नैतिक मूल्यांचे व नीती मर्यादांचे पालन करावे.

२३. शीख धर्मातील खालसा पंथियांनी पंच कंकार मानावेत.[८४] केस व दाढी राखावेत. कंगवा जवळ बाळगावा. कच्छ पायजमा किंवा तोकडी तुमान परिधान करावा, कडे-लोखंडाचे किंवा स्टिलचे कंकण घालावे. कृपाण -छोटी तलवार, कट्यार किंवा खंजीर बाळगावे.

२४. खऱ्या ज्ञानासाठी प्रयत्नशील रहावे.

२५. दुसऱ्यांना त्रास पीडा होईल असे व्यवसाय वा कृत्य करू नये.

२६. कर्मकांडपुर्ण मारल्या गेलेल्या मासाचे भक्षण करू नका आणि कसल्याही नशैली वस्तुचा वापर करू नका. दारू आणि तंबाखु पुर्ण प्रतिबंध आहे.

२७. कसलेही कर्मकांण्ड, अंधश्रध्दा आणि शिख विरोधी आचरण जसे जुव्वा खेळणे इ. पासून दुर रहावे.

२८. आपल्या पत्नी वा पती शिवाय सर्व स्त्री वा पुरूष हे आपले मुलगी, बहीण, भाऊ, वडील, आई मानावे.

२९. लिंग, जात, वंश, धर्माचा भेदभाव न करता सर्वाशी समानतेन वागावे.

**२.४ शीख धर्मांचे तत्त्वज्ञान :-**

शीख धर्मांमध्ये वेदांना प्रमाण मानले जात नाही. शीख गुरूंच्या विचारावर उपनिषदांचा प्रभाव जाणवतो. शीखांनी निती, भक्ती व सदाचार यांच्या आधारे संसार करावा असाच गुरू नानकांचा उपदेश आहे. शीख धर्म हा मुख्यत्वे करून गुरू परंपरा मानणारा धर्म होय. त्यामुळे शीख धर्मांत गुरू, गुरूग्रंथसाहिब, गुरूव्दारा या तीन घटकांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. एका अर्थाने या तीन घटकांना शीख धर्मांचे सर्व तत्त्वज्ञान सामावलेले आहे.

**२.४.१ गुरु :-**

सद्‌गुरू हेच ईश्वर स्वरूप आणि ईश्वराचे प्रतिक आहे. शीख धर्म परंपरेनुसार सद्‌गुरू म्हणजेच खरा ईश्वर होय. सद्‌गुरू खऱ्या अर्थाने ज्ञानमुर्ती व ज्ञानाची परमपवित्र ज्योती आहे. म्हणून पूजा, सद्‌गुरू निष्ठा, सद्‌गुरू स्मरण ही परमार्थाची श्रेष्ठतम साधने आहेत. शीख धर्मांत गुरूचे महत्त्व सांगतांना गुरू नानक म्हणतात, माणसांचा सर्वांत श्रेष्ठ गुरू म्हणजे ईश्वर होय. शीख धर्मांतील गुरूंचे महत्व आपल्या गुरूवाणीत सांगतांना गुरू नानक म्हणतात,

"गुरू मेरी पुजा, गुरू गोंविद
गुरू मेरा परब्रम्ह, गुरू भगवंत |"

**२.४.२ गुरूग्रंथ :-**

शीख धर्माचा पवित्र धर्मग्रंथ 'गुरूग्रंथसाहिब' यात शीखांचे धर्मगुरू व शीखेत्तर संताची पदे आहेत. यामध्ये संत नामदेव, संत कबीर, संत सुरदास, संत रविदास, संत त्रिलोचन,संत परमानंद, संत भिखन, संत सेना, संत जयदेव इ.ची पदे गुरूग्रंथात समाविष्ट आहेत. भाषाशैली, तत्त्वज्ञान यादृष्टीने 'गुरूमुखी' लिपीतील

या पवित्र ग्रंथाचे स्वरूप या अर्थाने 'सकलमत समन्वय' असे झालेले आढळते.[८५] गुरू अंगद यांनी प्रथम ग्रंथ निर्मीतीचे काम सुरू केले होते. त्यानंतर गुरू अमरदास यांच्या कार्किदीत ग्रंथ निर्मितीच्या कामात आणखी प्रगती झाली.

गुरू अर्जुन यांची सर्वांत मोठी उपलब्धी म्हणजे त्यांनी शिखांचा पवित्र धर्मग्रंथ 'आदिग्रंथ' किंवा 'गुरूग्रंथसाहिब' चे केलेले संकलन होय.[८६] शिख गुरूंचे अधिकृत लिखाण आणि शिकवण शिख पंथाच्या शिष्यापुढे ठेवणे ही गुरू अर्जुन यांची तळमळ होती. यासंदर्भात व्दितीय गुरू अंगद आणि तृतीय गुरू अमरदासचे पुत्र मोहन यांनी काही प्रयत्नही केले होते. म्हणूनच गुरू अर्जुन यांनी प्रथम गोविंदवाल येथे वास्तव्य करून असलेल्या बाबा मोहन यांच्या संग्रही असलेले या संदर्भातील साहित्य प्राप्त करण्याचे ठरविले. ते साहित्य आणण्यासाठी गुरू अर्जुन यांनी त्यांच्या अत्यंत विश्वासू अशा भाई गुरूदास व भाई बुढ्ढा या दोन शिष्यांना एकामागून एक बाबा मोहनकडे पाठविले. परंतु दोघेही रिकाम्या हाताने परत आल्याने गुरू अर्जुन स्वत: गोविंदवाल येथे गेले. गुरूंची विनंती नाकारणे बाबा मोहनला शक्य नसल्याने व सर्वात योग्य व्यक्तीकडे त्यांचा संग्रह जात असल्याने त्यांनी त्याच्याजवळचे सर्व साहित्य गुरू अर्जुनच्या हवाली केले. गुरू अर्जुन यांनी त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या गुरूंच्या रचनांवरही बाबा मोहनशी चर्चा केली व त्यानंतर ते अमृतसरला परत आले. भक्ती चळवळीच्या हिंदू व मुसलमान प्रमुखांकडे विचारणा करून त्यांच्या पंथांच्या वा मार्गांच्या संस्थापकांच्या उत्तमोत्तम रचना पाठविण्याची विनंती केली. अशा प्रकारे गुरू अर्जुन देवाने गुरूग्रंथसाहिबाची निर्मीती केली. त्यानंतर गुरू अर्जुनदेवाने पुर्वीच्या गुरूंनी केलेले ग्रंथ निर्मितीच्या कामाचे संकलन केले व त्यामध्ये इतर धर्मांतील व जातीतील महान व्यक्तींच्या साहित्यकृतीचा समावेश केला.

श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये वाणींची संख्या ५८७३ असून सहा गुरूंची वाणीसंख्या ४९४९ एवढी आहे. पंधरा भक्तांची वाणीसंख्या ७८४ व निकटवर्तीयांची गुरू सिक्ख यांचे १७ वाणी एवढी आहे तर भाटांच्या वाणींची संख्या १२३ आहे. शिखांचे पहिले गुरू नानक यांची गुरूग्रंथसाहिबातील ९७४ पदे आहेत.[८७] इ.स. १६०४ मध्ये गुरूग्रंथाचे लिखाण पुर्ण झाले. गुरू अर्जुनदेवाने लिहिलेल्या गुरू ग्रंथाची प्रत अमृतसर येथील सुवर्णमंदिरात ठेवण्यात आलेली आहे. गुरूग्रंथ साहिबांची देखभाल करण्यासाठी भाई बुढ्ढा यांना पहिला ग्रंथी म्हणून नेमण्यात आले. गुरूग्रंथसाहिबात पहिल्या पाच गुरूंची मिळून एकून ४८३९ पदे आहेत. याग्रंथातील 'जपुजी' ही आद्यगुरू नानकांची रचना असून ती सर्वश्रेष्ठ व प्रात:स्मरणीय मानली जाते. गुरूग्रंथसाहिबांची देखभाल करण्यासाठी भाई बुढ्ढा यांना पहिला ग्रंथी म्हणून नेमण्यात आले.[८८]

**२.४.३ गुरूवाणी :-**

गुरबाणी हे क्रियापद सर्वसाधारणपण शिख गुरूंनी रचलेल्या पुष्कळशा रचना आणि इतर गुरूग्रंथसाहिब रचल्याबद्दल वापरल्या जातो. तव प्रसाद सवाइये, चौपाई ला सुध्दा गुरबाणी समजल्या जाते. आदीग्रंथात गुरबाणी हे सर्वश्रेष्ठ ईश्वराकडुन प्रत्यक्ष आलेला आवाज आणि तो मजकुर सांसारिक भाषा आणि

शब्दात लिहील्याचे रूप आहे. त्याला सुध्दा 'गुरबाणी' असे म्हणतात. गुरूग्रंथसाहिबातील आद्यगुरूनानक यांची 'जपुजी' या नावाने ओळखली जाणाऱ्या पद्यरचनेलाच 'गुरूवाणी' असे म्हणतात. जपुजी किंवा जपजी या गुरू नानकांच्या पद्यरचनेवर शीख अनुयायांची गाढ श्रध्दा आहे. गुरूग्रंथसाहिब या ग्रंथाचा प्रारंभच 'जपुजी' म्हणजेच 'गुरूवाणी' ने होतो. गुरूनानकांच्या सर्व उपदेशाचे सार त्यात सामावलेले आहे.

"ओमकार सतिनामु करता पदखु निरभड

निरवैरु अकाली मुरति अजून सैभ गुरूप्रसादि ।।"

हा गुरूवाणीतील पहिला मूल मंत्र असून सर्व सृष्टीचा निर्माता, निर्भय, समर्थ, निवैर, कालतीत, स्वयंभू, गुरूरुप, सत्य स्वरुप, ओंकार स्वरुप, अद्वितीय अशा परमेश्वरांच्या स्मरणाने व कृपेने आपण आपले काम करु या असा या मंत्राचा भावार्थ आहे.[८९] गुरबाणी हे दोन शब्द गुर आणि बाणी या दोन शब्दाद्वारे बनला आहे. गुर हा शब्द त्यांच्या संदर्भावरून अनेक अर्थाने वापरल्या जातो. गुरूग्रंथसाहिबात गुर हा शब्द अनेक अर्थाने वापरल्या गेला. गुर हा शब्दाचा सर्वसाधारण वापर मनाच्या अंतरी असलेली शुध्दता ज्याला चित्त किंवा अंतर आत्मा संबोधल्या जाते यासाठी वापरला गेला आहे. यावरुन गुरूबाणी चा अर्थ सुविचाराचे भाषण अथवा मनाच्या शुध्दतेवरील भाषण असा निघतो.

निस्सीम गुरूभक्ती, ओंकारस्वरूप ईश्वरतत्त्वाचे नामस्मरण, नीतियुक्त आचरण, समाजबांधवांविषयी प्रेमभाव, भगवंतभक्तीच्या क्षेत्रात आणि समाजाच्या विविध स्तरांतरी भेदभाव न ठेवणे, ही सारी गुरूग्रंथाची शिकवण त्याच्या भारतीयतेतूनच आलेली आहे. भगवत् तत्त्व हे सर्वोपरी असून, तेच सदासर्वत्र विद्यमान आहे, हे गुरूकृपेने जाणून घेऊन सर्वांशी सद्भावयुक्त आचरण करीत सामाजिक ऐक्य साधावे, प्रसंगी स्वत:च्या वैयक्तीक, सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक स्वत्त्वाच्या संरक्षणासाठी शस्त्रांचा वापर करावा, पण अकारण इतरांवर आक्रमण वा अत्याचार करून नयेत हेच गुरूवाणीचे पुन:पुन्हा प्रतिपादन आहे. सर्व गुरूंचे चरित्रचारित्र्य देखील हेच स्पष्ट करते. किंबहुना सहिष्णु भारतीय समाजावरील क्रूर सांस्कृतिक आक्रमणाला गुरूवाणीत एक उत्तर देण्यात आले आहे.[९०]

जापजी साहिब, आनंद साहिब, किर्तन सोहीला हे गुरूग्रंथसाहिबाचे भाग आहे. जाप साहिब, तव प्रसाद सवाइये, आणि चौपाइ साहिबाची रचना गुरूगोविंद सिंगानी केली आणि ते दशमग्रंथात आढळतात. रेहरास हे गुरूग्रंथसाहिब आणि दशम ग्रंथातील स्त्रोताच मिश्रण आहे. शिख आपल्या नितनेममध्ये आणखी गुरबाणीचा समावेश करू शकतो. इतर सर्वसाधारण गुरबाणीच्या रचनेत शबद् हजारे, सुखमणी साहिब, असा-दी-वार, दाखणी ओंकार, बावन आखरी इ. चा समावेश होतो.

**२.४.४ गुरूव्दारा :-**

'गुरूव्दारा' म्हणजे शीखांचे उपासना मंदीर होय. शीख धर्मानुसार गुरूव्दारा हे परमेश्वराचे निवासस्थान नसून त्या निवासस्थानाकडे म्हणजेच ईश्वराकडे जाण्याचा दरवाजा आहे. ईश्वराच्या उपासनेने

प्रभुच्या महात्म्याचा दरवाजा उघडला जातो, अशी शीख धर्मांची श्रध्दा आहे. गुरूद्वारा म्हणजे गुरूकडे जाणारा मार्ग अथवा प्रवेशद्वार होय. गुरूद्वारा हे एक शिख धर्मीचांचे आराधणेच स्थळ आहे. 'गुरूद्वारा' हे वस्तुत: गुरूग्रंथमंदिरच असते.[९१] पंजाब भागातील रावी नदीच्या किनारी करतारपुर येथे शिखांचे पहिले गुरू गुरू नानक देवजी यांनी इ.स.१५२१ साली पहिला गुरूद्वारा बांधला. शिखांचे सहावे गुरू गुरू हरगोविंद यांनी 'गुरूद्वारा' हा शब्द प्रचलित केला. सगळ्याच गुरूद्वाऱ्यात लंगर हॉल असतो, जिथे लोक नि:शुल्क जेवण करू शकतात. गुरूद्वाऱ्यामध्ये वाचणालय, नर्सरी, क्लासरुम, सभागृह, भेट वस्तुदुकान आणि शेवटी दुरूस्तीचे दुकानही असु शकतात. पुष्कळशा गुरूद्वाऱ्यात ऐतिहासीक पवित्र सरोवर स्नानासाठीअसतात. गुरूद्वारामध्ये देवांचीमुर्ती, पुतळे वा धार्मिक चित्रे नसतात. खुप दुर वरून उंच शिखांचा झेंडा निशान साहिब असलेला झेंडा स्तंभावरून गुरूद्वारा ओळखता येतो, त्याचप्रमाणे शिख धर्माचे प्रतिक 'खंडा अथवा भाला' आहे.[९२] गुरूद्वारा मध्ये नगाडा असावा जो योग्य वेळी वाजवला जावा. जिथे भारतभर ज्या ज्या ठिकाणी शीखांचे गुरू यांचे वास्तव्य होते अथवा त्यांचा जन्म झाला अथवा गुरूंनी कोणतेतरी महान कार्य हाती घेतले त्या ठिकाणी गुरूव्दारा आहे, त्या ठिकाणी गुरूव्दाराची स्थापना केल्याचे आढळते. गुरूद्वारा मध्ये सर्वांना मुक्त प्रवेश असतो, पण उघड्या माथ्याने तेथे जायचचे नसते. टोपी, पगडी वा कमीतकमी रूमाल शिरावर धारण करावा लागतो.[९३] संपुर्ण देशात शीखांचे चार महत्त्वपूर्ण गुरूव्दारा आहेत. १)पाटणा २)अमृतसर ३) आनंदपूर ४)नांदेड.

शीख गुरूंच्या चरित्राशी संबंधित असलेली स्थाने शिखांनी पवित्र मानली आहेत. भारतात आणि पाकिस्तानातही त्यांची तीर्थक्षेत्रे आहेत. अमृतसर, आनंदपूर, पाटणा, नांदेड, तलवंडी साबो येथील पाच तख्ते ही अत्यंत पवित्र मानली जातात.[९४] शिखांच्या पवित्र क्षेत्रांत जे उपासनामंदिर असते त्याला 'गुरूव्दारा' असे म्हणतात.[९५] शिख हे अगदी सहजतेने आणि खोलवर प्रभावीत होतात जेव्हा भक्तीसंगत गुरबाणी मध्ये सांगीतल्या जाते. ह्या कारणामुळे शिखांनी एकत्र येउन उपासना आणि प्रार्थना करतात ते गुरूद्वारा जाणे आवश्यक आहे. शिखांनी पवित्र धर्मग्रंथाच्या सामुदायीक प्रवचणात भाग घेउन त्याचा उपयोग करून घ्यावा. गुरूद्वारात प्रवेश करण्यास कुणालाही प्रतिबंध केल्या जाऊ नये. मग तो कुठल्याही धर्माचा असला तरी चालेल. गुरूद्वारात सगळ्यांना मुक्त प्रवेश आहे. गुरूंच्या दर्शनासाठी पवित्र गुरूंना पहाणे आणि लंगर साठी फक्त त्या व्यक्तींच्या जवळ तंबाखु अथवा नशीले पदार्थ नसावेत, कारण ते शिख धर्मात निषीध्द आहेत. पादत्राण अथवा वाहन बाहेर सोडावीत, स्वत:च डोके झाकलेले असाव व पोषाख आदरयुक्त असावा. गुरूद्वारामध्ये संगत कार्यक्रम साधारण: खालील प्रमाणे पार पाडला जातो. त्यात श्री गुरूग्रंथसाहिबावर प्रकाश टाकला जातो, कीर्तन, कथा, व्याख्यान, अनंद साहिब, अरदास, फतह, सति श्री अकाल जैकारा आणि हुकम इ. त्यात समावेश होतो.[९६]

**अमृतसर (अकालतख्त)** - शीख धर्माचे माहेरघर म्हटले जाणारे हे शहर म्हणजे शिखांची धार्मिक राजधानी होय. येथील सुवर्णमंदीर व तलाव यांच्या वर्तुळात शीख धर्म केंद्रीभूत झाला आहे. तलावाचे नाव 'अमृतसर' असून ते तिसरे गुर अमरदासजी यांच्या नावावरून मिळाले असावे असे मानले जाते. सुवर्णमंदिराला 'दरबारसाहेब' असेही म्हणतात. मंदिरात शीख धर्मग्रंथ श्री गुरूग्रंथसाहिब याची स्थापना केलेली आहे. सहावे गुरू हरगोविंदजी यांच्या मुलाच्या स्मरणार्थ बांधलेला बाबा अटल नावाचा मनोरा येथे आहे.[९७] सुवर्णमंदिराच्या समोर शीख धर्माच्या सत्तेचे निदर्शक स्थान 'अकाल तख्त' हे आहे. अमृतसरला यात्रेसाठी निघालेल्या परंतु शत्रुंनी पकडलेल्या शिखांपैकी एकानेही प्राणरक्षणार्थ धर्मश्रध्दा सोडून दिली नाही, असे इतिहास सांगतो. सर्वात जास्त प्रसीध्द असलेला गुरूद्वारा भारतातील पंजाब राज्यात अमृतसरला असलेला 'हरमंदीर साहिब अथवा स्वर्ण मंदीर' हा आहे. शिख धर्मीयांच मध्यवर्ती केंद्र अकाल तख्त आहे. [९८]

१) **आनंदपूर (श्रीकेशगढसाहेब तख्त)** - हिमालयाच्या तळवटीतील हे धर्मस्थान अमृतसरच्या खालोखाल महत्त्वाचे मानले जाते. नववे गुरू तेगबहादुर यांनी हे नगर वसवले. औरंगजेबाने जेव्हा त्यांचा शिरच्छेद केला तेव्हा एका अस्पृश्य जातीच्या शिखाने त्यांचे पुज्य मस्तक येथे आणले. पंचप्याऱ्यांचा नाट्यपूर्ण प्रसंगही येथेच घडला.[९९] गुरू गोविंदसिंगानी आयुष्याची पंचवीस वर्षे येथे व्यतीत केली. या सर्व घटनांमुळे शिखांना आनंदपूर हे स्थान पवित्र वाटते.[१००]

## आनंदपुर साहिब या शहरातील शिखांचे गुरूद्वारे

**१.गुरूद्वारा तख्त श्री केशधर साहिब :-** खालसा पंथाचे जन्मस्थान म्हणुन हे गुरूद्वारा तख्त श्री केशधर साहिब प्रसिध्द आहे. शिख धर्माच्या अधिकार स्थान पाच तख्त पैकी एक हे वैशीष्ट्य आहे. गुरूद्वारा चे बांधकाम इ.स. १९३६ ते इ.स.१९४४ मध्ये झाले आहे. इमारतीची योजना चौकोनी असुन आत ३० चौरस मीटर आवार आहे. त्यात तख्त कार्यालय व गुरूद्वारा आहे. गुरूद्वाराचा हॉल १६ चौरस मिटर आहे. शिखांचे पवित्र ग्रंथ आणि गुरूगोविंदसिंच्या खालसांनी वापरलेली जुनी शस्त्र आहेत, जे शिख धर्माच्या 'मिरी आणि पीरी' ह्या विचार तत्वाला दर्शवतात. गुरूद्वारा गुमट उमललेल्या कमळ फुलाच्या आकाराचे आहे. इमारतीचे तळघरात लंगर सभागृह आणि यात्रीकरूसाठी निवास यात्री घर आहे. चौकोनी सरोवर पवित्र तलाव पाण्याचा तलाव यात्री करूनी त्यांच्या यात्रेची पवित्र स्नान करतात.

**२.गुरूद्वारा शिसगंज :-** गुरू तेग बहाद्दुर यांना मृत्युदंडानंतर ज्या जागी त्यांच्या त्यांच्या वेगळया केलेल्या मुडक्यावर अग्नीसंस्कार करण्यात आले त्या ठिकाणी इ.स.१६७५ साली रणजित सिंगानी गुरूद्वारा शिसगंज बांधला.[१०१] गुरू गोविंद सिंगानी त्या जागेवर एक ओटा आणि मंदिर बांधलेले होते. जेव्हा त्यांनी इ.स.१७०५ ला आनंदपुर सोडले तेव्हा त्यांनी एका उदासी पंथीय गुरू बक्श नावाच्या शिखाला त्यांच्या संरक्षणासाठी सोपवले. गुरूद्वाराला विस्तृत नविनीकरण इ.स. १९७० मध्ये केल्या गेले. ह्या शिखाच्या मंदिराला उंच

टोकदार शिखर असुन खाली पवित्र स्थान आहे. पवित्र स्थानाच्या सभोवताली संगमरमरच्या कोरीव खांबाचा आहे.

**३.गुरूद्वारा भोरा साहिब :-** गुरूद्वारा भोरा साहिब हा तीन मजली वर गुमट असलेला गुरूद्वारा आहे, ह्या जागेवर गुरू तेगबहादुरांच रहाण्याच घर होते. तळमजल्यावर १.५ चौरसमीटर ओटा होता, जिथे नववे गुरू तेगबहादुर यांनी चिंतन आणि पदांची रचना करत होते. तिथे आता गुरूग्रंथसाहिब स्थापीत केले आहे.

**४.गुरूद्वारा थारा साहिब :-** गुरूद्वारा थारा साहिब हा दमदमा साहिबच्या समोर ५ चौरस मिटर एक ओटा असुन त्या जागेवर इ.स.१६७५ मध्ये भाई क्रिपा राम दत्तानी इतर १६ कश्मिरी पंडीतासहीत त्यांची मदत मागीतली होती. ते औरंगजेबापासून संरक्षण मागण्यासाठी आले होते. त्यांनी बलपुर्वक इस्लाम धर्म परीवर्तनातुन वाचवण्यासाठी गुरू तेग बहादुरांना प्रार्थना केली.[१०२] {This is the reputed place where several Kashmiri Pandits came seeking protection from Auranzeb's army.}

**५.गुरूद्वारा अकाल बुंगा साहिब :-** गुरूद्वारा अकाल बुंगा साहिब हा गुरूद्वारा शिशगंज साहिबाच्या विरुध्द दिशेला आहे. हा मानसिंग नावाच्या एका पुजाऱ्याने इ.स.१८८९ ला बांधला. इथे गुरूगोविंद सिंगानी गुरू तेग बहादुरांच्या मुडक्याचा दाह संस्कार केल्यानंतर उपदेश भाषण दिले होते.

**६.गुरूद्वारा मंजी साहिब अथवा गुरूद्वारा दुमलग्रह साहिब :-**हा गुरूद्वारा तख्त श्री केशधर साहिबच्या उत्तरेला आहे. ह्याठिकाणी गुरू गोविंद सिंग आपल्या मुलांना प्रशिक्षण देत होते. ह्या जागेचा उपयोग खेळाचे मैदान म्हणुन केल्या जायचा इथे कुस्ती आणि इतर सामने खेळल्या जायचे.

**७.गुरूद्वारा शहिदी बाग :-** हा गुरूद्वारा तख्त श्री केशधर साहिब आणि किल्ला आंनदघर साहिब ह्यामधील रस्त्यावर बांधलेला आहे. अठराव्या शतकांच्या सुरूवातीच्या काळात ह्याजागेवर खुप मोठी बाग होती, शिख सैन्य आणि बिलासपुरचे सैन्य ह्यांच्यात संघर्ष झाल्याच्या काळात ह्या बागेत पुष्कळशा शिख सैनिकांनी आपल्या जीवाच बलीदान दिले. ह्या मुळ जागेवर 'गुरूद्वारा शहिदी बाग' आहे.

**८.गुरूद्वारा माता जित कौर :-** गुरू गोविंद सिंगाची पत्नी माता जित कौरना शिख आणि त्यांच्या मुलांवर झ ालेला क्रुर अत्याचाराबद्दल काल्पनीक चित्र दिव्य दृष्टी होती, तिचा अंत्यसंस्कार किल्ला होलघर साहिब च्या जवळ झाला होता. त्या जागेला आता 'गुरूद्वारा माता जित कौर' हा गुरूद्वारा आहे.

**९.गुरूद्वारा गुरू का महल :-** 'गुरूद्वारा गुरू का महल' हा आनंदपुर साहिब चक नानकीची पहीली इमारत आहे. भुमीपुजन इथे झाले होते. गुरू गोविंद सिंग, माता गुजरीजी, माता जितकौर, माता सुंरदकौर, माता साहिब कौर आणि गुरूजींचे चार मुल इथे रहात होते. झुंजार सिंग, जोरावर सिंग, आणि फतेह सिंग ह्याचा इथे जन्म झाला होता. गुरूद्वारा भोरा साहिब, गुरूद्वारा मनि साहिब, आणि गुरूद्वारास दमदमा साहिब हे गुरूद्वारा 'गुरू का महल' संकुलाचे भाग आहेत.

**१० गुरूद्वारा दमदमा साहिब :-** हा गुरूद्वारा शिशगंज गुरूद्वाऱ्याच्या जवळ आहे. या गुरुद्वाऱ्याला गुरू का महल असेही म्हणतात. गुरू तेग बहाद्दुर हे याठिकाणी राहत होते. शिख गुरू गोविंद सिंग यांना ह्या ठिकाणी गुरूपद देण्यात आले.

२) **पाटणा (पटणासाहेब तख्त)** - पाटणा शहरात इ.स.१६६६ साली गुरू गोविंदसिंग यांचा जन्म झाला.[१०] या ठिकाणी पाटणा तख्त हरिमंदिर बांधलेले आहे. सद्गुरू नानकदेव आणि नववे गुरू तेगबहाद्दुर यांचे येथे काही काळ वास्तव्य होते. त्यांच्या स्मृतीशी निगडित 'गुरु का बाग' म्हणून एक बाग अजूनही तेथे आहे. गुरू गोविंदसिंगांनी जेथे पंडित शिवदत्तांचे शंका समाधान केले तो 'गोविंद घाट' गुरूव्दारा अजून अस्तित्वात आहे. पाटण्याच्या राजवाड्यात जेथे बालगुरू आपल्या सवंगड्यासह खेळत, त्या जागी 'गुरूव्दारा मैनीसंगत' उभारलेला आहे. येथील हरिमंदिरात ग्रंथसाहिबाची जी प्रत आहे तिला 'बडेसाहिब' म्हणतात व तिच्यावर गुरूगोविंदसिंग यांची सही आहे. हरिमंदीरात गुरू तेगबहाद्दुर आणि गुरू गोविंदसिंग यांच्या अनेक वस्तूही ठेवण्यात आल्या आहेत.[१०४]

३) **नांदेड (हुजूरसाहेब तख्त)** - दहावे गुरू गोविंदसिंग येथे परमज्योतीत विलीन झाले, या ठिकाणी आता गुरूव्दारा संगतसाहेब, गुरूव्दारा मालटेकडी, गुरूव्दारा नगीनाघाट, बंदाघाट, लंगरसाहेब, माता साहेब कौर, शिकारघाट, हीराघाट, इ. स्थाने महत्त्वाची आहेत.[१०५] दक्षीण भारताचे अमृतसर म्हणून नांदेड गुरूद्वाराचा उल्लेख होतो.[१०६] शीख धर्मीयांचे दक्षिणे कडील एक प्रमुख केद्र म्हणून नांदेड शहर आहे. शिखांचे दहावे गुरू गोविंद सिंग यांची समाधी याच ठिकाणी असल्यामुळे या गुरूद्वारास विशेष महत्व प्राप्त झाले आहे. दसरा व होळीस फार मोठ्या प्रमाणत शीख बांधव पंजाबतून भक्तीभावाने नांदेडला येतात. शिख धर्मातील चार तख्तापैकी एक महत्वाचे तख्त म्हणून नांदेड गूरूद्वारा आहे.

इतर पवित्र स्थाने अमृतसर पासून जवळच तरण-तारण हे एक पवित्र क्षेत्र आहे. पाचवे गुरू अर्जुनदेव यांनी हे वसवलेले आहे. येथील तलावाच्या पाण्यात कुष्ठरोगनाशक गुण असल्याच्या समजुतीमूळे पंजाबच्या बाहेरूनही रोगी येथे स्नानासाठी येतात. नानकासाहेब लाहोर या गावी गुरू नानकांचा जन्म झाला होता. येथे अनेक पवित्र मंदिरे आहेत. कर्तारपूर येथे गुरू नानकांचा मृत्यू झाला. त्याच्या स्मरणार्थ रावी नदीच्या काठी मंदीर बांधलेले आहे. 'डेराबाबानानक' शहरी दरबार साहेब नामक सुंदर मंदिर असून सर्व भारतातून शीख तेथे यात्रेसाठी येतात. हरिगोविंदपूरची पायाभरणी सहावे गुरू हरगोविंदजी यांनी केली असल्यामुळे हे स्थान अत्यंत पवित्र मानले जाते. पाकिस्तानात एमिनाबाद आणि बाबेदी बेर अथवा सियालकोट या शहरी गुरू नानकांची स्मारके आहेत. बाबेदी बेर येथे त्यांच्या एका रजपूत शिष्याने बांधलेली दरबार बावलीसाहेब नावाची विहीर आहे. पाकिस्तानातच पंजासाहेब हे एक पवित्र स्थान आहे. तेथील एका दगडावर गुरू नानकांच्या हाताच्या पंजाची निशाणी उमटलेली आहे. लाहोरमध्ये अनेक शीख धर्मस्थाने असून त्यांपैकी शहीदगंज हे एक महत्वाचे आहे.[१०७] शिखांची जी चार तख्त किंवा पीठ आहेत त्यापैकी नांदेड हे एक

आहे. त्याला हुजूरसाहेब नांदेड असेही म्हणतात. दसरा व होळी या सणांच्या निमित्ताने येथे शिख भाविक मोठ्या संख्येने येतात.[१०८]

**२.४.५ ईश्वर :-**

शीख धर्म ईश्वरवादी असल्यामुळे त्यांना ईश्वराचे अस्तित्व मान्य आहे. सृष्टीचा जनक ब्रम्हदेवाचाही तो जनक असून तो निर्गुण व निराकार आहे. सत्याचे अमूर्त तत्त्व म्हणजेच ईश्वर हा सर्व सृष्टीचा निर्माता, कर्ता नियंता आहे. शीख धर्मांत ईश्वरी अस्तित्व मान्य आहे. 'वाहे गुरू' हे शिख ईश्वराला दिलेले एक नाव आहे. 'वाहे गुरू' चा अनुवाद आश्चर्यकारक ईश्वर असा होतो.[१०९] गुरू जो अंधकार दुर करतो. 'वाहे' म्हणजे आश्चर्यकारक आणि 'गुरू' म्हणजे शिक्षक होय. 'इक ओंकार' म्हणजेच एकच देव ज्याची दुसऱ्याशी तुलना करता येत नाही. 'इक ओंकार' हे गुरू नानक त्यांच्या आध्यात्मिक अनुभवावरून आणि दुरदृष्टीने प्रेरीत होउन शिख धर्मात सुरूवातीलाच शिख धर्माच प्रतिक म्हणुन 'इक ओंकार' वापरल्या जाते. 'इक ओंकार' म्हणजे एकच देव असा त्याचा अर्थ होतो.

**२.४.६ शबद् :-**

शीख धर्मांत 'शबद्' या संकल्पनेस अत्यंत महत्व आहे. 'शबद्' म्हणजे ईश्वर व ईश्वर शबद् होय. ईश्वराची इच्छा म्हणजे 'शबद्' होय.[११०] ईश्वराने आपली विश्वनिर्मीतीची इच्छा आपल्या हूकुमाने म्हणजेच शबदाने प्रकट केली व त्यातूनच विश्वनिर्मीती झाली.[१११] शीख तत्त्वज्ञानानुसार 'शबद्' च सर्व काही असून शबद्च गुरू आहे. अशा या शबद् रुपी गुरूशी जो शिष्य सुसंवाद साधतो तोच खरा शीख होय.

**२.४.७ ईश्वरभक्ती व नामस्मरण :-**

गुरू नानकांने जपुजी या प्रार्थनेत ईश्वराची संकल्पना स्पष्ट केली आहे. तो अनादि, सर्वशक्तीमान, गतीमान, चैतन्यदायी असून निर्गुण व निराकार आहे. ईश्वराला प्रसन्न करुन घेण्यासाठी सतत नामस्मरण करण्याची गरज आहे. ईश्वर नामस्मरण हेच खरे तप होय. अशा प्रकारे शीख धर्मांत सर्वसामान्य व्यक्तीसाठी सहज सोपा व सरळ असा ईश्वरभक्ती व नामस्मरणाचा मार्ग गुरू नानकांनी सांगितला. नामजपना ईश्वर नामाच मनन करणे आणि पवित्र धर्मग्रंथाचे वाचन करणे. गुरूंनी दाखवल्याप्रमाणे रहाणे. गुरूनी अट घातलेल्या धर्म तत्वाला प्रोत्साहन देत त्याप्रमाणे रहाणे. एक ईश्वरावर दृढ विश्वास ठेवणे. सर्व वंशातील मानवात समानता ठेवणे. लिंग, वय, सामाजिक स्थान, रंग, जात, इ द्वारे कोणाचाही भेदभाव न करणे. गुरू नानकदेव सतत सांगत होते की, अकाल पुरूष अर्थात अनंत अन् सर्वत्र विद्यमान अशा कालातीत ईश्वरतत्वाची आराधना करावी. तेच सृष्टीचे परम सत्य होय.[११२]

**२.४.८ मोक्ष :-** शीख तत्त्वज्ञानानुसार व्यक्तीने जीवनाचा उपभोग अवश्य घ्यावा, परंतु सतत नामस्मरण, संयमित जीवन उद्योगशीलता इ.व्दारे आत्मउन्नतीचा मार्ग गाठावा कारण तीच खरी मोक्षप्राप्ती असते. शिख

धर्म आत्मा वेगवेगळ्या रूपात लाखो वेळा बदलत जाउन शेवटी मानवाचा जन्म होतो हे मान्य नाही. इतर जीवांच्या तुलनेत मानवाला आनंददायी स्थिती मिळालेली आहे. शिखांच्या दृष्टीकोनातुन पाहीले तर कर्मामुळे मानसाचे जीवण हे खुप मौल्यवान समजल्या जात, आणि पशु, वनस्पती, खणिज द्रव्य त्याच्या खालोखाल समान समजले जातात.

**२.४.९ माया:-**

सर्व प्रकारच्या भौतिक वस्तू, वास्तू, इंद्रियसुख याबाबी अवास्तव म्हणजेच भासमान आहेत. यासंदर्भातील वास्तविकता जाणून घ्यावी. सत्यावर असणारे भासमान मायेचे आवरण काढून टाकावे. आपण जे विश्वरूप पाहतो ते रुप वास्तव नसून निव्वळ मायाजाल आहे. मृगजळाच्या मागे हरिण ज्याप्रमाणे पाणी म्हणून धावते त्याप्रमाणे मानवप्राणी देखील या भौतिक विश्वात वास्तव समजून त्यामागे धावत असते.

**२.४.१० वैयक्तीक जीवन :-**

शिखांच्या सामाजिक जिवनाला दोन पैलु आहेत. एक वैयक्तीक जीवनात शिस्त पाळणे व कौटुंबिक जीवन मजबुत करणे. दुसर सामाजीक जीवनात सक्रिय राहणे आणि समाजाच्या कुशल असल्याची खात्री करून घेणे. समाजातील दुर्बळ लोकांना सहाय्य करण्यासाठी स्थानिय आणि जागतीक स्तरावर योजनाबध्द व्यवस्था उभी करणे. हे शिख धर्माच्या तीन आधारस्तंभाचा ज्याचा गुरू नानकांनी 'वाण्ड के चाक्को' अथवा वाटा आणि खा सांगीतल्याचा एक पैलु आहे.

ईश्वर नामाच मनन करणे आणि पवित्र धर्मग्रंथाचे वाचन करणे. सकाळी लवकर उठणे. गुरूबाणी अथवा पाच बाणी वाचन करणे, संध्याकाळी रहेदास आणि रात्री किर्तण सोहीला तिन्ही उपासनेला दररोज म्हणणे. त्यानंतर प्रत्येक वेळी अरदास प्रार्थना करावी. नेहमी ईश्वराचे स्मरण करत रहावे आणि जेव्हा ही शक्य असेल ईश्वर नामाचा जप करत जावा. म्हणजेच नामस्मरण करावे. कुठलाही नविन कार्य अथवा नविन व्यवसाय सुरूवात करते वेळी सर्वशक्तीमान ईश्वरालाच प्रार्थना करावी. किरात करनी म्हणजेच गुरूच्या मार्गदर्शन शिकवणी प्रमाणेच स्वत:च जीवन मार्ग स्विकारावा. प्रामाणिक व्यवसाय व इतर काम अथवा अभ्यास ह्यात स्वत:ला गुतंवून घ्यावे.

कौटुंबिक जीवन प्रणालीला उचलुन धरा. मुलांच्या संगोपणात वेळ द्यावा. त्यांच्यात जीवन पध्दतीची जाणीव समजावण्यास कार्याशील रहावे. निरहंकारी रहा आणि विस्तृत कौटुंबिक जिवणात प्रेमाने रहा, गुरमत तत्त्वाला प्रोत्साहन द्या. कुटुंबाच्या विस्तृत उभारणीत नैतीक आधार द्या. सेवा गुरूद्वारातील सामाजिक कार्यात स्वैच्छेने मोफत सेवा करा, सामाजिक उपक्रम, हॉस्पीटल, वृध्दाश्रम, निराधार सेवाश्रम इत्यादी. ठिकाणी सेवा करावी. संधी मिळताच आपला रिकामा वेळ सामाजिक कार्यात घालावा. आपल्या संपत्तीचा १० % भाग वा उत्पन्नाचे पैसे सामाजिक उपक्रमात खर्च करावे, यालाच दसवंत असे म्हणतात. समाजातील दुर्बळ सदस्यांना निश्चीतपणे मदत करावी.

गुरूनी शिखांना शिस्तबध्द जीवनशैली जगण्याची आज्ञा दिली आहे. आणि अंधश्रध्देचे कर्मकांड जे व्यक्ती अथवा समाजाला कसलेही धार्मिक अथवा भौतिक लाभ होत नाही त्याचा आधंळेपणाने अनुसरण करू नका. श्री गुरूग्रंथसाहिबाच्या शिकवणीचे अनुसरण करा.

**२.४.११ सामाजिक जीवन :-**

आपल्या कुटुंबा व्यतिरीक्त समाजासाठी आपल योगदान देणे हे शिखांचे कर्तव्य आहे. वेळप्रसंगी शिख समाजासाठी आणि विस्तृत समाजाशी संभाषण करीत राहुन त्याच्यांशी समानतेचा व्यवहार करणे, त्यांचा धर्म आणि त्यांचा सम्मान करणे हे शिखांचे कर्तव्य आहे. शिखांचे व्यक्तीश व सामाजिक ध्यान साधना करणे, किर्तन आणि पवित्र धर्मग्रंथाचा पाठ यात सहभागी व्हावे. ध्यान चिंतन व गुरूग्रंथसाहिब समजुन घेणे हे शिखांच्या उन्नतीसाठी महत्त्वाचे आहे. एखाद्याने फक्त गुरूमुखीच शिक्षण व त्याचप्रमाणे गुरूबाणी इतर साहित्य ही शिखांच्या मदतीसाठी वापरता येतील. शिखांनी आपल्या जीवनात आध्यात्मिक मार्गदशनासाठी गुरूग्रंथसाहिबाचाच आधार घ्यायला पाहीजे.

'कार सेवा' हे शिख धर्माचा महत्त्वाचा भाग आहे आणि शिखांनी ह्या सामाजिक सेवेत जेव्हा संधी मिळेल भाग घेतला पाहीजे हे त्याच्या साध्या प्रकारात उदा. झाडुन काढणे, गुरूद्वाऱ्यातील फर्शी पुसणे, जेवण, पाणी वाढणे, लंगर मध्ये सेवा करणे, भक्त समुहाला हवा घालन, आवश्यक सामान पुरवणे, स्वयंपाकात मदत करणे, इतर व्यवस्थापणाचे काम करणे.

गुरूद्वारातील उपासनासत्र आणि सभेच उपासना सत्र चालु असतांना एकावेळी फक्त एकच कार्यक्रम एका हॉल मध्ये गुरूंच्या साक्षीत किर्तण करणे, प्रवचन देणे, धर्मग्रंथाच तपशीलवार विवेचन, वाचन केल्या जात. किर्तन शिख अथवा कोणीही ज्याला गुरूबाणी समजते व शुध्द शब्दोच्चार करू शकतो. भक्तीसंगीतात भाग घेउन किरतन आध्यात्मिक भजन गाने आणि मुक्त धार्मिक ग्रंथ रचनेतुन स्त्रोत अथवा शबद् पारंपारीक संगीत शैलीतच गायला जात होते. फक्त गुरूग्रंथसाहीबात गुरबाणी आणि भाई गुरदास व भाई नंदलाल ह्यांच्यात रचना गायला जातात. गुरूची आज्ञा घेण्याअगोदर, एक अरदास करणे आवश्यक आहे जी सर्व भक्तसंगत समुदाय अरदाससाठी उभी रहाते मग खाली बसुन काळजीपुर्वक गुरूच्या हुकुमाच श्रवण करते.

**अखंड पाठ :-**संकटाच्या वेळी व आनंदाच्या प्रसंगी, समारंभासाठी गुरूग्रंथसाहिबाचा सतत वाचन केल्या जात. वाचन ४८ तास सतत अभंग अदलाबदली होणाऱ्या जाणकार गुरबाणी वाचकद्वारे केल्या जाते.[११३] वाचन मोठ्या आवाजात निर्दोष शब्दोपचारात व्हायला हवे. गुरबाणीच जलद वाचन जे ऐकणाऱ्या व्यक्तीला काही समजत नाही. निरूत्साहीत केल्या जात ते धर्मग्रंथाचा आणि भक्त संगताचा अवमान समजल्या जात.

**साधारण पाठ :-** साधारण पाठ हे गुरूग्रंथसाहिबाच सतत नसणारे वाचन आहे आणि त्यासाठी कुणी सात दिवसापासुन बरेच महिण्याचा वेळ ग्रंथाचे १४३० अंग पुर्ण करण्यासाठी घेउ शकतो. शिखांच्या सामुदायीक परीपाठात पुढील गोष्टींचा समावेश होतो. प्रत्येक शिखांनी हा पाठ करणे आवश्यक आहे.[११४]

गुरूद्वाऱ्यामध्ये प्रार्थना सकाळी आणि सायंकाळी केल्या जातात. त्यात असा-दी-वार, सुखमणी साहिब पाठ, अखंड पाठ, अरदास आणि हुकूमनामा, किर्तनाचे कार्यक्रम, बारस कार्यक्रम, लग्नाचे कार्यक्रम, अंतम संस्कार, अम्रीत संस्कार यांचा समावेश होतो.

**२.५ अरदास :-**

'अरदास' ह्या शब्दाच्या मुळ संबंध संस्कृत शब्द 'अर्द' म्हणजे विनंती, मागणी, याचना शी आहे. ह्याचा संबंध पर्शीयन शब्द 'अर्झदारत' म्हणजे कनिष्ठ व्यक्तींने वरीष्ठ व्यक्तीला रितसर केलेली लेखी विनंती होय. अरदास हे शिख धर्मातील प्रार्थनेचा संच आहे.[११५] गुरूद्वारातील पुजा सेवेचा हा एक भाग आहे. रोजच्या रोज करावयाच्या गोष्टी त्यात गुरूद्वारात गुरूग्रंथसाहिबाला प्रकाश दाखवण्यासाठी आणि रात्रीचे शयन कक्षासाठी बंद करणे, सामुदायीक पुजा समाप्ती, छोट्या गुरूद्वारात जीवन मार्गातील विधी उदा. लहान मुलाचे नामकरण, प्रिय जणांची अंत्येष्टी, रोजच्या प्रार्थना, व इतर महत्वाच्या धार्मिक कार्यक्रमाच्या वेळी करावयाच्या प्रार्थनेचा संच म्हणजे अरदास होय.[११६]

'अरदास' तीन भागात रचलेला आहे. पहिल्या भागाची सुरवात चण्डी-दी-वार च्या दशम ग्रथांच्या ओळीने होते. ह्यात शिखांचे दहा गुरू, गुरू नानकांपासुन गरु गोविंद सिंग ह्यांचे गुण गौरव गाइले जातात. दुसऱ्या भागात खालसांना तोंड द्यावे लागलेले आव्हान त्यात त्यांनी मिळवलेला विजय व रीतसर विनंतीच वाचन करतात. तिसऱ्यात देवदेवतांचे नाव घेउन वंदन केल्या जाते. पहिला आणि तिसरा भाग रचलेला आहे आणि त्यात बदल करता येत नाही. विशीष्ट काळात दुसरा भाग वेगवेगळा असु शकतो, त्याला छोट रुप देता येते. जेव्हा अरदास गायल्या जाते, तेव्हा शिखजन नमस्कार करून विशीष्ट स्थितीत उभे राहतात. पुष्कळ जणांचे डोके झुकलेल असते आणि वाचनाच्या काही भागा नंतर 'वाहे गुरू' उच्चारत असतात.[११७] अरदास सुरू करण्याचे श्रेय खालसा पंथाचे स्थापक व शिखांचे दहावे गुरू गोविंद सिंग यांना दिले जाते. त्यांनी पहिल्या आठ ओळी व शेवटचा भाग लिहला आहे, व ते बदल करता येत नाही. दुसरा भाग हा लवचिक आहे, त्यात व्यापक स्वरूपात सुधारणा करता येते.

अरदास ही नेहमी हात जोडुन उभे टाकुन केल्या जाते.[११८] आणि साधारणता त्या अगोदर सुखमणीच्या चौथी अष्टपदातील आठ पदांचे वाचन केल्या जाते, ज्याची सुरूवात, "तु ठाकुर तुम पे अरदास" अशी आहे. ते अरदास तीन भागात विभागले आहे.

I. शिखांचे दहावे गुरू गुरू गोविंद सिंगानी अरदासची सुरूवात कडक निग्रहात रचना केली आहे आणि ह्यात कसलाही बदल करता येत नाही. पहिल्या भाग 'चण्डी-दी-वार' च्या सुरवातीच्या उताऱ्या दिसुन येते. शिखांच्या गुरूंचा गुण गौरव पठण केल्या जाते.[११९]

II. दुसऱ्या भागात पुष्कळशे परीच्छेदात शिखांच्या प्रतीकांचे पुर्ण आठवण, प्रार्थना, खालसा संबंधी विशेष महत्व उल्लेखीला आहे. या दुसऱ्या भागात, "वाहे गुरू कृपया मी सुरू करणाऱ्या प्रकल्पात यशस्वी होण्याचा मला आर्शिवाद द्या". जेव्हा नविन कार्याला सुरवात करायची असते, ह्या माझ्या अडचणीत मला मदत करा किंवा इतर वैयक्तीक विनंती यात असू शकते.

III. तिसऱ्यात ईश्वरी नावाला प्रणाम केल्या जातो. ह्या भागातही बदल करता येत नाही. "नानकनाम चारदी काला, तेरे बहाने सरबत दा बाला". अर्थ ओ नानक नाम पवित्र प्रभाव असणारा असु दे. तुझ्या इच्छेवरच सर्वाचं भल होत राहील.[१२०]

**२.६ किरतन अथवा किर्तन :-**

किर्तनाचे मुळ हे किर्त संस्कृत कीर्त या शब्दापासून बनतो.[१२१] किरताना अथवा किर्तन हा संस्कृत शब्द आहे ज्याचा अर्थ कथन करणे, पठण करणे, सांगणे, वर्णन करणे एखादा विचार वा गोष्ट सांगणे असा होतो.[१२२] पुष्कळशे किर्तन कार्यक्रम प्रेक्षकांना खिळवुन ठेवण्यासारखे रचलेले असतात ज्यात गायक प्रश्न उत्तर करतात वा पदांचे पुर्नगायन केले जाते. किर्तन कार्यक्रम प्रस्तुत करणाऱ्याला किर्तनकार म्हणतात. किरतन विभागात लोकप्रिय असलेल्या वाद्यांचा वापर केला जातो. किर्तनाला वैदीक मुळ आहेत आणि त्याचा अर्थ प्रभावी पणे सांगणे, कथन करणे, वर्णन करणे, मोजणी करणे, घडलेल्या गोष्टीची माहीती देणे असा आहे.[१२३] गुरूग्रंथाचे पठण करण्याचा अधिकार सर्व ज्ञातिधर्मातील आबालवृध्दांना आहे. ग्रंथपाठाला कीर्तन अशी संज्ञा आहे.[१२४]

किर्तनाचा आणि भजन ह्यांचा खुप जवळचा संबंध आहे. दोघांत ही सर्वसामान्य उद्देश, विषय, संगीतमय स्वररचना आणि असलेली भक्तीमय प्रस्तुती कलांचा भाग आहे. भजन हे एक जास्त मुक्त पध्दती असुन त्यात एकच गायक एका अथवा जास्त संगीतवाद्य वा त्याशिवाय प्रस्तुती देउ शकतो. किर्तन त्याउलट असलेला वेगळेपण म्हणजे ते जास्त योजना बध्द संघ प्रस्तुती असते. वैशीष्ट्येपुर्ण संगीतमय प्रश्न-उत्तरी, घनिष्ट चर्चा वा सौम्य विचारांचे देवाण-घेवाण आणि त्यात दोन किंवा जास्त संगीत वाद्य वापरले जातात.

शिख धर्मात भक्ती गायनाला कीर्तन म्हणुन उल्लेखिल्या जाते.[१२५] किर्तन हे गुरूद्वारा मध्ये प्रस्तुत केल्या जाते. किर्तनामध्ये गुरूग्रंथसाहिबा आणि दंतकथा गीत विशेष राग प्रणालीत वाद्यसहीत गायील्या जाते.[१२६] गुरूग्रंथसाहिब शिखांचा प्रमुख धर्मग्रंथाच संगीतमय गायनाला 'शबद् किर्तन' उल्लेखीतात. आणि उपस्थित भक्त समुदाय शांतपणे शबद् किर्तन ऐकतात. शिखांच्या इतिहासात किर्तन हे संगीतमय कथा गायणासारखे असते. रात्री किर्तनाला प्राधान्य दिले जाते. किर्तन हे एक धार्मिक, सौदर्यांचा आस्वाद देणार आणि सामाजिक कार्यक्रम, बहुदा रविवारी नियमीतपणे भक्त समुदाय किंवा ऐतिहासीक गुरूंच्या सन्मानार्थ साजरा केल्या जाणारे विशेष सणात गुरूद्वारामध्ये किर्तन गायीले जाते. शिख परंपरेत भक्ती पुर्ण स्मरण

ईश्वराचे नाव 'किर्तन अथवा किरतन' दररोज केल्या जाते. नियमीतपणे जमा होणाऱ्या भक्त समुदायाला संगत वा सतसंग असे म्हणतात. पुरातन भारतीय धर्मग्रंथात किर्तन ह्या शब्दाला आध्यात्मिक प्रवासातील सहप्रवासी अथवा सम विचाराचे व्यक्त असा अर्थ निघतो.

**२.७ शिख धर्मातील धार्मिक सण :-**

शिख धर्मात महत्त्वाचे साजरे केले जाणारे शिख सण महोत्सवा मध्ये गुरूपुरब, वैशाखी यांचा समावेश होतो. 'गुरू-पुरब' हा सण गुरूंच्या जीवणातील जन्मदिवस व इतर महत्वाचे वार्षिक उत्सव यात साजरे केले जातात. वैशाखी हा सण पहिले अम्रीत संचार दिक्षा समारोह आणि धान्य जमा करण्याचा उत्सव आहे. खालसा उभारणीचा उत्सव वैशाखी सणात साजरा केला जातो.[१२७]

शिखांचे धार्मिक विधी:- शिखांचे धार्मिक विधी अथवा वेगवेगळे संस्कार खालील प्रमाणे आहेत.

१ नामकरण:- बाळाच बारस कार्यक्रम करणे.

२ अम्रीत संचार:- दिक्षा कार्यक्रम करणे.

३ आनंद कारज :- विवाह सोहळा म्हणजेच आनंद कारज होय.

४ अंतिम संस्कार :- अंत्य संस्कार म्हणजेच अंतिम संस्कार होय.

५ इतर धार्मिक विधी आणि अधिवेशन :- वेळप्रसंगी शिख समुदाय एकत्र जमतात व अधिवेशन आयोजीत करतात.

**२.७.१ नामकरण :-**

'नामकरण' हे लहान मुलाच नाव ठेवण्याचा एक शिख समारोह आहे. बहुदा हे गुरूद्वारात केला जातो. जेव्हा बाळ आणि आई शारीरीक दृष्ट्या सक्षम होतात, तेव्हा हा कार्यक्रम केला जातो. परंतु ह्या कार्यक्रमासाठी कोणतेही वेळेचे बंधन नाही.[१२८] जेव्हा कुटुंबाला हा कार्यक्रम करण्याची तयारी असते, तेव्हा बाळाचे वडील अथवा कुटूंबातील इतर जेष्ठ व्यक्ती स्थानिक गुरूद्वाराशी संपर्क साधुन ह्या छोट्याशा कार्यक्रमाची व्यवस्था करतो. ह्या कार्यक्रमाच्या दिवशी, कुटूंबातील सदस्य, सगळी निमंत्रीत पाहुणे, आई आणि बाळ नेहमीच्या साप्ताहिक साद संगत धार्मिक कार्यक्रमाला उपस्थित असलेल्या भक्तांच्या किर्तनाला उपस्थित राहतात. ह्या कार्यक्रमाला आवश्यक असलेल्या फराळ प्रसादाची व्यवस्था करतात. आनंदाचे आणि विनंतीचे शबद् गायीले जातात, त्यानंतर संक्षीप्त 'आनंद साहिब' वाचन होते. त्याच्यानंतर बाळाच्या नामकरणाचा मुख्य कार्यक्रम सुरू होतो. नेहमीच्या प्रथेप्रमाणे ईश्वराला विनंतीची अरदास केली जाते. बाळाला चांगले आरोग्य असु दे, तो व तीला सर्मपित सेवादार बनवा देशाचा आणि पंथाचा, कुटूंब आणि धर्माचे नाव उज्वल करण्या योग्य बनव, बाळाला एक योग्य नाव सांगा. 'नामजप' हा ईश्वर आणि गुरू यांची कृपा संपादन करण्याचा सुलभ मार्ग होय.[१२९]

अरदास झाल्यानंतर हुकूमनामा जाहीर होतो. जेव्हा हुकूमनामा पाहीज्या जातो, हुकूमनामाच्या पहिल्या शब्दाच्या पहील्या अक्षराचा वापर बाळाचे नाव ठेवण्यासाठी वापरले जाते. शिख धर्मात सांगीतल्या गेले आहे की, जन्म मृत्यु यासंबंधी कोणत्याही खाने पीने अथवा इतर कोणत्याही प्रकाराचे सुतक पाळल्या जाऊ नये.[१३०]

"जंमणु मरणा हुकूमु है भाणै आवै जाइ ।

खाणा पीणा पवित्रु है दितोनु रिजकु संबाहि ।"

**२.७.२ आनंद कारज :-**

'आनंद कारज' हे शिखांच्या विवाहाचा समारोह आहे. 'आनंद कारज' म्हणजे 'आनंदी विवाह' अथवा 'संतोष देणारा विवाह' होय. आनंद कारज ची सुरूवात गुरू अमरदास यांनी केली. ह्यासाठी चार स्त्रोत्र 'लावाण' अथवा प्रार्थना म्हणतात. गुरू रामदासांनी लावाण चे चार पदांची रचना केली ते गाण वा उच्चारन करण हे आनंद कारज चा मुख्य गाभा आहे. हा सोहळा गुरूद्वाऱ्यातच व्हायला हवा. आनंद कारज ही आनंद आणि उत्सवाची घटना असते. त्यात दोन्ही पक्षाचे कुटूंब व मित्र परीवार सहभागी होतात. बहुतेक सर्व विवाह समारंभ सकाळच्या वेळी केल्या जातात. आणि दुपारच्या अगोदर त्याची संपन्नता होते.[१३१] शिख एक पत्नीत्व विवाहाची रीत सांभाळतात. पती आणि पत्नी हे एकसमान पाहील जाते. कुठलाही विदुर वा विधवा पुन्हा विवाह करू शकतात. इ.स.१५७९ मध्ये शिखांचे पाचवे गुरू गुरू अर्जुन देवजी आणि माता गंगा ह्याचा विवाह हा आनंद कारज प्रमाणे झालेला पहिला विवाह समारंभ होता. शिखांच्या मुलामुलीचा विवाह हा शिख धर्मातच झाला पाहीजे.

**२.७.३ अम्रीत संचार अथवा खांडे-दी-पाहूल :-**

अम्रीत संचार हा शिख धर्माची दिक्षा अथवा सभासद करून घेण्याचा कार्यक्रम आहे. इ.स.१६९९ मध्ये 'खालसा' ची स्थापना करते वेळी त्यांनी दिक्षा विधी अम्रीत संचारचा वापर केला. शिख ज्यांना खालसाची दिक्षा दिली गेली त्याला अम्रीतधारी अथवा खालसा पुरूषांना 'सिंग' व स्त्रियांना 'कौर' हे शिर्षक देण्यात येते. कौर अर्थात 'राजकन्या' असा अर्थ होतो. खांडे-दी-पाहूल हे फक्त शिख धर्मावर त्या संबंधी तत्वावर श्रध्दाच व्यक्त करत नाही तर सर्वशक्तीमान ईश्वराशी एकरूप होण्यासाठी शुध्द आणि पवित्र जीवण जगेन हे वचन आहे. अम्रीत वेळा अगदी सकाळच्या वेळेला हे संबोधल्या जाते, ही वेळ सकाळी ३ वाजल्या पासून ६ वाजेपर्यत असते. या दरम्यान रोजच ध्यान आणि गुरूबाणी स्त्रोतच पठण केल्या जाते. गुरू नानक जापजी साहीब मध्ये सांगतात, "अम्रीत वेळेला एका सत्य नावाच्या महानतेचा ध्यान करा". अम्रीत वेळेच महत्व संपुर्ण गुरूग्रंथसाहिब मध्ये सापडते. गुरूग्रंथसाहिब सांगते की,"जे स्वत:ला शिख धर्मीय समजतात त्यांनी अम्रीत वेळा जागी व्हायला पाहिजे आणि नाम लहरीत गुंग व्हायला पाहीजे, ईश्वराचे नामस्मरण करायला पाहीजे". शिखांच्या रेहात मर्यादात अम्रीत संचार बद्दल असे लिहले आहे की, अम्रीत वेळेत जागी

व्हा, स्नान करा आणि दैवी नामाचे ध्यान करा. शिख अम्रीत वेळेत त्यांच्या नितनेमचा जप करतात. पारंपारीक पध्दतीप्रमाणे असा-दी-वार उच्चारण करण्यासाठी भक्तांचा समुहाला भेटतात.

**२.७.४ अंतम संस्कार :-**

सुरूवातीच्या रूपात हिंदु धर्मीयात आणि नंतर शिख धर्मीयातही प्रेताच्या विधीपुर्वक दहन विधीला अंतम संस्कार म्हणतात. अंतम अथवा अंतिम म्हणजेच शेवटचे त्याचप्रमाणे संस्कार म्हणजे विधी होय. शिख धर्मात मृत्यु हे नैसर्गिक प्रक्रीया असल्याचे मानले जाते. आणि ईश्वराची इच्छा किंवा हुकूम मानले जाते. शिख धर्मामध्ये जन्म आणि मृत्यु हे अगदी जवळचे संबंध वाटतात कारण ते दोन्हीही मानवी जीवन चक्राचे येणे आणि जाणे अथवा आनान जाना चे भाग आहेत. अंतम संस्कार ला मुक्तीकडे नेणारा क्षणभंगुर अवस्था म्हणुन पाहीले जाते. अंतम संस्कार म्हणजे ईश्वराशी संपुर्ण एक होणे. अंतम संस्कार मध्ये प्रेताची विल्हेवाट लावण्यासाठी प्रेत दहन विधी चांगली समजल्या जाते. आणि जर हे शक्य होत नसेल तर दुसऱ्या रीत दफण अथवा समुद्रात जल समाधीची स्विकृती आहे. शिख धर्मामध्ये शरीर हे फक्त कवच समजल्या जाते, व्यक्तीच्या आत्मा हाच त्याचा वास्तविक व्यक्ती वैशिष्ट मानले जाते. 'वाहे गुरू' चा सोपा उच्चार करत राहावा.[१३२] अंतम संस्कारच्या वेळी अरदास, प्रार्थना, व वाहे गुरू चे उच्चारण केले जाते.

**२.८ गुरू-का-लंगर:-**

गुरूंचा मोफत प्रसाद जेवण म्हणजेच 'गुरू का लंगर' होय. गुरू का लंगर हे शिख धर्माचे खुप महत्वाचे भाग आहे. लंगरच्या पाठीमागे मुख्य तत्व दोन प्रकारचे सेवेत भागीदार होण्याची ट्रेनिंग होउन जाते व सर्व मार्गीय जीवन व्यतीत करणाऱ्या लोकांची सेवा करण्याची संधी मिळते आणि उच्च व खालच्या जातीतील भेद नाहीसे होण्यास मदत होते. गुरू का लंगर ह्या प्रथेद्वारे सर्वसामान्य जनतेला प्रसाद दिला जातो. गुरूद्वारामध्ये गुरू का लंगर मध्ये शुध्द शाकाहारी अन्न दिल्या जाते, कारण लंगर मध्ये सर्वांना मुक्त प्रवेश असतो. अनेक धार्मिक पंथाचे लोक या लंगर मध्ये प्रसाद घेतात. शिख सहभोजन लंगर प्रणाली रावीतीरी वसविलेल्या कर्तारपूरी आद्य गुरू नानकदेवांनी सुरू केली. गुरू अंगददेवांनी खडूरमध्ये, गुरू अमरदासांनी गोविंदवाल येथे तर गुरू रामदास, गुरू अर्जुनदेव यांनी अमृतसरच्या प्रांगणात हा समता-भोजनानंद व्यापक केला. गुरू हरिगोविंद-हर राय- हरिकिशन यांनी किरतपुरात तर पुढे नवमगुरूंनी आनंदपुरामध्ये लंगरव्यवस्था सुदृढ केली.[१३३] गुरू अमरदास म्हणत, "पहले पंगत फीर संगत" याचा अर्थ पहिले लंगर ला भेट द्या नंतर गुरूंना भेटा.[१३४]

शिख धर्मात लंगर हा शब्द, गुरूद्वारातील सामाजीक स्वयंपाक घराबद्दल वापरल्या जातो. जिथे सर्व भेटीला आलेल्या पाहुण्यांना त्यांच्या धर्म, जात, लिंग, आर्थिक दर्जा अथवा वंशदृष्ट्या कसलाही भेदभाव न करता मोफत जेवण दिल्या जाते. हे मोफत जेवण नेहमी शाकाहारी असते. लोक जमिनीवर बसतात, एकत्र जेवण करतात आणि सामाजिक स्वयंसेवकाद्वारे सगळी सेवा व स्वयंपाक घर चालवल्या जाते.[१३५] लंगर मध्ये

सर्वलोक समान शाखाहारी जेवण करतात. शाखाहारी जेवण्याला अपवाद म्हणजे काही गुरूद्वारात होल्ला मोहल्ला प्रसंग अपवाद आहे.

लंगर ही प्रथा पहिल्याने मुसलमानाच्या चिस्ती सुफी पंथाच्या बाबा फरीद ह्यांनी सुरू केली. लंगर ही प्रथा १२ व्या आणि १३ व्या शतकात दक्षीण आशियाच्या सुफीपंथात जवाहीर-अल-फरीदी ह्या दस्तावेजात नोंद आहे.[१३६] त्यानंतर हा शब्द किंवा पध्दती शिखांनी अवलंबीली. लंगर ही संकल्पना नाविन्यपुर्ण धर्मादाय अन्नदान आणि इ.स.१५०० च्या जवळपास शिख धर्माचे संस्थापक ह्यानी स्विकारलेल्या समानतेच्या जीवन पध्दतीचे प्रतीक होते.[१३७] शिख साहित्याचे अभ्यासक प्रोफेसर अरविंद पाल सिंग मानडायर ह्यांच्या मते ज्या वेळी गुरू नानकांनी शिख धर्माची स्थापणा केली. पंजाबमध्ये सामाजिक स्वयंपाक पध्दती अगोदरच चालु होती. आणि ते मुस्लिम सुफी पंथ आणि हिंदु गोरखनाथ पंथ चालवत होते.[१३८]

"लंगरू चलै गुर सबदि हरि तोटि न आवी खटीअै ।।

खरचे दिति खसंम दी आप खहदी खेरि दबटीअै ।।"[१३९]

शिख धर्मात लंगरची प्रथा, मोफत स्वयंपाक हे शिखांचे पहिले गुरू गुरू नानकांनी सुरूवात केली. त्याची रचना सर्व लोकांत त्यांच्या धर्म, जात, रंग, सांप्रदाय, वय, लिंग आणि सामाजिक दर्जा ह्या कसल्याचा भेदभाव न करता समानतेच्या तत्वांचा प्रसार करण्यासाठी होता.[१४०] शिख पंथात शिखांचे दुसरे गुरू गुरू अंगद ह्याची सगळ्या शिख मंदिरात जवळ अथवा दुर वरून भेटीसाठी येणाऱ्यांना साधे जेवण सामाजिक पगंतीत मोफत जेवण मिळण्याची सुव्यवस्था केल्याबद्दल आठवण केल्या जाते. गुरू अंगद यांनी स्वयंपाक घर चालवणाऱ्या स्वयंसेवकांना 'सेवादार' म्हणुन संबोधत असत. गुरूद्वारात भेटीला येणाऱ्या प्रवाशांच्या सेवा करण्यासाठी गुरू अंगद यांनी सेवा व प्रशिक्षणाचे नियम घालुन दिले. गुरू अमरदासांनी सुध्दा ह्या लंगर पध्दतीच समर्थन केले आणि त्याना भेटीला येणाऱ्यांनी त्यांच्याशी संवाद साधण्या अगोदर लंगर मध्ये जेवण घ्यावे अशी व्यवस्था केली.[१४१] लंगर मुळे शिखात दान, त्याग, सेवा, संघटन, कौशल्य इत्यादी गुणसंपदा वाढत राहीली.[१४२]

निर्दोष सामुहिक जीवनास शिख धर्म सशक्त पाठींबा देते आणि शिखांनी सर्व योग्य योजनांना जे समाजाच्या हिताचे आहेत आणि गुरूमत तत्वाचे प्रोत्साहन देत पाठींबा दिला पाहीजे. गरीब आणि कमजोर लोकांना मदत केली जाते. चांगली सामाजिक अवधारण व सहकार्यासाठी जबाबदारी घ्यावी लागते.

**२.९ शिख धर्मातील निषेधता :-** शिख धर्मात पुष्कळशा गोष्टी धार्मिक दृष्ट्या निषेध केल्या गेल्या आहेत.

I. केस कापणे :- अम्रीतधारी दिक्षा घेतलेल्या शिखांना आपल्या शरीरावरील कुठल्याही भागाचे केस कापणे अथवा काढण्यावर कडक निषेध आहे. एखादा अम्रीतधारी शिखाने ह्या निषेधाचे उल्लंघण केले असेल तर त्याने परत दिक्षा घ्यायलाच पाहिजे.[१४३]

II. नशा करणे :- ड्रग आणि तंबाखु इतर नशा आणणारे पदार्थ सेवन करण्यास अम्रीतधारी शिखांना परवानगी नाही. नशेली पदार्थाच सेवन हे शिखांसाठी पाप असल्यामुळे दिक्षा न घेतलेल्या शिखांनी सुध्दा मद्यपानापासुन दुर रहावे.

III. अंध आध्यात्मीकता अथवा अंधश्रध्दा:- अंधश्रध्दा व कर्मकांड पाळल्या जाऊ नयेत. उदा.तिर्थयात्रा, उपवास, शुध्दीचे कर्मकांड, सुंता, मुर्तीपुजा, थडग्याची पुजा, स्त्रियांची बुरखा पध्दती इ. परंतु पाच कंकार धारण करणे हे अंधश्रध्दा समजल्या जात नाही.

IV. भौतिक छंदीपणा :- भौतिक संपत्तीचा छंदीपणाचा पुरस्कार शिख धर्मात केल्या जात नाही.

V. प्राणीमात्राची बळी :- सती प्रथा, स्त्रियांनी आपल्या पतीच्या चित्तेवर स्वत:ला झोकुन देणे, धार्मिक उत्सव साजरा करण्यासाठी पशुंचा बळी देणे प्रतिबंद आहे.

VI. कुटुंब सोडुन जगण्याची रीत :- शिखांनी भिक्क्षुक, योगी, विहारवाशी वा ब्रम्हचारी सारख राहु नये ह्यासाठी प्रोत्साहन दिल्या जाते.

VII. फालतु चर्चा :- विनाकारण बोलत रहाणे, इतर लोकांच्या खाजगी बाबींची गप्पा करणे, खोट बोलणे, निंदा नालस्ती करणे, पाठीवर खंजर खुपसुन खुन करणे इत्यादीची परवाणगी नाही. गुरूग्रंथसाहिब शिखांना सांगते की, "तुमच्या तोडांत निंदानालस्ती आणि इतरांच्या खाजगी बाबींची गप्पा करण्याच बंद नाही केले तर तुमची सेवा अनुपयोगी व निष्फळ आहे".

VIII. धर्मगुरूंचा वर्ग :- शिख धर्मात धर्म गुरू नाही. गुरू गोविंद सिंगानी गुरू प्रथा बंद केली. गुरू गोविंद सिंगानी 'ग्रंथ हेच गुरू मानावे' असा संदेश दिला आणि ते गुरूग्रंथसाहिबा लाच गुरू मानु लागले. कोणताही शिख ग्रंथी बनण्यास स्वतंत्र आहे व गुरूग्रंथसाहिबाच वाचन करू शकतो.

IX. कर्मकाण्ड करून मारलेले प्राण्याचे मांस खाणे खाण्याचा प्रतिबंध आहे. उदा. हलाल किंवा कोशेर ज्याला कुठ्ठा मांस म्हणल्या जाते.[१४४] लंगर सेवा केल्या जाते त्यांत कसलही मास वर्ज आहे. शिख मांसाहार करतात त्या मासाला झटका मटन असे म्हणतात.

X. विवाहबाह्य शारिरीक संबंध ठेवण निषीध्द मानले जाते.

**२.१० शिख धर्मातील खाद्य पध्दती :-**

शिख धर्मात मिश्रीत शाखाहारी जेवण गुरूद्वारात दिल्या जाते पण शिखांना शाखाहारीच असावे हे बंधन नाही.[१४५] सर्वसाधारण मतानुसार शिखांनी मांसाहार घ्यावा अथवा नाही हे निवडण्याचे स्वातंत्र्य आहे. शिख एकदा अम्रीतधारी अथवा अम्रीत संस्कार झाले की त्यांना कुठ्ठा किंवा कर्मकांडानी मारल्या गेलेल्या मांस खाण्याचा प्रतिबंध आहे. कारण त्यामुळे शिखांना प्रतिबंधीत ४ शिखांची पध्दती पैकी एकाच नैतिक मर्यादा उल्लंघीली जाते. अकाल तख्त द्वारे शिखांना झटका मटन खाण्यास अनुमती आहे. इतर शिख खाद्य पध्दती

मध्ये 'सबलोह बिबेक', ज्याचा शब्दशा अर्थ 'सगळी लोह जिवन पध्दती' आणि फक्त लोखंडी भांड्याचा उपयोग होतो. लोखंडाच्या भांड्यात अन्न शिजवतांना गुरबाणी किंवा सिमरण अथवा चिंतन करत रहावे.

**२.११ शिख धर्माचे तीन आधारस्तंभ :-**

**२.११.१ सिमरन आणि नामजप** :- 'सिमरन' हा पंजाबी शब्द स्मरण ह्यावरून आला आहे. स्मरा म्हणजेच आठवण करा, स्मृती करा, स्मरण करा, होय. गुरूबाणी मध्ये सिमरन ला खुप महत्व आहे.[१४६] गुरूने शिखांना अचुकपणे सिमरन आणि नामजप ईश्वरावर ध्यान केंद्रीत करण्यात मार्गदर्शन केले आणि ईश्वराच नाव 'वाहे गुरू' मंत्र घोषाच पठणांची सवय लावली. शिखांनी सर्वशक्तीमान ईश्वराची सहज सुंदरता आणि कृपा ह्याच्या स्मरणात दररोज नितनेम बाणीचे पठण करायला हवे. सकाळी अमृत वेळा ही कार्य केली पाहिजे.[१४७]

सिमरन बद्दल गुरूग्रंथसाहिबात खालीलप्रमाणे लिहले आहे.

"बिरथा नाम बिना तनु अंध ।।
मुखि आवत ता कै दुरगंध ।।
बिनु सिमरन दिनू रैनि ब्रिथा बिहाइ ।।
मेघ बिना जिउ खेती जाइ ।।"[१४८]

अर्थ:- ईश्वर नामाचे स्मरण केले नाही तर दिवस व रात्र व्यर्थ होतात. ज्याप्रमाणे पाऊस झाला नाही तर शेती होत नाही त्याप्रमाणे प्रभु नामाशिवाय जीवन व्यर्थ आहे. जर तुम्ही ईश्वर नाम घेतले नाही तर तुमचे शरीर ज्या गोष्टीच्या प्राप्तीसाठी या पृथ्वी तलावर आले, त्या गोष्टीची प्राप्ती होत नाही. अशा प्रकारे ईश्वर नामाचे स्मरण अथवा सिमरनाचे महत्व गुरूग्रंथसाहिबामध्ये सांगितले आहे.[१४९] शिख धर्मात नाम जपो म्हणजेच नाम जपना अथवा नाम सिमरण चिंतन होय. श्री गुरूग्रंथसाहिबातील स्त्रोत्र गान करणे, ईश्वराच्या वेगवेगळ्या नाव स्मरण करणे, विषेशता वाहे गुरू ज्याचा अर्थ अलौकिक ईश्वर उच्चारत रहाणे असा होतो. वाहे गुरू हे देवाच प्रतीक आहे, जो सर्व रूपाचा निर्माता आहे, जो सर्व रूपात सर्वव्यापी आहे ह्या संबंधात ओळखल्या जातो. ईश्वर नामाचे चिंतन केल्याने भक्त नाम, ईश्वराशी दैवी संबंध जुळवण्यास पात्र बनतो. नाम मुळे सर्व इच्छा पुर्ती होते आणि मनातील अशुध्दीची पीडा धुतल्या जाते. गुरू गोविंद सिंगाच्या जाप साहेबात ईश्वराच्या ९५० नावाचा उल्लेख आढळतो.[१५०] गुरू गोविंद सिंगाच्या रेहात मर्यादेत शिखांनी नाम सिमरण हे त्याच्या रोजच्या परीपाठाचा भागच करायला हवा हे बंधन घातले आहे. परमात्मा चे सिमरण हे मनुष्याचे सर्वश्रेष्ठ कार्य आहे.[१५१]

**२.११.२ किरात करो** :- स्वत:च्या मेहनतीने, इमानदारीने, व कठीन परीश्रमाने कमाई करावी. आणि सत्य बोलवे, नैतिक मुल्याच्या सहाय्याने जीवन जगावे. किरात करो हे शिख धर्माच्या तीन आधारस्तंभापैकी एक आहे. किरात करो याचा अर्थ ईश्वराने दिलेल्या कौशल्याने, ताकदीने, हुशारीने आणि मेहनतीने कमाई करून

इमानदार, शुध्द आणि समर्पित जगुन स्वत:ची कुटूंबाची आणि विस्तृत प्रमाणात समाजाची हित आणि उन्नती करावी. ह्याचा अर्थ आत्मविश्वासाने कष्ट करा, आळशी बनु नका. ईश्वराने नेमुन दिलेल्या कार्यात नेहमी समर्पित रहा. गुरूग्रंथसाहिबात गुरू नानक सांगतात की, जे नामाचे ध्यान करून, ईश्वराचे नाव घेतात, मेहनतीने काम करून विश्रांती घेतात. ईश्वराच्या दरबारात त्यांचे चेहरे तेजाने चमकते, आणि त्याच्या सोबत इतराचाही बचाव होतो.

गुरूला समर्पीत शिखांच्या अंत:करणात खोलवर, खरा गुरू व्याप्त असतो. त्याच्या इतर शिखावर प्रेम करणाऱ्या शिखावर गुरू प्रसन्न असतो. खरा गुरू जसे मार्गदर्शन करतो त्या प्रमाणे ते आपले कर्तव्य पाळतात आणि त्यांच्या प्रार्थना म्हणत रहातात. खरा गुरू आपल्या समर्पीत शिखांची सेवा स्विकारतो.

**२.११.३ वा-चाक्को** :- शिखांना आपल्या संपत्तीत समाजाला भागीदार करावे. 'वा-चक्को' याचा अर्थ वाटा आणि मिळुन खा असा होतो. वा-चाक्को मुळे त्यागाची भावणा मनात निर्माण होते.

**२.११.४ दसवंद :-** 'दसवंद' चा शाब्दीक अर्थ दहावा भाग असा होतो आणि आपल्या उत्पन्नाचा दहावा भाग दान करावा ह्यासाठी संबोधल्या जात. आर्थिक आणि वेळ व सेवा मिळुन गुरूद्वारात किंवा इतर ठिकाण देता येते. 'दसवंद' हे वा-चाक्को ह्या तत्त्वावर आधारीत आहे. 'दसवंद' हे गुरू अर्जुन यांच्या काळात केल्या जात होते आणि आजही पुष्कळसे शिख त्याचा वापर करतांना दिसतात. गुरू नानकांनी यांनी देखील दसवंदचे महत्व सांगीतले आहे. गुरू अमरदासांच्या काळात एक औपचारीक रचना केली गेली, पवित्र गुरूंच्या शिकवणीचा शिखांना उपदेश करत शिख धर्माचा मार्ग पुढे नेण्यासाठी त्यांनी २२ माझीस देशाचा विविध भागात निर्माण केल्या ह्यातील प्रत्येक माझीवर पुरूष व स्त्रीयांची नेमणुक केली. आणि शिष्यांनी गुरूला दिलेल्या दानाच मध्यवर्ती कार्यालयात जमा केले गेले. यातुन अमृतसर तलाव, गुरूद्वारे, हरीमंदीर, विहिरी, तलाव, ह्यासाठी खर्च केल्या गेले. शिखांनी आपल्या उत्पन्नाचा दहावा हिस्सा दसवंत सामाजिक कार्यासाठी काढुन ठेवण्यासाठी 'गुरू-को-गोलक' अथवा 'गुरूचा खजाना' ही संकल्पना बनवल्या गेली.

**२.१२ शिख धर्माची लिपी - गुरूमुखी :-** 'गुरूमुखी' याचा अर्थ 'गुरूच्या तोंडातुन' असा होतो. गुरू अंगद यांनी गुरूमुखी लिपीचा शोध लावला. पंजाबी भाषा लिहिण्याच्या ज्या दोन लिपी आहेत त्यापैकी एक असुन त्यात शिख आणि पंजाबी भाषेचा वापर करतात.[१५२] शिख धर्माचा सर्वात महत्वाचा ग्रंथ गुरूग्रंथसाहिब हे गुरूमुखीत लिहीलेला आहे, पुष्कळशा नेहमीच बोलल्या जाणाऱ्या शब्दाचे ते मिश्रण असुन त्या प्रजातीत 'संतभाषा' असे शिर्षक दिल्या गेले आहे. गुरूमुखी लिपीत ३८ ध्वनी अक्षर, दहा स्वर अक्षर, दोन अनुस्वार नाकातुन आवाज निघणारे आणि एक कुठल्याही ध्वनीसाठी वापरल्या जातात, पैकी तीन दात आणि ओठाणे उच्चारले जाणारे ध्वनी अक्षर आहेत.

भारतीय तिबेटी आणि दक्षीण पुर्व आशीयातील बहुतेक भाषेप्रमाणे गुरूमुखी लिपीचे मुळ ब्राम्ही लिपीत आहेत.[१५३] पंधराव्या शतकात सुरूवातीला गुरूमुखी कशी उगम पावली आहे. शिख गुरूंनी

सुरूवातीचा गुरूमुखीचा गुरूग्रंथसाहिब लिहिण्यास वापर केला, हे शिखांचे धर्मग्रंथ आहे. भारतातील पंजाब मध्ये कार्यालयीन लिपी म्हणुन या लिपीचा वापर केला जातो.

**२.१३ शिख धर्माचे प्रतिक चिन्ह :-**

**खंडा :-** 'खंडा' हे शिखांचे प्रतिक आहे. शिख धर्माच्या विश्वासाचे हे प्रतिक असुन २० व्या शतकाच्या अखेरीस त्याला सध्याचा आकार मिळाला आहे. 'खंडा' हे शिख धर्माचे प्रतिक तीन प्रतीकांचे मिश्रण आहे.[१५४] खंडा मध्ये मध्यवर्ती दुधारी खंडा अथवा तलवार आहे, एक गोलाकार चक्रम आहे, दोन एकधारी तलवारी किंवा किरपान, खंडा आणि चक्रमच्या दोन्ही बाजुला खाली एक दुसऱ्याला क्रॉस करून बसवलेली आहेत.[१५५] ते 'मीरी आणि पीरी' ह्या दोन स्थितीत प्रतिनीधीत्व करतात. हे दोन्ही मिळुन आध्यात्मिक आणि ऐहिक जिवनाची एकात्मता दर्शवतात, आणि त्यांना वेगळ आणि स्वतंत्र अस्तित्व आहे अस समजल्या जात नाही. खंडा हे शिख धर्माचे सिध्दांत 'देग तेग फतेह' च बोधचिन्हाच्या रूपात वर्णन करते. खंडामध्ये तीन अवजार आणि एक वर्तुळाचा समावेश आहे. खंडा दोन तलवारी आणि चक्र जे एक वर्तुळ आहे. निशान साहीबच्या झेंड्यावर एक दुधारी तलवार खंडा उत्कृष्टपणाची दागीण्यासारखी ठेवलेली असते.

**२.१४ शिख धर्मातील काही संकल्पना :-**

**१.जापजी साहीब :-** श्री गुरूग्रंथसाहिबाला आदिग्रंथ असे म्हटले जाते. वस्तुत: जपुजी हाच शिख बांधवांचा आद्यग्रंथ आहे.[१५६] जापजी साहीब ही एक प्रार्थना असुन ती श्री गुरूग्रंथसाहिबाच्या सुरूवातीला दिली गेली आहे. त्याची रचना शिखांच्या पहिले गुरू गुरू नानक यांनी केली. जापजी सुरवात मुलमंत्राने होते. त्यानतंर ३८ पौरी कडवे आहेत आणि ह्या रचनेच्या अखेरीस शेवटचा श्लोक म्हणल्या जातो. जापजी हे गुरू नानकांची पहीली रचना असल्याचा विश्वास केला जातो आणि ते शिख धर्मीयांच्या विश्वासाच परीपुर्ण वैशिष्ट्य समजल्या जाते. जापजी साहिब मध्ये पहिल्याच मंत्रात त्या ग्रंथाचे सार आले आहे. किंबहुना हा मंत्र म्हणजेच गुरू नानकदेवची शिकवण होय.[१५७] जापजीच्या शिखांच्या परंपरेत दिक्षा समारोहात आणि अंतम संस्काराच्या वेळी उच्चारल्या जाते. 'जाप' चा अर्थ पठण करणे, पुन्हा पुन्हा म्हणणे, एकसुरात म्हणणे असा होतो, ज्ञानाचा बोध होणे असा होतो. जापजी साहिब मधील एक कडवे, "नमो सरब गिआनं । नमो परम तानं।। नमो सरब मंत्रं।। नमो सरब जंत्रं ।।" अर्थ परमात्मा सर्व संसाराची काळजी आहे, हिच काळजी त्याला क्रियाशील बनवते, संसार सर्व संसाराचे संचालन आणि पोषण करतो, परमात्मा सर्वव्यापक, समर्थ, सर्वकल्याणकारी आहे.[१५८] शीख प्रात:काळी प्रार्थना म्हणून जपुजी चा पाठ करतात. गुरू नानक देवजी यांचा जपुजी हा मुळ ग्रंथ आहे. तो अडतीस स्तोत्रपर कडव्यांचा आहे. त्याची भाषा सोळाव्या शतकातील पंजाबी बोली आहे.[१५९] पहाटे जपुजीचा पाठ, नंतर सुखमनी आणि आसा दी वार यांचा पाठ केला जातो. सायंकाळी गुरूग्रंथाचा पाठ झाल्यावर सामूहिक प्रार्थना केली जाते. साऱ्या गुरूपरंपरेचे स्मरण करतात. मगच प्रसाद वाटप होते.

**२.चौपाइ :-** 'चौपाइ' हे गुरू गोविंद सिंग रचीत स्त्रोत आहे. 'चौपाइ' हे दसम ग्रंथाचा ४०५ वी चरीत्रोपाख्यानाच चरीत्र आहे. यात दोन युध्दाचे वर्णन आहे.

**३.रेहरास :-** 'रेहरास' साधारणत: रेहदास साहीब अस जाणल्या जाते. शिखांची संध्याकाळी म्हणण्याची प्रार्थना आहे. ह्यात गुरूग्रंथसाहिब व दसम ग्रंथातील स्त्रोताचा समावेश आहे.

**४.तव प्रसाद सवाइये :-** 'तव प्रसाद सवाइये' हे एक १० कडव्याच छोटेसी रचना आहे. शिखांच्या दररोजच्या पुजा पध्दतीचा तो भाग आहे. हे गुरू गोविंद सिंगानी लिहीले आहे. तव प्रसाद सवाइये ही रचना अमृत संचार कार्यक्रमात वाचली जाते. शिखांच्या दररोजची सकाळची प्रार्थना समाविष्ट आहे आणि जाप साहिब पुर्ण झाल्यानंतर म्हणल्या जाते.

**५.सोहिला :-** 'सोहिला' ही बाणी रात्रीच्या वेळी वाचल्या गेली पाहीजे.[१६०] गुरू नानक देवजी यांनी आपल्या शिष्यसमूहाला सोहिला हे भजन समूहस्वरात गायला सांगितले. हे भजन रात्री जाण्याआधी ते नेहमी म्हणत, म्हणायला लावीत.[१६१]

**६.कार सेवा :-** 'कार सेवा' हे शिख धर्माचा महत्त्वाचा भाग आहे आणि शिखांनी ह्या सामाजिक सेवेत जेव्हा संधी मिळेल भाग घेतला पाहीजे हे त्याच्या साध्या प्रकारात उदा. झाडुन काढणे, गुरूद्वाऱ्यातील फर्शी पुसणे, जेवण, पाणी वाढणे, लंगर मध्ये सेवा करणे, भक्त समुहाला हवा घालन, आवश्यक सामान पुरवणे, स्वयंपाकात मदत करणे, इतर व्यवस्थापणाचे काम करणे. सेवाभावना हवी. कार सेवा अर्थात् आपल्या हातांनी, आपण होऊन करायची सेवा. हीच 'कारसेवा' म्हणून प्रसिध्द आहे. कुणी गुरूद्वारात आलेल्यांची पादत्राणे सांभाळतो. कुणी भोजन व्यवस्थेतील कामातून भाग घेतो. कुणी झाडू मारतो अशी सेवा सक्ती जबरदस्तीनं केली जात नाही. 'मान अभिमान मंधे, सो सेवकु नाही'.[१६२] गुरूद्वारात जाताना केवळ ईश्वरतत्त्वाविषयी भक्तीभाव वा गुरूबद्दलचा श्रध्दाभाव असून भागत नाही. तो तर असायलाच हवा. पण त्याहूनही मोठी विनम्र वृत्ती हवी.[१६३]

**७.अकाल तख्त :-** शिख धर्मात अकाल तख्त ची संख्या पाच आहे.[१६४] अकाल तख्त शब्दामध्ये एक संस्कृत आणि एक अरबी आहे. दोहोंचे मूळ अर्थ वेगळे आहेत. 'अकाल' अर्थात् कालातील, अढळ परमसत्ता, तिचे सिंहासन होय. अशी उच्चता गुरूबैठकीला दिली गेली. ती उच्चता गुरूंच्या सदासर्वकाळ आणि सर्वांना परिस्थिती निरपेक्षतेने प्रेरक असलेल्या विचारांची आहे. त्या विचारात मानवी जीवनाला सदासर्वकाळ मार्गदर्शक होण्याची क्षमता आहे.[१६५] अकाल तख्त पाच आहेत. १) श्री अकाल तख्त साहिब, अमृतसर २) तख्त श्री पटना साहिब, बिहार ३) तख्त श्री केसगढ़ साहिब, अनंदपूर ४) तख्त श्री हजुर साहिब, नांदेड़ ५) तख्त श्री दमदमा साहिब तलवंडी साबो.

**८.जपु :-** गुरूग्रंथसाहिब या ग्रंथाची सुरूवात जपु बाणीने होते. त्याचप्रमाणे ही दररोज म्हणण्याची वाणी आहे. गुरू नानक देवजी यांनी ह्या वाणीची रचना केली आहे. ह्या वाणीमध्ये ३८ पउड़िया व २ श्लोक आहेत.

**९. सो दरू :-** सो दरू हा शब्द गुरूग्रंथसाहिबा मध्ये तीन वेळा आला आहे. ह्या वाणीचा मुळ अर्थ परमेश्वराच्या घराचे महत्व अथवा महिमा याचे वर्णन केले आहे.

**१०.सो पुरखु :-** सो पुरखु हे पाच पदांची रचना आहे ज्यामध्ये परमात्मा चे वेगवेगळे गुण बद्दल माहिती सांगीतली आहे. व परमात्मा बद्दल संपुर्ण माहिती दिली आहे.

**११.सोहिला :-** सोहिला ही शीखांची दररोजची वाणी आहे. गुरूग्रंथसाहिबामध्ये ही बाणी अंग १२ वर लिहिल्या गेली आहे. सोहिला बाणी मध्ये १ महला, महला ४ व महला ५ ची बाणी आहे.

**१२.अलाहणीआ :-** अलाहणीआ ह्या शीर्षकामध्ये गुरू नानक व गुरू अमरदास यांची बाणी लिहल्या गेली आहे.

**१३. निशान साहिब :-** त्रिकोणी आकाराच्या सुती अथवा रेशमी केशरी रंगाच्या वस्त्राचा, ईश्वरसत्तेचे प्रतीक असणारा निशान साहिब अथवा झेंडा हा शिख समाजाचा एक मानबिंदू असतो. सर्व गुरूंच्या काळात ध्वज फडकविण्याची आणि त्याला वंदना देण्याची प्रथा राहिली. पाच गुरूंच्या आरंभीच्या शांतीपर्वात श्वेत ध्वजा होता. पाचवे गुरू अर्जुन देवजींच्या बलीदानानंतर सहावे गुरू हरगोविंद यांच्या काळात युध्द संघर्षात पर्व अधिक जोमाने सुरू झाले. त्यांनी श्वेत ध्वजेऐवजी केशरी ध्वजा केली. इ.स.१६०९ मध्ये ही नवी शौर्यसूचक केशरी ध्वजा त्यांनीच हरमंदीरातील अकाल तख्त साहिबवर प्रथम फडकविली. गुरूद्वाऱ्यात ही ध्वजा लाकडी किंवा लोहाच्या उंच स्तंभावर खंडा अथवा शस्त्रप्रतिकासर फडकत असते. खंडावर एक चिह्न असते. दोन तलवारी आणि चक्र असते. दोन खड्गातून आध्यात्मिक आणि ऐहिक - सांसारिक सत्तेचे सूचक होते. चक्र हे सृष्टिक्रमाचे प्रतीक असते. प्रत्येक गुरूद्वाऱ्यासमोर हा निशानसाहिब अथवा झंडासाहिब असायलाच हवा. आपल्या गुरूद्वाराची, समाजाची आध्यात्मिक आणि ऐहिक उन्नती होत राहावी, ध्वजा फडकती राहावी अशी प्रार्थना या निशानसाहिबाकडे पाहात शिख बांधव नित्य करीत असतात.[१६६]

**१४. सिध गोसटि :-** गुरू नानक यांनी ह्या बाणी मध्ये अंतर-धर्म संवाद बद्दल माहिती दिली आहे. सिध गोसटि गुरूग्रंथसाहिब ग्रंथातील अंग १०१९ वर अंकित केल्या गेली आहे.

**सारणी २.१ शीख धर्मातील बाणीचे शिर्षक व त्यातील वर्णन.**

| अ.क्र. | बाणीचे शिर्षक | वर्णन |
|---|---|---|
| १ | जाप साहीब | जाप साहीब मध्ये ध्यान साधनेवरील स्त्रोत दिले आहेत. |
| २ | अकाल उस्तात | अकाल उस्तात मध्ये ईश्वराच्या भक्तीप्रद २७१ पद दिले आहेत. |
| ३ | बाचित्तर नाटक | गुरूगोविंद सिंगाचे आत्मचरित्र त्यांच्या आध्यात्मिक वंशावळी सहीत त्यात माहिती दिली आहे. |

| ४ | चंडी चरीतर उक्ती बिलास | चंडी चरीतर १ यामध्ये पौराणिक देवता चंडीवर चर्चा व त्यातील उल्लेखानुसार ते संस्कृत धर्मग्रंथ मार्केडेंय पुराणावर आधारीत आहे. |
|---|---|---|
| ५ | चंडी चरीतर २ | चंडी चरीतर २ मध्ये चंडीवर चर्चा करण्यात आली आहे. |
| ६ | चंडी दी वार | पंजाबीत चंडीची चर्चा व कुठल्याही पुराणावर आधारीत नसुन एक स्वतंत्र कथाकथन आहे. |
| ७ | ग्यान प्रबोध | ग्यान प्रबोध हे ज्ञान जागृत करण्याची क्रिया आहे. |
| ८ | चौबीस अवतार | विष्णु अवताराची २४ कथाकथन जे दशम ग्रंथाचा १/३ भाग आहे. |
| ९ | ब्रम्हा अवतार | ब्रम्हाच्या सात अवतारावर कथाकथन ह्यामध्ये आहे. |
| १० | रूद्रा अवतार | रूद्रावर चर्चा करणारे महाकाव्य आहे. |
| ११ | शबद पातशारी १० / शबद हजारे | संन्याशी, योगी, वैरागी, आणि मुर्तीपुजेसारखी कर्मकांडाची माहिती असणारे १०धार्मीक स्त्रोत यात आहेत. |
| १२ | ३३ स्वाइ | ३३ कडवे |
| १३ | खालसा महिमा | खालसांच्या स्तुतीत दोन काव्यात्मक रचना ह्यात आहेत. |
| १४ | शास्तर नाममाला | शस्त्र नामाचा हार, अच श्री शास्तर नाममाला पुराण लिख्याते. |
| १५ | श्री चरीत्रोपाख्यान | पुरूष आणि स्त्रियांचे पुष्कळसे स्वभाव व वाईट आणि चांगले दोन्हीचा यात समावेश आहे. |
| १६ | चौपाइ | शिखांचे दररोजच्या प्रार्थने पैकी एक आहे. काव्यो बाच बेनती चौपाई. |
| १७ | झाफरनामाह | विजयावर एक महाकाव्य, सम्राट औरंगजेबाला लिहिलेले एक पत्र ज्यात हिकायतान समावेश आहे. |
| १८ | हिकायत | झाफरनामाचा एक भागातील कथा आहे. |

**संदर्भ ग्रंथ :-**


१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१७.

२. कित्ता,पृ.क्र.१७.

३. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३४४.

४. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.

५. सिंह खुशवंत, अनुवाद तळणीकर प्रशांत, (२०१३). शीख, चिनार पब्लिशर्स, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२२.

६. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३७९.

७. दीक्षित श्रीनिवास, (२०१५). भारतीय तत्त्वज्ञान, फडके प्रकाशन, कोल्हापूर, बारावी आवृत्ती, पृ.क्र.३९.

८. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३८०.

९. सिंह खुशवंत, अनुवाद तळणीकर प्रशांत, (२०१३). शीख, चिनार पब्लिशर्स, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२३.
१०. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३८०.
११. कित्ता, पृ.क्र.३८०.
१२. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३७६.
१३. कित्ता, पृ.क्र.३७६.
१४. Cole W.O. ; Singh Sambhi Piara, (२०१६). Sikhism and Christianity : A Comparative Study, Springer Publication, p.no.१३.
१५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३७.
१६. कित्ता, पृ.क्र.३७६.
१७. कित्ता, पृ.क्र.३७६.
१८. Nesbitt Eleanor, (२०१६). Sikhism : A Very Short Intttroduction, Oxford University Press, Oxford, p.no.२४.
१९. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३५४.
२०. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.
२१. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.१.
२२. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३५५.
२३. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे, पृ.क्र.१६७.
२४. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३५५.
२५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३७२.
२६. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.१.
२७. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३५५.
२८. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८०). मराठी विश्वकोश, खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.२९३.
२९. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८०). मराठी विश्वकोश, खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.२९३.
३०. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.१०७.
३१. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३५७.
३२. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.२८.
३३. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८०). मराठी विश्वकोश खंड ९,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.८३८.

३४. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.२.

३५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.

३६. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.२२.

३७. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६०.

३८. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८२). मराठी विश्वकोश, खंड ११,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९८२, पृ.क्र.९५३.

३९. कित्ता, पृ.क्र.९५६.

४०. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६०.

४१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.

४२. डांगे सिन्धू स.ए., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.१.

४३. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६१.

४४. सुत्तनिपात, पृ.क्र.९३५-३६.

४५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८२). मराठी विश्वकोश खंड ११,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९८२, पृ.क्र.९५३.

४६. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६२.

४७. डांगे सिन्धू स.ए (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर पुणे, पृ.क्र.२.

४८. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६२.

४९. कित्ता, पृ.क्र.३६२.

५०. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८२). मराठी विश्वकोश खंड ११,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९८२, पृ.क्र.९५४.

५१. जोशी पी.जी., (२००३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर. पृ.क्र.३६३.

५२. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८२). मराठी विश्वकोश खंड ११,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९८२, पृ.क्र.९५४.

५३. कित्ता, पृ.क्र.९५६.

५४. कित्ता, पृ.क्र.९६०.

५५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३७९.

५६. Lewis Barnand ; Chruchill Buntzie Ellis, (२००९). Islam : The Religion and The People, Wharton Publication, p.no.८.

५७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.

५८. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७).मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३८१.

५९. Ruthven Malise, (२००४). Historical Atlas of Islam, Harvard University Press, Harvard, p.no.१४.
६०. सिंह खुशवंत, अनुवाद तळणीकर प्रशांत, (२०१३). शीख, चिनार पब्लिशर्स, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२०-२१.
६१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७).मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३८२.
६२. Knight Ian ; Socllins, (१९९०). Richard, ed. Queen Victorias Enemies : India No.३ Men-at-arms, (paperback ed.),Osprey Publishing, Illustrated Edition, p.no.१५.
६३. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७).मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३८२.
६४. कित्ता, पृ.क्र.३८२.
६५. Esposito John, (२००४). The Islamic World : Past and Present, Oxford University Press, New york, p.no.१२१-१२२.
६६. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.
६७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७).मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. प्रथमावृत्ती : १९७७. पृ.क्र.३८२.
६८. कित्ता, पृ.क्र.३८२.
६९. जोशी लक्ष्मणशास्त्री (१९८०).मराठी विश्वकोश खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. पृ.क्र.५८९.
७०. कित्ता, पृ.क्र.५९०.
७१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.
७२. जोशी लक्ष्मणशास्त्री (१९८०).मराठी विश्वकोश खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. पृ.क्र.५९०.
७३. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरामणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.९.
७४. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.३०७.
७५. सिंह खुशवंत, अनुवाद तळणीकर प्रशांत, (२०१३). शीख, चिनार पब्लिशर्स, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२३.
७६. Nayar Kamala Elizabeth, (२००४). The Sikh Diaspora in Vancouver : Three Generations Amid Tradition, Modernity, and Multixulturalism, University of Toronto Press, Illustrated Edition, p.no.४८.
७७. V.D.Mahajan, (१९७०). Muslim Rule in India, S.Chand Publication, New Delhi, १९७०,p.no.२२३.
७८. सिंह खुशवंत, अनुवाद तळणीकर प्रशांत, (२०१३). शीख, चिनार पब्लिशर्स, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२४.
७९. Louis Moreno, Cesar Colino, (२०१०). Diversity and Unity in Federal Countries, McGill Queen University Press, p.no.२०७.
८०. William Owen Cole, Piara Singh Sambhi, (१९९५). The Sikhs : Their Relegious Beliefs and Practices, Sussex Academic Press, p.no.२००.

८१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१४३.
८२. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.८.
८३. Shackle, Christopher ; Mandair, Arvind Pal Singh, (२००५). Teachings of the Sikh Gurus : Selections from Sikh Scriptures, United Kingdom : Routledom, p.no.xvii-xviii.
८४. Dhavan P., The Making of the Sikh Warrior Tradition, १६९९-१७९९, Oxford University Press, p.no.३-४.
८५. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.१८.
८६. कित्ता, पृ.क्र.१८.
८७. Christopher Shackle, Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, Routlede, p.no. xviii-xix.
८८. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.१८.
८९. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.४२.
९०. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१०६.
९१. कित्ता, पृ.क्र.१३६.
९२. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरामणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१५.
९३. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१३६.
९४. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१४.
९५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.
९६. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१९.
९७. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती, पृ.क्र.१९.
९८. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.
९९. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती, पृ.क्र.१९.
१००. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.
१०१. Singh Pashaura ; Louis Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Oxford University Press, Oxford, p.no.४४७.
१०२. Ibid, p.no.२३६.
१०३. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.१९.

१०४. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.
१०५. कित्ता, पृ.क्र.३८१.
१०६. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.२५.
१०७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश खंड ७,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७७, पृ.क्र.३८१.
१०८. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२०.
१०९. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.२०.
११०. कित्ता, पृ.क्र.१८.
१११. कित्ता, पृ.क्र.२०.
११२. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.९१.
११३. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१६.
११४. कित्ता, पृ.क्र.१६.
११५. McLeod W.H., (१९९०). Textual Sources for the Study of Sikhism, University of Chicago Press, Chicago, p.no.१०३.
११६. Cole Owen W., (२००४). Understanding Sikhism, Dunedin Academic Press, p.no.८.
११७. MacAuliffe, (१९०९). The Sikh Religion:Its Gurus, Sacred Writings and Authors, The Clarendon Press, Oxford, p.no.३३१.
११८. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१२.
११९. Knut A. Jocobsen; Kristina Myyrvold, (२०१२). Sikhs Across Borders: Transnational Practices of European Sikhs, Bloomsbury Publishing, p.no.२३७-२३८.
१२०. Sikh Rehat Maryada : The code of Sikh conduct & conventions, Dharam Parchar Committee (Shiromani Gurdwara Parbandakh Committee) n.d. Amritsar, p.no.९.
१२१. Rigopoulos Antonio, (१९९३). The Life And Teachings Of Sai baba Of Shirdi, State university of New York Press, New York, p.no.२७५.
१२२. Lal Ananda, (२००९). Theaters of India: A Concisc Companion, Oxford University Press, Oxord, p.no.४२४.
१२३. Macdonell Auther Anthony, (१९२४). A Practical Sanskrit Dictionary, Motilal Banarsidass, p.no.६९.
१२४. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.११६.
१२५. Kunt A.Jacobsen ; kristina Myrvild, (२०१२). Sikhs Across Borders : Transnational Practices of European Sikhs, Bloomsbury Academic Press, p.no.११२.
१२६. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरामणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१५.

१२७. Cath Senker, (२००७). My Sikh Year, The Rosen Publishing Group, p.no.१०.
१२८. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.२१.
१२९. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१३७.
१३०. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.२१.
१३१. कित्ता, पृ.क्र.२२.)
१३२. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.२४.
१३३. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.४४.
१३४. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.११.
१३५. McWilliams Mark, (२०१४). Food & Material Culture: Proceedings of the Oxford Symposium on Foodand Cookery २०१३, Oxford Symposium, p.no.२६५.
१३६. Metcalf Barbaba D., (१९८४). Moral Conduct and Authority: The Place of Adab in South Asian Islam, University of California Press, California, p.no.३३६.
१३७. Singh Nikky Guninder Kaur, (२०११). Sikhism :An Introduction, I.B.Tauris Publication, p.no.८२-८३.
१३८. Maindair Arvind Pal Singh, (२०१३). Sikhism: A Guide for the perplexed, Bloomsbury Publishing, p.no.२५.
१३९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९६७.
१४०. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.२६.)
१४१. Singh Duggal Kartar, (१९८८). Philosophy and Faith of Sikhism, Himalayan Institute Press, p.no.१५.
१४२. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.३०६.
१४३. Singh Nirmal, (२००८). Searches In Sikhism, Hemkunt Press, p.no.१९६.
१४४. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.३०.
१४५. Lucinda Mosher, (२००५). ४ Distance, Belonging (Faith in the Neighbourhood), Church Publishing Inc, p.no.१०८.
१४६. सिंह सत्येन्द्र पाल, (२०१०). सिख धर्म दर्शन के मूलतत्त्व, किताबघर प्रकाशन, नवी दिल्लीण प्रथम संस्करण, पृ.क्र.३३.
१४७. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.९.
१४८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.२६९.

१४९. सिंह सत्येन्द्र पाल, (२०१०). सिख धर्म दर्शन के मूलतत्त्व, किताबघर प्रकाशन, नवी दिल्ली प्रथम संस्करण, पृ.क्र.३२.
१५०. Singh Prithi Pal, (२००६). The History of Sikh Gurus, Lotus Press, p.no.१७६.
१५१. सिंह सत्येन्द्र पाल, (२०१०). सिख धर्म दर्शन के मूलतत्त्व, किताबघर प्रकाशन, नवी दिल्ली, प्रथम संस्करण, पृ.क्र.१०२.
१५२. Danniels Peter T.; William Bright, (१९९६). The Worlds Writing Systems, Oxford University Press, p.no.३९५.
१५३. George Cardana, Danesh Jain, (२००३). The Indo-Aryan Languages, Routledge Publication, p.no.७२-७४.
१५४. Rose David, (१९९५). Sikhism Photopack, Folens Limited Publishing, p.no.१०.
१५५. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.३१५.
१५६. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.२७९.
१५७. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.४२.
१५८. सिंह सत्येन्द्र पाल, (२०१०). सिख धर्म दर्शन के मूलतत्त्व, किताबघर प्रकाशन, नवी दिल्ली, प्रथम संस्करण, पृ.क्र.११९.
१५९. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.२८१.
१६०. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, सचिव, धर्म प्रचार कमेटी, शिरोमणि गु.प्र.कमेटी,अमृतसर, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१०.
१६१. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.३८.
१६२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.५१.
१६३. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.३०४.
१६४. धर्म प्रचार कमेटी, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, प्रकाशक सचिव, धर्म प्रचार कमेटी, गोल्डन आफसेट प्रेस, अमृतसर, पृ.क्र.१४.
१६५. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.३०८.
१६६. कित्ता, पृ.क्र.३१५.

**प्रकरण ३**

# शीख धर्मातील गुरूपरंपरा

**प्रस्तावना :-**

शिख धर्म हा जगातील सर्वांत श्रीमंत धर्म मानला जातो. शूर, पराक्रमी, धाडसी, आक्रमक, मेहनती व झूंजार व्यक्तीमत्व म्हणून शिख समाज ओळखला जातो. खत्री, जाट, अरोड, डोगरा, ब्राम्हण आदि विविध जातीचा मिळून शिख धर्म बनला आहे. पंजाब मधील शेती, व्यापार, व देशसेवेसाठी शिखांनी आपला नावलौकिक संपादन केला आहे. त्याचप्रमाणे शिख धर्मामध्ये तंत्रज्ञ, यंत्रज्ञ, कारागीर, स्थापत्य विशारद, वाहतूक व्यवसायात व्यवसाय करणारे आहेत. शिख धर्मीय लोक दाढी वाढवतात, स्वत:च्या नावापुढे 'सिंग' हे उपपद लावतात तर स्त्रिया 'कौर' उपपद लावतात.[१] शिख पूरूष व स्त्रियांना अनुक्रमे सरदार व सरदारनी म्हणण्याचा प्रद्यात आहे. वेगळी जीवनपध्दती, उंचीपूरी व्यक्तीमत्व यामूळे शिख समाज लवकर लक्षात येतो.

शिख धर्मांच्या उदयापूर्वीचा पंधराव्या शतकातील कालखंड हा अंधकारमय कालखंड म्हणून ओळखला जातो. भारतीय समाज हा पूर्णत: दिशाहीन व विकास खूंटलेला अवस्थेत होती यातून समाजात नवचैतन्य निर्माण करण्याचे काम शिख धर्मांच्या उदयाने झाला. भारतीय समाजात धार्मिक कर्मकाड पूजा-अर्चा, उरूस जत्रा, अंधश्रध्दा अनिष्ठ रूढी, चालीरिती इ. चे प्राबल्य वाढले होते. धार्मिक क्षेत्रात पूजारी व पूरोहीत वर्गाचे पगडा वाढला होता. जातीभेद, वर्णभेद, उच्चनीचता, गरीब-श्रीमंत, वेठबिगारी, सालदारी पध्दती इ. कारणामूळे सामान्य जनता होरपळून निघाली होती. स्पृश्य-अस्पृश्यता, हिंदू-मूस्लीम, सावकार-सरदार वर्गाकडून सामान्य लोकांचे शोषण होत होते. १५व्या शतकात भारतात कमालीची अस्थिरता निर्माण झ ाली होती. भारतातील अस्थिर वातावरणामूळे मोगल बादशहा बाबर याने भारतावर आक्रमण केले. संपूर्ण भारतावर अंकूश ठेवणारी सत्ता नसल्यामूळे लहान मोठ्या सत्ताधाऱ्यामध्ये संघर्षाचे वातावरण निर्माण झाले होते.

इ.स. १२०० पासून पंजाबवर आक्रमण करणाऱ्या टोळ्यामूळे भारतातील जनता होरपळून निघाली होती. मूस्लीम आक्रमणकाऱ्यांना कंटाळून बऱ्याच हिंदूनी मूस्लीम धर्म स्विकारला होता. यादरम्यानच्या काळात संत नामदेव, संत कबीर यांनी कुसंस्कार, अधंश्रध्दा, अनिष्ठ रूढी इ. दूर करण्यासाठी महत्वपूर्ण कार्य केले होते. संत ज्ञानेश्वर ज्ञानाचे ईश्वर तर नामदेव नावाचे ईश्वर यांनी सगुण भक्तीतून निर्गुण भक्तीत आंधळ्या भक्तीतून डोळस भक्तीत, अज्ञानातून आत्मज्ञानात नेणीवेतून जाणिवेत प्रवेश केल्याचे दिसून येते. गुरूनानक देवापूर्वी होऊन गेलेल्या संतांनी जे मौलिक कार्य उत्तर भारतामध्ये केले होते. त्यांची प्रेरणा गुरूनानक देवास मिळाली. गुरूनानक भक्ती आंदोलनाचे प्रमूख संत होते. त्यांचा जन्म १५ एप्रिल १४६९ मध्ये पंजाब मधील शेखुपुरा जिल्ह्यातील तलवंडी रायभोई की तलवा गावात झाला. गुरूनानक यांनी संपूर्ण

भारतभर पदयात्रा करून त्यांनी सर्व जाती धर्मांतील लोकांची दू:खे जाणली. संपूर्ण परिस्थितीचे अवलोकन केले.

हिंदू धर्म, जैन धर्म, बौध्द धर्म, मूस्लीम धर्म,इ. धर्मांचा अभ्यास करून त्या धर्मांतील चांगल्या गोष्टीचा स्विकार केला. गुरूनानक यांनी सत्यालाच जीवनाचे एकमात्र लक्ष्य मानले. 'सत श्री अकाल' म्हणजेच ईश्वर सत्य आहे ही गुरू नानकांची श्रध्दा होती. सर्व मानव जातीस समान लेखणारा सर्वांसाठी समान उपासना पध्दत देणारा सरळ व सोप्या भक्ती मार्गाचा पूरस्कार करणारा, मूर्तीपूजेपेक्षा गुरूग्रंथालाच महत्व देणारा, गुरू-शिष्य परंपरेवर आधारलेला शिख धर्म गुरू नानकांनी स्थापन केला. गुरूनानक यांनी स्थापन केलेला सर्वांना समान लेखणारा सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची भावना या शिख धर्मात होती. सर्वसामान्य जनतेला या धर्मात स्थान होते.

गुरू नानक हे गुरू व शिख धर्माचे १५ व्या शतकातील संस्थापक होते.[२] शीख धर्माची सुरूवात अल्पप्रमाणात झाली असली तरी शक्तीशाली व अधिकार प्राप्त शीख गुरू नानक देवजी हे शीखांचे पहिले गुरू होते. शीख धर्म गुरू परंपरेत मान्यता प्राप्त १० गुरू झाले. सर्व १० गुरू खत्री ह्या जातीत व बेदी, त्रेहान, भल्ला व सोढी ह्या गोत्र परीवारात जन्मली होती.[३] आधुनिक शीख धर्म श्री गुरूग्रंथसाहिब ला गुरू मानतात. हा विश्वास गुरूंच्या लिखाना सोबत त्यांच्यात खोलवर रूजवला. गुरूगोविंद सिंग यांनी गुरूग्रंथसाहिब लाच गुरू मानावे असा आदेश काढला आणि त्याप्रमाणे आजही श्री गुरूग्रंथसाहिबाला शीख धर्मात गुरू मानल जाते. मुगल शासकांनी इस्लाम धर्म स्विकारण्यास नाकारल्याबद्दल व शीख, हिंदूना छळ करण्यास प्रतिकार केल्याबद्दल १० गुरू पैकी शेवटल्या सहा गुरूंना बराच छळ सहन करावा लागला, आणि वेळप्रसंगी त्यांना आपल्या प्राणाची आहूती सुध्दा घावी लागली.[४] गुरू अर्जुन व गुरू तेगबहाद्दूर यांना देहांती शिक्षा देण्यात आली.[५] शिखांचे दहावे गुरू गोविंदसिंघ यांच्या अनुक्रमे सहा आणि नऊ वर्षाच्या मुलांना मारण्यात आले. शिख गुरूंशी घनिष्ठ संबंध असलेल्या नातेवाईकांना छळ करुन जीवे मारण्यात आले.[६] मुस्लीम धर्म न स्वीकारण्याबद्दल मुघल शासकाकडून बंदा बहाद्दूर, भाई मतीदास, भाई सतिदास, भाई दयाल यांची हत्या करण्यात आली.[७] शिख धर्माचे एक ठळक वैशिष्ट्य आहे. त्यात गुरूपंरपरेचा केवळ गौरव नाही. केवळ गूरूकार्याचे निवेदन नाही. सिक्खांनी वेळोवेळी नानाप्रकारे आपल्या इतिहासातील प्रसंगांच्या नोंदी करून ठेवील्या आहे. जीवनसाखियाँ आणि परिचईग्रंथ या संदर्भात महत्त्वाचे मानावे लागतात.[८]

शिख धर्मातील गुरूपरंपरा खालील प्रमाणे आहेत.

### ३.१ गुरू नानक देव (इ.स. १४६९-इ.स.१५३९) :-

शीख धर्माचे प्रवर्तक व आद्य गुरू म्हणून गुरू नानक देवजी यांना ओळखले जाते. नानक या शब्दाचा अर्थ 'अन्य कुणासारखा नव्हे' असाही होतो. गुरू नानकांना बाबानानक, नानकशाह, नानकपातशाह, नानकसाहिब, नानकदेव अशी अनेक आदरयुक्त नावे शिखांनी दिली आहेत.[९] गुरू नानक यांचा जन्म

तळवंडी (सध्याचे पाकिस्तान) या गावी वेदी शाखेच्या एका क्षत्रिय अथवा खत्री या हिंदू कुटुंबात झाला. तळवंडी हे स्थान नानकदेवांमुळेच आता 'नानकाना साहिब' ह्या नावाने ओळखले जाते.[१०] गुरूनानक यांचा जन्म कार्तिक पौर्णिमा १५ एप्रिल १४६९ रोजी रायभोई तलवंडी (नानक साहिब पंजाब, पाकिस्तान) येथे झाला. शिख धर्मांचे संस्थापक व एकुण १० गुरू पैकी पहिले शिख गुरू होते त्यांचा जन्म दिन 'गुरूनानक गुरूपुरब' म्हणुन कार्तीक पुर्ण माशीला ऑक्टोंबर-नोव्हेंबर महिन्यात जगभर साजरा केला जातो.[११] त्यांच्या वडीलांचे नाव कल्याणचंद मेहता कालू व त्यांच्या आईचे नाव तृप्तादेवी होते.[१२] नानकदेव हे एकुलते एक पुत्र असल्यामुळे ते लाडात वाढले. वडील काळूचंद वेदी हे सरकारी पटवारी होते. गुरू नानक यांचे आई-वडील बनिया जातीचे हिंदू होते. नानकदेवांचे शिक्षण घरीच झाले. गुरू नानक हे खत्री समाजाचे होते.[१३] लहाणपनी त्यांची बुद्धी प्रखर होती. वयाच्या ७ व्या वर्षी गुरू नानक यांना त्यांच्या वडीलांनी त्या वेळच्या प्रथेनुसार गावातील शाळेत प्रवेश दिला, शाळेतील शिक्षकांना त्यानी वर्णमालेतील अद्याक्षर हे बाराखडीच्या सारखे व ईश्वराच्या एकाकार रुप असल्याच सांगुन त्यांच्या शिक्षकाला आश्चर्यचकित केले.[१४] लहानपणीच गणित तसेच हिंदी, अरबी, फार्सी ह्या भाषा ते शिकले. वेद व कुराणाचेही त्यांनी अध्ययन केले. बुध्दीने ते कुशाग्र होते. इ.स.१५३९ साली तलवंडी मधील मौलवी कुत्तुबुद्दीन यांच्या जवळ फारसी शिकण्यासाठी गेले असता त्यांची कुशाग्र बुध्दी पाहून शिक्षक आश्चर्य व्यक्त केले.[१५] त्यांची वृत्ती लहानपणापासूनच सात्विक व धार्मिक होती. त्यांचा बहुतेक वेळ साधुसंतांच्या व फकिरांच्या सहवासात व एकान्तात बसून चिंतन करण्यात जाई. वडिलांना अर्थातच यांची ही वैराग्यशील वृत्ती आवडत नव्हती. नानकदेवांना गुरे चारणे, शेते राखणे इ. कामे त्यांनी दिली, तरी त्यांची वृत्ती बदलली नाही.[१६] वयाच्या ८व्या वर्षी त्यांनी शाळा सोडली लहाणपनी बऱ्याच चमत्कारीक घटना घडल्यामुळे लोक त्यांना दिव्यशक्तीचा पूरूष मानत. गुरू नानक यांच्या बाल्यावस्थेतील चमत्कारीक व निराळी घटणेबद्दल असे सांगीतल्या जात की, झोपलेल्या नानक बाळाला प्रखर सुर्य प्रकाश एका प्रसंगी झाडाच्या सावलीने व दुसऱ्या प्रसंगी विषारी नागान आपल्या फणानी झाकले होते. राय भुलर हे ह्या प्रसंगाचे साक्षीदार होते.[१७] बटाला गावाच्या मुलचंद व चंडो राणी ह्यांची मुलगी माता सुलक्खनी हिच्याशी गुरू नानक यांच्याशी २४ सप्टेंबर १४८७ रोजी विवाह झाला. सोळाव्या वर्षी त्यांचा विवाह झाला. वयाच्या ३२ व्या वर्षी त्यांना दोन पुत्र झाले. त्यांचे नाव श्रीचंद, लखमीचंद असे होते. गुरूनानकांच्या शिकवणीने श्रीचंद यांनी ज्ञान प्राप्त केले. श्रीचंद ने शिख धर्माच्या 'उदासी' शाखेची स्थापना केली.[१८]

गुरू नानक यांच्या पेक्षा ५ वर्षांनी मोठी असलेली बेबे नानकी नावाची बहिण होती. इ.स.१४७५ मध्ये बहिणींचा विवाह होउन ती सुलतानपूरला गेली. नानकांच आपल्या बहिणीवर खुप प्रेम होते. नानकदेवांना काळूचंदांनी आपली मुलगी आणि जावई अनुक्रमे नानकी व जयराम यांच्या ओळखीने सुलतानपूर येथील सरकारी मोदीखान्यात अथवा धान्यकोठी मध्ये नोकरीस लावून दिले.[१९,२०] सुलतानपूर येथील मोदीखान्यावरील नोकरी त्यांनी व्यवस्थितपणे केली व लौकिक अर्थाने संसारही नेटका केला; तथापि खऱ्या

अर्थाने त्यांचे मन परमार्थाकडेच धाव घेत राहिले. भक्ती संत प्रणालीच्या हिन्दु कुटूंबात नानकजीचं संगोपण झ ाल.[२१] ते परमेश्वर चिंतनात तल्लीन असत. दररोज सकाळी उठून ते जवळच्या ओढ्यावर स्नानास जात व नंतर काठावर येऊन प्रार्थना करत. एके दिवशी स्नानानंतर ते जवळच्या एका गुहेत जाऊन ध्यान करू लागले व त्यातच त्यांची समाधी लागली. ह्या अवस्थेत ते तेथे तीन दिवस होते. ते ओढ्यात वाहून गेले असावेत असा लोकांचा समज झाला. समाधी-अवस्थेत त्यांना ईश्वरी साक्षात्कार झाला आणि दिव्य मार्ग दिसला. ह्या साक्षात्कारी दिव्य मार्गानुसार उपदेश करण्यासाठी, समाजातील लोकांचे दु:ख दूर करण्यासाठी ते बाहेर पडले.[२२] गुहेतून बाहेर येताच ते ‘कोणी हिंदूनही नाही व कोणी मुसलमानही नाही’ असे ओरडून सांगू लागले. नानकदेवाला साक्षात्कार होताच त्यांनी आपली मोदीखान्यावरील नोकरी सोडून दिली व ते सद्धर्मप्रचारार्थ घराबाहेर पडले. त्यांच्या ह्या म्हणण्याचा इत्यर्थ हा, की हिंदु-मुस्लिम हे भेद खरे नसून सर्वजण प्रथम मानव आहेत व ते सर्व त्या एकमेव परमेश्वराची लेकरे आहेत. त्यांनी पुढील पाच तत्त्वांच्या आचरणावर आपल्या धर्मात भर दिला.[२३]

(१) नाम व गान : ईश्वर नामाचा उच्चार करून त्याचे गुणगान करणे.

(२) दान :- सर्वांना दानधर्म करणे.

(३) अश्नान अथवा स्नान :- दररोज सकाळी स्नान करून शुचिर्भूत होणे.

(४) सेवा :- परमेश्वराची व मानवाची सेवा करणे आणि

(५) सिमरन अथवा स्मरण :- आत्मसाक्षात्कार होण्यासाठी व ईश्वराची कृपा होण्यासाठी ईश्वराचे नामस्मरण करणे व त्याची प्रार्थना करणे.

गुरू नानक देवजींची शिकवण अवलंबण्याचे तीन मान्य पध्दती आहेत.

१) वा चक्को : - इतरांबरोबर वाटून घेणे. ज्यांना आवशकता आहे त्यांना मदत करणे.

२) किरत करो :- धोका - पिळवणुक न करता कष्टाने मिळवलेल्या कमाईवर जगणे.

३) नाम जपना :- मानवी जीवनाच्या पाच कमजोरीवर नियंत्रण मिळवण्यासाठी ईश्वरनामाचा जप करणे. नाम जपना अथवा नाम सिमरन ईश्वर नामाचा जप केल्याने ईश्वराच्या साक्षात्काराचा अनुभव येतो असे गुरू नानक सांगतात.[२४]

गुरू नानक देवजी आजपर्यतच्या काळात होऊन गेलेल्या मोठ्या धार्मिक संस्थापकापैकी अग्रगण्य मानले जातात. नानकदेवांच्या जीवनाशी अनेक आख्यायिका निगडित असून त्यांनी अनेक चमत्कार केल्याचेही सांगतात. साक्षात्कारानंतर इ.स.१४९७ पासून सुमारे चोवीस वर्षे त्यांनी दूरवरच्या चार यात्रा करण्यात व्यतीत केली. ह्या यांत्रामध्ये त्यांनी विविध धर्मांच्या अधिकारी व्यक्तींशी, साधुसंतांशी, फकिरांशी, योग्यांशी, सुफींशी चर्चा, विचारविनिमय, संवाद केला. विविध चालीरीती, रुढी, श्रध्दांचा परिचय करून घेतला व दुष्ट रूढींविरूध्द प्रचार करून त्यांच्या निर्मूलनाचेही प्रयत्न केले.[२५] इ.स.१५०७ मध्ये गुरूनानक देव यांनी आपला संसार आपल्या सासऱ्याकडे सोडून मरदाना, बाला, लहना आणि रामदास या चार मित्रांसोबत

तिर्थयात्रेला निघाले. त्यांनी केलेल्या चार प्रदीर्घ यात्रा याला 'उदासिज' असे म्हटले आहे.[२६] तीर्थयात्रा अथवा धर्म प्रसार व प्रचार गुरू नानक देवजी सोबत भाई मरदाना हा शिष्य नेहमी सोबत असायचा.[२७] भाई मरदाना किर्तन करत असतांना 'रबाबी' हे वाद्य वाजवायचा म्हणून त्याला 'रबाबी' म्हणून देखील ओळखल्या जात होते. गुरू नानक यांच्या चार 'उदासिज' खालील प्रमाणे आहेत.

(१) पूर्वेकडील यात्रा (इ.स.१४९७ ते इ.स.१५०९) या यात्रेमध्ये बांगलादेश व ब्रम्हदेशापर्यंत त्यांनी यात्रा केली.

(२) दक्षिणेकडील यात्रा (इ.स.१५१० ते इ.स.१५१५) या यात्रेमध्ये श्रीलंकेपर्यंत त्यांनी यात्रा केली.

(३) उत्तरेकडील यात्रा (इ.स.१५१५ ते इ.स.१५१७) या यात्रेमध्ये हिमालय व तिबेटपर्यंत त्यांनी यात्रा केली, काहींच्या मते त्यांनी या यात्रेमध्ये चीनपर्यंत यात्रा केली.

(४) पश्चिमेकडील यात्रा (इ.स.१५१७ ते इ.स. १५२१) या यात्रेमध्ये मध्यपूर्वेतील इराक, इराण, मक्का-मदीना, बगदाद, अफगाणिस्तन इत्यादीपर्यंत त्यांनी यात्रा केली.

भारत, अफगानिस्तान, फारस, अरब, इ. देशात भ्रमन केले. या यात्रेला पंजाबी भाषेत 'उदासियाँ' असे म्हणतात. गुरुनानक यांच्या कार्यामूळे त्यांना लड्डाख व तिब्बत मध्ये नानक यांना 'लामा' या नावाने ओळखतात. गुरूनानक हे दार्शनिक, योगी, गृहस्थ, धर्मसुधारक, समाजसुधारक, कवी, देशभक्त आणि विश्वबंधू हे सर्व गुण होते. गुरू नानक यांची पहिली उदासी ३० ऑगस्ट १५०७ रोजी सुरू झाली.[२८] गुरुनानक यांना गुरूनानक ऐवजी 'बाबा नानक'आणि 'नानकशाह' या नावाने ओळखले जातात. तळवंडी येथील मरदाना नावाचा एक मुसलमान हा नानकदेवांचा पहिला अनुयायी होय. तो नानकदेवांच्या भजनात रबाब नावाचे वाद्य वाजवून त्यांना साथ करीत असे. नानकदेवांचा आवाज मधुर होता व त्यांना संगीताचेही चांगले ज्ञान होते. स्वरचित उत्स्फूर्त भजने ते रागदारीत आपल्या मधुर आवाजात गात असे. त्यांची ईश्वरभक्तीने ओथंबलेली भजने ऐकण्यासाठी अनेक लोक जमत असत. चौथ्या यात्रेहून पश्चिमेकडील यात्रेहून परतल्यावर त्यांनी रावी नदीच्या पूर्व किनाऱ्यावर 'कर्तारपूर' नावाचा नवीन गाव वसविला. तेथे ते स्वत: नांगर चालवून शेती करून लागले. सकाळ-संध्याकाळचा त्यांचा वेळ कीर्तन, भजन, निरूपण व धर्मोपदेश यांत व्यतीत होई. त्यांना तेथे अनेक अनुयायी लाभले. त्यांचे उर्वरित सर्व आयुष्य तेथेच आपल्या कुटुंबीयांसमवेत व अनुयायां समवेत व्यक्तीत झाले.[२९]

पाकिस्तानातील किला रोहतास येथील परिव्यक्त गुरूद्वारा चोवा साहिब इथे गुरू नानकांनी आपल्या प्रवासाच्या दरम्यान पाण्याचा झरा निर्माण केला ह्याचे स्मृती स्मारक आहे.[३०] आपल्या जीवनात गुरू नानकांनी खुप दुरदुर प्रवास केला. काही आधुनिक नोंदी सागतात की, इ.स.१४९६ ला वयाच्या २७ व्या वर्षापासून पुढे ३० वर्ष सतत प्रवास करून त्यांनी तिबेट, दक्षीण एशीया, अरबिया या ठिकाणाला भेट दिल्या.[३१] गुरू नानक यात्रे दरम्यान वेगवेगळ्या धर्मातील प्रतिपक्षा सोबत धार्मिक चर्चा करत, त्यांनी भारतीय पौराणिक स्थळ सुमेरू पर्वत, मक्का, बगदाद, आचलबटाला, मुलतानला भेट दिली. ह्यांबद्दलच्या गोष्टी १९ व्या व २० व्या

शतकांत विस्तृत प्रसार पावल्या व वेगवेगळ्या भाषेत हे घटना वृत्तांत सापडतो.[३२] क्लेवार्ट आणि स्नेल ह्यांच्या मते, ह्या नव्या प्रवास घटना त्या भागातील समकालीन मुस्लीम पिरा बद्दल सुफी ताजकिरात सांगण्यात येणाऱ्या चमत्काराच्या चढाओढीत सांगीतल्या गेल्या.[३३] गुरू नानकांनी मिडल-ईस्टचा प्रवास केला होता असे भारतीय विद्वान बगदाद शिलालेखाच्या आधारे लिहीतात. काही जण त्यांनी जेरुसलेम, मक्का, विटीकन, अझ रबेजान, सुदान चा प्रवास केला होता असेही सांगतात.[३४]

गुरु नानक देवजी सर्वेश्वरवादी होते, मूर्तिपूजा त्यांना मान्य नव्हती. रुढी परंपरा, कूसंस्कार यांचा त्यांनी सदैव विरोध केला. देवाचा साक्षात्कार बाह्य साधनानी नाही तर आंतरीक साधनेतून होतो. त्यांच्या विचारात वैराग्य होते त्याचप्रमाणे तत्कालीन राजनीतीक, धार्मिक आणि सामाजिक स्थितीवर त्यांची नजर होती. ईश्वर चिरस्थायी त्यांनी बनवलेल्या सर्व प्राणी मात्रात असतो हा संदेश देत खुप दुरदुर गुरू नानकांनी प्रवास केला आणि ते चिरस्थायी सत्य आहे. त्यांनी समानता, बंधुत्व, पवित्रता, सद्‌गुणावर आधारीत अव्दितीय आध्यात्मीक, राजनितीक संप्रदायाची स्थापना केली. गुरुनानक देव यांनी यांच्या साहित्यात त्यांनी स्त्रियांना महत्व दिले आहे. मूर्तीपुजा, बहूदेवोपासनास ते विरोध करत. तत्कालीन हिंदू मूस्लीम दोघांवर त्यांच्या मताचा प्रभाव पडत होता. काही लोकांनी त्यांची तक्रार इब्राहीम खान लोदी यांच्याकडे केली आणि बऱ्याचशा दिवसांची कैदेची शिक्षा केली आणि पानिपतच्या लढाईत इब्राहिम खान लोदीचा पराभव झाला आणि बाबराचा विजय झाला आणि गुरुनानक यांची कैदेतून सूटका झाली. त्याचप्रमाणे बाबरच्या स्वारीच्या वेळी नानकदेव ऐमनाबादेत होते. मोगल सैनिकांनी गावकऱ्यांवर बरेच अत्याचार केले. लूटमार केली. अनेकांना बंदी बनवून त्यांच्याकडून कष्टाची कामे करून घेतली. यात नानकदेवांच्या वाट्यालाही बाबराची कैद अनुभवावी लागली. चक्की पिसण्याचे भोगही भोगावे लागले. त्याची स्मृती म्हणून 'गुरूद्वारा चक्कीसाहिब' बांधण्यात आला.[३५]

गुरुनानक देव हे कवी होते. गुरुनानक भावनिक, कोमल हदयाने प्रकृतीला एकरुप होऊन कविता करत. त्यांची भाषा 'बहता नीर' होती. त्यात फारसी, मुल्तानी, पंजाबी, सिंधी, खडी बोली, अरबी, संस्कृत आणि ब्रजभाषेतील शब्द होते. शिखांचे पहिले गुरू नानक यांची गुरूग्रंथसाहिबातील ९७४ पदे आहेत.[३६] त्यात १९ रागांचा समावेश आहे. जपजी, सिध घोस्ट, सोहिला, दखनी ओंकारी, आसा-री-वार, पत्ती, बारह माह यांचा समावेश होतो. ग्रंथसाहिबाच्या सुरूवातीसच 'जपजी' म्हणजे 'ईश्वर चिंतन' या नावाने आलेला ३८ कडव्यांचा जो भाग आहे, तो नानकदेवांनी पंजाबीत रचला आहे. उदात्त सौंदर्य व आध्यात्मिक समृध्द आशय यांचा उत्स्फूर्त काव्याविष्कार त्यात दिसून येतो. जपजीची संहिता ही प्रत्येक शीख व्यक्तींच्या घरी नित्यनेमाने म्हटली जाणारी प्रात:प्रार्थना झाली आहे.[३७] जपजीच्या सुरूवातीस मूलमंत्र नावाचे लहानसे स्तोत्र असून त्यात ईश्वराचा स्वरूपाचे संक्षिप्त वर्णन आलेले आहे. उर्वरित जपजीत याच मूलमंत्रातील प्रमुख विषयाचा विस्तार आहे. याशिवाय 'सिंध गोष्ट' म्हणजे 'सिध्दांशी वा योग्यांशी संवाद होय'. 'अश-दी-वार'

म्हणजे 'हा भागही दररोज सकाळी गुरूव्दारांतून म्हटला जातो'. 'बार माह' म्हणजे 'बारा महिन्यांचे गीत होय' इ. रचना गुरू नानकांनी केल्या आहेत. ह्या आपल्या काव्यरचना त्यांनी संगीतातील विविध रागांत निबध्द केलेल्या आहेत.[३८] गुरूमुखी भाषेत नानकांच्या उपदेशपर शिकवणी पदात जमा झाल्या आहेत. गुरू नानक देवजी यांनी जपु, पहरे, वार माझ, पटी, अलाहणीआ, कुचजी, सुचजी, थिती, ओअंकार, सिंध गोसटि, बारह माहा, असा-की-वार, आणि वार मलार इ. ची रचना केली.[३९] गुरू नानकांच्या शिकवणीच्या दोन स्पर्धात्मक सिध्दांत आहेत.[४०] कोले आणि सांभी ह्या दोन सिध्दांत आहेत त्यात नानकांची शिकवण व शिख धर्म ह्या 'जनमसाखी' वर आधारीत आहेत.[४१] गुरू नानक यांनी धर्म प्रचारासाठी ४ प्रवासगाथा केल्या. त्यालाच 'उदासिज' असे म्हणतात. त्याचप्रमाणे इतर स्थळांना भेटी दिल्या. पाकीस्तानातील किला रोहतास येथील 'गुरुव्दारा चोवा साहिब' इथे गुरूनानकांनी आपल्या प्रवासाच्या दरम्यान पाण्याचा झरा निर्माण केला ह्या गोष्टीचे तो गुरूव्दारा स्मृती स्मारक आहे.[४२] आपल्या जीवनात गुरू नानकांनी खुप दुर दुर प्रवास केला. इ.स. १४९६ साली वयाच्या २७ वर्षापासून पुढे ३० वर्ष सतत प्रवास करुन त्यांनी तिबेट, दक्षीण आशिया, अरबिया या ठिकाणाला भेटी दिल्या. प्रत्येक धर्मातील प्रमुख व्यक्तींना भेटून ते धार्मिक चर्चा करत असत त्यांनी भारतीय पौराणिक स्थळ सुमेरुपर्वत, मक्का, बगदाद, आचलबटाला, मुलतान या स्थळांना भेटी दिल्या ह्या प्रवास वर्णनाबद्दल १९ व्या व २० व्या शतकांत विस्तृत माहिती मिळते.[४३] गुरू नानक यांच्या प्रवासादरम्यान सिकंदर लोदीने त्यांना व त्यांच्या सोबतच्या व्यक्तींना अटक केली, परंतु गुरूनानक यांच्या किर्तनाने तो मंत्रमुध्द व त्याला आपल्या कृत्याचे वाईट वाटले त्याने गुरूनानक यांच्या समोर नतमस्तक झाला आणि गुरू नानक व त्यांच्या सोबतचे संतजन यांची सुटका केली.[४४]

इस्लाममधील एकेश्वरवाद, ख्रिस्ती धर्मातील कृपेची ग्रेस कल्पना आणि हिंदू धर्मातील आत्म्याच्या अमरत्वाची कल्पना ईश्वर मानवरूपात अवतार धारण करतो, ही हिंदूंची अवतारकल्पना मात्र त्यांना मान्य नाही, यांचा आपल्या शीख धर्मात समन्वय व स्वीकार केला. एक शांतीचा दूत, प्रेम व विश्वबंधुत्वाचा पुरस्कर्ता, मानवतेचा पूजक म्हणून नानकदेवांनी केलेले कार्य व प्रस्थापित केलेला धर्म महत्वपूर्ण आहे. त्यांनी केवळ सदाचारसंपन्न असा नवा धर्मच स्थापन केला नाही, तर उत्तर भारतात जातिव्यवस्था, अस्पृश्यता, सतीची चाल, मूर्तिपूजा, पुरोहित वर्गाने लादलेले जाचक कर्मकांड, वाईट रूढी इ. विरूध्द सतत लढा देऊन सामाजीक क्रांतीही घडवून आणली. 'संगत' म्हणजे 'धर्मसंघ' होय. व 'लंगर' म्हणजे 'अन्नछत्र' होय. 'संगत' व 'लंगर' ह्यांचा त्यांनी पाया घालून त्यांव्दारे जातिधर्मांतील प्रत्यक्ष आचरणात्मक सामाजीक परंपरेची सुरूवात केली. आजही समता व लोकशाही पध्दतीचा उत्तम आदर्श म्हणून ह्या दोन संस्थांचा निर्देश करता येईल.[४५] जातीपातीच्या भेदभावाबद्दल सागतांना गुरू नानक म्हणतात की, "माणसाची जात त्याच्या कर्मावरून

ठरते. माणसाची करणी त्याचा दर्जा ठरविते. जातीचा विचार मनातुन काढून टाका, कारण परमेश्वराचा प्रकाश सर्वाच्या अंतरंगात आहे आणि परलोकात कोठे जातपात आहे".[४६]

मृत्यूसमय जवळ येताच त्यांनी त्यांचा पट्टशिष्य भाई लेहणा याचे 'अंगद' असे नामकरण करून त्याला आला वारसा नेमले. 'अंगद' याच अर्थ स्वत:च्या शरीराचा भाग असा आहे. इ.स. १५३९ मध्ये आपली ज्योती अंगददेव यांच्या देहात ठेऊन त्यांनी देहत्याग केला. हिंदू आणि मुसलमान अनुयायांनी त्यांच्या मृत देहावरील चादर अर्धी अर्धी वाटून घेतली व आपापल्या धर्मांनुसार तिचा अंत्यसंस्कार केला. मधे एक आडवी भिंत उभारून दोन्ही समाजांनी त्यांचे कर्तारपूर येथे स्मारक उभारले.[४७] जीवनाच्या शेवटी त्यांची प्रसिद्धी सर्वत्र पसरली त्यांच्या विचारात बदल झाला. ते स्वत: आपल्या परीवारासोबत राहू लागले, दान धर्म, भंडारा करू लागले. त्यांनी करतारपूर शहर वसवले. सध्या हे शहर पाकिस्तानात असून त्याठिकाणी आश्विन कृष्ण १० सवंत १५९७ म्हणजेच २२ सप्टेंबर १५३९ साली वयाच्या ७० व्या वर्षी त्यांचा मृत्यू झाला.[४८] मूत्यपूर्वी गुरुनानक देव यांनी आपले शिष्य भाई लहना याला आपला उत्तराधिकारी घोषित केले आणि त्यानंतर भाई लहना याला 'गुरु अंगद देव' या नावाने ओळखले जाऊ लागले.

गुरूमुखी भाषेत नानकांच्या उपदेशपर शिकवणी पदात जमा झाल्या आहेत. गुरूनानकांच्या शिकवणीच्या दोन स्पर्धात्मक सिध्दांत आहेत.[४९] कोले आणि सांभी ह्यांच्या नुसार एक ओढुनताणुन नानकांची शिकवण व शिख धर्म हे ईश्वरीय दैवो संदेश आहे असे सांगणारे जनमसाखी, जी सामाजिक प्रतिकार शक्ती किंवा १५ व्या शतकातील मुस्लीम मैत्रीभाव स्थापन करण्यासाठी नव्हती.[५०] दुसरा सिध्दांत सांगतो की, नानक हे फक्त गुरू होते. सिंघाप्रमाणे शिख धर्म अवताराच्या सिध्दांताची पुष्टी करत नाही, गुरू हेच शक्तीचे स्तोत्र असल्याची धारणा आहे. ते ईश्वरीय अवतार नाहीत. ते एक ज्ञानबोध झालेले आत्मा आहेत.[५१]

जन्मसाखीज हे नानकांच्या जीवनावर आधारीत असल्याच सुरूवातीच सुत्र मानल्या जात. गुरूग्रंथसाहिब लिहीणारा भाई गुरदास आपल्या वर्स मध्ये गुरू नानकांच्या जीवनाबद्दल ही लिहीतात. पुरातन गाथा जनमसाखीत सांगीतल्याप्रमाणे हा काळच नानकांच्या जीवनाचा रचनात्मक काळ होता. त्यांच्या बराचशा पदांची रचना त्यांनी ह्याच काळात केली. शिख धर्माच्या गाथेत नानकांचा जन्म व बाळपणातच त्याना लाभलेली प्रगल्भता त्या समकालीन व्यक्ती सांगत असत. वयाच्या ५व्या वर्षापासूनच ईश्वर भक्तीचा त्यांना छंद होता. बऱ्याचशा विव्दानांच्या माताप्रमाणे जन्मसाखीचे रचयीते हे नानकांच्या सोबतीतील होते व पुष्कळदा त्यांनी त्यांच्या बरोबर प्रवास केला. पाकीस्तानातील हसन अब्दाल येथील गुरूव्दारा पंजासाहेब येथे गुरूनानकांचा हस्तलिखीत सुरक्षीत ठेवल्या गेल्याच मानल जात. गुरूग्रंथसाहिब हे शिख धर्माच्या सर्वोच्च प्रभुत्व असलेल ग्रंथ आहे. शिख धर्मांचा संस्थापक म्हणून पहिले गुरू नानक देवजी यांचे ९७४ पदांचा ह्यात समावेश आहे.[५२] गुरू नानक देवजी सांगतात की, सगळी मानव मात्र कसल्याही विधी पुजाऱ्याशिवाय सरळ ईश्वराशी संपर्क साधु शकतात असे गुरू नानक जोर देउन सांगतात.

अरविंद पाल सिंग मन्डायर ह्यांच्या नुसार गुरू नानकांनी मानवाबद्दल विस्तृत करून सांगीतलेली धारणा आणखी शुध्द करून अहम ईश्वराबद्दलची एकेश्वरवादी धारणा नाकारली. प्रेमाच्या चळवळीच्या चौकात एकेश्वरवाद एक प्रकारे निरर्थक ठरतो. माणसाच्या जीवनाचा ध्येय हे मी आणि तो, मी-मी नाही ह्या द्विधा संपवुन पृथकरण एकाकी मी आणि तो, कर्म-अकर्म, ओढ-अनाकर्षन, ह्यांचा जीवनात समतोलपणा साधणे हा असावा असे शिख गुरू शिकवतात.[५३] गुरू नानक यांच्या मतानुसार शिख धर्मांची गुरूगादी ही वंशपरंपरेने न चालता शिष्य परंपरेने चालावी.[५४]

गुरू नानक व अन्य शिख गुरूंनी भक्तीवर जोर दिला. आध्यात्मिक जीवन व घरसंसार हे एक दुसऱ्यात विणल्या जाव ही शिकवण देतात. शिखांच्या जागतिक दर्शनात नित्याचा संसार हे असीम वास्तविकता आहे. वाढत जाणारी दैवी भक्ती नित्याच्या संसारात उत्साहीने भाग घेण्यास प्रवृत्त करते. सोनाली मारवाह यांच्या मते सक्रिय, रचनात्मक, व्यावहारीक जीवन सत्य-निष्टा, शुध्द चारीत्र्य असेल तर ते आध्यात्मीक सत्याच्या वरच्या पातळीच आहे असे गुरू नानकांनी सांगीतले आहे.[५५] भाई लेहना ह्यांना गुरू नानकांनी आपला वारस नेमला व त्यांच नामकरण गुरू अंगद अर्थात "प्रत्येकाचा आपला" किंवा "तुमचाच भाग" अस केल.[५६] भाई लेहना ला आपला वारसा निवडल्याच्या थोड्या काळानंतर करतारपुर येथे वयाच्या ७० व्या वर्षी २२ सप्टेंबर १५३९ ला गुरू नानक स्वर्गवासी झाले.

### ३.२ गुरू अंगद देव (इ.स.१५०४ -इ.स.१५५२) :-

गुरू अंगद शिखांचे द्वितीय गुरु सृजनात्मक व्यक्तीमत्व, अध्यात्मीक क्रियाशीलता होती. गुरु अंगद हे शिखांचे महान गुरू होते. गुरू अंगद यांचा जन्म हरीके गावात सध्याचे मुक्तसर जवळील सराइ नागा, पंजाब येथील त्रैहान खत्री कुटूंबामध्ये ३१ मार्च १५०४ साली झाली. त्यांच नाव 'लेहना' होत.[५७] भाई लेहनाचे वडील छोटे दुकानदार होते. गुरु अंगद यांचे वडील श्रीफेरु मल एक व्यापारी होते. त्यांच्या आईचे नाव माता रामोजी होते. त्यांचे वडील श्रीफेरू मल हे स्वत: पुजारी व दुर्गामाताचे प्रवचक होते.[५८] गुरु अंगद यांच्यावर सनातन मताचा प्रभाव होता. गुरु अंगद दुर्गा देवीचे भक्त होते.[५९] इ.स.१५२० मध्ये त्यांचा विवाह माता खीवी ह्या खत्री मुलीसोबत वयाच्या १६व्या वर्षी झाला. त्यांना चार अपत्य होते त्यापैकी दोन मूले दासू जी व दातू जी आणि दोन मूली अमरोजी व अनोखी असे होते.[६०] मूगल सम्राट बाबर सैन्याच्या भितीने त्यांच्या वडीलांनी गाव सोडून परीवारासह बियास नदीच्या किनारी खडुरसाहिब ह्या खेड्यात सध्याच तरनतारन या गावी स्थायीक झाले.[६१]

शिख बनण्याच्या व अंगद नामकरण होण्या अगोदर लेहना धार्मिक प्रवचक व दुर्गादेवीचे पुजारी होते.[६२] बालपणापासूनच लेहना धर्मशिलवृत्तीचा आणि देवी दुर्गामातेचा निष्ठावान आराधक होता. प्रतिवर्षी ज्वालामुखीया ठिकाणी यात्रेस जाण्याचा त्यांच्या घराण्याचा नियम असे. त्या यात्रेचे नेतेपणही लेहणाच्या वडिलांकडे त्यांच्या श्रीमंती आणि औदार्यामूळे होते. पुढे ते लेहणाकडे आले.[६३] भाई लेहनानी वयाच्या

दुसऱ्या दशकांच्या शेवटी गुरू नानकांच शिष्य बनुन करतारपुर येथे ६-७ वर्षे त्यांची मनोभावाने सेवा केली. आपल्या मुलाला वगळुन गुरू नानकांनी भाई लेहनाला आपला उत्तराधिकरी नेमण्याचा कारणावर अनेक दंत कथा आहेत. एकदा एक पाण्याचा जग चिखलात पडला. गुरू नानकांनी आपल्या मुलाला पाण्याचा जग उचलुन आणण्यास सांगीतले. जग घाण झाला व उचलण्याचा त्रास टाळण्यासाठी मुलांनी जग उचलला नाही. नंतर गुरू नानकांनी भाइ लेहनाला सांगीतल. त्यानी जग उचलला स्वच्छ धुतला व पाण्याने भरून गुरू नानकांना सादर केला.[६४] गुरू नानकांनी त्याना अलिंगन दिल त्यांच 'अंगद' नामकरण केल. 'अंगद' याचा अर्थ 'शरीराचा भाग' होय. व १३ जुन १५३९ ला दुसरे नानक म्हणुन आपला उत्तराधिकारी नेमला.[६५]

गुरु अंगद देवजी हे भाई जोधा जी एक शिख अनूयायी यांच्याकडून गुरु नानकसाहिब यांचे 'शबद' ऐकून प्रभावित झाले व गुरुनानक यांच्या दर्शनासाठी करतारपूर येथे गेले. गुरू अंगद यांची शिख धर्माचे संस्थापक गुरू नानकांशी भेट झाली व त्यांनी शिख धर्माची दिक्षा घेतली. त्यांनी गुरू नानकासोबत खुप वर्ष काम व सेवा केली. सतगुरु नानक साहिब यांच्या विचारामूळे ते शिख झाले आणि करतारपूर येथे स्थायीक झाले गुरु नानक यांच्या महान पवित्र कार्याप्रती त्यांच्या महान भक्ती आणि ज्ञान पाहून गुरु नानक यांनी भाई लेहना याचे नामकरण केले व आपल्या स्वत:च्या मुलाला वगळुन गुरू अंगद यांना शिखांचा दुसरा गुरू म्हणुन निवडले व गुरुपद प्रदान केले.[६६] गुरुमतच्या प्रसार करण्याची जबाबदारी दिली. गुरु नानक यांच्याकडून गुरु अंगद यांना आत्मज्ञान प्राप्त झाले. गुरुनानक यांनी त्यांना नविन नाव गुरु अंगद साहिब असे दिले. गुरु अंगद देव यांनी गुरुनानक यांची ६-७ वर्ष करतारपूर येथे सेवा केली. २२ सप्टेंबर १५३९ रोजी गुरू नानक साहिब यांची प्राणज्योत मावळल्यानंतर गुरु अंगद करतारपूर सोडून खडूर साहिब गाव (गोइन्दवाल जवळ) गेले. गुरू नानकांच्या दोन मुल श्री चांद व लखमी चांद ह्यांनी गुरू गादी साठी वारसा हक्काचा वाद उभा केला म्हणून गुरू नानकांनी गुरू अंगदाना असे करण्यास सुचित केल असावे. उत्तराधिकारी नंतरच्या सुरूवातीच्या काळात पुष्कळ थोड्या लोकांनी त्यांना मान्यता दिली. गुरू नानकांच्या कुलांनी आपणच उत्तराधिकारी असल्याचा वाद केला. गुरू अंगदानी गुरू नानकांच्या शिकवणीवर केंद्रीत होऊ शिख धर्म उभा करण्याचा प्रवास केला. लंगर धर्मादाय अन्नसत्राची सुरूवात केली. गुरू अंगद देव यांनी शिख धर्म पुढे चालवला. गुरु नानक देव यांच्या विचार लिखीत व भावनात्मक प्रचार केला. वेगवेगळ्या धर्मांच्या संत योगी पूरूष, मूल्ला मौलवींशी आध्यात्मिक विषयावर चर्चा केली. गुरू अंगद यांनी हिमालयाच्या परीसरातील भारतीय-युरोपी लिपी तांकरे च्या जागी 'गुरूमुखी' लिपीचा अविष्कार केला.[६७] गुरु नानक देव यांच्या पंजाबी लिपीला गुरुमुखी लिपीत लिहले. गुरुमुखी लिपी लोकप्रिय झाली.[६८] गुरु अंगद यांनी गुरू नानक यांच्या शिकवणीची पद एकत्र करण्यास सुरूवात केली. त्यानी ६२-६३ पदांची रचना करून त्यात भर टाकली. गुरू अंगद यांनी मूलांच्या शिक्षणावर त्यांची विशेष रुची होती. त्यांनी विद्यालय व साहित्य केंद्राची स्थापना केली. मल्ल-आखाडा प्रथा सुरू केली. भाई बाला जी यांच्याकडून गुरु नानक यांच्या जीवनाचे तथ्य एकत्रित करुन

गुरुनानक यांच्या जीवनावर लिखान केले. त्यांनी ६३ श्लोकांची रचना केली, जी गुरुग्रंथ साहिबात घेण्यात आली.[६९] गुरु नानक यांनी सुरू केलेली 'गुरु का लंगर' प्रथा प्रभावीपणे आजही राबविली जाते. गुरु नानक देव यांनी स्थापन केलेल्या सर्व महत्वपूर्ण स्थानांना भेट दिली. आणि शिख धर्माचा प्रचार-प्रसार केला. दरम्यानच्या काळात त्यांना बऱ्याच अडथळा आला. शिख धर्माने आपली एक धार्मिक ओळख निर्माण केली. सद्धर्मप्रवर्तनासाठी संतचरित्रांनी मोठीच आवश्यकता असते, असे गुरू अंगद देवजी नेहमी म्हणत, त्यांनी अनेक पंडितांना पाचारण करून त्यांच्याकडून संतभक्तांच्या कथागाथा सर्वसामान्यांना सहज समजतील, अशा भाषेत लिहून घेतल्या.[७०]

इ.स.१५४० च्या दरम्यान दुसरा मुगल सम्राट हुमायुनची गुरू अंगद यांच्याशी भेट झाली.[७१] कनौजच युध्द हुमायुन हरला व मुगल सिंहासन शेरशाह सुरी ने बळकाविले. गुरू अंगद खदुर साहेब येथे सत्संगी बसले होते, तिथे हुमायुन आला. सम्राटाचा सत्कार झाला नाही म्हणुन हुमायुन खुप रागात आला व खुप आक्रमक बनला. पण गुरूनी त्याला आठवण करून दिली की, जेव्हा लढाई करण्याची आवश्यकता होती तेव्हा तु लढा दिला नाहीस, पराभुत होऊन राज्य गमवल आणि ईश्वराची प्रार्थना करीत असणाऱ्यावर तु लढु इच्छतोस. ह्या प्रसंगाच्या एक शतकाच्या काळानंतर लिहीतेल्या शिख ग्रंथात गुरू अंगदानी मुगल सम्राटाला आशिर्वाद देउन 'तुझ राज्य तुला परत मिळेल' असा आर्शिवाद दिल्याचे वर्णन आहे.[७२]

गुरू नानक यांच्या परंपरेनुसार त्यांनी आपल्या मुलाच्या ऐवजी गुरु अमरदास यांना गुरुपद प्रदान केले. गुरू अमरदास हे वैष्णव हिंदू होते जे नंतर शिखांचे तिसरे गुरू झाले.[७३] गुरू अंगद यांनी गुरू अमरदास यांना गुरुपद प्रदान केले गुरु अंगद यांनी गुरुमत विचार गुरु शबद् रचनेचे कार्य गुरु अमरदास यांच्याकडे दिले. वयाच्या ४८ व्या वर्षी २९ मार्च १५५२ रोजी खुदूर साहिब येथे गुरु अंगद देव यांचा मृत्यू झ ाला. त्यांनी खडूर साहिब जवळ बियास नदीच्या काठावर 'गोइन्दवाल' नावाचे नविन शहर निर्माण कार्य सूरू केले आणि गुरु अमरदास यांना या कार्याची देखरेखीची जिम्मेदारी दिली.[७४] गुरू अमरदास यांनी याठिकाणी ८४ पायऱ्याची एक विहिर बांधली.[७५] गुरु अंगदांनी गुरूमुखी लिपी ही शिखांची परंपरागत भाषा बनवली. 'गुरूमुखी' ही भारतीय पंजाबी लिहिण्याची मानदण्ड लिपी आहे. शिख धर्म ग्रंथ व ऐतिहासीक साहित्य हे गुरूमुखी लिपीत लिहील्या जाते.[७६] प्रचलित असलेली उत्तर भारतातील इन्डो-युरोपीयन लिपीची गुरू नानकांनी दुरूस्ती केली. लिपी अगोदरच सुधारण्याच्या स्थितीत असण्याची शक्यता आहे कारण गुरूनानकांच एक पद ह्याच लिपीत लिहील्या गेले होते असे कोले आणि सांभी सांगतात व लिपीचे अक्षर प्रचलित होती ह्याबद्दल प्रमाण देतात.[७७] शिख देवळ प्रांगणात लंगरच्या व्यवस्थापणात गुरू अंगदानी खुपच सुधारणा केली. तिथे दुर जवळचे तिर्थयात्री सामुदायीक प्रणालीत मोफत जेवण मिळते. त्यांनी सेवादाना तिर्थयात्रीशी नम्रतेने आदर सत्कार करीत वागवाव, स्वयंपाक गृह, आराम गृह कसे चालवावेत ह्या बद्दल नियम बनवन्याची श्रेय गुरू अंगद यांना जाते.[७८] गुरू अंगदानी 'माल बनारा' ही परंपरा सुरू केली, त्यात शारीरिक आणि

आध्यात्मिक योग क्रिया केल्या जात. गुरू अंगद यांनी ६२-६३ पदांची रचना केली जी शिखांच्या धर्मग्रंथ श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट आहे.[७९] गुरू नानकांनी स्थापीत केलेल्या इतर स्थानांना त्यांनी भेट दिली. नविन गुरूद्वाराची स्थापना करीत शिख धर्माचा प्रसार केला आणि शिख धर्म वाढवला.[८०]

गुरू अमरदास शिख बनण्यापुर्वी विष्णु केद्रीत वैष्णव हिंदु धर्मावलंबी होते. त्यांनी हिमालयात व गंगातिरी हरीद्वारला २० वेळा तिर्थ यात्रा केली. इ.स.१५३९ च्या दरम्यान तिर्थयात्रेत एका साधुन त्यांना विचारल की, तुम्ही अद्याप गुरू का केला नाही ? अमरदासाने गुरू करण्याचा निर्णय घेतला.[८१] यात्रेवरुन परत आल्यानंतर एकदा गुरू अंगदाची मुलगी बिबी अमरो जिचा विवाह हिंदु कुटूंबात झाला होता. गुरू नानकाची पद गाताना ऐकले. अमरदासानी तिच्या कडून माहीती मिळवली. इ.स.१५३९ च्या दरम्यान दुसरे गुरू अंगद भेट घेऊन त्यांना आपले आध्यात्मिक गुरू बनवले. गुरू अंगद त्याच्या पेक्षा वयान खुप लहान होते. गुरू नानकाच अनुकरण करीत गुरू अंगदानी गुरू अमरदासाला आपला उत्तराधिकारी तिसरा नानक म्हणून नामांकीत केल. गुरू अंगदाची अविरत सेवा करण्यासाठी अमरदास वाखानल्या जातात. खुप सकाळीच उठुन गुरू अंगदाच्या स्नानासाठी पाणी भरण, धुणी-भांडी स्वच्छ करन, गुरू व त्यांचे इतर शिष्यासाठी स्वयंपाक करन, सकाळ-सध्यांकाळ जास्तीत जास्त नामसंकिर्तन तपश्या करत होते. आपल्या स्वत:च्या मुलाला डावलुन गुरू अंगदांनी अमरदासाला इ.स.१५५२ साली आपला उत्तराधिकारी नेमले. २९ मार्च १५५२ ला गुरू अंगदाचा मृत्यू झाला.

गुरू अंगद देवांना कुस्ती खेळाची अत्यंत आवड होती.[८२] ते लहान मुलांच्या कुस्त्या लावुन देत. त्यांना शरीरबळाचे महत्त्व पटवून देत. बलोपासना हा पुढे शिख पंथाचा एक मोठा आधारच ठरला. उत्तम अंगमेहनत करावी. भरपूर खावे-प्यावे, त्यात कसल्याही प्रकारचा विधीनिषेध ठेवू नये. अंगापिंडाने धट्टेकट्टे होऊनच जीवनसंघर्षावर मात करणे शक्य होते, असा एक प्रकारचा आत्मोध्दारक इहवादी आणि आशावादी विश्वासच पंथबांधवांना प्रथम गुरूपासून मिळाला. गुरू अंगद यांच्या कार्यामुळे दशमगुरू गुरू गोविंद सिंग यांनी आपल्या पूर्वगुरूंचे स्मरण करताना सहज म्हटलं आहे, "सिक्ख नहीं कोई अंगद जैसा".

### ३.३ गुरू अमरदास (इ.स. १४७९-इ.स.१५७४):-

गुरू अमरदास यांचा जन्म इ.स. १४७९ मध्ये झाला. गुरु अंगद यांनी इ.स. १५५२ साली गूरू अमरदास यांना तिसरे गुरु म्हणून घोषित केले. वयाच्या ७३ व्या वर्षी गुरू अमरदास शिखांचे तिसरे गुरू बनले.[८३] शिख बनण्यापुर्वी गुरू अमरदास हे वैष्णवपंथी हिंदु होते. त्यांनी आपल आयुष्य समर्पीत हिंदु म्हणुन तिर्थयात्रा व उपवास व कर्मकांड करण्यात घालवल होते. एका दिवशी त्यांनी गुरू अंगदाची मुलगी बिबी अमरो गुरू नानकांची काही स्त्रोत गातांना ऐकले आणि त्यांनी ताबडतोब खुडूर साहिब येथे जाऊन गुरू अंगद यांना आपले गुरू म्हणून स्विकार केला आणि ते एक समर्पित शिख बनले. त्यावेळी गुरू अमरदास यांचे वय ६१ वर्ष होते. लवकरच ते गुरू अंगद व शिख समाजाची सेवा करण्यात गुंतून गेले. गुरू अंगदाच्या प्रभावामुळे आणि गुरूजींच्या शिकवणीमुळे भाई अमरदास हे समर्पित शिख बनले. भाई अमरदास यांनी

खडुरसाहिब येथे राहाण्यास सुरूवात केली. त्याठिकाणी ते सकाळी लवकर उठत होते आणि बियास नदीवरून गुरूजीच्या स्नानासाठी पाणी भरत होते, ते गुरूजींची सेवा करत होते.[८४] गुरू-का-लंगर साठी जंगलातुन लाकुड गोळा करून आणत असत. ते सेवा आणि गुरू ह्यात एवढे तल्लीन झाले की त्यांचा अहंकार गळुन पडला आणि आपल्या जबाबदारी पुर्णपणे हरवुन गेले की, त्यांना जीवनात कसलीही आवड नाही असा वयोवृध्द व्यक्ती बनले. त्यांना 'अमरू' ह्या टोपण नावाने ओळखल्या जायचे. भाई अमरदास यांची शिख धर्माच्या तत्वावरील जबाबदारी, समर्पित सेवा, व गुरूभक्ती यामुळे त्यांच्या वयाच्या ७३ व्या वर्षी मार्च १५५२ मध्ये गुरू अगंद यांनी गुरू अमरदासांना तिसरा नानक म्हणुन नियुक्त केले. गुरू अंगदांनी वसवलेल्या नव्या 'गोविंदवाल' गावी त्यांनी आपल मुख्यालय स्थापण केले. 'गोविंदवाल' हे शिखांचे प्रमुख केंद्र बनले.

लवकरच खुप मोठ्या प्रमाणात गुरूंच्या दर्शनासाठी शिख 'गोविंदवाल' येथे येण्यास सुरूवात झाली. गुरू अमरदासांनी याठिकाणी पध्दतशीर, योजनाबध्द, आणि जोरदारपणे शिख धर्माचा प्रचार व प्रसार करण्यास सुरूवात केली. त्यांनी शिख संगतची२२ उपदेश केंद्र अथवा मंजी मध्ये विभागणी केली आणि एका समर्पीत शिखाला त्याचे प्रमुख बनवले. गुरू अमरदास हे कुशल संघटक होते. 'मंजी' याचा गुरूमुखीत अर्थ 'पलंग' असा होतो. प्रत्येक मंजीसाठी एक सत्चरित् शिखाची धर्मनायक म्हणुन नेमणुक करण्यात आली. मंजी वर बसून त्याने उपदेश करावा.[८५] आणि पुढे गुरूद्वारा प्रबंधक समितीची बीजे येथे दिसतात. ते स्वत: भेट देत आणि भारताच्या वेगवेगळ्या भागात धर्म प्रसारक पाठवून शिख धर्माचा प्रचार व प्रसार करत असत. शिख धर्म प्रसारासाठी त्यांनी १४० धर्म प्रसारक नेमले, त्यात ५२ स्त्रियांचा समावेश होता. मंजी मध्ये स्त्रियांची नेमणुक केली, स्त्रियांनाही दीक्षाप्रचारक म्हणून नेमले गेले. त्यांना 'पिराहा' असे म्हणत. 'पिराहा' या शब्दाचा अर्थ आसन असा आहे. भाई गुरूदासच्या हिंदी, संस्कृत आणि हिंदु धर्मग्रंथाच्या ज्ञानाबद्दल गुरू अमरदास प्रभावित झाले. पुर्ण देशात मसंदाना पाठवण्याच्या परंपरेनुसार गुरू अमरदासांनी शिख धर्माची शिकवणीचा प्रसार करण्यासाठी भाई गुरूदासाला आग्रा येथे पाठविले. आपल्या देहावसानाच्या अगोदर गुरू अमरदासांनी शिखाच्या दैनंदिन कार्याचे नियम तयार केले.

जो स्वत:ला खऱ्या गुरूचा शिख म्हणवुन घेतो, त्याने सकाळी लवकर उठायलाच पाहीजे, आणि आपल्या प्रार्थना म्हणल्या पाहिजे. त्यांनी सकाळच्या अम्रीत वेळेला पवित्र तलावात स्नान करावी. गुरूजींच्या उपदेशानुसार त्याने ईश्वराचे चिंतन करावे आणि स्वत:ची दु:खाचे मुळ, पाप आणि कुकर्मापासुन सुटका करून घ्यावी. दिवसाच्या वेळेनुसार धार्मिक ग्रंथाचे वाचन करावयास हवे. प्रत्येक कार्य करते वेळी ईश्वरनामाचा जप करत रहावा.

शिख धर्मांमध्ये 'लंगर' परंपरेची सूरूवात गुरु अमरदास यांनी केली.[८६] गुरू का लंगर या पारंपारीक प्रथेला मजबुत केले आणि भेटीला येणाऱ्या सर्वांनाच प्रथम जेवण करणे अत्यावश्यक केले, गुरू अमरदास

म्हणत, “पहले पंगत फीर संगत” याचा अर्थ पहिले लंगर ला भेट द्या नंतर गुरूंना भेटा.[८७] मोगल सम्राट अकबर यांनी गुरू अमरदास यांच्या भेटीला आला असता, लंगर प्रथेवर एवढा प्रभावित झाले की त्यांनी गुरू का लंगर प्रथेसाठी राजकीय संपत्ती दान देण्याची आपली इच्छा जाहीर केली परंतु गुरू साहिबांनी आदरपुर्वक त्यांना नकार दिला.

गुरू अमरदास यांनी जन्म, विवाह, आणि मृत्युच्या नव्या समारंभाची सुरूवात केली, ह्या प्रकारे त्यांनी स्त्रीयांची प्रतिष्ठा वाढवली आणि स्त्रीलिंग बाळाची सुरक्षीतता निश्चीत केली. गुरू अमरदास यांनी दिवाळी, बैसाखी, माधी असे तीन गुरूपर्बची शिख उत्सव म्हणुन पक्के केले. शुभविवाहाप्रसंगी गुरूवाणी चा उच्चार मंत्राक्षराप्रमाणे केला जावा, असाही त्यांनी नियम केला.[८८]

गुरू अमरदास यानी गोविंदवाल जवळ ८४ पायऱ्याची एक विहिर बांधली.[८९] त्या विहिरीच्या ८४ पायऱ्यावर प्रात:स्मरणाची भजने म्हटल्यामुळे ८४ लक्ष योनीच्या जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्तता होते, अशी शिखांची भावना आहे.[९०] गुरू अमरदास यांनी स्त्रियांना समान पातळीवरचे तत्व शिकवणे चालु ठेवले. सती प्रथेची बंदी घालण्यासाठी आवाज उठवला.[९१] मोगल काळात गुरु अमरदास यांना मानाचे स्थान होते. सम्राट मोगल बादशहा अकबर गुरु अमरदास यांचा सल्ला घेत असत. गुरु अमरदास यांनी पहिल्या दोन गुरुंचे उपदेश संगीतातून लोकांपर्यत पाठविण्याचे काम केले. गुरू नानक व गुरू अंगद यांच्या लिखानाच्या खुप प्रती तयार केल्या. त्यांनी ८६९ कडव्यांची रचना केली आणि ‘आनंद साहिब’ याचे लेखन केले. शिखांचे पाचवे गुरू अर्जुन यांनी सगळ्या शब्दांचा गुरूग्रंथसाहिबात समावेश केला. ‘आनन्द साहिब’ हे परमानंद यांचे गीत याचे लेखन गुरु अमरदास यांनी केले.[९२] गुरु अमरदास यांनी आपल्या अनूयायांना जातीय भेदभाव नष्ट करण्यास सांगीतले. ‘मंजी’ आणि ‘पिरी’ या धार्मिक कार्यांची त्यांनी सुरुवात केली.[९३] महिला व पूरुषांना शिक्षण व्यवस्थेवर भर देण्यास त्यांनी जास्त महत्व दिले. मोगल बादशहा अकबर सोबत गुरु अमरदास यांचे मित्रत्वाचे संबंध होते. अकबराशी बोलून हिंदू व शिख धर्मावरील जिजीया कर कमी केले. गुरु अमरदास यांनी सती प्रथेला विरोध करून विधवा पूनर्विवाहास त्यांनी समर्थन दिले. गुरु अमरदास हे सती प्रथे विरोधात आवाज उठवणारे पहिले समाजसुधारक होते. स्त्रियांना पडद्यात ठेवणेही अमरदासांना मान्य नव्हते. या प्रथेवर चर्चा करण्यापेक्षा आपल्या प्रवचनांना येणाऱ्या स्त्रियांनी अशी अन्याय पध्दती अनुसरू नये, असा दंडक घालून देण्यात गुरूजीने वेगळेपण प्रकट होते.[९४] अस्पृश्यता समाप्त करण्यासाठी अमरदास यांनी ‘सांझी बावली’ चे बांधकाम केले व सर्वांसाठी पाणी दिले. गुरू अमरदास यांचे ८६९ शब्द १७ रागामध्ये श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत.[९५] गुरू अमरदास यांचे अनंद, पटी आणि ४वार ह्या महत्वपुर्ण रचना आहेत. गुरू अंगददेवांप्रमाणेच अमरदासांनीही गुरूचरित्र लेखनाचे काम पुढे नेले. आपल्यापूर्वी झालेल्या गुरू

व संत-भक्तांच्या निवडक रचनांची एक 'मोहनपोथी' त्यांनी तयार केली. ही जबाबदारी त्यांचा नातू सन्साराम याने पार पाडली. त्याने आपल्या वडिलांचे नाव संकलनास दिले म्हणून ही 'मोहन' पोथी होय.[९६]

जेव्हा गुरू अमरदास यांची लहान मुलगी बिबी भानीच्या विवाहाची वेळ आली, त्यांनी लाहोर येथील आपला अनुयायी श्रध्दाळू आणि मेहनती 'जेठा' नावाच्या तरूणाची निवड केली. जेठा तिर्थयात्रेच्या वेळी गुरू अमरदास यांना भेटला व त्यांच्या शिकवणुकीमुळे प्रभीत होऊन गोविंदवाल येथे राहण्याचे ठरवले. जेठा आपल्या उपजिवीकेसाठी गहु विकायला सुरूवात केली आणि आपल्या रिकाम्या वेळी तो नियमीतपणे गुरू अमरदासांचे प्रवचणासाठी उपस्थित राहत असे आणि गुरूंची सेवा करत असे. गुरू अमरदासांनी आपल्या मुलापैकी कोणालाही गुरूपदासाठी योग्य समजले नाही, त्यापेक्षा त्यांनी आपला जावई जेठा यास उत्तराधिकारी म्हणुन नेमले. व जेठा चे 'रामदास' असे नामकरण केले. गुरू अमरदास यांनी ९५ व्या वर्षी अमृतसर जिल्हातील गोविंदवाल इथे गुरूपदाची जबाबदारी चौथे नानक म्हणुन गुरू रामदासांना दिला. गुरु अमरदास यांचा मृत्यू १ सप्टेंबर १५७४ रोजी झाला.

गुरू अमरदास अन्य गुरूंच्या तुलनेने पाहता अधिक परिवारप्रिय होते. आपल्या मोहरी या धाकट्या मुलाला पहिला मुलगा झाला, तेव्हा गुरूजी आनंदून गेले आणि त्यांनी ३८ कडव्यांची एक दीर्घ कविता लिहिली. पुढील दोन गुरू रामदास आणि अर्जुनदेव यांनी या कवितेला एकेक कडवे जोडून तिचे महत्त्व अधिक वाढविले आणि या चाळीस पौड्या अथवा कडव्यांच्या काव्याला आनंदमंगल काव्य म्हणून लोकप्रियता लाभली.[९७] पाचवे गुरू अर्जुनदेव यांच्या आज्ञेप्रमाणे गुरू अमरदास यांचा पणतू सुंदरदास याने अमरदासांच्या निर्वाणावर एक काव्यरचना केली. ही 'सद' म्हणून प्रसिध्द आहे. 'सद' पाठामुळे अमरदास अधिकच अमर होऊन शिख सांप्रदायिकांची गुरूभक्ती सर्वत्र प्रसिध्द होण्यास मदत झाली.[९८] गुरू अमरदास आणि बादशहा अकबर यांची गुरूमैत्री राहिल्यामुळे त्यांची प्रतिष्ठा वाढली. पंथाचा प्रसारही होण्यास मदत झाली. नानकदेव-अंगददेवाच्या काळात सामान्य हिंदू लोक शिख संप्रदायाकडे वळले, तर अमरदासांच्या कारकीर्दीत प्रतिष्ठित वर्गही मोठ्या संख्येने शीख बनला.

### ३.४ गुरू रामदास (इ.स.१५३४-इ.स.१५८१):-

गुरू रामदास यांचा जन्म २४ सप्टेंबर १५३४ मध्ये चूना मण्डी लाहोर (पाकिस्तान) मध्ये झाला. शिखांच्या १० गुरू पैकी गुरू रामदास हे चौथे गुरू होते.[९९] गुरु रामदास यांच्या आईचे नाव माता अनूप देवी व वडिलांचे नाव बाबा हरि दास जी सोढी खत्री समाजाचे होते.[१००] त्यांच नाव 'जेथा' होत. बालपणी गुरु रामदास अत्यंत सूंदर व आकर्षक होते. गुरु रामदासजी यांचा परीवार अत्यंत गरीब होता. गुरु रामदासजी यांचा परीवार उकडलेले चन्ने विकून उदरनिर्वाह करत असे. जेव्हा गुरु रामदास ७ वर्षाचे होते तेव्हा त्यांच्या आई-वडिलांचा मृत्यू झाला. त्यांच संगोपण त्यांच्या आईच्या आईने (आजीने) केले.[१०१] गुरु रामदास जी

आपल्या आजीसोबत गोइन्दवाल साहीब येथे गेले. गुरु रामदास हे गोइन्दवाल याठिकाणी गुरु अमरदास जी सोबत धार्मिक कार्यात भाग घेऊ लागले. गुरू रामदास यांनी गुरू अमरदास यांना आपला मार्गदर्शक म्हणुन स्विकार केला व त्यांची सेवा केली. गुरु रामदास यांनी गोइन्दवाल साहिबच्या निर्मीतीत मदत केली.

गुरु रामदास यांचा विवाह गुरु अमरदास यांची मूलगी बिबी भानी हिच्याशी झाला.[१०२] व ते गुरू अमरदास यांच्या कुटूंबाचे सदस्य बनले. गुरु रामदास यांना पृथ्वीचंद, महादेव, अर्जुन अशी तीन मूले होती. लग्नानंतर गुरु रामदास हे गुरु अमरदास यांचे अत्यंत प्रिय व विश्वासू अनूयायी झाले. गुरु अमरदास यांच्या सोबत गुरु रामदास यांनी देशात वेगवेगळ्या ठिकाणी धर्माचा प्रसार व प्रचार केला. शिखांच्या पहिल्या दोन गुरूंचे अनुकरण करून अमरदासांनी देखील आपल्या मुलांना वगळून भाई जेठाची आपला उत्तराधिकारी म्हणून निवड केली व त्यांचे नामकरण 'रामदास' म्हणजेच ईश्वराचे सेवक असे केले.[१०३] गुरु रामदास यांच्यातील धर्माबद्दलचा सेवाभावामूळे १ सप्टेंबर १५७४ रोजी शिखांचे चवथे गूरु म्हणून त्यांना मान्यता मिळाली. गुरू अमरदासांच्या मुलांचा विरोधाचा त्यांना सामना करावा लागला. गुरू अमरदासांच्या निवडलेल्या 'गुरू-दा-चाक' ह्या जागी त्यांनी आपल कार्यालय चालविले. नव्याने स्थापलेल हे गाव 'रामदासपूर' म्हणवल्या गेले. ह्याचीच वाढ होत नंतर अमृतसर (शिखांचे पवित्र शहर) म्हणून नावारूपाला आले. शिखांच्या परंपरेत पवित्र शहर अमृतसर वसवण्याचे श्रेय गुरू रामदासांना दिल जात.[१०४] गुरु रामदास यांनी 'रामदासपूर' शहराची निर्मीती केली नंतर हे शहर अमृतसर म्हणून ओळखल्या जाऊ लागले. अमृतसर हे शहर लाहौर प्रमाणे महत्वपूर्ण शहर बनले.[१०५] शिख धर्माची संघटना सुदृढ करण्यासाठी दान एकत्र करून आध्यात्मिक व आचियतगुरु रामदास यांनी 'मंजी-पध्दती' परीवर्तन करून 'मसंद पध्दती' सूरू केली या पध्दतीमूळे शीख धर्माची खूप प्रगती झाली.[१०६] मसंद हे गुरू पासून खूप दूर राहणारे, शिख समाजाचे पुढारी असतात. दुरवरच्या सत्संगाच नेतृत्व करतात. शिखाचे दैनंदिन कार्य, मंदिर बनवन, दानाचे पैसे जमा करन, आपसात चर्चा करून निर्णय घेणे, इ. संस्थागत संघटण व शिख धर्म वाढवण्यात मदत झाली.[१०७] अमृतसर शहराची निर्मीतीचे सर्व श्रेय गुरू रामदास यांना जाते. शिखांच्या ऐतिहासीक दस्तऐवजाप्रमाणे गुरू अमरदासांनी ह्या जागेची निवड केली होती. ही जागा 'गुरू-दा-चक्क' म्हणवल्या गेली. त्यावर गूरू अमरदासांनी गुरू रामदासांना सांगितले की, "तळ बनवता येण्यासारखी जागा शोधुन त्याठिकाणी नविन गाव वसवावे".[१०८] गुरू गादीवर बसल्यानंतर अमरदासांच्या मुलांचा बंड विरोधाला तोंड देऊन रामदासांनी नविन गाव वसवल व 'रामदासपुर' हे नाव दिले. त्यांनी तळ पुर्ण करण्यास सुरुवात केली त्याचप्रमाणे गुरू मंदीर नविन इमारत बनवली शेजारीच रहाण्याचे घर बांधले. त्यानी भारतातील इतर भागातुन व्यापारी-कारागिर यांना निमंत्रण देउन त्यांच्या सोबत रहाण्यासाठी बोलावले.[१०९]

शिख धर्मातील भिन्न वैवाहिक पध्दती दूर केली 'लंगर' प्रथा पूढे नेली. अंधश्रध्दा, वर्णव्यवस्था, जातीभेदाचा विरोध केला. गुरुग्रंथसाहिबात ३० राग, ६३८ शबद् , २४६ पौउडी, १३८ श्लोक, ३१ अष्टपदी आणि ८ बारांचा समावेश आहे.[११०] गुरु रामदास यांनी आपल्या तिसरा पूत्र अर्जुन यांना शिखांचे पाचवे गुरु म्हणून घोषित केले आणि अमृतसर सोडून गोइन्दवाल याठिकाणी गेले. गुरु रामदास यांचा १ सप्टेंबर १५८१ रोजी मृत्यू झाला. गुरू रामदासांनी आपल्या स्वत:च्या मुलाला उत्तराधिकारी नेमला. अगोदरचे ४ गुरू वारसा संबंधाने नव्हते. पाचवे ते दहावे शिख गुरू वारसा उत्तराधिकारी होते.[१११] गुरू रामदासांनी आपल्या सर्वात लहानगा मुलगा अर्जुन ह्याला शिखांचे पाचवे गुरू आणि आपला वारस म्हणून निवडले. शिखांच्या इतिहासात वारस निवडनुकीमुळे नेहमीच वाद व आंतरीक विभागणी होत राहिली.[११२] गुरू अमरदासांचा जेष्ठ मुलगा प्रितीचंद हे शिख प्रथेत अर्जुनच्या खुप विरोधात वेगळी तुकडी मिनास (अधम, दुष्ट) बनवली व लहान हरगोविंदचा खुन करण्याचा प्रयत्न केला.

गुरू रामदासांनी गुरू ग्रंथसाहिबातील ६३८ पदे ३० रागात रचली आहेत.[११३] गुरूग्रंथसाहिबाचा १\१० पदे आहेत. गुरू रामदास हे एक नामांकीत कवी होते. आणि भारतीय शास्त्रीय संगीताच्या ३० रागावर त्यांनी पदाचे रचना केली.[११४]

गुरू रामदासांची गुरूग्रंथसाहिबातील पदांचा अर्थ पुढील प्रमाणे आहे.

जो आपल्याला गुरूचा अनुयायी म्हणवतो त्यानं सुर्योदयापुर्वी उठल पाहीजे. व ईश्वराच नामस्मरण कराव. खुप सकाळी उठुन अमृतरूपी तलावाच्या पाण्यान स्नान करून गुरू नामस्मरण जप करावा. ह्यामुळे सर्व पाप धुतल्या जाउन आत्मा शुध्द होतो.[११५]

ईश्वरनामान माझ अंत:करण आनंदी होत. ईश्वर नामाचा जप करण हे माझे मोठे सौभाग्य आहे. खऱ्या गुरू मुळेच ईश्वर नामाचा चमत्कार अनुभवता येतो. काही विरळ्याच आत्म्याला गुरूच्या ज्ञान प्रकाशात चालायला मिळत.[११६] हे मानवा ! गर्वाच विष तुला मारत आहे. ईश्वराबद्दल तुला आंधळ बनवत आहे. स्वार्थामुळे तुझे शरीर, सोन्याचा रंग बेरंग व भित्तीदायक बनला आहे. भ्रांतीपुर्वक श्रेणी काळवटतात. अहंपणाचा उन्मादान ते जखडल आहे.[११७]

शिखांच्या लग्नात नवरा-नवरी क्लॉकवाइज फेऱ्या घालत रामदासांची लावण ही पद म्हणत असतात. आनंद आणि लावण सुही प्रकारातील वेगवेगळया भागाची रचना करण्याच श्रेय गुरू रामदास आणि गुरू अमरदास यांना जाते. शिख धर्मात लग्न विधीचा अंग म्हणुन नवरा-नवरी यांनी गुरूग्रंथसाहिबाच्या चार वेळा प्रदक्षिणा घालवल्या जातात.[११८] गुरू रामदासांनी आपल्या स्वत:च्या मुलीच्या लग्नानिमीत्त लग्नाचे पवित्र दोहे रचले होते. लावन च्या पहिल्या चरनात गुरूंच्या उपदेशाला मार्गदर्शक समजुन पवित्र नामस्मरीत संसार

करावा अस गुरू रामदासांनी सांगीतले आहे. दुसऱ्या चरनात आपल्या खोल अंतरत्म्यात एकमात्र ईश्वर वसलेला असतो. तिसऱ्या चरणात अधोलौकिक प्रेमाबद्दल सांगत. चौथ्या चरणात दोघांच एकत्र येण दोघांनी नेहमीसाठी एकरूप झालं पाहिजे, अस सांगत.[११९]

### ३.५ गुरू अर्जुन (इ.स.१५६३-इ.स.१६०६):-

गुरु अर्जुन शिखांचे पाचवे गुरु होते. गुरु अर्जुन यांच्या वडीलांचे नाव गुरु रामदास व आईचे नाव बीवी भानी होते.[१२०] गुरू अर्जुन यांचे वडील भाई जेथा जे पुढे चालुन गुरू रामदास बनले व गुरू अमरदासांचे मुलगी बीबी भानी ह्यांचा सर्वात लहान मुलगा गुरू अर्जुन हे होते. शिख परीवारात जन्मलेले ते पहिजे शिख गुरू होते. गुरु अर्जुन यांचा जन्म १५ एप्रिल १५६३ रोजी गोइन्दवाल मध्ये झाला. सुरूवातीचे ११ वर्ष गुरू अर्जुनाचे वास्तव्य गोविंदवाल इथे व नंतरचे ७ वर्ष आपल्या वडिलासोबत रामदासपुरला होते. शिख परंपरेनुसार आपल्या तारुण्यात २ वर्ष ते लाहोरला राहीले. त्यांच्या वडीलांनी आपल्या चुतलभाऊ सहारीमलच्या विवाहासाठी गुरू अर्जुनला तिथ पाठवल व नंतर शिख धार्मिक संघटन स्थापन करण्यास सांगीतल.[१२१] इ.स. १५८१ गुरू अर्जुनाच्या वडीलांचा मृत्यू झाल्यानंतर त्यांची शिख गुरू म्हणुन नियुक्ती झाली. गुरू रामदास हे सोधी जातीच्या खत्री होते. गुरू अर्जुनच्या नंतर वंशानुक्रमामुळे पुढे रामदासांच्या सोधी परीवाराकडेच गुरू परंपरा राहीली.[१२२] गुरू अर्जुनाला दोन वडील भाऊ प्रितीचंद व महादेव होते. सगळ्यात लहान मुलाला आपला उत्तराधिकारी शिखांचा पाचवा गुरू म्हणुन निवड केली. महादेव यांने संन्याशी जीवनाचा मार्ग पत्करला. शिख संस्कृती प्रत्येक घरात पोहोचण्यासाठी त्यांनी अथक प्रयत्न केले. इ.स. १५९० मध्ये तरनतारन सरोवराचे बांधकाम केले. गुरुग्रंथसाहिबाची निर्मीती भाई गुरदासच्या मदतीने इ.स.१६०४ मध्ये केली. गुरुग्रंथसाहीबामध्ये गुरु अर्जुन यांनी ३६ महान व्यक्तीच्या लिखानाची मदत घेतली. गुरु अर्जुन यांच्या ३० राग, २२१८ शबद्, गुरुग्रंथसाहिबात आहेत.[१२३] गुरु अर्जुन यांचा स्वभाव शांत होता. त्यांच्या मनात सर्वधर्माबद्दल आदर होता. गुरु अर्जुन यांनी 'सुखमनी साहीब' ची रचना केली. गुरू अर्जुनानी अगोदरचा गुरू रचित दोह्यांचे संकलन शिख गाथेच पहिल प्रकाशन आदिग्रंथ बनवुन हरमंदीर स्थापीत केले.[१२४] गुरू रामदासांनी सुरूवात केलेल्या मंसद प्रणालीला गुरू अर्जुनानी पुर्नरचना केली. रामदासांनी नविन गाव वसवल व 'रामदासपुर' हे नाव दिले. त्यांनी तळ अथवा सरोवर पुर्ण करण्यास सुरुवात केली त्याचप्रमाणे गुरू मंदीर नविन इमारत बनवली शेजारीच रहाण्याचे घर बांधले. त्यांनी भारतातील इतर भागातुन व्यापारी-कारागिर यांना निमंत्रण देउन त्यांच्या सोबत रहाण्यासाठी बोलावले.[१२५] स्वैच्छीक श्रमदान व दानावर गुरू अर्जुनच्या वेळी अमृतसर दरबार साहिब बांधल आणि नंतर हे शहर वाढत गेल.[१२६] तळ्याचा परीसर वाढत वाढत भव्य मंदीर वास्तु बनली त्यांच्या मुलानी गुरूद्वारा हरमंदीर साहिब बनवला व इ.स.१६०४ मध्ये शिखांच्या ग्रंथाची स्थापना केली.[१२७] इ.स.१५८८ मध्ये सुवर्णमंदीर बांधकाम सुरूवात करण्यात आली, बांधकामास मुस्लिम फकीर मियां मीर ह्याच्या हाताने सुरूवात करण्यात आली.[१२८] अमृतसर अथवा

रामदासपूर या शहराच्या बांधकामाच्या कार्याचा इ.स.१५७४ ते इ.स.१६०४ काळातील उल्लेख इ.स.१७४१ ला लिहील्या गेलेला शिखांच्या ऐतिहासीक 'माहिमा प्रकाश वस्तक' कथेत सापडतो.[१२९] गुरू अर्जुनानी मसंद प्रणालीची पुर्नरचना केली, शिखांच्या संघटणेला सेवा आणि दान कराव आपल्या कमाईचा दहावा हिस्सा दसवंदला द्यावा हा नियम घालुन दिला. मसंद फक्त दानाचे पैशेच जमा करत नव्हते तर आपल्या विभागातील धर्मावलंबी यांचे भांडण तंटे सोडवत असत, गुरूद्वारे बांधणे, लंगर चालवण्यासाठी आर्थिक व्यवस्था करण्याचे कार्य दसवंत करतात.[१३०] गुरू अर्जुन देवांच्या काळात 'अकाल तख्ताची' अथवा शिख सिंहासनाची पायाभरणी झाली होती.[१३१] गुरू अर्जुन यांनी सुखमनी साहिब ह्याची रचना केली. संतोखसर अथवा शांतीचे तळ, गंगासर अथवा गंगेच तळ, तरनतारण, करतारपुर, हरगोविंदपुर ह्या शहराची स्थापणा व इतर सुविधा ह्याच श्रेय गुरू अर्जुनाला जाते.[१३२] गुरू अर्जुन यांनी श्री गोविंदपुरा, रामसर, छिहरटा साहिब, गुरू का बाग इ. पवित्र ठिकाणांची निर्मीती व या शहरात दवाखाने बनवून बऱ्याच शिख व इतर जातीतील लोकांची सेवा केली. जागोजागी विहिरी, सरोवर, तळे इ. केल्यामुळे पंजाबातील शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्यास मदत झाली.[१३३]

गुरू अर्जुन खुप मोठे कवी होते. त्यांनी २२१८ पदांची गुरूग्रंथसाहिबाच्या एकंदरीत पदाच्या १\३ पदाची रचना केली. गुरू अर्जुनाची पद रचना बृजभाषेत विद्वतापुर्ण संस्कृत शब्द संग्रहाची आध्यात्मिक उपदेश होते. ते पुर्ण करून हरीमंदीर साहिब मध्ये स्थापीत केल्यावर सम्राट अकबराला ह्याबद्दल विस्तृत माहीती देण्यात येऊन ह्यातली शिकवण ईस्लाम च्या विरूध्द असल्याचा आरोप ठेवला गेला. सम्राट अकबराने गुरूग्रंथसाहिबाची प्रत आणण्याचा आदेश दिला. गुरू अर्जुनानी एका थालीत ठेवून प्रत सम्राट अकबराकडे पाठवली त्याबरोबर एक संदेश होता की, ह्या थालीत तुम्हाला तीन गोष्टी सापडतील सत्य, शांती, आणि चिंतन आणि ह्यात सर्व मानव जातीच कल्याण करणार नामरूपी अमृत आहे. अबुल फजल अलामी रचीत अकबरनामा मध्ये गुरू अर्जुनाची मुगल सम्राट अकबर व त्याच्या दरबारीयांची इ.स.१५९८ मध्ये भेट झाल्याचा उल्लेख आहे. लुइस फेनेचच्या मते त्यांच्या ह्या भेटीच्या प्रभावामुळेच शिखांची हस्तलिपी रचल्या गेली व शिखांत युध्दप्रेमाची वृत्ती दृढ झाली.[१३४]

मुगल सम्राट जहाँगीर बादशहा याने गुरू अर्जुन ला कैद करून मुस्लीम धर्म स्विकारावा म्हणून खुप छळ करून लाहोर पाकिस्तानमध्ये ३० मे १६०६ मध्ये अत्यंत दूख: यातना देऊन गुरु अर्जुन यांची फाशी देऊन हत्या केली.[१३५] शिख धर्माच्या इतिहासात गुरू अर्जुनांच होतात्म्याचा काळ खुपच संकटग्रस्त होता. शिरामनी गुरूद्वारा प्रबंधक कमेटीच्या २००३ च्या कॅलेंडर नानकशाही नुसार १६ जुन हा गुरू अर्जुनचा शहिदी दिवस म्हणुन प्रत्येक वर्षी साजरा केला जातो.[१३६]

देहदंडाची अमलबजावणी होण्याअगोदर गुरू अर्जुनानी आपला मुलगा व उत्तराधिकारी हरगोविंद शस्त्र उचलुन अत्याचाराचा विरोध करण्याचा आदेश दिला. गुरू अर्जुन हे पाचवे गुरू ह्या नावाने ओळखले जातात.

गुरू अर्जुन यांचे जन्मस्थान हे आता स्मारक गुरूद्वारा चौबारा साहिब म्हणुन प्रसिध्द आहे. तर पाकिस्तानातील लाहोर येथे गुरूद्वारा डेरा साहिब ह्या जागेवर गुरू अर्जुन देव मृत्यू पावले ह्याच स्मृतीचिन्ह असल्याचे परंपरागत विश्वास ठेवल्या जातो.

गुरू अर्जुन देवाला राजकीय व सामाजिक दर्जा अत्यंत उच्च प्रतिचा होता. कोणत्याही मोहाला बळी न पडता केवळ स्वधर्माकरीता हाल भोगण्यास व प्राण अर्पण करण्यास तयार झालेल्या गुरू अर्जुनाचे स्वधर्म व सत्कार्य ह्यासंबंधीचे प्रेम किती उच्च होते, हे स्पष्ट जाणवते. शिखांचे संघटन करून स्वतंत्र राष्ट्र निर्माण करण्याचे व त्याचा दर्जा वाढविण्याचे श्रेय जसे गुरू अर्जुन देवाकडे जाते, तसेच स्वधर्मसाठी प्राणाहुति अर्पण करण्याचा आद्य बहुमान देखील त्याच्याकडेच जातो. रामदासपूर या शहराला पुढे अमृतसर असे नाव देण्यात आले आणि पुढे अमृतसर शहराला 'कुबेरनगरी' बनवण्याचे सर्व श्रेय गुरू अर्जुन देवजींना जाते.[१३७] गुरू अर्जुन देवजी यांनी श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये २३१२ पदे, ३० रागात समाविष्ट केली आहेत. सुखमनी, बारह माहा, बावन अखरी, गुणवंती, अंजुलीआ, बिरहड़े व ६ वार इ. गुरू अर्जुन देवजी यांची रचना केली आहे.[१३८] गुरू अर्जुन देवजींनी सतीच्या चालीला विरोध करून शिख गुरूंनी स्त्रियांवरील अत्याचारांना एक प्रकारे आव्हानच दिली. अर्जुन देवाची क्रांतिकारकता विधवाविवाहाला उत्तेजन देण्यात विशेष दिसून येते.[१३९]

### ३.६ गुरू हरगोविंद (इ.स.१५९५-इ.स.१६४४):-

गुरू हरगोविंद हे शिखांचे सहावे गुरु होते. गुरु हर गोविंद यांचा जन्म १९ जून १५९५ रोजी पंजाब मधील अमृतसर पासून पश्चिमेला ७ कि.मी. अंतरावरील वडाली ह्या गावात झाला. गुरु हरगोविंद यांच्या वडीलांचे नाव अर्जुन देव व आईचे नाव माता गंगा होते. गुरू अर्जुन यांचे ते एकुलते एक पुत्र होते. लहानपणी त्यांना देवी रोगाचा त्रास झाला होता. त्यांच्या चुलत्यांनी केलेल्या विषबाधेतुन ते वाचले. त्यांच्यावर कोब्रा फेकुन त्यांना जिवे मारण्याच्या प्रयत्नातुन ते बचावले. भाई गुरूदासासोबत त्यांनी धार्मिक ग्रंथाचा अभ्यास केला. धनुष्य व तलवार बाजीचे प्रशिक्षण व गुरू बुधांनी दिले. गुरू अर्जुन यांचा मुगल सम्राट जहाँगिर यांनी फाशी दिल्यानंतर गुरु हरगोविंद हे वयाच्या ११व्या वर्षी म्हणजे ११ जून १६०६ रोजी ते शिखांचे सहावे गुरु बनले.[१४०] गुरु हरगोविंद हे 'छट्टे बादशाह' या नावाने सुध्दा ओळखले जातात.[१४१] गुरू हरगोविंद यांना त्याचे अनुयायी 'सच्चा पादशहा' अर्थात 'खरा राजा' म्हणू लागले.[१४२] आपले वडील गुरू अर्जुनांच्या मुगल सम्राट जहाँगिरने मृत्यूदंड दिल्यानंतर वयाच्या ११ व्या वर्षी अल्पवयातच ते गुरू बनले. आपल्या वडीलांच्या मृत्युदंडाच्या प्रति उत्तरात शिख धर्माच्या संरक्षणासाठी गुरू हरगोविंदानी शिख समाजात लष्करीबाणा रुजवला.[१४३] गुरु हरगोविंद यांनी अमृतसर मधील हरमंदीराच्या समोर 'अकाल तख्त' ची निर्मीती

केली. 'अकाल तख्त' म्हणजे 'अनन्त काळाचे सिंहासन' होय. न्याय स्थापणा व भौतिक वादांच्या प्रकरणासाठी कोर्ट म्हणुन खालसा अथवा संपुर्ण शिख समाज हा सर्वोच्च भौतिक अधिकाराचे केंद्र म्हणुन अकाल तख्ताची मान्यता आहे. गुरु हरगोविंद हे युध्दात सहभाग घेणारे पहिले गुरु शिखांना युध्द कला आणि सैन्य परिक्षणासाठी प्रेरणा दिली. गुरु हरगोविंद 'मीरी पीरी' ची स्थापना केली.[१४४] 'मीरी' ह्या तलवारीला भौतीक शक्ती व 'पीरी' या तलवारीला आध्यात्मिक अधिकारासाठी वापर केला. गुरू हरगोविंद हे संरक्षणासाठी नेहमी स्वत:भोवती शस्त्रधारी शिख नेहमी ठेवलेले असत.[१४५] गुरु हरगोविंद यांनी रोहिला, करतारपूर, अमृतसर, गुरुसर, करितपूर या युध्दात त्यांनी सहभाग घेतला होता. गुरू हरिगोविंद हे लढावु, शिकार करण्यास उत्सुक असत. पर्शीयन दस्ताऐवजानुसार अगोदरच्या गुरूच्या उलट ते मासभक्षी होते. गुरू हरगोविंदांनी लोकांना शारीरिक सुदृढता मिळवुन मुष्टी युध्दास तत्पर शरीर ठेवण्यास प्रवृत्त केले. त्यांचा दरबार अथवा कोर्ट होते. अनुयायी भक्तांना प्रशिक्षण देऊन त्यांना सशस्त्र बनवले. गुरू हरगोविंद यांच्याकडे ७०० घोडे होते, त्यांची रिसालदारी अथवा सैनिक ३०० घोड-सैनिक होते व ६० बंदुकधारी पायदळ होते.[१४६] अमृतसरच्या रक्षणासाठी गुरूजींनी एक खास किल्ला बांधविला, त्याला 'लोहगढ' असे नाव दिले.[१४७]

गुरु हरगोविंद यांना माता नानकी, महादेवी, दामोदरी या तीन पत्नी होत्या. ह्या तीनही पत्नी कडून त्यांना मुल झाली. पहिल्या पत्नीला झालेली दोन मुल त्यांच्या जीवनकालातच मरण पावली. तिसऱ्या पत्नीपासुन झालेल्या सर्वात लहान मुलगा तेगबहाद्दुर होता. तेगबहाद्दुर हा प्रभावी शिखांचे नववे गुरू बनले. बाबा गुरदिता, बाबा सूरजमल, बाबा अतिराय, बाबा अटल राय, गुरु तेग बहादूर, बीबी बीरो हे गुरु हरगोविंद यांची मूले होती. आपल्या वडीलांच्या हत्येमूळे प्रेरणा घेऊन त्यांनी शिखांना शस्त्र व शास्त्र ची शिक्षा दिली. गुरुपद धारण केल्या नंतर 'पीरी'-एक अध्यात्मिक अधिकार, 'मिरी' ऐहिक अधिकार अशा दोन तलवारी गुरु हरगोविंद यांनी ग्रहन केल्या.[१४८] गुरू हरगोविंद यांनी 'अकाल तख्त' ची स्थापना केली.[१४९] गुरु हरगोविंद यांची तिसरी पत्नी यांचा धाकटा मूलगा तेगबहाद्दूर हा नववा शिख गुरु बनला. गुरु हरगोविंद यांनी जनतेच्या संरक्षणासाठी मार्शल आर्ट व शस्त्रे अंगीकारले. आपल्या वडीलांच्या उपदेशाप्रमाणे त्यांनी नेहमी सशस्त्र शिखांच्या घेऱ्यात स्वत:ला ठेवले. ५२ नंबरचा आकडा त्याच्या जीवनात विशेष प्राधान्याचा होता. त्यांच्या सेवकदारांत ५२ सशस्त्र सैनिक होते. त्याचप्रमाणे गुरु हरगोविंद यांनी 'किरतारपूर' शहर स्थापन केले. शिख प्रार्थना स्थळांना 'गुरूद्वारा' नाव देण्याचे श्रेय गुरू हरगाविंद यांना जाते. गुरू हरगोविंद यांनी मल्लशाळा आणि शस्त्रविद्येचे आखाडे वाढवीत तरूण शिखांना सैनिक बनविले.[१५०] 'अर्जुन देवांच्या क्रुर हत्येचा आम्ही बदला घेऊ', असे क्षात्रतेज निर्माण केले. हरिकिर्तनांच्या बरोबरीने दांडपट्टा, कुस्त्या, शिकारी, भालाफेक यांच्या स्पर्धा सुरू केल्या. जुन्या जमान्यात होऊन गेलेल्या वीर पुरूषांच्या पराक्रमाचे पोवाडे लिहून घेतले.

युध्दकथांचे वर्णन करणारे जलसे सुरू केले. सदैव सशस्त्र राहून घोडा बाळगणे, प्रसंगी अन्यायाच्या प्रतिकारासाठी युध्द मैदानावर उतरणे, त्यासाठी सर्वसंग परित्यागाची तयारी ठेवणे हे प्रत्येक शिखाचे कर्तव्य बनले.

गुरू अर्जुनच्या मृत्यूदंडानंतर मुगल शक्तीला शिखाचे प्रत्युत्तराचे गुरू हरगोविंदाने नेतृत्व केले. त्याची नाममात्र शहाजहानच्या अधिकार मान्य केले पण इस्लामीक अत्याचाराचा विरोध केला. शहाजहानच्या फौजेशी त्यांनी ४ वेळा युध्द केले. शिख समाजाला संघटीत करण्याच्या त्यांच्या प्रयत्नामुळे मुगलशक्तीशी त्यांचे संघर्ष होत राहीले.[१५१] मुगल सम्राट जहाँगिरच्या गुरू अर्जुनाला मृत्युदंड कारणाने सुरूवातीपासुनच गुरू गोविंदाना मुगल राजांचे वैमनस्य होते. त्यांनी सशस्त्र बनुन मुघलांशी लढा देण्यास शिखांना उपदेश केला. जहाँगीरच्या हाती त्यांच्या वडीलांचा झालेल्या मृत्युने त्यांना शिख समाजाला सैनिकी विस्तार देण्यास प्रवृत्त केले. 'मिरी आणि पीरी' (आध्यात्मिक शक्ती व भौतिक अधिकार) च्या प्रतिक्षेत त्यांनी दोन तलवारी धारण केल्या. त्यांनी रामदासपुरच्या संरक्षणात तिथे किल्ला बनवला व औपचारीक कोर्ट 'अकाल तख्ताची' स्थापना केली.[१५२] गुरू अर्जुनावर लादलेला कर शिखांनी व गुरू हरगोविदांनी भरला नाही हे कारण पुढे करून जहाँगिरन १४ वर्षाच्या हरगोविंदला इ.स.१६०९ मध्ये ग्वालीअरच्या किल्यात कैदेत टाकले. हरगोविंद १६ वर्षाचे असतांना इ.स.१६११ व इ.स.१६१२ मध्ये त्यांची कैदेतुन सुटका झाली.

सुरजीत सिंग गांधीनुसार मुगल साम्राज्याचा विरोध केला म्हणुन लाखो रुपये दंड करून किल्यात कैदेत ठेवलेल्या ५२ राज्यांना आपल्यात असलेला धार्मिक मार्गदर्शक दुरावतो आहे ह्याने निराश झाले होते. गुरू हरगोविदांनी आपल्या सोबत सर्व राजाना मुक्त करण्याची विनंती केली व त्यांच्या प्रामाणिक वागणुकी बद्दल स्वत: जामिन घेतला. जहाँगिरने त्यांच्याही मुक्ततेची आज्ञा दिली. जहाँगीर बादशहाने गुरु हरगोविंद व त्यांच्यासोबत ५२ हिंन्दू राजांना कारागृहातून ग्वालियर किल्यातून मूक्त केले, या घटनेला 'बन्दी छोड दाता' म्हणून ओळखले जाते.[१५३] गुरू हरगोविंदानी ५२ प्लेट असलेला विशेष अंगरखा शिवून घेतला. जेव्हा गुरू हरगोविंदा किल्यातुन बाहेर निघाले. बंदी राजांनी त्यांच्या अंगरखेची एक-एक प्लेट धरून त्यांच्या सोबत तेही बाहेर आले.[१५४] त्यांच्या मुक्ततेनंतर गुरू हरगोविंदानी आपल पुर्ण लक्ष शिख सैनिकांना सुदृढ करण्यात केंद्रित केले व शिख समाजाची दृढ पुर्नरचना केली. जहाँगिरशी त्यांचे संबंध मित्रत्वाचे बनले. काश्मीर, राजपुतानाच्या जहाँगीरच्या प्रवासात ते त्याच्या सोबत राहिले. परंतु इ.स. १६२७ ला सुरूवात झालेल्या शाहजहाँनच्या संबंधात पुन्हा कटूता आली. शाहजहॉन असहिष्णु होता. त्याने लाहोर येथील शिखांची बावोली ध्वस्त केली. शाहजहाँनच्या शिकारी टोळीने हरगोविंदच्या संपत्तीची लुटमार केली व त्यांच्या सशस्त्र चकमकीची सुरूवात झाली. शाहजहाँनच्या मुगल सैन्याशी अमृतसर, करतारपुर व इतरत्र ठिकाणी हरगोविंरच्या सैनिकांनी युध्दात सामना केला. इ.स. १६३४ च्या अमृतसर लढाईत गुरू हरगोविंदनी मुगल सैनिकांचा पराभव केला.

इ.स.१६३० च्या सुरूवातीला गुरू हरगोविंद व समर्थ रामदास यांची भेट झाली होती. गुरु हरगोविंद यांचा गुरुकाळ ३७ वर्ष ९ महिने ३ दिवस होता. वयाच्या ४८ व्या वर्षी १९ मार्च १६४४ रोजी किरातपूर रूपनगर पंजाब येथे गूरू हरगोविंद यांचा मृत्यू झाला. शिख धर्मातील प्रथेप्रमाणे त्यांनी आपला नातु हर राय यांना सातवा गुरू बनवले.[१५५] सतलज नदीच्या किनारी वसलेल गाव किरतारपुर येथे निधन झाले. सतलज नदीच्या काठी त्यांचा अंत्यसंस्कार करण्यात आले त्याठिकाणी 'गुरद्वारा पातालपुरी' उभा आहे.

**३.७ गुरू हरराय (इ.स.१६३०-इ.स.१६६१):-**

शिखांचे सातवे गुरु हरराय यांचा जन्म १६ जानेवारी १६३० रोजी किरतपूर साहिब मध्ये झाला. गुरू हरगोविंद यांनी आपला वारस व शिखाचे सातवे गुरू म्हणून हरराय यांची निवड केली.[१५६] गुरू पद मिळाले तेव्हा त्यांचे वय अवघे १४ वर्ष होते.[१५७] गुरु हरराय यांच्या वडिलांचे नाव बाबा गुरुदीता व आईचे नाव माता निहाल कौर होते. गुरू हरराय हे सोधी घराण्यातील होते. वयाच्या आठव्या वर्षी त्यांच्या वडीलांचे निधन झ ाले. वयाच्या दहाव्या वर्षी इ.स.१६४० मध्ये गुरू हर राय यांचा विवाह दयारामची मुलगी माता किशन कौर अथवा सुलखणी हीच्याशी झाला. त्यांना रामराय व हरकिशन अशी दोन मुले होती. हर राय यांचे मोठे भाऊ धिरमलने शाहजहाँनचे प्रोत्साहन व सहकार्य मिळवले, शिख परंपरा उभारण्याचा प्रयत्न केला आणि आपले आजोबा सहावे गुरू हर गोविंदची निंदा केली. हे कार्य सहाव्या गुरूंना आवडले नाही व त्यांनी सगळयात लहान हर रायला आपला उत्तराधिकारी म्हणुन नियुक्त केले.[१५८] वयाच्या १४व्या वर्षी ८ मार्च १६४४ रोजी शिखांचे सातवे गुरु बनले. त्यांचे आजोबा गुरु हरगोविंद यांच्या मृत्यू नंतर १७ वर्ष त्यांनी गुरुपदाचा सांभाळ केला.[१५९] गुरु हरराय यांचा विवाह माता किशन कौर यांच्याशी झाला. रामराय व हरकिशन हे त्यांचे पूत्र होते.

गुरु हरराय यांनी शिख सैन्य दलाचे पूनर्गठन केले. शिख गुरूंनी एकत्र केलेल्या मोठ्या सैन्याचा सांभाळ करण्यासाठी त्यांची किर्ती होती तरी पण सशस्त्र संघर्ष टाळण्याचा त्यांचा प्रयत्न असे. ते एक आध्यात्मिक पूरूष त्याचप्रमाणे एक यौध्दा देखील होते. गुरु हरराय यांनी किरतपूर येथे एक आयुर्वेदीक जडी-बूटी औषधी दवाखाना आणि संशोधन केंद्र स्थापन केले. गुरु हरराय यांच्या दवाखान्यात 'दारा शूकोह' याला मृत्यूच्या दाढेतून परत आणले.[१६०] मुगल साम्राज्याच्या सिंहासनाचे उत्तराधिकारी स्पर्धेत गुरू हर राय यांनी औरंगजेबाच्या कट्टरवादी प्रभावाऐवजी त्यांनी दारा शिकोहचा मध्यमार्ग प्रभाव उचलुन धरला.[१६१] इ.स.१६५८ साली औरंगजेब याने उत्तराधिकारी युध्द जिंकल्यानंतर दारा शिकोहला मृत्युदंड देण्यात आला व दारा शिकोहला समर्थन का दिल्या गेले ह्याची विचारणा करण्यासाठी इ.स.१६६० साली औरंगजेबानी गुरू हर रायला फर्माण पाठवले. गुरू हर राय यांनी आपला मुलगा रामरायला प्रतिनीधी म्हणुन पाठवले. औरंगजेबानी रामरायला बंदी बनवले. शिखांचे पवित्र धर्मग्रंथात आदिग्रंथाच्या पदावर औरंगजेबानी रामरायला प्रश्न

विचारला. त्यावेळी रामरायाने पदातील शब्दाचा अर्थ बदलुन सांगीतल्याबद्दल गुरू हर राय यांनी रामरायला धर्माबाहेर करून आपल्या लहान मुलगा हरकिशन आठवे गुरू बनवले. काही शिख साहित्यात त्यांचा नावाचा 'हरीराय' म्हणुन लिहिल्या गेले. गुरु हरराय यांनी लाहौर, सियालकाट, पठानकोट, साम्बा, रामगढ, जम्मू-कश्मिर अशा वेगवेगळ्या ठिकाणी प्रवास करून '३६० मंजियाची' स्थापना केली. त्यांनी 'भ्रष्ट मसन्द' पध्दती सुधारण्यासाठी सुयरेशाह, साहिबा, संगतिये, मिया साहिब, भगत भगवान, भगत मल, जीत मल अशा पवित्र आध्यात्मिक व्यक्तींची नियुक्ती केली. गुरू हर राय यांनी भारतीय खंडाच्या विभागात प्रवास करून पुष्कळशा शिख धर्माची दिक्षा दिली. गुरू हर राय यांनी पुष्कळशा जनसमुहात धर्मग्रंथाचे गावून संकिर्तन करण्याची परंपरा शिख धर्मात सुरवात केली. शिखांच्या परंपरागत गावून शबद किर्तन करण्यात कथा सांगणे. उपदेशपर भाषण देण्याचीही ही वाढ केली. त्यांनी अतुट ग्रंथ गायण पध्दती अखंड किरतनाची शिख परंपरेत भर टाकली. त्याचप्रमाणे धर्मग्रंथाचे गायक मंडळीचे, श्लोकांचे सामुहिक गायन पध्दत सुरूवात केली.[१६२] गुरू हर राय यांनी आज्ञा दिली की,"लंगरसाठी शिखांना वेळेचे बंधन घालू नये. कुणी केव्हाही आला तरी त्याचे तेथे स्वागत व्हावे".[१६३]

गुरु हरराय यांना गुरुपदाच्या काळात बऱ्याच अडथळांच्या समोर जावे लागले. गुरु हरराय यांनी रामराय यांना औरंगजेब दरबारात जाऊन चूकीचा अर्थबोध सांगितल्याबद्दल धर्मातून दूर केले. आणि आपले छोटे पूत्र हरकिशन यांना शिखांचे आठवे गुरु म्हणून घोषित केले. ६ ऑक्टोंबर १६६१ रोजी किरतपूर साहिब येथे त्यांचा मृत्यू झाला.

### ३.८ गुरू हरकिशन (इ.स.१६५६-इ.स.१६६४):-

गुरू हरकिशन यांचा जन्म ७ जूलै १६५६ रोजी किरतपूर साहिब मध्ये झाला. गुरु हरकिशन यांच्या वडिलांचे नाव हरराय व आईचे नाव माता किशन कौर होते.[१६४] वयाच्या ८व्या वर्षी इ.स. १६६१ मध्ये त्यांना आठवे गुरु म्हणून स्थापीत केले.[१६५] वयाच्या आठव्या वर्षी शिख धर्माचे सर्वांत लहान वयात गुरू झालेले हे शिख धर्माचे आठवे गुरू होते. इ.स.१६६४ साली वयाच्या आठव्या वर्षाच्या अगोदरच त्यांना देवी हा रोग झ ाला व त्यातच त्यांचा मृत्यु झाला. 'बालगुरू' म्हणुन ते ओळखल्या जातात.[१६६] शिख धर्मीय साहित्यात त्यांचा हारी क्रिषण असा उल्लेख सापडतो.[१६७] राजा जयसिंह ने गुरु हरकिशनला महिलातून रानी कोण आहे? असे विचारले असता, गुरु हरकिशन नौकरानीच्या वेशभूषेत असलेल्या रानीच्या मांडीवर जाऊन बसले. आणि रानीला ओळखले. खूप कमी काळात सामान्य जनतेशी मित्रत्वाचे संबंध प्रस्तापित केले. दरम्यानच्या काळात दिल्लीमध्ये हैजा, छोटी मता या रोगांचा प्रकोप झाला. गुरु हरकिशन यांनी दिल्लीतील रोगग्रस्त लोकांशी सेवा केली. मूस्लीम लोक या कार्यामूळे त्यांना 'बाला पीर' म्हणू लागले. रोगग्रस्त लोकांची सेवा

करत असतांना गुरु हरकिशन यांना तेज ज्वर झाला आणि ३० मार्च १६६४ रोजी त्यांचा मृत्यू झाला.[१६८] गुरू हरकिशन यांच्या मृत्युच्या वेळी त्यांनी 'बाबा बकाले' असा उच्चार करून मृत्यु पावले. श्रध्दाळू शिखांनी त्या शब्दांचा बकाला खेड्यात उत्तराधिकारी गुरू सापडतील असा अर्थ लावला.[१६९] व त्याप्रमाणे शिख धर्मातील धार्मिक लोकांनी शोध लावला व गुरू तेगबहाद्दुर शिखांचे नववे गुरू झाले. गुरू हरकिशन यांनी २ वर्षे, ५ महिणे, २४ दिवस एवढ्या थोड्या काळ गुरू राहिले. दिल्लीत ज्या घरात ते राहत होते तो ऐतिहासिक गुरुद्वारा 'श्री बंगला साहिब' होय.

गुरू हरकिशनजींच्या जीवनाविषयी माहिती फार थोडी उपलब्ध व सुव्यवस्थीत लिहीलेली सापडत नाही. गुरू हरकिशन जेव्हा दिल्लीला पोहचले तेव्हा गुरू हरकिशन व त्यांचा जत्था राजा जयसिंगचे पाहुणे होते. दररोज खुप मोठा शिख भक्तांचा समुदाय गुरूंच्या दर्शणासाठी येत होता. भारतातील ऐतिहासीक गुरूद्वारा 'गुरूद्वारा बंगला साहिब' हा गुरू हरकिशन रोगी लोकांची मदत करत होते, त्याजागी बांधल्या गेला आहे.

## ३.९ गुरू तेग बहाद्दूर (इ.स.१६२१-इ.स.१६७५):-

गुरु तेग बहाद्दूर यांचा जन्म अमृतसर येथे १ एप्रिल १६२१ रोजी झाला. सहावे गुरू हरगोविंदाना एक मुलगी बिबी विरो व पाच मुल बाबा गुरूदित्ता, सरजमल, अनिराय, अटलराय, व त्यागमल असे होते. त्यागमल पुढे 'तेगबहाद्दुर' या नावाने जाणल्या गेले. मुगलांच्या विरुध्द लढ्यात त्यांचे शौर्य पाहुन गुरू हर गोविंदानी त्याला हे नाव दिले.[१७०] तेग बहाद्दुर म्हणजे तलवारी प्रमाणे शक्तीमान होय. गुरु तेग बहाद्दूर यांच्या आईचे नाव माता नानकी व वडिलांचे नाव गुरु हरगोविंद होते. गुरु तेग बहाद्दूर यांनी १६ एप्रिल १६६४ रोजी गुरुपद स्विकारले. अमृतसर हे त्यावेळी शिख पंथाचे केंद्र होते. शिख गुरूंची गादी तिथे होती. तेथुन देशातील दुरवरच्या भागात 'मसवंद' धर्मप्रचारकांची साखळी ने शिखांशी संपर्क ठेवण्यात येत होता म्हणुन त्याला राजधानीचे स्वरूप आले होते. गुरू तेगबहाद्दुरांचे पोषण शिख संस्काराप्रमाणे होत होते. त्यांना तिरंदाजी व घोडस्वारीचे शिक्षण देण्यात आले. त्यांनी पुष्कळ वेळा दिर्घकाळ ध्यान व तपश्याचा अनुभव घेतला. गुरू तेगबहाद्दुरांचा माता गुजरींशी ५ फेब्रुवारी १६३३ ला विवाह झाला.[१७१]

इ.स. १६४० मध्ये गुरू हरगोविंद आपल्या मृत्युच्या वेळी आपल्या पत्नी नानकी सहित अमृतसर जिल्ह्यातील त्याच्या पुर्वजांच्या गावी बकाला येथे परतले. गुरू तेगबहाद्दुर त्यांच्या सोबत होते. बकाला गुरू बिलास दसविन पातशाही ह्यात वर्णन केल्याप्रमाणे तेव्हा सुंदर तलाव, विहिरी, बाओली असलेले वैभवशाली गाव होते. गुरू हरगोविंदच्या मृत्युनंतर तेगबहाद्दुर आपली पत्नी व आई सोबत तिथेच वास्तव्य करत राहिले. ते ध्यानमग्न रहाण्यात वेळ घालवन पण संन्याशी नव्हते आपली कौटुंबिक जबाबदारी सांभाळुन रहात. गुरू

हरकिशन दिल्लीला होते तेव्हा त्यांच्या भेटीला गेले होते.[१७२] मार्च १६६४ मध्ये गुरू हर किशन यांना 'स्मॉलपॉक्स' देवीच्या रोग निघाला. त्यांच्या अनुयायांनी शिख धर्मातील परंपरेनुसार गुरू उत्तराधिकारी विचारला तेव्हा गुरू हरकिशन यांनी बाबा बकाला असे उत्तर दिले. म्हणजे माझा उत्तराधिकारी बकाला इथे मिळेल. गुरूच्या शब्दाच्या अनिश्चीततेचा फायदा घेऊन पुष्कळजन बकाल्याला जमले व स्वत:ला नवा गुरू असल्याचे सांगत होते.[१७३]

नववे गुरू म्हणुन तेगबहाद्दुर कसे शोधल्या गेले ह्याबद्दल शिख संप्रदायात दन्तकथा आहे. एक श्रीमंत दुकानदान बाबा माखनशहा लुबाना स्वत:च्या जीवीतासाठी प्रार्थना केली, जर मी वाचलो तर ५०० सुवर्ण मुद्रा शिख गुरूला भेट देण्याचा संकल्प केला.[१७४] नवव्या गुरूच्या शोधात तो बकाला ला पोहोचला. एक दावेदाराकडुन त्यांना विनम्र अभिवादन करून दोन सुवर्ण मुद्रा देत दुसऱ्या दावेदाराकडे जात राहीला. खऱ्या गुरूला त्याला वाचवण्यासाठी ५०० सुवर्ण मुद्रा देण्याचा गुप्त संकल्प माहीत असणार ह्यावर त्याचा दृढ विश्वास होता. त्यांने भेटलेल्या प्रत्येक गुरूंनी २ सुवर्ण गुद्रा स्विकारत त्याला जाण्याचा निरोप दिला.[१७५] त्यानंतर त्याला तेगबहाद्दुर ही बकालाला राहात असल्याचे माहीत झाले. लबानानी सर्वांप्रमाणे तेगबहाद्दुर यांना २ सुवर्ण मुद्रांची दक्षणा भेट दिली. तेगबहाद्दुरांने त्याला आपला आशिर्वाद दिला व तुझी ही दक्षिणा संकल्प केलेल्या ५०० सुवर्ण मुद्रापेक्षा खुपच कमी असल्याची टिका टिपणी केली. मखानशाह लबानाला खरे पणाच्या फरकाची जाणीव झाली व तो पळतच छतावर गेले व "गुरू लोचो रे, गुरू लाधो रे" अशी आनंदाने ओरडायला सुरूवात केली म्हणजे, "मी गुरू ना शोधल. मी गुरू ना शोधले."[१७६] ऑगस्ट १६६४ ला शिख भक्तांचा समुदाय बकालाला आलेल्यांनी शिखांचे नववे गुरू म्हणुन तेगबहाद्दुरांना अभिषेक केला. गुरू तेगबहाद्दुर वयाच्या ४३ व्या वर्षी गुरू पदावर बसविण्यात आले.[१७७] भक्तांच्या समुदायाच नेतृत्व दिवाण दुर्गामल यांनी केले आणि औपचारिक टिक्का सोहळा तेगबहाद्दुरवर भाई गुरूदित्ताने साजरा करून त्यांना गुरू पद प्रदान केले.[१७८]

गुरू तेगबहाद्दुरांनी गुरूग्रंथसाहिबाच्या रचनेत शेवटच्या भागात पुष्कळ भक्तीपद, श्लोक व दोहे समाविष्ट केले.[१७९] गुरु तेग बहाद्दूर यांची ११५ पदे गुरुग्रंथसाहिबामध्ये आहेत.[१८०] गुरू तेगबहाद्दुरांनी ११६ शबद्, १५ रागांची रचना केली व त्यांच्या भक्तांनी ७८२ कडवे रचल्याचे श्रेय आहे, शिख संप्रदायाच्या बाणी मध्ये तो भाग आहे. गुरू तेगबहाद्दुरांनी मुगल साम्राज्याच्या विविध भागात प्रवास केला आणि भक्त समुदायांनी बऱ्याच ठिकाणी शिख मंदिर बाधण्याचा प्रस्ताव केला. गुरु तेग बहाद्दूर यांनी आनंदपूर साहीब शहराची निर्मीती केली. संपूर्ण भारतभर प्रवास केला. गुरुग्रंथसाहिबातील स्लोक महाल ९ खूप प्रसीद्ध आहे. त्यांच्या कार्याचा गुरूग्रंथसाहिबात समावेश आहे. गुरूग्रंथसाहिबात वेगवेगळ्या विषयाचा समावेश आहे. उदा. ईश्वराचा स्वभाव, मानविय अनुराग, शरीर, मन, दु:ख, सन्मान, सेवा, मृत्यु, मुक्ती इत्यादी.

गुरू तेगबहाद्दूरांनी त्या क्षणापासून शीखधर्माच्या संरक्षण-संवर्धनासाठी आपल्या आयुष्यातील प्रत्येक क्षण व्यतीत केला. ते अमृतसरला गेले असताना विरोधकांच्या कारस्थानामुळे परमपावन हरमंदिराचे दरवाजे त्यांच्यासाठी बंद करण्यात आले. गुरू तेगबहाद्दूरांनी आपल्या विरोधकांकडे क्षमाशील नजरेनं पाहिले. शीख धर्माचा प्रसार केला. हजारो सैनिक, फार मोठ्या प्रमाणात अनुयायी त्यांच्याबरोबर विविध ठिकाणी यात्रा करू लागले.[१८१] गुरू तेग बहाद्दुरांनी देशाच्या वेगवेगळ्या भागात ढाका, आसामसहीत खुप प्रवास केला. शिखांचे पहीले गुरू नानक ह्यांच्या शिकवणीचा प्रसार करण्यासाठी ज्या जागांना त्यांनी भेट दिली व वास्तव्य केले त्या ठिकाणावर त्यांनी शिख मंदीराची उभारणी केली. आपल्या प्रवासात गुरू तेगबहाद्दुरांनी शिख विचार व संदेशाचा प्रसार केला तसेच सामुदायीक पाण्याच्या विहीरी व लंगर सुरूवात केली. गुरूनी तीन वेळा क्रमवार किरतारपुर याठिकाणाला भेट दिली. आसाम, बंगाल, बिहारच्या प्रवासानंतर बिलासपुरच्या राणी चंपाला गुरूंनी भेट घेतली. आपल्या राज्यात जागेतील एक तुकडा भेट देण्याचा राणीने प्रस्ताव दिला. गुरूंनी ती जागा ५०० रूपयात विकत घेतली. इ.स.१६७२ हिमालयाच्या पायथ्याशी त्या जागेवर गुरू तेग बहाद्दुरांनी 'आनंदपुर साहिब' नावाचे शहर वसवले. गैरमुस्लिम समाजावर अत्याचार होत असल्याचे समजल्यावर गुरू तेगबहाद्दुरांनी काश्मीर व उत्तर पश्चीम सिमा भागात प्रवास केला व त्यांच्या समस्या जाणुन घेतल्या.[१८२]

गुरु तेग बहाद्दूर यांनी कश्मिरी पंडीत, हिंदू लोकांना मूसलमान बनण्यास विरोध केला आणि ईस्लाम धर्म स्विकार न करण्याच्या कारणामूळे मूगल शासक औरंगजेब याने २४ नोव्हेंबर १६७५ रोजी चांदणी चौक दिल्ली याठिकाणी भर चौकात गुरु तेग बहाद्दूर यांचे शिर धडापासून वेगळे केले.[१८३] गुरुद्वारा 'शिशगंज' हा रकाबगंज याठिकाणची आठवण करुन देतो ज्याठिकाणावर गुरु तेग बहाद्दूर यांचा अंतीम संस्कार झाला.

शिख परंपरा शिकवते की गुरूंच्या साथीदारांना सुध्दा धर्मपरिवर्तणासाठी खुप छळ केला गेला. भाई मतिदास यांना तुकड्या तुकड्यात करवतीने कापल्या गेले आणि भाई दयालदासना उकळत्या पाण्याच्या कढईत फेकल्या गेले. त्याप्रसंगी गुरू तेग बहाद्दुरांना पिंजऱ्यात ठेवुन त्यांच्या साथीचा होणारा छळ दाखवल्या गेला.[१८४] भारतातील शिख व गैर मुस्लिमांना धार्मिक स्वांतत्र्यासाठी, मुस्लिमांच्या बलपुर्वक छळ करून धर्म परीवर्तनाच्या त्रासाला न घाबरता आपल्या धर्माची उपासणा करत रहावी ह्यासाठी बलिदान दिले ह्यासाठी तेगबहाद्दुरांचे स्मरण केल्या जाते.

शिखांची मुस्लिम सत्ता व छळ ह्या विरोधी निश्चय मृत्युदंडानंतर अजुनही दृढ झाला. पशाउरा सिंग सांगतात, "यद्यपी गुरू अर्जुनच्या बलिदानात शिख समुदायाला संघटित होण्यास मदत झाली, गुरू तेगबहाद्दुरांच्या बलिदानात मानविय हक्काच संरक्षण ध्येय होय हेच शिखांची ओळख होण्यास मदत झाली".

विलर्फेड स्मिथ सांगतात, "नवव्या गुरूला बळजबरीने दृष्टीगोचर व्यक्तित्व हिन ईस्लाम धर्मात परीवर्तीत करण्याचे अमानुष प्रयत्नाचा, हुतात्म्याचा नऊ वर्षाचा मुलगा, गुरू गोविंद ह्यावर अमीट प्रभाव झाला, ज्यांनी प्रतिक्रीया करत हळूहळू विचारपुर्वक शेवटी शिख समुदायाला विशीष्ट औचारीक उत्कृष्ट उदाहरणाच्या स्वरूपात संघटीत केले". त्यामुळे खालसा व्यक्तीत्वाचा प्रारंभ झाला.

शिखांचे नववे गुरू तेगबहाद्दुर यांना 'भारताची ढाल','तलवारीची शक्ती असणारा', 'नववे गुरू', 'खरा राजा' या नावाने सुध्दा ओळखले जाते. मानवी हक्क व अंत:करणाच्या आवाजाप्रमाणे रहाण्याचा स्वातंत्र्यासाठी बलीदान करणारे गुरू म्हणून सुध्दा गुरू तेग बहाद्दुर यांना ओळखले जाते. गुरू तेगबहाद्दुरांनी आनंदपूर व पटीयाला शहर स्थापन करण्याचे श्रेय जाते. गुरू तेगबहाद्दुर यांनी आपल्या जीवन काळात हिंदु धर्माची रक्षा केल्याबद्दल त्यांना 'हिंद की चादर' असे म्हणतात.[१८५]

### ३.१० गुरू गोविंदसिंग (इ.स.१६६६-इ.स.१७०८) :-

गुरू गोविंदसिंग यांचा जन्म गोविंदराई मध्ये २२ डिसेंबर १६६६ रोजी पटना साहिब बिहार मध्ये झाला. त्यांचे नाव 'गोविंदराय' असे करण्यात आले.[१८६] गुरु गोविंदसिंग यांच्या वडीलांचे नाव गुरु तेग बहाद्दूर व आईचे नाव माता गुजरी होते. गुरू गोविंदसिंग हे गुरू तेगबहाद्दुर व शिखांचे नववे गुरू व माता गुजरी ह्यांचे एकुलते एक मुल होते. त्यांचा जन्म सोधी खत्री कुटुंबात झाला. गुरू गोविदसिंग यांचा जन्म झाला तेव्हा त्यांचे वडील बंगाल आणि आसामला यात्रेत होते. त्यांचे जन्म नाव गोबिंदराय होते. ज्याठिकाणी त्यांचा जन्म झाला, त्या जागेवर तख्त श्री पाटणा हरीमंदीर साहिब गुरूद्वारा उभा आहे. त्यांचे कुटूंब इ.स.१६७० ला पंजाबला परतले व मार्च १६७२ ला ते चक्कनानकी हिमालयाच्या पायथाशी शिवालिक भागात स्थलांतर झाले, तिथेच त्यांनी शालेय शिक्षण घेतले. गुरू तेगबहाद्दुर यांना काश्मीर हिंदु पंडीतांच्या धार्मिक परीवर्तीत करण्यास नाकारल्याने व स्वत:ला मुस्लीम धर्मात परीवर्तीत करण्यास नाकारल्याने मुगल बादशहा औरंगजेब यांच्या आज्ञेने दिल्ली येथील चांदनी चौकात दि ११ नोव्हेंबर १६७५ ला शिरच्छेद करण्यात आला. त्यांच्या हौतात्म्यानंतर तरूण गोबिंदरायना २९ मार्च १६७६ रोजी वैशाखीला शिख समुदायान शिखांचे दहावे गुरू म्हणुन मान्यता दिली.[१८७] दहावेगुरू बनल्या नंतरही गुरू गोविंद सिगांनी शिक्षण आणि सैन्य कौशल्य घोडदौड आणि धणुष्य इ. सूरू ठेवले.[१८८] वयाच्या दहाव्या वर्षी त्यांनी आनंदपुरच्या १० कि.मी. उत्तरेला बसंतगड येथे २१ जुन १६७७ मध्ये माता जितो सोबत विवाह केला. त्या दोघांना तीन मुल जुझार सिंग, झोरावर सिंग, फतेहसिंग झाली. वयाच्या सतराव्या वर्षी त्यांनी आनंदपुरला ४ एप्रिल १६८४ मध्ये माता सुंदरीशी विवाह केला. त्यांना एक मुलगा अजित सिंग झाला. वयाच्या ३३ व्या वर्षी त्यांनी आनंदपुरला १५ एप्रील १७०० मध्ये माता साहिब देवानशी विवाह केला. अशा प्रकारे गुरूगोविंदसिंग यांच्या पत्नीचे नाव माता जितो, माता

सुंदरी, माता साहीब देवन असे होते.[१८९] गुरु गोविंदसिंग यांच्या मुलांचे नाव अजित सिंह, जूजार सिंह, झोरावर सिंह, फतेह सिंह असे होते. गुरू गोविंद सिंग यांची तिसरी पत्नी साहिब देवान ह्यांचा शिख धर्मात प्रभावी सहभाग होता. गुरू गोविंद सिंगानी तिला 'खालसाची आई' म्हणुन जाहीर केले. गुरु गोविंदसिंह हे आध्यात्मीक गुरु, योद्धा, कवी व विचारवंत होते. गुरु गोविंद सिंग यांनी जाप साहिब, चांदी-दी-वार, तव-प्रसाद, सावैये, झाफरनामह, बाचीत्तर नाटक, अकाल उस्तात, चौपाई, इ. चे लेखन केले. इ.स.१६८४ मध्ये त्यांनी पंजाबी भाषेत चांगल आणि वाईट ह्यातील युध्दाबद्दल चंडी-दि-वार दंत कथा लिहीली. या 'चंडी-दि-वार'' मध्ये चांगल्या आणि अन्यायाविरूध्द व अत्याचाराविरूध्द विजय होतो याविषयी माहिती आहे. प्राचिन संस्कृत ग्रंथ मार्केडेंय पुराणातही हेच सांगीतल्या गेले. गुरू गोविंद सिंग यांच्यापाशी तलवारीचे पाणी होतेच, पण त्याहुनही मोठे असे लेखणीचे सामर्थ्यही होते. त्यांनी आपल्या बचितर संघर्षमय जीवनाची आत्मचरित्रपर कहाणी स्वत: लिहून ठेवली त्याला 'बचितर नाटक' म्हणून संबोधतात.[१९०] गुरू गोविंद सिंगानी 'जफरनामा' हे मूळ फारसी लिहिलेले एक विस्तृत पत्र आहे. इ.स. १७०६ मध्ये गुरूजींनी ते बादशहा औरंगजेबाकडे पाठविले. त्यावेळी बादशहा दक्षिणेत अहमदनगरनजीक होता.[१९१]

गुरु गोविंदसिंग यांच्या वडीलांचे नाव गुरु तेग बहादूर यांनी इस्लाम धर्म न स्विकारल्यामूळे त्यांची शिरच्छेद करण्यात आला. तेव्हा गुरु गोविंद सिंगाचे वय ९ वर्ष होते.[१९२] शिखांचे दहावे गुरू गोविंदसिंग यांनी इ.स.१६९९ मध्ये खालसा पंथाची स्थापना केली.[१९३] 'खालसा' याचा शब्दशा अर्थ 'शुध्द जन' असा होतो. गुरू गोविंद सिंगांनी जमलेल्या शिख समुदायातुन कौन आपले मस्तक त्याग करणारा स्वयंसेवक आहे असे विचारले. एक जण पुढे आला त्याला त्यांनी तंबुत नेले. गुरू रक्ताने माखलेली तलवार घेउन स्वयंसेवकाशिवाय बाहेर आले.[१९४] गुरू गोविंद सिंगांनी पुन्हा दुसऱ्या स्वयंसेवकाची मागणी केली. पहिल्या प्रमाणेच ते पुन्हा रक्ताने माखलेली तलवार घेउन तंबुतून आले. अशाप्रकारे त्यांनी चार वेळा केले. पाचवा स्वयंसेवक त्यांच्या सोबत तंबुत गेला त्यानंतर सगळ्या पाच स्वयंसेवक सुरक्षीत घेउन गुरू बाहेर आले. गुरूने त्यांना 'पंचप्यारे' अस नाव दिले. शिख संप्रदायातील पहिले खालसा ठरले.[१९५] गुरू गोविंद सिंगांनी नंतर एका लोखंडी पात्रात पाणी आणि साखर टाकली. आणि दुधारी तलवारीच्या सहाय्याने ते अमृत बनवले. आदीग्रंथाची पद गात त्यांनी ते पंचप्यारेना दिले. ह्याप्रकारे खंडे-का-पाहुल म्हणजेच नामस्मरण सोहळा सैनिकी समुदाय खालसाचा झाला.[१९६] गुरू गोविंद सिंगांनी पाच जणांना खालसा ची दिक्षा दिल्यानंतर ते आता 'सिंग' या नावाने ओळखले जाऊ लागले. शिख परंपरेतील ते पहिले खालसा ही उपाधी दिली. आणि ते पाच स्वयंसेवक दयाराम (भाई दया सिंग), धरमदास (भाई धरम सिंग), हिम्मत राय (भाई हिम्मत सिंग), मोहकम चांद (भाई मोहकम सिंग) व साहिब चांद (भाई साहिब सिंग) असे होते. त्या पाच जणाला सांगीतले की,'माझ ेही नामकरण करा' अशाप्रकारे गुरू सहावे खालसा बनले आणि त्याच गुरू गोविंद राय हे नाव बनलुन गुरू

गोविंदसिंग झाले.[१९७] खालसा साठी बलीदान देण्यासाठी तयार झालेल्या पाच जणांना 'पंचप्यारे' असे म्हणतात. या पंचप्याऱ्यांची नावे अशी दिली आहेत. लाहोरचा खत्री दयाराम, हस्तिनापूरचा जाट धर्मदास, द्वारकेतील धोबी मोहकमचंद, जगन्नाथपूरीचा स्वयंपाकी हिंमतराय, आजच्या कर्नाटकातील बीदरचा न्हावी साहेब चंद, यातील चार तथाकथित शुद्र होते. एक क्षत्रिय होता, गुरूजींनी सर्वप्रथम त्यांना खालसा होण्याची दीक्षा दिली. मग त्यांच्याकडून आपण स्वत: दीक्षा ग्रहण केली. आधी खालसांना गुरूस्थान दिले आणि मग गुरूंना खालसाचे स्थान दिले. गुरू गोंविंद सिंगांनी खालसा सैनिकांच्या शिस्तीचे नियम जाहीर केले. तंबाखु, हलाल मांस, विवाहबाह्य संबंध, व्यभिचाराचा निषेध केला पाहीजे. विरोधी व त्यांचे उत्तराधिकारी ह्याच्याशी केव्हांही संबंध ठेवायचे नाही असे खालसांनी ठरवले. इतर जातींच्या स्त्री-पुरूषांना खालसा पंथाची दिक्षा आणि जात, लिंग इ.चा भेदभाव न ठेवता सर्वांना समानतेने वागवण्यास सुरूवात केली पाहिजे. शिख पंथात गुरू गोविंद सिंगांनी खालसा पंथाची सुरूवात मुगल साम्राज्याचा चालत आलेला अत्याचाराचा विरोध, औरंगजेबाच्या शिख आणि हिंदु धर्मावर होत असलेल्या हत्याचा प्रतिकार ह्यासाठी शिख धर्मात त्यांचे विशेष महत्व आहे. गुरू गोविंद सिंगाना घोडा पाळण्याचा व घोडा दौड करण्याचा त्यांना चांगला शोक होता. प्राचिन इतिहासाची पुस्तके वाचण्याचा व ऐकण्याचा त्यांना चांगला शौक होता.[१९८]

खालसा बद्दल गुरू गोविंद सिंगाना आदर होता. त्यांनी सांगीतले खऱ्या गुरू आणि संगत पंथात कसलाही फरक नाही. त्यांनी खालसा स्थापीत करण्या अगोदर शिखांच्या चळवळीत संस्कृत शब्द शिष्य वापरल्या जायचा 'शिष्य' म्हणजे अनुयायी अथवा विद्यार्थी पण त्यानंतर खालसा शब्द वापरला गेला.[१९९] 'खालसा' हा शब्द 'खलिस' या अरबी शब्दापासून आला आहे. 'खलिस' म्हणजे तावून-सलाखून निघालेला, अत्यंत शुध्द, गुरूनिष्ठेच्या आणि आत्मबलिदानासाठी तयार असलेल्या शिष्य समुदायाचे तावून सुलाखून निघालेले सोने म्हणजे खालसा होय.[२००] विशीष्ट म्हणजे खालसाच्या अगोदर पुर्ण भारतात शिख समुदायात शिख गुरूनी मसंद नियुक्त करण्याची व्यवस्था होती जे स्थानिक समुदायाचे नेतृत्व करत, स्थानिक मंदिराची व्यवस्था पहात, धन आणि दान शिखांच्या हेतुसाठी स्विकारत. गुरू गोविंद सिंगानी मसंद पध्दती भ्रष्टाचारी बनल्याचा निष्कर्ष काढला, त्यांनी ती पध्दत बंद पाडली. स्वत:च्या मार्गदर्शनाखाली खालसाच्या मदतीने जास्त केंद्रीय नविन पध्दत सुरू केली. ह्या सुधारणेमुळे शिखांचे दोन समुदाय बनले, एक ज्यांनी दिक्षा घेउन खालसा बनले दुसरे शिख राहीले पण खालसा दिक्षा घेतली नाही. खालसांनी स्वत:ला वेगळी धार्मिक ओळख ठेवली तर नानक पंथीयांनी आपली वेगळी ओळख ठेवली.[२०१] गुरू गोविंदसिंगानी सुरूवात केलेली सैनिकी खालसा समुदायामुळे आधुनिक विचारवंताच्या शिखामधील बहुलता चर्चेत भर घातली. त्यांनी सुरूवात केलेली प्रथा आधुनिक काळातही टिकुन राहीली, दिक्षा दिलेल्या शिखांना खालसा तर ज्यांनी दिक्षा दिल्या गेली नाही त्यांना सहजधारी शिख म्हणवल्या जात होते.[२०२] खालसा उभारणीचा उत्सव वैशाखी सणात साजरा केला जातो. मॅकलिओड यांच्या अनुसार 'खालसा' हा शब्द 'खालिसा' म्हणजे 'शुध्द' ह्या वरून

घेतला गेला.[२०३] शिख धर्म भारताच्या उपखंडाच्या उत्तर पश्चीम भागात निर्माण झाला. इलिनोरच्या अन्वये मुगल साम्राज्याच्या शासनात जी जमीन प्रत्यक्ष सम्राटाच्या अधिकार असते त्याला खालसा संबोधल्या जायचे. ही जागीर सरदारांना त्यांच्या एकनिष्ट असल्याच्या वचनाच्या मोबदल्यापैक्षा वेगळी असायची.[२०४] खालसा एक शिख दुसऱ्या शिखांला भेटेल तेव्हा अभिवादनाची एक विशिष्ट पध्दत ठेवावी. 'वाहे गुरू की खालसा', 'वाहे गुरू की फतेह', अर्थात् गुरूंनी स्थापन केलेल्या खालसा पंथाची वाहवा होवो. गुरू चा विजय होवो आणि आपल्या गुरूंचा मार्ग यशस्वी होऊन जनमानसात तो वाहवा मिळवो. आपल्या सत्गुरूंचा विजय असो, मी त्यांचा उत्तम शिष्य होतो आहे असे म्हणावे आणि एकमेकांस मिठी मारून भेटावे.[२०५]

दिक्षीत झाल्यानंतर खालसा शिखांना 'सिंग' आणि स्त्रियांना 'कौर' संबोधल्या जाते. दिक्षीत खालसा हे सैनिकही असतात. खालसा पंथाचे स्वरूप लढाऊ होते कारण त्यावेळचे राजकीय वातावरण, त्यावेळी समाज बांधवांना शिस्तीच्या एका धाग्यात बांधण्यासाठी पाच ककारांची निर्मीती गुरू गोविंदसिंग यांनी केली.[२०६] कंकार मानणाऱ्यास खालसा पंथाचे मानले जाते. ककारांची नावे केस, कडे, कंगवा, कच्छा, कृपान अशी पाच कंकार आहेत. गुरू गोविंद सिंगानी नेहमी करीता पाच कंकार वापरायला आज्ञा दिलेली आहे.

I. **केस :-** केस कधीच कापायचे नाही कारण केस हे पावित्र्याचे व शक्तीचे प्रतिक आहेत. केस हे देवाने दिलेली देणगी आहे वाढलेल्या केसामूळे हा खालसा पंथाचा सदस्य आहे हे पटकन लक्षात येते. ईश्वराच्या निर्मीतीच परीपुर्ण प्रतीक म्हणुन आदर दाखवत शिख केव्हाही आपले केस कापत नाहीत, त्याला आकार देत नाहीत. न कापलेले केस व वाढवलेली दाढी पुरूषांच्या संबंधात शिखांच्या मुख्य कंकाराचा भाग आहे. शीख माणसाने फक्त गुरुपुढेच डोके टेकवायचे इतरांपूढे नाही, हे एक महत्वाचे कारण आहे. शीख महिलांनी अंगावरचे कोणतेच केस कापायचे नाही, असा दंडक आहे.

पागोटे हे आध्यात्मिक मुकूट आहे. त्यामुळे शिखांना तो वा ती शुध्दीच्या सिंहासनावर विराजमान असल्याची सतत जाणीव करून देते, आणि शिखधर्माच्या तत्वाप्रमाणे रहाण्यास त्याची प्रतीबध्दता दाखवते.

II. **कडे :-** कडे दागिना म्हणून वापरत नसल्यामूळे ते सोन्याचांदी ऐवजी स्टीलचे असावे. या कड्यामुळे गुरुशी एकनिष्ठ राहता येते. कोणतेही धर्मविरोधी काम करणार नाही याची सतत आठवण राहण्याचे काम कडे करते. देवाला सुरूवात व शेवटही नाही याचे 'कडे' हे प्रतिक आहे. गुरू गोविंद सिंगानी इ.स.१६९९ बैसाखीला अम्रीत संचार समारंभात शिखांनी आपल्या मनगटात लोखंडाचे कडे किंवा करा नेहमीसाठी वापरण्याचा आदेश दिला. कडे किंवा करा हे लोखंड, स्टिलचे वर्तुळ असुन ते ईश्वर हे कधीच न संपणार आहे ह्याचे प्रतिक आहे. हे समाजाशी नेहमीसाठी जुळल्या गेली, खालसा शिखांनी संबंध झालेल्या साखळीचे आपण एक कडी आहोत ह्याच प्रतिक आहे.

III. **कंगवा :-** वाढलेले केसांची नीट निगा राखता यावी म्हणून जवळ कंगवा असावा. देवाने दिलेल्या शरीराची आपण व्यवस्थित काळजी घेत आहेत याचे 'कंगवा' हे प्रतिक आहे. केसांना दिवसातुन दोनदा कंगवा करावा. स्वच्छरितीने पुन्हा पटका बांधावा. कंघा हे लहानसा लाकडी कंगवा आहे ते शिख दिवसातुन दोन वेळा वापरतात. तो नेहमीसाठी केसातच खुपसुन ठेवलेला असावा अशी अपेक्षा असते, आणि ते स्वच्छतेचे प्रतिक आहे. कंगव्याने केस स्वच्छ करण्यास व गुंतावळा काढण्यास मदत होते. केसांना कंगवा केल्याने शिखांना त्याचे जिवन सुध्दा व्यवस्थीत व नियोजनबध्द असावे ह्याची आठवण देत रहाते. कंगवा स्वच्छतासूचक असला तरी केवळ केसासाठी नव्हे. केस राखायचे म्हणजे निसर्गाने जे आपल्याला दिले आहे ते सारे सांभाळायचे. केस ठेवायचे म्हणजे ईश्वराचे जसे दिले आहे, आपल्याला ठेवले आहे त्यात संतोष ठेवायचा.[२०७]

IV. **कच्छा :-** 'कच्छा' म्हणजे एक प्रकारची सुती विजार होय. 'कच्छा' ही विजार मात्र गुडग्यापेक्षा खाली नसावी. युद्धाच्या काळात घोडदौडीच्या वेळी हिचा उपयोग होत असे. दिक्षा संस्कार झालेला शिख दररोज 'कच्छा' अथवा 'काच्चेरा' वापरतो. काहीजण तर स्नान करते वेळी सुध्दा काच्चेरा वापरतात, सुचनेनुसार एका क्षणात तत्पर असायला हवे. कसलाही क्षण आल्यास सैनिकाला युध्दाच्या वेळी मोकळेपणाने वापरता यावे असे हे वस्त्र असते. भारतातील हवामान लक्षात घेता, कच्छा हे त्यावर दुसर काही न घालता पुरूष नेहमीचे अथवा श्रमाचे कार्य करू शकतात. शिख इतिहासकार सांगतात त्याप्रमाणे कच्छ हा संयम तसेच विनय व्यक्त करणारा तर उजव्या हातात घालायचे कडे प्रत्येक काम करीत असताना ते सत्कार्य आहे याचे स्मरण देणारे असते.[२०८] कच्छ म्हणजे आतली छोटी विजार असा अर्थ रूढ होतो. दोन्ही अर्थाने ते संयम व विनयाचेच द्योतक आहे. तसेच पटकन एखादी कृती करण्याच्या तयारीत असण्यचेही.

V. **कृपाण :-** अन्यायाचा प्रतिकार करण्याचे व दुर्बलांचे रक्षण करण्यासाठी कृपाणाचा उपयोग करणे अपेक्षित आहे. जे संकटात आहेत त्यांच्या संरक्षणासाठी धाव घेणे हे शिखांचे कर्तव्य असल्याचे किरपाण अथवा कृपाण हे प्रतिक आहे. निर्बल आणि निरपराधींच्या संरक्षण आणि शौर्याचे ते प्रतिक आहे. 'किरपाण' हे नेहमी धारदार असायला हवे. कृपाण शक्तिदर्शक आणि स्वाभिमानरक्षकही ठरते.

"When all other means have failed. It is but lawful to take to the sword."- Guru Gobind singh Zafarnamah.[२०९]

खालसा बद्दल सरबलोह ग्रंथात पुढील प्रमाणे लिहले आहे.

"खालसा मेरो रूप है खास।
खालसा मै हऊ करऊ निवास ।।
खालसा मेरो पिंड प्रान ।
खालसा मेरी जान की जान।।"

अर्थ :-गुरू गोविंद सिंग म्हणतात की, खालसा माझी आत्मा आहे, खालसा माझे अनेक रूपे आहेत, खालसा माझे तन आहे, खालसा माझे मन आहे, खालसा माझी प्राणशक्ती आहे.[२१०] बॅ. न.वि.गाडगीळ यांनी म्हळल्याप्रमाणे, खालसा पंथाने एक नवा भ्रातृभाव उत्पन्न केला. प्रार्थना करायची, "गुरूंचे मानायचे हे जीवन झाले, जे पतित होते ते उन्नत झाले. भंगी, न्हावी, धोबी, भटारे सर्व काही दलित जाती यांना उन्नत करणारे खालसा हे अमोघ अमृत ठरले".[२११]

दसम ग्रंथ लिहील्याचे श्रेय गुरू गोविंद सिंगाना दिल्या जाते. त्यात प्राचिन भारतीय लढाऊ संताच्या पुराणकथा समाविष्ट आहेत.[२१२] १६ व्या आणि १७ व्या शतकाच्या दरम्यान माहीतीत नसलेल्या लेखकांनी लिहीलेले वेगवेगळ्या भागात व वेगवेगळ्या घटना वृत्तांत असलेले शिख ग्रंथ जे गुरू नानकांची रचना असल्याचा दावा करत होते. गुरू अर्जुन यांनी त्यातील भ्रष्ट व नविन लेख घुसडुन दिलेला भाग वेगळा करण्याचा प्रयत्न केला, व शुध्द घटना वृत्तांत घेऊन आदीग्रंथाची रचना केली. १७ व्या शतकांत ग्रंथाला पोथी म्हणल्या जायचे आणि तीन हस्तलिखीत ग्रंथ खरे असल्याचा दावा केला जायचा. एक करतारपुरला इ.स. १६०४ ला रचलेले, दुसर इ.स.१६४२ मध्ये रचलेले खरामंगत अनुवाद आणि तिसर आदीग्रंथ होय. शिख परंपरेत करतारपुर पोथीला इ.स.१७०६ मध्ये भटिंडा येथे गुरूग्रंथसाहिब म्हणुन शेवटी मान्यता देण्याचे श्रेय गुरू गोविंद सिंगाना दिले जाते. गुरू गोविंद सिंगानी मान्यता दिलेल्या ग्रंथात इतर अनुवादीत अनावश्यक दोहे लिहल्या गेले. गुरू गोविंद सिंगानी हा ग्रंथ शिखांच्या चिरस्थायी गुरू असल्याचही जाहीर केले. शिख गुरूंना होणाऱ्या त्रासामुळे त्यानी देहरूपी गुरू परंपरा बंद करून गुरू मानीयो ग्रंथ असा उपदेश शिख बांधवांना दिला. श्री गुरू ग्रंथ साहिबाला गुरू मानावे असे त्यांनी सांगीतले.[२१३] गुरू गोविंद सिंगानी आपले वडील गुरू तेग बहाद्दुर यांचे रचना गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट केली आणि जैजावंती रागाचा समावेश केला आणि ग्रंथातील एकून रागांची संख्या ३१ केली.[२१४] गुरू गोविंद सिंगानी गुरूग्रंथसाहिबात केलेल्या साऱ्या रचनाचा विषय 'मानवी मन' हाच आहे.[२१५] गुरू गोविंद सिंग हे उच्च प्रतिचे कवी होते.[२१६]

गुरू गोविंद सिंगानी इतरही ग्रंथाची रचना केली, विशेषता दसम ग्रंथ ज्याला गुरूग्रंथसाहिबा नंतर चे महत्व असल्याच शिख समजतात.[२१७] दसम ग्रंथात जप साहेब, अम्रीत सवाइये व बिन्ती चौपाई जे शिखांच्या नित्या प्रार्थना अथवा पाठ इ. चा समावेश आहे.[२१८] दसम ग्रंथ हे भारतीय आध्यात्मीक पुराणातील धर्मनिरपेक्ष कथांचा विस्तृत विवरण आहे. 'सरबलोह' ग्रंथाशी सुध्दा गुरूने रचना केली असे मानल्या जात. गुरू गोविंद सिंग यांच्या दशमग्रंथाची लिपी गुरूमुखी असली तरी त्यातील काव्य अपभ्रंश हिंदीतील आहे. दशमग्रंथाची पृष्ठसंख्याही आदिग्रंथाइतकीच भरते.[२१९] दशमग्रंथ आणि श्रीगुरूग्रंथसाहिब यांचे एक ठळक साम्य दिसते. दोन्ही ग्रंथ संपादित आहेत. 'जफरनामा' सारखी रचना त्यात परिशिष्टासारखी वाटते.

पंजाबमधील रुपनगर मांजरी इथे माता गुजरी व त्यांचे दोन लहान राजपुत्र फतेह सिंग व झोरावर सिंग हे गुरूजीच्या सैन्यदलातुन दुरावल्या गेले. नदी ओलांडतांना वाहुन गेले अथवा मारल्या गेले त्या ठिकाणी 'गुरूद्वारा परीवार बिचोरा साहिब' बांधल्या गेला. गुरूजींची आई माता गुजरी व दोन लहान मुलांना सरहिंदचा राज्यपाल वझिर खानने अटक केली. त्यांचे लहानमुल वय वर्षे ५ व वर्षे ८ ह्यांना मुस्लिम धर्मात परीवर्तीत होण्यास नकार दिल्यामुळे जीवंत भिंतीत मारून टाकल्या गेले, आणि नातवांची हत्या झाल्याची वार्ता एकल्यानंतर माता गुरजी कोसळून मरण पावली. त्यांची दोन मोठी मुले वय वर्षे १३ व वर्षे १७ देखील डिसेंबर इ.स.१७०४ मध्ये मुघल सैनिकांशी झालेल्या युध्दात मारल्या गेली.

सरहिंदचा नबाब व मुस्लिम सैन्य कमांडर वझिरखान ज्याच्या सैन्यासोबत गुरूनी पुष्कळ युध्द केली. जमशेदखान व वालीसबेग ह्या दोन अफगाणाना घेतल व बहाद्दुरशाहच्या भेटीसाठी जिथे जिथे गुरूचे सैन्य जाईल त्याचा पाठलाग करून गुरूची हत्या करण्याचा निर्देश दिला. त्या दोघांनी गुप्तरित्या गुरूचा पाठलाग करत दक्षीण भारतात गुरूचे सैन्य होते त्या ठिकाणी आले. गोदावरी नदीच्या किनारी महिनोवार राहीलेल्या कॅम्पमध्ये त्यांनी प्रवेश केला.[२२०] गुरूजी पर्यंत पोहचण्यास त्यांना वाव मिळाला आणि नांदेड इथे जमशेदखानने त्यांचा भोसकुन जिवघेणी जखमी केले.[२२१] काही विद्वान सांगतात की, गुरू गोविंद सिंगच्या हत्याऱ्याला वझिर खानने पाठवले नसेल तर जवळपासच रहात असलेल्या मुगल सैनिकांनी पाठवल असेल.[२२२] गुरूजींना जखम ही ह्रदयाच्या खाली केली होती. त्याही स्थितीत गुरूजींनी त्याचा मुकाबला केला त्याला जिवे मारले, हत्याऱ्याचा दुसरा साथी पळुन जाण्याचा प्रयत्न करत असता शिख संरक्षनाने त्याला मारले.[२२३] या हल्यामुळे गुरू गोविंद सिंग तीव्र जखमी झाले आणि काही दिवसानंतर ७ ऑक्टोंबर १७०८ रोजी गुरूचा देहांत झाला. तख्त श्री हुजुरसाहिब नांदेड हे इ.स.१७०८ ज्या जागेवर गुरू गोविंदसिंगाना अत्यंसस्कार केला गेला त्या ठिकाणी उभारला आहे. त्यांच्या गर्भ गृहाला सध्याही 'अंगीता साहिब' म्हणतात. धर्मासाठी या थोर वीरपुरूषाने बलिदान केले आणि शीख धर्मानुयात नवचैतन्य निर्माण केले. गुरू गोविंदसिंह हे गुरू तेगबहाद्दूर यांचे सुपूत्र होते. त्यांनीही जिवाची तमा न बाळगता शीख धर्माचा प्रसार व प्रचार केला. त्यांची समाधी मराठवाड्यातील नांदेडच्या गुरूव्दारात आहे.[२२४]

ओवेन आणि सांभी यांच्या मतानुसार शिख परंपरेत गुरू गोविंद सिंगाचे महत्व हे फार महत्वाचे ठरल्या गेले, कारण त्यांनी खालसा पंथाची सुरूवात केली, मुगल सम्राटाकडुन होणाऱ्या छळाचा प्रतिकार केला, शिख धर्म आणि हिंदु धर्मावर औरंगजेबाचे इस्लामी आघातापासुन संरक्षण देत राहीले.[२२५]

"अ ीस कृपाण खंडो खडग तुपक तबर अरू तीर ।

सैफ सरोही सैहयी यहै हमारे पीर ।।"

गुरू गोविंदसिंहजी आत्मविद्यासंपन्न होते. स्वाध्यायप्रेमी होते. त्यांची अत्यंत बिकट प्रसंग असतानाही चित्तवृत्ती स्थिर ठेवून अध्ययन-मनन केले. अखेर त्यांनी आपले सारे लक्ष शत्रूला समाप्त करण्यावर केंद्रित

केले. त्यासाठी त्यांना शास्त्रापेक्षा तलवार, कृपाण, चक्र, तीर, पाश, बंदुका हेच आम्हाला गुरूस्थानी आहे, असे म्हणण्या इतपत त्यांचे कडवे शस्त्रप्रेम होते. अस्त्र-शस्त्रे ही शक्तीची प्रतीके असतात आणि परम शक्तीमान परमेश्वरही त्यांचा आवश्यक तेव्हा उपयोग करी. त्यामुळे शस्त्र नि परमतत्व यांची सांगड घालता येते असे ते म्हणत.[२२६]

कनिंगहॅमच्या मते पराभूत मनोवृत्तीच्या लोकांत पुन्हा जोम उत्पन्न करण्याचे काम गुरू गोविंदसिंगानी केले.

डॉ. तेजसिंह यांच्या मते खालसा हे एक यशस्वी बंड होते. ती योजनापूर्वक यशस्वी केलेली क्रांती होती.

### ३.११ गुरूग्रंथसाहिबा :-

गुरूग्रंथसाहिब हा शिख धर्माचा धार्मिक ग्रंथ आहे. त्या ग्रंथाला अंतिम, सर्वोच्चत्तम आणि चिरस्थायी जीवीत गुरू मानतात. गुरू अर्जुन देवांनी या आदीग्रंथाचे संकलन केले. शिखांचे दहावे गुरू गुरू गोविंद सिंगानी त्यात एक स्लोक, दोहरा महारा ९ अंग १४२९ आणि त्यांचे वडील गुरू तेग बहाद्दुरांचे सर्व ११५ भजन त्यात समाविष्ट केले, हा दुसरा अनुवाद श्री गुरूग्रंथसाहिब म्हणुन ओळखला गेला.

शीख धर्मांचे पाचवे गुरू अर्जुनदेवांनी आदिग्रंथाचे संपादन केले. पुर्वतयारी झाल्यानंतर गुरू अर्जुन रामसर या एकांस्थानी आले. तेथे पिंपळादी वृक्षांची दाट छाया होती. अत्यंत निसर्गरम्य अशा या स्थानाच्या सौंदर्यात भर टाकण्यासाठी रामसर तलावाचे बांधकाम हाती घेण्यात आले. गुरूच्या तसेच या पवित्र ग्रंथाच्या संकलनासाठी मदत करणाऱ्या कवी, भाट, संत, फकीर यांच्या निवासासाठी तंबू उभारण्यात आले. पवित्रग्रंथाच्या संकलनाचे कार्य जेथे सुरू करण्यात आले ती जागा 'रामसर' या नावाने ओळखली जाऊ लागली.[२२७] अमृतसर येथील तलावाच्या काठी बोरीच्या झाडाखाली गुरू अर्जुनदेवांनी ग्रंथातील रचना भाई गुरूदास यांना सांगुन लिखाण केला. मोठया समारंभपुर्वक भाद्रपद शु. १ सवंत १६६९ म्हणजेच ३० ऑगस्ट १६०४ रोजी हरिमंदिर मध्ये या ग्रंथाची प्रतिष्ठापण करण्यात आली. या ग्रंथास 'आदिग्रंथ अथवा पोथी साहिब' असेही म्हणतात. भाई बुढ्ढाजी हे या ग्रंथाचे पहिले ग्रंथी होते. इ.स.१८६४ पर्यंत 'गुरूग्रंथसाहिब' चे हस्तलिखीत स्वरूप होते, त्यांनतर छापील गुरूवाणी प्रचलित झाली. सातव्या गुरूंच्या काळापासून म्हणजेच गुरू हररायांच्या काळापासून आदिग्रंथाला ग्रंथ साहिब या नावाने संबोधले जाऊ लागले. गुरू गोविंद सिंगांच्या काळापासून हा ग्रंथ गुरूग्रंथसाहिब या नावाने संबोधिला जाऊ लागला.[२२८] शिखांचा तो धार्मिक ग्रंथ असल्याने त्यांना तो अत्यंत पवित्र वाटतो म्हणून त्या ग्रंथाला 'पवित्रग्रंथ' असेही म्हणतात. गुरूग्रंथसाहिब हा नामदेव, कबीरादी भारतीय संतभक्त आणि शिख गुरू यांच्या नीतिपर काव्याचा एक विशाल संग्रह आहे.[२२९] इ.स.१७०८ मध्ये गुरूगोविंद सिंगानी देहरूपी गुरू परंपरा बंद करून शिख धर्माचा धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबालाच गुरू मानावे असा हुकूम काढला आणि श्री गुरूग्रंथसाहिब हे शिखांचे अकरावे गुरू म्हणून मान्यता दिली आणि देहरूपी गुरू परंपरा बंद केली.

"आज्ञा भई अकाल की, तबे चलायो पंथ ।
सब सिक्खन को हुक्म है गुरू मानयो ग्रंथ ।
गुरू ग्रंथ जी मानिआहु, प्रगट गुरां की देह ।

जो प्रभु को मिलबो चहै, खोज शब्द मै लेह ।"

ब्रिटीश इतिहासकार ग्रीनलीज ए गास्पल ऑफ गुरूग्रंथसाहिब या ग्रंथात लिहतात की, "गुरूग्रंथसाहिबा हा ग्रंथ प्रेमाचा देवदूत आहे."

गुरूग्रंथसाहिबा ही चित्तशुध्दीवर भर देतो, पण त्यासाठी नामस्मरणाचा आणि गुरूनिष्ठेचा मार्ग दाखवितो. गुरूग्रंथामध्येही बायबलप्रमाणे अनेकांच्या सद्विचारांचे सारसंकलन आहे.[२३०]

**सारणी क्र.३.१ शीख धर्मांतील गुरू परंपरा व त्यांचा कालखंड खालील प्रमाणे आहे.**

| अ.क्र. | गुरूचे नाव | जन्मदिनांक | गुरू बनण्याची तारीख | मृत्यू दिनांक | काळ |
|---|---|---|---|---|---|
| १ | गुरू नानक देव | १५ एप्रिल १४६९ | २० ऑगस्ट १५०७ | २२ सप्टेंबर१५३९ | ६९ |
| २ | गुरू अंगद | ३१ मार्च १५०४ | ७ सप्टेंबर १५३९ | २९ मार्च १५५२ | ४८ |
| ३ | गुरू अमरदास | ५ मे १४७९ | २६ मार्च १५५२ | १ सप्टेंबर १५७४ | ९५ |
| ४ | गुरू रामदास | २४ सप्टेंबर १५३४ | १ सप्टेंबर १५७४ | १ सप्टेंबर १५८१ | ४६ |
| ५ | गुरू अर्जुन | १५ एप्रिल १५६३ | १ सप्टेंबर १५८१ | ३० मे १६०६ | ४३ |
| ६ | गुरू हरगोबिंद | १९ जून १५९५ | २५ मे १६०६ | २८ फेब्रुवारी १६४४ | ४८ |
| ७ | गुरू हरराय | १६ जानेवारी १६३० | ३ मार्च १६४४ | ६ ऑक्टोंबर १६६१ | ३१ |
| ८ | गुरू हरकिशन | ७ जुलै १६५६ | ६ ऑक्टोंबर १६६१ | ३० मार्च १६६४ | ७ |
| ९ | गुरू तेगबहाद्दूर | १ एप्रिल १६२१ | २० मार्च १६६५ | ११ नोव्हेंबर १६७५ | ५४ |
| १० | गुरू गोविंदसिंग | २२ डिसेंबर १६६६ | ११ नोव्हेंबर १६७५ | ७ ऑक्टोंबर १७०८ | ४१ |

## आलेख क्र.३.१ शीख धर्मांतील गुरू परंपरा व त्याचा कालखंड



**संदर्भग्रंथ :-**

१. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.६.

२. Luis Moreno ; Cesar Colino, (२०१०). Diversity and Unity in Federal Countries, McGrill Queen University Press, ISBN ९७८०७७३५९०८७८, p.no.२०७.

३. Gabriel A. Almond ; R.Scott; Emmanuel Sivan, (२००३). Strong Religion:The Rise of Fundalmentalisms Around the World (illustrated ed.), University of Chicago Press, Chicago. ISBN ९७०२२६०१४९८२, p.no.१५७.

४. Singh Prithi, (२००६). The History of Sikh Gururs, Lotus Press, ISBN ९७८८१८३८२०७५२, p.no.१२३.

५. Singh Kartar, (२००३). Life Story of Guru Nanak, Hemkum Press, p.no.९०.

६. Singh Kirapala, (२००६). Select Documents on Partition of Punjab १९४७, National Book Press, p.no.२३४.

७. Mahajan V.D., (१९७०). Muslim Rule In India, S.Chand Publication, New Delhi. p.no.२२३.

८. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.३२.

९. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.५१.

१०. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

११. Dawe, Donald G., (२०१५). Guru Nanak Dev Encylopaedia of Sikhism, Panjabi University, Patiala, Retrieved १८ August २०१५.

१२. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती, पृ.क्र.२५.

१३. Nayar Kamala Elizabeth, (२००४). The Sikh Diaspora in Vancouver : Three Generations Amid Tradition, Modernity, and Multixulturalism, Illustrated eds., University of Totonto Press, Toronto. p.no.४८. ISBN ९७८००२०८६३१०.

१४. Cunningam, Joseph Davey, A History of The Sikhs, Joseph Davey, London John Mrray, p.no. ३७-३८.

१५. सिंघ साहिब, (२०१४). श्री गुरू नानकदेव जी, सिंघ ब्रदर्ज, अमृतसर, प्रथम संसकरण, पृ.क्र.१४-१५.

१६. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

१७. Singh Kartar, (१९८४). Life Story Of Guru Nanak, Hemkent Press, New Delhi, ISBN९७८८१७०१०६८, p.no.१८.

१८. Mandanjit Kaur, Udasi, Encyclopedia of Sikhism, Punjabi University Patiala, Patiala, Retrieved १७ September २०१५.

१९. Cole, W. Owen; Sambhi, Piara Singh, (१९७८). The Sikhs:Their Religious Beliefs and Practices., Routledge & Kegan Paul, London. ISBN ०७१००८८४२६, p.no.९.

२०. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

२१. Lorenzen David (१९९५). Bhakti Religion in North India:Community Identity and Political Action, State Universityof New York Press, New York, p.no. १-२.

२२. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

२३. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.२८.

२४. McLeod W.H., (२००९). The A to Z of Sikhism, Scarecrow Press, p.no.१३९-१४०.

२५. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

२६. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.२७.

२७. सिंघ साहिब, (२०१४). श्री गुरू नानकदेव जी, सिंघ ब्रदर्ज, अमृतसर, प्रथम संसकरण, पृ.क्र.२२.

२८. कित्ता, पृ.क्र.१३२.

२९. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

३०. Singh Kirapala ; Kapur Prithipala, (२००४). Janamsakhi Tradition : An Analytical Study, Singh Brothers, p.no.१७४.

३१. Johal Jagbir, (२०११). Sikhism Today, Bloomsbury Academic Press, p.no.१५ note १.

३२. Windand M. Callewaert ; Rupert Snell, (१९९४). According to Tradition : Hagiographuical Writing in India, Otto Harrassowitz Verlag, p.no.२६-२७.

३३. McLeod W.H., (२००७). Essays in Sikh History, Tradition and Society, Oxford University Press, Oxford, p.no.४२-४४.

३४. Mahinder N. Gulati, (२००८). Comparative Religious And Philosophies : Anthropomorphism And Divinity, Atlantic Publishers, p.no.३१६-३१९.

३५. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.३१२.

३६. Christopher Shackly, Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, Routledge. p.no. xviii-xix.

३७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.

३८. कित्ता, पृ.क्र.४८८.

३९. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.९.

४०. Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhsm : A Guide for the Perplexed, Bloomsbury Academic, p.no. १३१-१३२ ISBN ९७८-१४४११०२३१७.

४१. William Owen Cole and Pieara Singh Sambhi, (१९९५). The Sikhs : Their Religious Beliefs and Practices, Sussex Academic Press, p.no. ९-१२. ISBN९७८-१८९८७२३१३४.

४२. Singh, Kirapala ; Prithipala, (२००४). Janamsakhi Tradition : An Analytical Study, Singh Brothers, p.no.१७४.
४३. Winand M.Callewaert : Rupert Snell, (१९९४). Bhakti Religion in North India : Community Identity and Political Action, State University of New York, p.no.४१-४२. ४४. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, खंड पहिला, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती २००६, पृ.क्र.१२८.
४५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८८.
४६. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.४२.
४७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४८७.
४८. The Sikhism Home Page : Guru Nanak - www. Sikhs.org Reterived ९ August २००९.
४९. Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhism:A Guide for the Perplexed, Blomsbury Academic, ISBN ९७८१४४११०३१७, p.no.१३१-१३४.
५०. Owen W. Cole; Piara SinghSambhi, (१९९७). A Popular Dictionary of Sikism:Sikh Religion and Philosophy, Taylor & Francis, p.no.७१.
५१. Singh H.S., (२००९). The Encyclopedia of Sikhism, Hemkunt Press, ISBN ९७८८१७०१९३०११, p.no.१०४.
५२. Christopher Shackle ; Mandair Arvind, (२०१३). Teachings of the Sikh Gurus:Selections from the Sikh Scriptures, Routledge, ISBN ९७८११३६४५१०८, p.no.xviii-xix.
५३. Mandair, Arvind Pal Singh, (२००९). Religion and the Specter of the West Sikhism, India, Postcoloniality and the Politics of Translation, Columbia University Press, Columbia, ISBN ०३४७२४४, p.no.३७२-३७३.
५४. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.२१.
५५. Marwha Sonali Bhatt, (२००६). Colours of Truth, Religion Self and Emotions,Concept Publishing Company, New Delhi, p.no.२०५.
५६. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.१६.
५७. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.५६.
५८. William Owen Cole ; Piara Singh Sambhi, (१९९५). The Sikhs:Their Religious Beliefs and Practices, Sussex Academic Press, p.no.१८-२०.
५९. Louid E.Fenech; W.H.McLeod, Historical Dictionary of Sikhism, Rowman & Littlefield Publishers, p.no.३६. ISBN ९७८-१-४४२२-३६०१-१.
६०. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.१०.
६१. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.५२.

६२. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.२३.
६३. गुरूमतिज्ञान/श्रीगुरूदेव अंगदजी ५०० वर्षीय प्रकाश गुरूपर्वकी समर्पित विशेषांग, (२००४). धर्मप्रसार कमेटी, शिरोमणि गुरूद्वारा प्रबंधक कमेटी, अमृतसर, एप्रिल-मे-जुन२००४, पृ.क्र.४)
६४. Cole W. Owen ; Sambhi, Piara Singh, (१९७८). The Sikhs:Their Religious Beliefs and Practices London, Routledge & Kegan Paul, p.no.१८.
६५. Pashaura Singh ; Louis E.Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Oxford University Press, p.no.२२.
६६. Shakle, Christopher, Mandair, Arvind Pal Singh, (२००५). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, United Kingdom, Routledge, p.no.xiii-xiv. ६७. Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhism : A Guide for the Perplexed, Bloomsbury Academic, p.no. ३५-३७. ISBN 978-1-4411-0231-7.
६८. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.५३.
६९. William Owen Cole and Piara Singh Sambhi, (१९९५). The Sikhs : Their Relegious Beliefs and Practices, Sussex Adademic Press, p.no.१८-२०. ISBN ९७८-१-८९८७२३-१३-४.
७०. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.४४.
७१. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.५५.
७२. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.४८.
७३. Khushwant Singh, “Amar Das (१४७९-१५७५)” Encyclopaedia of Sikhism, Punjab University, Patiala.
७४. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.५६.
७५. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.६०.
७६. Shackle Christopher, Mandar Arvind Pal Singh, (२००५). Teachings of the Sikh Gurus:Selections from the Sikh Scriptures, United Kingdom, Routledge, p.no.xvii-xviii.
७७. Cole W. Owen, Sambhi Pieara Singh, (१९७८). The Sikhs:Their Religious Beliefs and Practices, Routledge & Kegan Paul, London, p.no.१९.
७८. Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhism : A Guide for the Perplexed, Bloomsbury Academic, p.no.३५-३७. ISBN ९७८-१-४४११-०२३१-७.
७९. Shackle Christopher Mandair ; Singh Arvind Pal, (२००५). Teachings of the Sikh Gururs:Selections from the Sikh Scriptures, Routledge, United Kingdom, p.no.xviii.
८०. Singh Arvind Pal Maindai, (२०१३). Sikhism:A Guide for the Perplexed, Academic Bloomsbury, p.no.३५-३७.
८१. Singh Khushwant, (२०१६). Amar Das, Guru (१४७९-१५७४)-Encyclopedia of Sikhism, Punjab University, Patiala

८२. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.५३.
८३. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.११.
८४. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.५७.
८५. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.८५.
८६. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.६०.
८७. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.११.
८८. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.८६.
८९. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.६०.
९०. कित्ता, पृ.क्र.६०.
९१. Singh Duggal Kartar, (१९८८). Philosophy and Faith of Sikhism, Himalayan Institute Press, p.no.१५.
९२. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगपुरा, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, पृ.क्र.६१.
९३. मार्डीकर मदन (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.६०.
९४. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.८६.
९५. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.११.
९६. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.९०.
९७. कित्ता, पृ.क्र.९३.
९८. कित्ता, पृ.क्र.९४.
९९. Willeam Owen Cole ; Sambhi Paiara Singh, (१९९५). The Sikhs : Their Religious Beliefs and Prectices, Sussex Academic Press, ISBN९१९७२३, p.no.२२-२४.
१००. Fundamentalisms Comprehended-Marty,Martin E.;Appleby; R.Scott, University of Chicago Press, eds.2004, p.no.453. ISBN 9780226508887.
१०१. Singh Mandair Arvind Pal, (२०१३). Sikhism:A Guide for the Perplexed, Bloomsbury Publishing, p.no.३८-४०.
१०२. रोडे सोमनाथ, (१९९९). शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृ.क्र.६१.
१०३. Shakti Pawha Kaur Khalsa, (१९९८). Kundalini Yoga: The Flow of Eternal Power, Penguin, p.no.७६.

अध्यात्मिक रूपात गहण संकेत देते. ब्रम्हाण्ड हे एक तीव्र आवाजाने बनल्या गेले व ही ईश्वराची पहिली किमया समजली जाते. हा आवाज निर्माण कर्ता व निर्मीती मध्यस्थी माध्यमकारक बनले आहे. ईश्वर ही एक भावना आणि शुध्द प्रकाश अथवा ज्योत जे प्रत्येक मानव प्राण्याच्या मनाला सत्याची जाणीवाची संकेत देते. शिखांच्या आध्यात्मवादात मुलमंत्राच ध्यान मग्न आणि त्याचा जप केल्याने आत्म्याला परब्रम्हाशी तल्लीन करतो. मुलमंत्र वाहे गुरू नाम वैयक्तीक आत्मा ईश्वराशी एक रूप होतो. मुल मंत्राने सर्व ईश्वरीय गुण साध्य होतात. त्याला भाग्य निर्णायक म्हणल्या जाते. ह्या प्रकारे ईश्वराचे नाव हे फक्त विशीष्ट स्वर असलेले अक्षर शब्द नाही पण दैवी शक्ती जी ब्रम्हाण्ड विषयक व मानवाचे अदृश्य नैसर्गिक नियमाने नियंत्रण नियमावली आहे. ईश्वराचे खर नाव त्यांच्या व्यापक व्यक्तीतत्व आणि त्याच्या अस्तीत्वाच्या सत्याचे प्रत्यक्ष संकेत व्यक्त करते. ईश्वर नाम आपल व्यक्तीमत्व बदलण्याची म्हणजे वास्तवतेशी स्वत:चा संपर्क साधण्याची आवश्यकता आहे. मानवाचा जन्म म्हणजे ही एक मुक्ती प्राप्त करण्याची संधी मानली पाहीजे कारण मुक्ती प्राप्त करून घेण हे फक्त मानवाला शक्य आहे. कुठल्याही व्यक्तीच्या इतिहास किती वेळा त्यान पुर्नजन्म घेत रहावा हे पुर्णपणे त्याच्या इच्छेच्या प्रमाणावर तो किती नैतिक प्रयत्न करतो ह्यावर अवलंबुन आहे.

शिख धर्म पंथाचा गुरूग्रंथसाहिब हे एक अद्वितीय आध्यात्मिक मापदण्ड आहे. जे मानवाच्या दृष्टीला लपलेले ईश्वरीय पंजेचा विश्लेषणात्मक दृष्टीकोण देते. ग्रंथासाठी निवडलेला प्रत्येक शब्द अनंतकाळाच्या गुप्त शक्ती व त्यांच्या कार्यप्रणालीचा द्रुत गतीने धावत जाणाऱ्या भौतीक पध्दती उघड करते.

गुरूग्रंथसाहिब हे नेहमीच कुठल्याही गुरूद्वाऱ्यातील केंद्रीय बिंदु असतो. उंच अशा ओट्याच्या मध्यभागी ज्याला तख्त अथवा सिंहासन यावर ठेवतात. भक्त समुदाय त्यापुढे खाली फर्शीवर बसुन त्याच्या प्रती नतमस्तक होऊन आदर दाखवतात. गुरूग्रंथसाहिबाला सर्वोच्च आदर आणि सम्मान दिल्या जातो. शिख आपले डोक झाकुण घेतात आणि पादत्राणे बाहेर सोडल्या जातात नंतर ते पवित्र धर्मग्रंथाला भेट देतात, ते त्याचे चिरस्थायी जिवीत गुरू आहेत. गुरूग्रंथसाहिबाला साधारणत: त्यांच्या प्रती आदर असल्याचे प्रतिक म्हणुन डोक्यावर घेउणच फिरवतात. त्याला अस्वच्छ हाताचा स्पर्श केल्या जात नाही, फर्शीवर ठेवल्या जात नाही. गुरूग्रंथसाहिबावर छत्र धरल्या जाते. मोराच्या पिसाचा पंखा त्यावर हलवला जातो. गुरूग्रंथसाहिबाची व्यवस्था एका ग्रंथीद्वारे पाहील्या जाते, जो पवित्र स्त्रोताच गायण करीत शिखाच्या प्रार्थनेच नेतृत्व करण्यास जबाबदार असतो. ग्रंथी हा गुरूग्रंथसाहिबाचा काळजी वाहक असतो. उष्णता, धुळ, दुषीत हवामानापासुन बचाव करण्यासाठी गुरूग्रंथसाहिबाला स्वच्छ कपडा 'रूमाला' द्वारे झाकुण ठेवल्या जाते.[४२] गुरूग्रंथसाहिबाचे सर्वात मोठे वैशिष्ट्य म्हणजे त्याची सर्वसमावेशकता होय. शिख गुरूंबरोबरच त्यात अन्य भारतीय संतसत्पुरूषांच्या नऊशे अडतीस रचना समाविष्ट आहेत.[४३]

श्री. न.वि. गाडगीळ यांनी म्हटल्याप्रमाणे हा आदिग्रंथ म्हणजे शिख आणि अन्य धर्मीय साधुसंतांच्या भक्तीमय वाणीचे संमेलन आहे. इथे कुठेही गुरूचरित्र वर्णन नाही. गुरूंनी केलेले चमत्कार नाहीत,

तात्त्विक विवेचनापेक्षा श्रध्दांचे स्पष्टीकरण मिळते. शिख बांधव श्रीगुरूग्रंथसाहिबांपासून प्रेरणा प्राप्त व्हावी यासाठी मत्था अथवा डोके टेकवतात. त्यात श्रेष्ठ ज्ञान आहे त्याचे आकलन प्रत्येकाला व्हावे ही त्यांची मनीषा असते. मनात अपार आदर आणि श्रध्दा भाव असतो.

### ४.४ गुरूग्रंथसाहिबातील पदे व त्यांचे लेखक :-

'गुरूग्रंथसाहिब' गुरू अर्जून यांनी पूर्ण केली. या ग्रंथात ३६ वाणीकारांच्या रचनांचे महत्त्वपूर्ण स्वरूप व लिखाण आहे. गुरूग्रंथसाहिबामध्ये १५ इतर भाषिक संतांच्या अभंगांचे पदांचे स्थान आहे. त्यात संत कबीर ५४१ पदे, संत नामदेव ६१ पदे, संत रवीदास ४१ पदे, शेख फरीद ११६ पदे, संत धना ४ पदे, संत बेनी ३ पदे, शेख बिकन २पदे, संत जयदेव २ पदे, सूरदास १ पद, संत परमानंद १ पद, संत पीपा १ पद, संत रामानंद १ पद, संत साधना १ पद, संत त्रिलोचन ४ पदे, संत सेन १ पद अशी एकून ७६९ पदे इतर भाषिक संतांच्या पदे समाविष्ट आहेत.

श्री गुरूग्रथंसाहिबामध्ये ६ शिख गुरूंची पदे समाविष्ट आहेत. गुरू नानक ९७४ पदे, गुरू अंगद ६३ पदे, गुरू अमरदास ८६९ पदे, गुरू रामदास ६३८ पदे, गुरू अर्जुन २३१२ पदे गुरू तेग बहाद्दुर ११६ पदे अशी एकून ४९७२ पदे शिख गुरूंची आहेत.

श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये अकरा भाटांची पदे समाविष्ट आहेत. भट हरिबंसजी २ पदे, भट बल्हजी ५ पदे, भट मथुराजी १४ पदे, भट गयंकजी १३ पदे, भट नल्हजी १६ पदे, भट भल्हजी १ पदे, भट सल्हजी ३ पदे, भट भिखाजी २ पदे, भट किरतजी ८ पदे, भट जालपजी ५ पदे, भट कलसहारजी ५४ पदे, अशी एकून १२३ पदे भाटांची पदे समाविष्ट आहेत.

श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये चार गुरसिक्खांची पदे समाविष्ट आहेत. राय बलवंडजी ५ पदे, भाई सत्ताडून ३ पदे, बाबा सुंदरजी १ पद, भाई मरदाना १ पदे, अशी एकून १० पदे गुरसिक्खांची आहेत.

शिखांच्या पवित्र गुरूग्रंथसाहिबातील मापदंडाला प्राथमिक व दसम ग्रंथाला गौण दर्जा भारतीय पौराणिक कथेप्रमाणे मान्य आहे. ज्यामुळे शिखांच्या पवित्र प्रतिकात्मक आजच्या जगताला व मागील पुर्वजांना महत्वाचा मानला जातो.

#### ४.४.१ गुरूग्रंथसाहिबातील संतांची अथवा भक्तांची चरित्रे

**१.बाबा शेख फरिद:-**

चिश्ती सिलसिले याचे प्रमुख बाबा फरीद यांचा जन्म इ.स.११७३ मध्ये खोतवाल जिल्ह्यातील मुल्तान या गावात शेख मतालुदीन सुलेमान यांच्या घरी झाला.[४४] बाबा फरीद यांच्या आईचे नाव मरीयम होते.[४५] बाबा शेख फरीद हे बाराव्या शतकातील पंजाबमधील एक थोर सूफी मूस्लीम संत होते. त्यांच्या रचनांचा श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये समावेश केला गेला आहे.[४६] हजरत शेख फरीदुद्दीन मसूद शकार ह्यांचा जन्म पाकिस्तानातील पंजाबमधील मुलतान जिल्ह्यातील कोथवाल खेड्यात झाला. मुलतानचे हजरत ख्वाजा कुतुबुद्दीन बख्तियार काही यांचे ते अनुयायी होते.[४७]

अकराव्या शतकात गजनी व काबूल येथील मुस्लीम राजकर्त्यांमध्ये सदैव लढाया होत असत. त्याचा त्रास गरीब बिचाऱ्या शांतता प्रिय सामान्य जनतेला भोगावा लागे. ह्या त्रासाला कंटाळून गजनीच्या राजपरिवारातील शेख शईब हे आपल्या कुटूंब कबिल्यासह भारतात आश्रयास आले व ते पंजाब प्रांतातील मुलतान या शहरात स्थायिक झाले. त्याच सुमारास महंमद पैगंबर यांच्या आप्तांपैकी काबूलचे एक मुल्ला मुलतान जवळच्या करोर ह्या गावी आश्रयार्थ आले.[४८] पुढे शेख शईबचा मोठा मुलगा 'जमालउद्दिन' यांच्याशी 'मरिअम' चा विवाह झाला. जमालउद्दिन व मरिअम यांचा दुसरा पुत्र म्हणजेच 'बाबा शेख फरीद' होय. पंजाबी भाषेत लिहिलेले त्याचे ११६ पदे श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट केले आहेत.[४९]

**जन्म व बालपण :-**

शेख फरीद यांचा जन्म हिजरी ५६९ इ.स.११७३ मध्ये रमजान महिन्याच्या पहिल्या दिवशी झाला. रमजान महिन्यात मुसलमान लोक महिनाभर रोजे उपवास करतात. चंद्र दर्शन झाल्यावर उपास सोडतात. पण ज्या दिवशी फरीदचा जन्म झाला त्या दिवशी आकाशात मेघांनी झाकून गेले होते. चंद्र दर्शन होणे अशक्य होते. मग रोजा केव्हा सोडायचा असा प्रश्न उपस्थित झाला तेव्हा तेथील मौलवीने सांगितले, "मरिअमच्या पोटी आजच एक दिव्य बालक जन्मास आले आहे. ते जेव्हा स्तनपान करील तेव्हा आपण उपवास सोडू." मौलवीने असे सांगण्याचे कारण असे होते की, त्या बालकाने जन्मल्यापासून आईच्या स्तनास तोंडही लावले नव्हते. पण एक नवल घडले. रात्र झाली. चंद्रोदयाचा समय झाला अगदी त्याच वेळी बालकाने स्तनपान केले. लोकांना आनंद झाला. उपवास सुटला. असे म्हणतात की, त्या बाळाने संपूर्ण रमजानचे महिन्यात कधीही दिवसा स्तनपान केला नाही. रात्री चंद्रोदयानंतरच स्तनपान केले. ह्यामुळे लोकांची खात्रीच पटली की, हे मूल जणू ईश्वरी अवतारच आहे. पुढे योग्य वेळी मुलाचे 'फरीदउद्दिन मसौद' असे नामकरण करण्यात आले. हेच बालक पुढे 'बाबा शेख फरीद' ह्या नावाने विख्यात झाले.[५०] हजरत शेख फरीदजी यांचे निधन १५ ऑक्टोंबर १२६५ मध्ये भारतातील पंजाबमध्ये त्यांचे निधन झाले.[५१]

**शक्करगंज:-**

बाळ फरीद हळूहळू मोठा होऊ लागला. बोलू लागला. त्याला ईश्वरभक्तीची गोडी लागावी म्हणून त्याची आई मरिअम त्याला भक्ती गीते शिकवू लागली. नमाज शिकवू लागली. पण बाळ फरीदने आईस विचारले, "आई प्रार्थना कशाला करायची ? नमाज कशाकरिता म्हणायचा ?" त्याची समजूत काढण्यासाठी आई म्हणाली,"बाळ प्रार्थना केल्याने अल्लाह आपल्यावर प्रसन्न होतो. तो आपल्याला चांगले फळ देतो. मिठाई देतो." हे मुलाला खरे वाटावे म्हणून आईने तो ज्या आसनावर प्रार्थनेस बसे त्याच्या खाली साखरेची पुडी ठेवली. प्रार्थना झाल्यावर आसनाखाली साखरेची पुडी पाहून बाळ फरीदची आईच्या सांगण्यावर विश्वास बसला. एक दिवस फरीदची आई साखर ठेवावयास विसरली. फरीद व मित्र आपापल्या आसनावर

बसून प्रार्थना म्हणू लागले. प्रार्थना संपली. फरीदने आपले आसन उचलले पण आज त्याखालून साखरे ऐवजी मातीचे ढेकूळ निघाले. फरीदने त्याचा एक तुकडा आपल्या जिभेवर ठेवला. तो गोड लागला. त्याने आपल्या मित्रांनाही त्या मातीच्या ढेकळाचा प्रसाद दिला. त्यांनाही तो साखरेसारखा गोड लागला. तेव्हापासून मुलांनी त्यास 'शक्करगंज' म्हणावयास सुरूवात केली. ही दंतकथा सोडली तर फरीदची वाणीच इतकी मिठ्ठास होती की त्याने केलेला उपदेश इतका गोड असे की जणू साखरेचे कोठार 'शक्करगंज' म्हणूनच त्यांच्या नावामागे शक्करगंज ही उपाधी लागली असावी.[५२]

**धार्मिक शिक्षण :-**

वयाच्या सोळाव्या वर्षी फरीद आपल्या माता पित्यांसह 'हजयात्रे' स गेला. तेथून परत येताना फरीदच्या पित्याने फरीदला काबूल येथे इस्लाम धर्मांच्या शिक्षणासाठी ठेवले. तेथे काही वर्षे राहून फरीदने इस्लाम धर्मतत्वांचा सखोल अभ्यास केला. शिक्षण पूर्ण करून तो मुलतानला परत आले. त्याच वेळी दिल्लीहून 'ख्वाजा कुतुबद्दिन बख्तीयार उशी' हे सूफी संत मुलतान येथे आले होते. फरीद त्यांच्या प्रवचनास जाऊ लागला. त्यांच्या सहवासात फरीद पूर्णपणे रममाण झाला व त्याने त्यांचे शिष्यत्व पत्करले. ख्वाजा कुतुबूद्दिन त्याच्या कुशाग्र बुध्दीवर, प्रगाढ श्रध्देवर खूष झाले व ते त्यास आपल्याबरोबर दिल्लीस घेऊन गेले. तेथे त्यांच्या मार्गदर्शनाखाली फरीदची अध्यात्मिक साधना सुरू झाली. फरीदची योग्य ती अध्यात्मिक प्रगती झाली अशी खात्री झाल्यावर कुतुबुद्दिन बख्तीयार यांनी फरीदला हांसी व सरसा ह्या गावात ईस्लाम धर्माच्या प्रचारार्थ पाठविले. ख्वाजा कुतुबुद्दिन बख्तीयार उशी हे पैगंबरवासी झाल्यावर शेख फरीद पाकपट्टण येथे स्थायिक झाले व त्यांनी आपल्या गुरूंचे कार्य पुढे चालू ठेवले.

**बाबा शेख फरीद यांच्या जिवनातील काही प्रसंग व कथा :-**

शेख फरीद यांच्याबद्दल अनेक कथा प्रचलित आहेत. त्यांपैकी त्यांच्या व्यक्तीमत्वाची दर्शन अशी एक कथा पुढील प्रमाणे आहे. एकदा शेख फरीद व त्यांची आई रात्री झोपले असता त्यांच्या घरात चोरी करण्याच्या उद्देशाने एक इसम हळूच घुसला. त्याने काही माल उचलला व तो परम जाण्यासाठी मागे वळला आणि एक आश्चर्य घडले. एकाएकी त्याची दृष्टीच गेली. डोळ्यांना काही दिसेनासे झाले. तो भीतीने किंचाळला. घरातले सर्व लोक जागे झाले. नोकराने त्या चोरास पकडले. चोराने आपला गुन्हा कबूल केला. माता मरिअमने त्यास असले वाईट धंदे सोडून देण्यास व सन्मार्गाने चालण्यास सांगितले. मरिअमचा तो उपदेश ऐकून चोरास आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. त्याने क्षमायाचना केली. फरीदने त्यास जवळ घेतले. त्याच्या डोळ्यांवरून प्रेमाने हात फिरवला. त्याच क्षणी त्या चोरास परत स्वच्छ दिसू लागले. त्याने फरीद व मरीअमच्या पायावर डोके ठेकवले व खाली मान घालून तो निघून गेला.[५३] दुसऱ्या दिवशी सकाळीच तो चोर आपल्या बायका-मुलांना घेऊन फरीद यांच्या घरी आला. येताना त्याने दुधाचा पेला आणला होता. तो त्याने मरिअमच्या चरणी ठेवला व नमस्कार करून म्हणाला, माताजी ! माझे

अपराध पोटात घाला. मला क्षमा करा व मला आणि माझ्या कुटुंबाला सन्मार्ग दाखवा. बाबा शेख फरीद यांनी त्यास उपदेश केला. त्यांना ईस्लाम धर्माची दीक्षा दिली व त्यास आपल्याजवळ ठेवून घेतले. पुढे त्या कुटुंबाने शेख फरीद यांच्या शिकवणूकीप्रमाणे जगून आपले जीवन सार्थकी लावले.

**बाबा शेख फरीद यांच्या जीवनातील काही प्रसंग:-**

बाबा शेख फरीद यांनी आपल्या साधनेच्या काळात वासना व विकार यांना जिंकण्यासाठी अनेक उपाय केले. त्यांनी काही दिवस स्वत:स उलटे टांगून घोर तपश्चर्या केली तसेच क्षुधेची वासना मारण्यासाठी ते आपल्याजवळ एक लाकडाची चकती ठेवत व भूक लागली की ते चघळीत असत. पण ह्या साऱ्या गोष्टी केवळ दंतकथा असून शेख फरीद यांच्या वचनांचा केवळ विपर्यास होय असे म्हणणे योग्य होईल. वास्तविक जंगलात जाऊन तपस्या करण्यास त्यांचा अत्यंत विरोध होता.

"फरीदा जंगलु किआ भवहि वणि कंडा मोडेहि।।

वसी रबु हिआलीऐ जंगलु किआ ढूढेह।। १९ ।।"[५४]

फरीद वरील पदात सांगतात की, अरे ईश्वरप्राप्तीसाठी रानावनात कशाला हिंडतोस. ईश्वराला जंगलात कशाला शोधत फिरतोस. अरे ईश्वर तर तुझ्या ह्दयातच आहे. उगाच वनात जाऊन पायात काटे मात्र मोडतील.[५५]

काठ की रोटी बद्दल असाच विपर्यास झालेला दिसतो. फरीद म्हणतात,

"फरीदा रोटी मेरी काठ की लावणु मेरी भूख ॥

जिना खाधी चोपडी घणे सहनिगेदूख ॥ २८ ॥

रूखी सुखी खाइ कै ठंढा पाणी पीउ ॥

फरीदा देखि पराई चोपडी ना तरसाए जीउ ॥ २९ ॥"[५६]

ह्या दोन श्लोकांवरून असे दिसते की, फरीद शिळीपाकी लाकडासारखी कडक झालेली भाकरी व थोडेसे तोंडी लावणे एवढ्यावर समाधानी होते.[५७] स्वादिष्ट रुचकर भोजनाने व्याधी उत्पन्न होऊन दु:खच सोसावे लागते. पुढे ते लोकांना उपदेश करताना सांगतात, 'अरे जीवा ! तू शिळीपाकी भाकरी खा. त्यावर थंड पाणी प्यावे. त्यातच समाधान मानावे. आपली कष्टाची भाकरीच बरी. दुसऱ्याच्या स्वादिष्ट व भरपूर तूप चोपडलेल्या अन्नाकडे पाहून स्वत:चा जीव दु:खी करू नकोस.'[५८]

**शेख महंमद यांची शिकवण :-**

बाबा शेख फरीद यांच्या उपदेशानुसार जीवाने परमेश्वरास आपल्या अंत:करणातच शोधावे. बाहेर अन्यत्र फिरण्याचे कारण नाही. प्रभू परमात्मा जे देईल त्यात समाधान मानावे. सतत प्रभू परमात्म्याचे स्मरण करावे. मोहमायेपासून सावध राहावे. सर्व जीवांप्रती प्रेमभाव मनात बाळगून त्यांची सेवा करावी. कोणाही जीवास दु:ख देऊ नये. असे केल्याने परमेश्वर प्राप्त होईल. अशा प्रकारे लोकांना सन्मार्गावर आणणारे

बाबा शेख फरीद वयाच्या ९४व्या वर्षी इ.स.१२६६ मध्ये मोहरम महिन्यांच्या पाचव्या दिवशी त्यांचा मृत्यू झाला. श्री गुरूनानक हे शेख बाबा फरीद यांच्यानंतर २०० वर्षांनी जन्मले. शिखांचे पहिले गुरू नानक यांनी आपल्या तिसऱ्या उदासीच्या परीभ्रमणाच्या काळात शेख फरीद यांच्या धर्मपीठावर पीठासीन असलेल्या शेख ब्रम्ह म्हणजेच शेख फरीद यांची भेट झाली व त्यांचेकडून बाबा शेख फरीद यांची वाणी त्यांना प्राप्त झाली. त्यापैकी ११२ श्लोकांचा व ४ पदांचा समावेश श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये करण्यात आला आहे.[५९] बाबा फरीद यांची पदे गुरूग्रंथसाहिब यामध्ये समाविष्ट आहेत.

**२. श्री संत रविदास:-**

संत रविदास महाराज यांचा जन्म बनारस येथे इ.स.१३७६ मध्ये झाला. संत रविदास महाराज यांचा जन्म बनारस जवळील मांडूर या गावी झाला.[६०] संत रविदास यांच्या वडीलांचे नाव रघुरायजी व आईचे नाव कर्मा देवी होते. संत रविदास हे 'चांभार' या जातीचे होते.[६१] संत रविदास यांनी आपल्या जातीचा उल्लेख गुरूग्रंथसाहिबातील एक पदात केला आहे, ते पद पुढील प्रमाणे आहे.

"नागर जनाँ मेरी जाति बिखिआत चंमारं।।"[६२]

संत रविदास यांनी उच्च जातीच्या लोकांद्वारे निम्न जातीच्या लोकांना कशा प्रकारे गैरव्यवहार केला जात होता याचा उल्लेख त्यांनी आपल्या गुरूग्रंथसाहिब यातील पदामध्ये लिहला आहे. संत रविदास यांचे ४१ पदे १६ रागात समाविष्ट आहेत.[६३] संत कबीर यांनी रविदास महाराजांना 'रविदास सन्त' ही उपाधी दिली आहे.[६४] श्री संत रविदास हे स्वामी रामानंदांच्या अत्यंत श्रेष्ठ अशा बारा अंतरंग शिष्यापैकी एक महान संत होते. त्यांचा जन्म काशी क्षेत्रापासून जवळच असलेल्या मंडूर या गावी झाला. ते रई दास, रैदास व रोहिदास अशा विविध नावांनी ओळखले जातात. त्यांच्या जन्माबद्दल एक आख्यायीका आहे, काशी क्षेत्राजवळच श्री गोवर्धनपूर येथे रघुराम व कर्मादेवी हे एक चर्मकार कुटुंब राहत होते.[६५] कच्चे चामडे कमवून त्यापासून जोडे, चाबुक, लगाम, जीन आदी विविध वस्तू बनवून विकणे हा त्यांचा पिढीजात व्यवसाय होता. जुने जोडे आणि चपला दुरुस्त करतांना ते सतत देवाची स्तुती करीत असत. भक्त स्वामी रामानंदजींचे ते शिष्य होते.[६६]

एक दिवस दुरच्या एक गावाहून साहित्य विक्री करून सायंकाळी परत येत असतांना वाटेत एक जंगल होते. त्यास मृगवन म्हणत, तेथे एका बुध्द विहाराच्या खिंडारात रघुरामास एक साधू ध्यानस्थ बसलेले दिसले. रघुरामाने त्यास नमस्कार करून आशिर्वाद मागितला. साधूने त्याच्याकडे खिरीच्या भोजनाची इच्छा व्यक्त केली. दुसऱ्या दिवशी रघुराम व कर्मादेवी खिरीसह सर्व भोजन घेऊन साधूकडे आले व त्यांनी त्यास ताटात भोजन वाढले. साधू तृप्त झाले. त्यानी रघुरामास वर मागण्यास सांगितले. लग्न होऊन बरेच दिवस होऊनही त्यांना मूलबाळ होत नव्हते. त्यांनी आपली ही व्यथा साधूपुढे व्यक्त केली. साधुने सांगीतले, तुम्हास लवकरच एक पुत्र होईल व तो तुमच्या कुळाचे नाव अजरामर करील. असा आशिर्वाद दिला. त्या

आशिर्वादाप्रमाणे त्यांना एक पुत्ररत्न प्राप्त झाले. त्यांचा जन्म मांडूर येथेच झाला असे सांगणारा एक श्लोक रैदास रामायण ग्रंथात दिला आहे, तो खालीलप्रमाणे आहे.

"कासी ढिग मांडूर स्थाना, शुध्द वरण करत गुजराना ||

मांडूरनगर लीन औतार रविदास सुभनाम हमारा ||"

संत रविदासांचा जन्म माघ शु. १५ सवंत १४३३ ह्या दिवशी झाला. त्याबद्दल 'रविदास की भक्ती साधना' ह्या ग्रंथात आहे.

"चोदह सौ तैतीस की. माघ सुदी पंद्रास |

दु:खियो के कल्याणहित प्रगटे श्री रविदास ||"

मूल जन्माला आले पण काही केल्या ते स्तनपान करत नसे. सगळ्यांना चिंता पडली. कर्मादेवी रामानंदांच्या सतसंगास जात असे. तिची रामानंदांवर श्रध्दा होती. तिने रामानंदांना बोलावले. रामानंदांनी रामाचे चरणामृत बाळास पाजले व ताबडतोब बाळ दूध पिऊ लागला. बाळाचा जन्म रविवारी झाला म्हणून त्याचे नात 'रविदास' असे ठेवण्यात आले. संत रविदासांचे माता पिता सात्विक वृत्तीचे होते. हेच संस्कार घेऊन रविदास जन्मास आले होते. त्यामुळे लहान वयातच ते रामभक्ती करू लागले. संत रविदास यांचे वय वाढत असतांना त्याचे रामभक्तीचे वेड वाढतच गेले. तो वारंवार पंचघाटावर स्वामी रामानंदांच्या प्रवचनास जाऊ लागला. वयाच्या सातव्या वर्षीच संत रविदास बहुश्रूत व विद्वान झाला.[६७]

त्याबद्दल संत रविदास दर्शन ग्रंथात खालीलप्रमाणे वर्णन आहे.

"दिन द वडो भयो रविदासा मन मै है हरि का विसवासा |

वरस सात कौ भयो है जब ही नौथा भगति दिढाई तव ही |"

संत रविदासांच्या मनातील प्रभुभक्तीची ओढ दिवसेंदिवस वाढतच होती. ईश्वरप्राप्तीचा मार्ग सापडावा म्हणून गुरू करणे आवश्यक आहे हे जाणून ते स्वामी रामानंदांकडे गेले. पण रामानंद आपणास स्वीकारतील का ही शंका त्यांच्या मनात होती व तसे त्याने रामानंदांना सांगितले होते. रामानंद त्यास म्हणाले, "अरे कसली जात घेऊन बसलास ? तू चांभार नाहीस. तू शुद्र नाहीस. तू तर माझा बंधू आहेस. सहोदर आहेस." ह्यावर संत रविदास आनंदित झाला व त्याने रामानंदांना त्यास अनुग्रह देऊन आपला शिष्य करून घ्यावे अशी प्रार्थना केली. रामानंदांनीही त्यास विधीवत दीक्षा देऊन त्यास "ओम रामायनम:" हा षडाक्षरी मंत्र दिला. ह्यासंबंधी भक्त रत्नावलीमध्ये खालीलप्रमाणे उल्लेख आढळतो.

"रामानंद मोहि गुरू मिल्यो माया ब्रम्ह विसास |

राम नाम अमि रस पियौ रविदासहि भयौ पलास ||

र (ऊं) राम मुहि गुरू रामा दिन्हौ नहि इह मंत्र विसाराउ ||"

आता रविदास पूर्णपणे राममय झाला. त्याने धंद्यात लक्ष घालावे, नीट संसार करावा म्हणून रघुरामांनी रविदासाचे लग्न 'लोना' ह्या मुलीशी झाला. दुकानात बसावयास लावले. संत रविदासही दुकान चालवू लागले. जोडे शिकवू लाकले. मुखाने प्रभुनामाचा उच्चार करावा व हाताने काम करावे असा नित्यनेम सुरू झाला. ते जोडे घेणारा ग्राहक जे दाम देईल ते घेत असत. एवढेच नव्हे तर रस्त्याने कोणी साधू बैरागी अनवाणी दिसला तर त्यास ते दूकानात घेऊन त्याच्या पायात जोडे घालीत. त्याचे ते पैसेही घेत नसत. ह्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. धंदा आपबट्ट्या जाऊ लागला. अखेर वडिलांनी त्यांना घरातून बाहेर काढले. रविदास व लोना आता जवळच एका झोपडीत राहू लागले. आता तर त्यांना सर्व दिशा मोकळ्या झाल्या. त्याची ईश्वरभक्ती अशा प्रकारे वाढतच गेली.

एकदा एक साधु रविदासांकडे आला. त्याचे अठरा विश्वे दारिद्रय पाहून त्याला रविदासाची कीव आली. त्याने त्यास परीस देऊ केला. रविदासाने तो घेण्याचे साफ नाकारले. रविदासांनी सांगितले, "मी आहे ह्यात सुखी आहे. मला सोन्या-नाण्याची गरज नाही. मला सद्‌गुरूरूपी परीस प्राप्त झाला आहे. माझ्या मानवजन्माचे सोने झाले आहे." ते म्हणतात, "माधव पारसमणो लइ जाउ | मोहे सोनका नही चाऊ || परम पारस गुरू भेटिओ पुरब लिंपत लिलाट ||" शेवटी त्या साधुने तो परीस रविदासांच्या झोपडीच्या वळचणीस खोचून ठेवला. पुढे कित्येक महिने उलटून गेले. तो साधू परत रविदासाकडे आला. रविदासाने तो स्विकारला नाही. साधू परीस घेऊन गेला. पण दुसरे दिवसापासून एक नवीनच प्रकार सुरू झाला. संत रविदासांच्या देवघरातून देवाच्या आसनाखाली रोज पाच सुवर्णमुद्रा निघु लागल्या. संत रविदास बावचळून गेले. पण एक दिवस त्यांना स्वप्नात प्रत्यक्ष भगवंतांनी दर्शन देऊन त्यांनी रविदासास त्या मोहोरा स्वीकारण्याचा आदेश दिला. संत रविदासांनी ईश्वरी आदेश मानला पण आपल्या प्रपंचासाठी ते त्यातला एक पैसाही खर्च करत नसत. आपल्या चरितार्थासाठी त्यांनी आपला जोडे शिवण्याचा धंदा चालूच ठेवला व निघणाऱ्या मोहरा सार्वजनिक कार्यार्थ खर्च करण्यास सुरूवात केली. त्या धनातून त्यांनी एक सुंदर मंदिर बांधले. त्यालगत एक सत्संग भवन निर्माण केले व तेथे साधु-संतांच्या निवासाची व भोजनाची व्यवस्था केली. ह्या गोष्टीमूळे रविदासांची कीर्ती दूरवर पसरली व त्यांच्या सतसंगास अलोट गर्दी जमू लागली. संत रविदास हे भक्त स्वामी रामानंदजींचे ते शिष्य होते. त्यांच्या उच्चभ्रू शिष्यांमध्ये प्रसिध्द संत व भक्त मीराबाई मेधतची राजकन्या व मेवाडची राणी होती. तिच्या सासुबाई झालाबाई या सर्वांना माहीत होत्या. आरंभी ते सगुणोपासक होते. नंतर त्यांच्या प्रभावामुळे ते निर्गुणाचे उपासक झाले. त्यांचे एकेचाळीस पदे अथवा अभंग श्री गुरूग्रंथसाहिबा मध्ये समाविष्ट आहेत.[६८]

संत रविदासांची ही लोकप्रियता उच्चवर्णीयांना बोचू लागली. त्यांनी काशीराजाकडे तक्रार केली. राजाने न्यायसभा बोलावली. ब्राम्हण म्हणाले, "रविदास चांभार आहे. त्यास ईश्वरभक्ती करण्याचा वा

ईश्वरपूजा करण्याचा अधिकार नाही." त्यावर रविदास शांत चित्ताने उतरले, "महाराज सारे जीव ईश्वराचीच लेकरे आहे ना ? मग त्यात हा उच्च-निच असा भेदभाव करणे बरोबर आहे का ? साऱ्यांचीच शरीरे पंचमहाभूतांपासून बनली आहेत ना ? मग त्यात भेदाभेद का ? सूर्य सर्वांनाच प्रकाश देतो. वायू सर्वांसाठी वाहत असतो. माझ्या गुरूने मला असे शिकवले आहे की, प्रभू दरबार सर्वांसाठी खूला आहे. यजुर्वेदात सांगितले आहे की, शुद्राची उत्पत्ती प्रभुचरणातून झाली. त्याचे चरणामृत आपण प्राशन करतो मग केवळ चर्मकाराचे पोटी जन्म घेतला म्हणून मी अपवित्र कसा ? नीच कसा ? वास्तविक जो रामनामाचा उच्चार करत नाही तोच नीच होय."

संत रविदासांचे हे सडेतोड व विद्वतापूर्ण भाषण ऐकून काशीराजा प्रभावित झाला व त्याने संत रविदासास आपल्या शेजारी उच्चासनावर बसण्याची विनंती केली. नंतर शास्त्रार्थ सुरू झाला. ब्राम्हणांच्या प्रत्येक मुद्याचे संत रविदासाने यशस्वीपणे खंडन केले. पण ब्राम्हण आपली हार मान्य करीनात. आता त्यांनी नवीनच मुद्दा काढला. ते म्हणाले, रविदास स्वत:स श्रेष्ठ भगवत भक्त म्हणवतो ना ? मग त्याने भगवंताची प्रार्थना करून त्यास येथे प्रत्यक्ष प्रगट करून दाखवावे. असे केल्यास आम्ही त्याची पालखी वाहू. तसे न केल्यास त्याने आपली भगवत भक्ती सोडून आमची सेवा करावी."[६९]

संत रविदास नम्रतेने म्हणाले, "हे पंडितहो ! तुम्ही सर्वज्ञ आहात असा हट्ट धरू नका. असे करणे म्हणजे माझी परीक्षा नव्हे तर प्रत्यक्ष भगवानाचीच सत्वपरीक्षा पाहण्यासारखे आहे." तरीही ब्राम्हण आपला हट्ट सोडीनात शेवटी संत रविदासांनी ईश्वराची प्रार्थना करावयास सुरूवात केली. "हे प्रभू ! तुला भक्तवत्सल म्हणतात. तूच भक्तांच्या प्रतिष्ठेचे रक्षण करतोस असे म्हणतात. आता तूच तुझे हे ब्रीद सांभाळ." एवढे बोलून ते प्रभुभजनात रंगुन गेले. त्यांना देहभान राहिले नाही. ते प्रार्थनेत प्रभूशी एकरूप झाले आणि इकडे चमत्कार झाला. प्रत्यक्ष भगवंत राज दरबारात प्रगट झाले. त्यांचे प्रखर तेज पाहून सगळ्यांचे डोळे दिपले. ब्राम्हणांनी हार पत्करली. संत रविदासांचा जयजयकार केला व पालखीत बसवून काशीनगरीत त्यांची मिरवणूक काढण्यात आली. स्वत: काशीराजाने पालखी वाहून गेली. आता संत रविदासांची कीर्ती दशदिशात पसरली.

चितोडच्या राणा संग यांची पत्नी राणी अत्यंत धार्मिक वृत्तीची होती. गुरूशिवाय ज्ञान नाही. गुरूविणा साधना अपूर्ण आहे. हे जाणून गुरूप्राप्तीच्या इच्छेने ती काशीक्षेत्री आली. तेथे तिने रविदासांचा महिमा ऐकला. संत रविदासांच्या दर्शनासाठी ती गोपाळ मंदिरात गेली. तेथे रविदासांचे कीर्तन ऐकून तिला अध्यात्मिक आनंद झाला. हेच आपले गुरू अशी तिची मनोमन खात्री पटली. तिने त्यांच्या पाया पडून आपणास शिष्य करून घेण्याची विनंती केली. संत रविदासांनी तिला आपल्या पतीची परवानगी घेऊन

येण्यास सांगितले. त्याप्रमाणे इ.स.१५१० साली राणीने राणासंगाची अनुज्ञा प्राप्त केल्यावर 'देवठणी एकादशी' ह्या दिवशी तिला विधीवत दीक्षा देऊन रविदासांनी तिचा आपली शिष्या म्हणून स्वीकार केला.

काही काळ गेल्यावर राणीच्या आग्रहावरून संत रविदास चित्तोडला गेले. राणीने त्यांचे राजवैभवाला साजेल असे स्वागत केले. गुरूच्या स्वागतासाठी एक खास भोजनाचा कार्यक्रम आयोजित केला. पण ब्राम्हणांनी चांभाराच्या पंक्तीस बसण्याचे साफ नाकारले. तडजोड म्हणून ब्राम्हणाशेजारी संत रविदास भोजन करताना दिसू लागले. ब्राम्हण बावचळून गेले. खात्री करून घेण्यासाठी त्यांनी दुसऱ्या पंक्तीत डोकावून पाहिले. तेथेही त्यांना राणासंग व राणी यांच्याबरोबर रविदास भोजन करताना दिसले. त्यांना संत रविदासजींचा अधिकार कळून आला. ते रोहिदासास शरण गेले.

इ.स.१५१६ साली राणासंग व राणी झाली यांचा ज्येष्ठ पुत्र कुवरसिंह यांच्याशी मीराचा विवाह झाला. राणी झाली ही संत रविदासाची शिष्या झाली.[७०] संत रविदासांची कीर्ती दिल्लीचा बादशहा सिकंदर लोदीच्या कानावर गेली. संत रविदास इस्लाम धर्मावरही टीका करतो. त्यामुळे इस्लाम धर्म धोक्यात आला आहे. काहीतरी जालीम उपाय करा. असाही दरबारी लोकांनी व मुल्ला मौलवींनी तगादा लावला. संत रविदासांना कैद करून दिल्लीस नेण्यात आले व बादशहाने त्यास मुसलमान होण्यास सांगितले. संत रविदासांनी त्यास साफ नकार दिला. बादशहा म्हणाला, "अरे गोसावड्या, माझी सत्ता साऱ्या जगावर चालते. माझ्या हुकूमाची अवज्ञा करतोस, पाहतो आता तुला कोण वाचवते." तेव्हा संत रविदास म्हणाले, "महाराज साऱ्या जगावर आपली सत्ता चालते हा आपला भ्रम आहे. साऱ्या जगावर माझ्या प्रभू परमात्म्याची सत्ता चालते. तोच माझे रक्षण करील." बादशहा संतापला त्याने रविदासांस हाल हाल करून ठार मारण्याचा आदेश दिला. संत रविदासांना तुरूंगात डांबण्यात आले. संत रविदास आसनस्थ होऊन प्रभुनामात दंग होऊन गेले.

इकडे नमाजाची वेळ झाली. बादशहा व त्याचे मुसलमान सरदार नमाज पढू लागले. तेव्हा त्यांना सर्वत्र रविदास दिसू लागले. सिकंदर लोदी फार घाबरला आणि त्याच वेळी आकाशवाणी झाली, "हे अज्ञानी दुष्ट राजा ! माझ्या श्रेष्ठ भक्तास, रविदासास तू का छळत आहेस. त्यास शरण जा. नाहीतर मी तूझा सर्वनाश करीन, ताबडतोब त्याला सोडून दे." राजा रविदासांच्या पाया पडला व त्याने त्यास मुक्त केले. संत रविदास चितोडगडावर गेले. आता ते वृध्द झाले होते. आपले जीवितकार्य पूर्ण झाले आहे असा त्यांना साक्षात्कार झाला. वयाच्या १५१ व्या वर्षी सवंत १५८४ म्हणजेच इ.स.१५२७ साली मध्ये चित्तोडगड येथे त्यांनी आपला देह ठेवला व तयांचा आत्मा परमात्म्यात एकरूप झाला.[७१] काहींच्या मते ते काशीमध्येच समाधिस्त झाले.

**संत रविदासांची शिकवण :-**

संत रविदासाच्या मते हा मानवजन्म पूर्वपुण्याईने प्राप्त होतो. मानवजन्माचा उद्देश परमेश्वर प्राप्ती हा आहे. पण माणूस ते विसरून सांसारिक विषयभोगात दंग होऊन आपले आयुष्य वाया घालवतो. ज्याच्यावर प्रभूची कृपा होते, तो प्रभुभक्तीत रंगून जातो व जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होतो.

संत रविदास सांगतात,

"जनम जात मत पूछिऐ का जात अरू पात |
रविदास पूत सभ प्रभ के कोउ नहिं जात कुजात ||
जात प्रांत के फेर भंहि उरझि सहइ सभ लोग |
मानुषता कुं खात हइ रविदास जात कर रोग ||"

कोणासही तू कोणत्या जातीचा आहेस हे विचारू नकोस. अरे कसली आहे जात अन् पात, असा भेदभाव करू नये. सारे जण त्या एकमात्र प्रभू परमात्म्याचीच लेकरे आहेत. कोणीही उच्च जातीचा वा नीच जातीचा नाही.

"रविदास ब्राम्हण मति पुजिए जउ होवै गुनहीन |
पूजिही चरन चांडाल के जउ होवै गुन परवीन ||
पंचदोष तजि जो रहई संत चर लवलीन |
रविदास ते ही नर जानई ऊंचह अनु कुलीन ||"

रविदास सांगतात, गुणहीन भ्रष्ट ब्राम्हणाची पूजा करू नका. गुणवाण चारित्र्यवान जरी तो चांडाळ हीनकुळात जन्मलेला असला तरी त्याची पूजा करा. ज्याने पंचदोषांचा त्याग केला आहे, जो संतचरणी लीन झाला आहे तोच खरा उच्च जातीचा व कुलीन समजावा. जन्माने कोणीही उच्च किंवा नीच्च कुलीन नसतो.[७२] ईश्वरप्राप्तीसाठी रानावनात जाण्याची आवश्यकता नाही. तो सर्वव्यापी राम प्रत्येकाच्या ह्रदयातच आहे. तेथे त्याचा शोध घ्या.

"गिरी बन काहे खोजन जाई घट अभि अन्तर भोजहु भाई |

ज्याप्रमाणे फुलातच सुगंध वास असतो त्याप्रमाणेच सर्व जीवांचे ठाई राम वास करतो.

पुहुप मधे ज्युं बास बसत है त्युं सब घट रमहि रघूराई ||"

रविदासांनी बाह्य देखावा, कर्मकांड आदी गोष्टींवरही खूप टीका केली आहे व अशाने परमेश्वर प्राप्ती होत नाही असेही ते ठनकावून सांगतात. संत रविदास म्हणतात,

"देता रहे हज्जा बरस मुल्ला चाहे अजान
रविदास खुदा नंह मिल सकइ जौ लौं मन शैतान ||
माथे तिलक हाथ जप माला जग ठगने कूं स्वांग बनाया |

मारग छांडी मुमारग डहकै सांची प्रीत बिनु राम न पाया ॥"

हे मुल्ला तू हजार वर्षे जरी नमाज आदा केलास, तरी जोपर्यंत तुझ्या मनात कपट करास्थानरूपी सैतान वास करत आहे तोपर्यंत तुला खुदा भेटणार नाही. अरे पंड्या ! तू कपाळी टिळा लावून, हाती जपमाळ घेऊन भक्तीचे ढोंग करून जगास फसवू शकशील पण खरी श्रध्दायुक्त अंत:करणाने भक्ती केल्याशिवाय तुला राम प्राप्त होणार नाही. जसे जीव कर्म करतो तसे फळ प्राप्त करतो. म्हणून सत्कर्म करा, वासना सोडून हरिभजन करा. रविदास पुढे सांगतात, "हरि के नाम बिनु झूठे सगल पसारे |" प्रभुनामाखेरीज अन्य सारे कर्मकांड खोटे आहे. म्हणून जीवाने अहर्निश, रात्रंदिवस नामस्मरण केले पाहिजे. मनाला प्रभूपासून दूर नेणाऱ्या सर्व गोष्टींचा त्याग केला पाहिजे. जेव्हा मन प्रभूच्या नामस्मरणात एकरूप एकरस होऊन जाते, तेव्हा त्याच्या अंतरातील प्रभुपरमात्म्याची परमज्योत प्रकाशमान होते. प्रभुप्राप्तीसाठी साधुसंतांची संगत धरावी. संत रविदास सांगतात, "चलत-हलत-बैठत-उठत धरि हुं तुमरी ध्यान." हे प्रभू ! सदा येता-जाता-उठता-बसता-मी तूझेच ध्यान करतो. अखेरीस रविदास सांगतात.

"पीआ राम रसु पीआरे ॥ टेक ॥

पीवत पीवत आपा जग भुला हरि रस माहि बौरानारे ॥"

मी रामनामरूपी अमृत प्राशन केल्याने मला सांसारिक मोहमायेचा विसर पडला व मी हरिरसात गुंगून गेलो. एकरूप झालो आहे.[७३]

अशा या महान प्रभुभक्ताबद्दल संत कर्मदास म्हणतात,

"सुमंत्र रविदास वचनं कोटि दोष विचनाशनम |

रविदासचरणं ध्यान धरणं कुल समूह उध्दारणम् ॥"

संत रविदासांचे प्रत्येक वचन हे सुमंत्रासमान आहे. हे मंत्र कोटी कोटी दोषांचा विनाश करणारे आहेत. जो संत रविदासांच्या चरणांचे ध्यान करतो, त्याच्या संपूर्ण कुळाचा उध्दार होतो.

**३. संत नामदेव**

भक्त नामदेवजींचा जन्म महाराष्ट्रातील हिंगोली जिल्ह्यातील नरसी या गावी झाला. संत नामदेव यांचा जन्म इ.स.१२७० मध्ये झाला. संत नामदेव हे 'शिंपी' ह्या जातीचे होते.[७४] संत नामदेव यांच्या वडीलांचे नाव दामाशेठ व आईचे नाव गोनाबाई होते. दामाशेठ हे परमेश्वराची भक्ती करत असत. त्यांचे वडीलांच्या धार्मिक वृत्तीचा त्यांच्यावर खूप प्रभाव पडला.[७५] वेगवेगळ्या यात्राहून परततांना ते पंजाबमधील गुरदासपूरमधील घुमान या गावात काही काळ राहिले.[७६] कैवल्याचा पुतळा श्री ज्ञानदेवांनी वारकरी संप्रदायाचा पाया घातला, तर तुकाराम महाराजांनी त्यावर कळस चढवला. संत नामदेव महाराजांनी आपल्या अंगच्या संघटन कौशल्याने त्या मंदिराची उभारणी केली. एवढेच नव्हे तर हा भक्तीमार्ग श्री गुरू

नानकदेवांच्या पूर्वी संपूर्ण उत्तर भारतात व प्रामुख्याने पंजाब प्रांतात प्रचार व प्रसार केला. हे त्यांच्या जीवनातील महत्वपूर्ण कार्य होय. विसोबा खेचर हे संत नामदेव महाराजांचे गुरू होते.[७७] गुरू नानकदेवांनी देशातील ज्या प्रदेशात विशेषत्वाने प्रवास केला, जनताजनार्धनाच्या भेटीगाठी घेतल्या त्या ठिकाणी संत नामदेवही गेलेले होते. किंबहुना संत नामदेवरायांनीच गुजरात, राजस्थान, पंजाब, वायव्य भारतीय प्रदेशातील जनतेशी जवळीक साधून तेथे प्रथम विशुध्द धर्मविचारांची पेरणी केली होती. त्यांच्यानंतर हेच कार्य संत कबीरदासांनी केले. त्यांच्या निर्वाणानंतर नानकदेवांनी हा वारसा अधिक समर्थ आणि संपन्न केला. मोठ्या शक्तियुक्तीने केला.[७८]

संत नामदेव महाराजांचे काही अभंग खालीलप्रमाणे आहेत.

"नामा म्हणे तये कीर्तनाची गोडी । घालीतसे उडी नेटेपाट ।।"[७९]

संत नामदेव वरील अभंगात म्हणतात की, देवाला कीर्तन, नामसंकीर्तन अत्यंत प्रिय असते, त्याची त्यास गोडी आहे. त्यामुळेच तो परमात्मा लागलीच भक्ताच्या भेटीला धावून येतो.

"नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । असत्य केशवा वचन होता ।। ३ ।।"[८०]

संत नामदेव महाराज म्हणतात की, मी माझी स्वत:ची जीभ उतरून देईन. सारांश, श्री विठ्ठलेशाचे नामसंकीर्तन केले तर भक्ताच्या कुळांत तो प्रत्यक्ष विठ्ठल देव वास करतो व त्या भक्तांच्या उध्दारासाठी धावत येऊन आत्मत्वानें दर्शन देतो, याच्या सत्यतेची खात्री बाळगा.

"पुत्रभावे स्मरण केले। तया वैकुंठासी नेले।।"[८१]

संत नामदेव महाराज वरील अभंगात म्हणतात की, अजामेळ हा खरे तर नामधारक, नामभक्ती करणारा भक्त नव्हता. परंतु त्याच्या मुलाचे नाव नारायण असे देवाचे होते. त्यामुळे मुलाला बोलवीत असताना आपोआपच परमेश्वराचे नाम घेतले जायचे. आणि न कळत देवाच्याच नावाचा जप झाल्यामूळे त्याला वैकुंठ प्राप्ती झाली.[८२] म्हणजेच नामाचा महिमा असा मोठा आहे आणि ते हे नामभक्ती महात्म्य जाणून घेणे आवश्यक आहे. गुरूग्रंथातील सुधारक, पुरोगामी, परिवर्तशील, अंधश्रध्दारूढीविरोधी समाजजागरणविषयक चैतन्याचे प्रथम श्रेय अर्थातच संत नामदेवरायांना द्यावे लागते.[८३]

"नामा म्हणे सर्व राम हाचि भाव । नाही आणिक देव रामेविण ।। ४ ।।"[८४]

संत नामदेव महाराज म्हणतात की, तो नाम-भक्तांना ज्ञान देऊन संसार सागरातून उध्दार करून त्याचे जीवन सफल व परिपूर्ण करतो. ही नामभक्ती हे अत्यंत सोपे साधन आहे. वाणीने देवाचे नाम घेत राहणे, एवढेच त्यासाठी करावे लागते. त्यामुळे सहजासहजी परमात्म्याची प्राप्ती होते. आणि जन्मजन्मांतरीच्या व्याधी ह्या नामाने नाहीशा होतात.

"नामसंकीर्तन नित्य नाम वाचे । दहन पापांचे एका नामे ।। २ ।।"[८५]

संत नामदेव वरील अभंगात सांगतात की, नामसंकीर्तनाने मात्र पापाचे ताबडतोब दहन होते.[८६] म्हणजेच एका नामाचे जर पापाचा नाश होत असेल तर मग इतर साधनांचा करून त्यात दोष राहिल्यास प्रायश्चित घेण्यापेक्षा सोप्या नामाचा अवलंब करणे केंव्हाही योग्यच ठरेल. असा जो नामधारक आहे तो फार पुण्यवान आहेच, पण त्याच्यासारखा दुसरा परमात्मप्राप्तीचा योग्य व उत्तम अधिकारी नाही.

"विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होईल तुम्हा ।। २ ।।"[८७]

संत नामदेव महाराज म्हणतात की, मुखाने विठ्ठल विठ्ठल म्हणा. हा उघडा मंत्र म्हणा- हा मंत्र उघडा आहे. कारण, तो कोणीही घेतला तरी चालतो वेदातील काही मंत्र असे आहेत की, ते कोणीही म्हणून चालत नाही. केव्हाही म्हणून चालत नाही. प्रत्येक मंत्रोच्चाराला नियम आहेत. त्यानुसारच त्याचे पठण होणे गरजेचे आहे, पण या नाममंत्राला मात्र कोणत्याच प्रकारचे बंधन नाही म्हणून हा उघडा विठ्ठल मंत्र सतत म्हणा. या मंत्राच्या पठणाने, नामजपाच्या मुळे कळिकाळ म्हणजेच मृत्यू देखील नामधारकाचा अंकित राहिल. उदा. गायत्रीमंत्राचे पठण करावयाचे झाल्यास ते शास्त्रात सांगितलेले जे नियम आहेत. त्या स-स्वर स्वरूपांतच करावयास हवे. भक्ती सिध्दीचे नाम-बीज वा बीज-नाम-भक्ती श्री केशवराजांनपी मजला दिले आहे, असे संत नामदेव महाराज सांगतात.

गुरू अमरदास सिरी रागात संत नामदेव यांचे वर्णन पुढील प्रमाणे करतात, "नामा छीबा कबीरू जुलाह्य पूरे गुर ते गति पाई ।।"[८८]

गुरू रामदास जी यांनी सूही रागात संत नामदेव यांचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे, "नामदेव प्रीती लगी हरि सेती लोकु छीपा कहै बुलाइ ।। खत्री ब्राह्मण पिठि दे छोडे हरि नामदेउ लीआ मुखि लाइ ।।"[८९]

संत नामदेव यांनी वेगवेगळ्या चार भक्ती यात्रा केल्या त्यांनी २० वर्षे पंजाबमधील गुरदासपूर जिल्ह्यातील घुमाण याठिकाणी वास्तव्य केले. त्यांच्या कार्यामुळे घुमाण येथील गुरूद्वाऱ्याला संत नामदेव यांचे नाव देण्यात आले. संत नामदेव यांचा मृत्यू इ.स.१३५० मध्ये पंढरपूर येथे झाला. संत नामदेवांचे ६१ पदे १८ रागात शीख धर्मग्रंथ श्री गुरूग्रंथसाहिब यात समाविष्ट आहेत.[९०] संत नामदेवांच्या एकूण भावविश्वावर ज्ञानदेवांच्या अलौकीक व्यक्तीमत्वाचा प्रभाव होता, असे नामदेवांच्या अनेक अभंगातून दिसून येते. ज्ञानदेव आणि नामदेव यांची भेट हा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील एक अपूर्व योग मानावा लागेल. 'प्रवरेच्या तीरावर उदयास आलेले ज्ञान भीवरेच्या तीरावरील भक्तीशी एकरूप झाले' आणि ज्ञानोत्तर भक्तीची परंपरा उदयास आली. संत नामदेवांची गुरूपरंपरा निराळी सिध्द झाली, तरी त्यांच्या व्यक्तिमत्वाची घडण ज्ञानदेवांच्या सहवासात झालेली दिसून येते. त्यांच्या अनेक उक्तींतून ज्ञानदेवांच्या अवतारकार्याचे वर्णन आलेले आहे.[९१] भक्तीयोग ही वारकऱ्यांना ज्ञानदेव-नामदेवांकडून प्राप्त झालेली जीवननिष्ठा होय.[९२] संत नामदेवांनी ज्ञानदेवादी भावंडांचे चरित्र आदि, तीर्थावळी आणि समाधी या तीन ओवीबध्द प्रकरणांत गोवले आहे. ज्ञानदेवांचे पहिले चरित्रकार नामदेव आहेत.[९३] संत नामदेव हे कीर्तनकार

होते. संत नामदेवांच्या इतर अभंगातून त्यांच्या साधक जीवनातील प्रबळ अशा मनोवृत्तींचा उत्कट आविष्कार झाला आहे. भूतकालातील जीवनाबद्दल अनुताप आणि परमात्म प्राप्तीची उत्कंठा त्यात तीव्रतेने व्यक्त होते, परमात्म प्रेमाच्या विविध भावछटा विविध भूमिकांतून सहजपणे व्यक्त होतात. कारूण्य, वात्सल्य, औदासीन्य, विरोध, माधुर्य, इत्यादी भाव व्यक्त करणारे त्यांचे अभंग आत्मनिष्ठ भावकाव्याचे उत्तम उदाहरण ठरतील. ज्ञानदेवांसारख्या उत्कट आणि भव्य कल्पनांच्या भराऱ्या त्यात नसतील मात्र भावकोमल अंत:करणात उमटणाऱ्या तरंगाकारांचे सौंदर्य मात्र उत्कटत्वाने जाणवते.[९४] संत नामदेवांची भक्ती तंत्रनिष्ठेपासून, विधिनिषेधापासून अलिप्त होती.[९५] 'नामस्मरण' हे त्यांच्या भक्तीमार्गाचे मर्म होय. नामाचे महत्व त्यांना इतके वाटते, की ते परमेश्वरास म्हणतात, लपलासी तरी नाम कोठे नेसी । आम्ही अहर्निशी नाम गाऊ. वारकरी संप्रदायाचा हा नाममहिमा त्यानी पंढरी ते थेट पंजाबपर्यत उत्तरेकडे गायिला. ज्ञानदेवांनंतर आपली ५४ वर्षाची हयात त्यांनी भक्तीमार्गाचा प्रचार करण्यात घालविली.[९६] पंजाबात घुमान या गावी त्यांचे स्मारक असून पंजाबातील बहुतेक शिंपी आपणास नामदेव शिंपी म्हणवून घेतात. पंजाबात उत्तरेकडे भक्तिमार्गाचा प्रसार करीत असतांना, तेथील भाषेत त्यांनी जी काव्यरचनास केली, त्यांतील ६१ पदे शीखांच्या ग्रंथसाहिबात समाविष्ट झाली आहेत. नाममहिमा हा वारकऱ्यांच्या भक्तीचा गाभा आहे.[९७] पंजाबात त्यांच्या संचाराच्या अनेक प्रभावखुणा विद्यमान असून, घुमानचे प्रतिक समाधी मंदीर हे त्यापैकी सर्वाधिक महत्त्वाचे आणि एक ठोस प्रमाण ठरते.[९८]

"नामा म्हणे ह्रदयी सदा। राम कृष्ण हाचि धंदा।

हेचि एक सत्यसार । हाचि जप जपतसे ।।" - नामदेव[९९]

**४.संत कबीर**

संत कबीर यांचा जन्म इ.स.१३९८ मध्ये झाला. उत्तर प्रदेशातील बनारस याठिकाणी त्याचा जन्म झाला. उत्तर प्रदेशातील वाराणसी येथील नीरू आणि नीमा या विणकर दाम्पत्याने भक्त कबीर यांचे पालन-पोषण केले.[१००] कुणी म्हणतात कबीराने एका ब्राम्हण विधवा स्त्रीच्या पोटी जन्म घेतला होता. पण त्याला भक्कम आधार नाही. त्यांनी लहानपणीच ज्यू आणि मूस्लिम लोकांची महत्वाची मानली गेलेली 'सुंता' ह्या पध्दतीला नकार दिला होता.[१०१] संत कबीर यांचा जन्म झाला त्यावेळी भारतातील समाज हा धार्मिक आणि सामाजिक अशा दोन श्रेणी मध्ये विभागला होता. संत कबीर यांचे वयाच्या २२ व्या वर्षी 'लोई' या मुलीशी लग्न झाले. धर्मांमध्ये फूट पाडणाऱ्या रुढी परंपरांचा त्यांनी जोरदार निषेध केला होता. ते भक्त स्वामी रामानंदाचे अनुयायी होते.[१०२] जीवन निर्वाहासाठी त्यांनी विणकरांचा धंदा चालू केला. त्यांच्या अनुयायांना पुढे 'कबीरपंथी' नाव पडले. संत कबीर यांचा मृत्यू इ.स.१४९५ मध्ये झाला. संत कबीर यांच्या प्रमुख रचना बावन अखरी, सत वार, थिंती इ. आहेत.[१०३] त्यांचे पाचशे एकेचाळीस अभंग श्री गुरूग्रथंसाहिबा मध्ये समाविष्ट आहेत.

त्यांच्या अभंग अथवा पदांचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.

जोपर्यत मनामध्ये स्वर्गाची इच्छा आहे तोपर्यत देवाच्या पायापाशी ते कधीही स्थिर होणार नाही. कबीर म्हणतात मी हे कसे समजावून सांगू की, स्वर्ग हा भक्तांच्या संगतीत आहे.[१०४]

दुसऱ्यांच्या मृत्यूचा शोक का करतो ? तुम्ही स्वत: कुठे जिवंत राहणार ? तुम्ही जर जिवंत राहणार असाल तर आणि तरच तुम्ही शोक करा.[१०५]

कबीर म्हणतात देवाच्या भक्तांपेक्षा तीर्थक्षेत्र जास्त श्रेष्ठ झालेले पाहून मी दु:खी झालेलो आहे.[१०६]

गुरू अमरदास सिरी रागात संत नामदेव व कबीर यांच्या बद्दल वर्णन पुढील प्रमाणे करतात,

"नामा छीबा कबीरू जुलाह्य पूरे गुर ते गति पाई ।।"[१०७]

**५. भक्त धन्ना :-**

भक्त धन्ना यांचा जन्म एका गरीब जाट कुटुंबात इ.स.१४१५ साली झाला. भक्त धन्ना यांचा जन्म शेतकरी परीवारात झाला. त्यांचे वडील शेती करून आपल्या कुटुंबाचे भरण पोषण करत असत.[१०८] धन्नाचे आईवडील धार्मिक वृत्तीचे होते. सकाळी उठून देवदर्शन करून, साधुसंतांचे दर्शन करून आपापल्या उद्योगाला लागत. हेच संस्कार बाल धन्नावर होत होते. त्यामुळे तोही धार्मिक वृत्तीचा झाला होता.

एकदा लहानग्या धन्नाने एका ब्राम्हणास शाळिग्रामाची पूजा करताना पाहिले. त्याने ब्राम्हणाकडे पूजेसाठी शाळीग्राम मागितला. मुलाची समजूत काढण्यासाठी त्याने शेजारी पडलेला एक दगड धन्नास दिला खुप आनंद झाला. दगड घेऊन तो घरी आला. एका कोपऱ्यात एक झाडाखाली त्याने त्याची शाळिग्राम म्हणून स्थापना केली. जवळच्याच झाडाची पाने तुळशीपत्रे म्हणून तो त्या दगडावर वाहत असे. त्यास भाकरीचा नैवेद्य दाखवत असे. पण दगडाचा देव भाकरी थोडाच खाणार. तो देवाला मनोभावे सांगू लागला, हे देवा ! तू माझा नैवेद्य का भक्षण करत नाहीस ? मी लहान म्हणून ? की मी हीन जातीचा म्हणून ? काहीही असो. तू माझा नैवैद्य भक्षण केल्याशिवाय मी ही अन्नग्रहण करणार नाही. त्याने जेवणखाने सोडले. सतत तो नामस्मरण करू लागला. आईवडिलांना काळजी वाटू लागली. अखेर परमेश्वराला त्याची दया आली. एक दिवस शाळिग्राम त्याच्यासमोर प्रगट झाले. त्याने त्याच्याकडून भाकरी घेऊन खाण्यास प्रारंभ केला. अर्धीअधिक भाकरी खाऊन झाली आणि एक नवल घडले. धन्नाने भगवंताला हात धरला व म्हणाला, देवा किती रे तू अप्पलपोटा ! तू माझा नैवेद्य स्वीकारण्यास म्हणून मी इतके दिवस उपाशी राहिलो पण आत्ता भाकरी खाताना तुला माझी दया आली नाही ना ? मलाही दोन घास भरवावेत असे सुध्दा तुला वाटले नाही ना ? धन्नाची ही अनन्य भक्ती पाहून देव प्रसन्न झाला. त्याने उरलेली भाकरी धन्नास आपल्या हाताने भरवली. अशा प्रकारे धन्य तो भक्त धन्ना आणि धन्य त्याची भक्ती. आता भक्त व देव मित्र झाले. एकमेकांची सखे झाले. आनंदाने एकमेकांच्या संगतीत नाचू बागडू लागले.

एकदा धन्नाच्या वडिलांची धन्नास जवळच असलेल्या शेतात पेरण्यासाठी गव्हाची मोटळी देऊन त्यास पेरणी करण्यास जाण्यास सांगितले. वडिलांनी सांगितल्या प्रमाणे धन्ना पेरणी करण्यासाठी निघाला.

वाटेत त्याला साधुसंताचा जथा दिसला. त्यांनी त्याच्याकडे भिक्षेची याचना केली. धन्नाने आपल्या जवळची गव्हाची मोटळी टाकली त्या सांधूना देऊन टाकली व पुढे निघाला. शेतात पोहेचला. परंतु त्यानी पेरणीसाठी असलेली धान्य साधुसंतांना वाटले. धन्ना याने कोणतेही धान्य नसतांना पेरणीसाठी सुरूवात केली. आणि आश्चर्य संपूर्ण शेतात गव्हाचे पीक चांगल्याप्रकारे आले. त्यावर्षी त्यांना त्या पिकांचे अमाप उत्पन्न झाले. हे म्हणजे पुण्य कर्माचे परमेश्वराने दिलेले फळ होते.[१०९]

धन्ना आता मोठा झाला. एक दिवस भगवंत धन्नास म्हणाले, धन्ना ! आता तू मोठा झालास. तुझ्या निरागस भक्तीने मी प्रसन्न झालो. आजवर तुझ्याशी खेळलो, बागडलो पण एवढे पुरेसे नाही. पुढील प्रगतीसाठी ज्ञान आवश्यक आहे. गुरूशिवाय ज्ञान नाही. ज्ञानाशिवाय मुक्ती नाही. जा, गुरू कर. काशीक्षेत्री माझा भक्त रामानंद आहे. त्याच्याकडे जा. त्याचे शिष्यत्व पत्कर. तोच पुढील मार्ग दाखवेल.

धन्ना काशीक्षेत्री आला. रामानंदाच्या चरणी त्याने लोटांगण घातले व त्यांचे शिष्यत्व स्विकारले. त्यांच्याच उपदेशाने बालभक्त धन्नाचा साक्षात्कारी संतश्रेष्ठ धन्ना झाला. पुढे संत धन्नाने संपूर्ण राजस्थानात रामभक्तीचा प्रचार व प्रसार केला व लोकांच्या आध्यात्मिक जीवनास एक वेगळेच वळण दिले. वेगळी दिशा दिली.[११०]

संत धन्ना यांनी श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये प्रभु प्राप्तीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे, "धन्नै धनु पाइआ धरणीधरु मिलि जन संत समानिआ।।"[१११]

संत धन्ना यांनी आपल्या अभंगात अथवा पदात सांगितले की, मला प्रभु परमेश्वराची प्राप्ती ही संत, महापुरूषाच्या संगतीमुळे प्राप्त झाली आहे.[११२]

**धन्नाची शिकवण:-**

धन्नाच्या आध्यात्मिक जीवनाची सुरूवात सगुण उपासनेपासून, मूर्तिपूजेपासून झाली असली तरी रामानंदांच्या सहवासाने त्यांच्या लक्षात आले की, ईश्वर फक्त मूर्तीत नसून तो सर्व विश्वात भरून राहिला आहे. तोच विश्वविधाता आहे. विश्वंभर आहे. तोच सर्वेसर्वा आहे. कर्ता करविता आहे. जीवाने अनन्यभावाने त्यास शरण जावे. आपल्या अंतरात त्याचा शोध घ्यावा.

संत धन्ना सांगत, लोक हो ! ईश्वरप्राप्तीसाठी पूजा, अर्चा, व्रत्तवैकल्ये, तीर्थयात्रा आदी गोष्टींची जरूरी नाही. तो प्रभु परमात्मा तुमच्या अंतरातच आहे. त्याचे मनोभावे नामस्मरण करा. त्याचा आपल्या अंत:करणातच शोध घ्या. पुरोहितांनी निर्माण केलेल्या स्पृश्यास्पृश्यतेवर जातिभेदावर उच्चनीचतेवर ते कडाडून विरोध करतांना म्हणत, प्रत्येक जीवाच्या अंतरात त्या परमात्म्याचीच परमज्योत वास करीत आहे तर कोणी उच्च तर कोणी नीच कसा ? सारे एकसारखे आहेत. सारेच भगवंताच्या मूर्ती आहेत

त्यांची गुरूनिष्ठा अनन्यसाधारण होती. परमेश्वरप्राप्तीसाठी गुरूचे मार्गदर्शन अत्यंत आवश्यक आहे. अशी त्यांची धारणा होती. श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये संत धन्नाजींच्या ४ पदांचा समावेश आहे.[११३]

**६. संत श्री सेना महाराज :-**

संत सेना महाराजांचा जन्म इ.स.१३९० मध्ये झाला. संत सेना महाराज हे बांधवगडचे होते असेही म्हटले जाते व त्यांचा जन्म वैशाख व. द्वाद्वाशी सवंत १३५७ रविवार रोजी सांगितला जातो. इ.स. १३९० मध्ये त्यांचा जन्म झाला.[११४] त्यांच्या पित्याचे नाव देविदास व मातेचे नाव प्रेमकुवर असे होते. त्यांचे नाव 'सैण' असे होते. पण सैण हे सेना ह्या शब्दाचेच रूप आहे असेही म्हणतात. संत सेना महाराज यांचा रेवा संस्थानात बांधवगड येथे बरेच दिवस मुक्काम होता व तेथील राजा तीरसिंह यांचे ते नाभिक होते व त्याबद्दलही आधी लिहिल्याप्रमाणे कथा सांगितली जाते.[११५] पण तेथून ते काशीक्षेत्री गेले व तेथे ते स्वामी रामानंदांच्या संपर्कात आले व त्यांचे शिष्यत्व पत्करले. रामानंद यांचे अन्य दोघे शिष्य संत कबीर व संत रविदासाशी त्यांचे विशेष सख्य होते. त्या तिघात अनेक वेळा पारमार्थिक विषयावर चर्चा होत असत. त्या चर्चा ऐकण्याची संधी ज्यास मिळाली ते खरोखर भाग्यवान होत.[११६] संत सेना हे बीदरच्या राजाचे शाही न्हावी होते. आणि संत ज्ञानेश्वराचे ते परम सेवक होते.[११७] संत श्री सेना महाराज यांच्या विषयी अनेक मते आहेत. काहींच्या मते ते उत्तर प्रदेशात जन्मले व रामानंदाचे शिष्य होते. तर काहींच्या मते ते मूळचे मध्य प्रदेशातील असून तेथून ते महाराष्ट्रात आले. काहींच्या मते ते बांधवगडच्या नरेशांचे सेवक होते तर काहींच्या मते ते बिदरच्या सुलतानाचे नाभिक होते. पण ते मूळचे महाराष्ट्रातीलच असावेत असे मानण्यास खूप वाव आहे. कारण एका अभंगात ते म्हणतात, "ही माझी मिरासी | पांडुरंग पायापासी ||" ह्यावरून सेना महाराजांच्या घराण्यातच विठ्ठल भक्ती चालत आली असावी असा तर्क करता येतो. संत सेना बिदरच्या सुलतानाचे नाभिक होते हेही खरे असावे कारण त्याबद्दलची एक कथा महाराष्ट्रात प्रचलित आहे. भक्त सेनजी हे व्यवसायाने व जातीने न्हावी होते.[११८] नित्य प्रात:काळी उठावे, स्नानादी नित्यकर्मे उरकून देवपूजा व ध्यानधारणा करावी व मगच धोकटी घेऊन व्यवसायार्थ बाहेर पडावे असा सेनांचा नित्यक्रम होता. त्यात ते कधीही कोणत्याही कारणाने बदल होऊ देत नसत. मध्यप्रदेशातील रिवाजजवळील बांधवगडचा राजा राजाराम यांच्याकडे ते कामाला होते. ते स्वामी रामानंदजीं शिष्य होते. राजाला जेव्हा त्यांच्या आध्यात्मिक दिव्य शक्तीची प्रचिती आली तेव्हा राजा त्यांच कुटुंबीय त्यांचे अनुयायी झाले.[११९] पण एकदा ते देवपूजेस बसले असता सुलतानाचा सांगावा घेऊन दूत आला. पण सेनाने आपला पण सोडला नाही. नित्यनेमाप्रमाणे आपला पूजा-अर्चा, ध्यान-धारणा हा आपला क्रम चालूच ठेवला. इकडे नवल घडले. प्रत्यक्ष पांडुरंगाने सेनाचे रूप घेऊन सुलतानाकडे जाऊन सेनाचे काम पूर्ण केले. ह्या विषयी संत सेना आपल्या अभंगात सांगतात,

"जाणुनी संकट श्री हरी | धोकटी घेतली खांद्यावरी ||
त्वरे आला राजदरबारी | देखुनि हरी क्रोध निमाला |
राया सन्मुख बैसोनी | हाती दिधलें दर्पण |
मुख पाहे अवलोकून | मूर्ती दिसे चतुर्भुज |"

पण ह्या प्रसंगानंतर संत सेनांना फार वाईट वाटले. आपल्यासाठी प्रत्यक्ष पांडूरंगाला धोकटी न्यावी लागली याचे त्यांना खूप वाईट वाटले. त्यांनी धंदा सोडला, प्रपंच सोडला व पूर्ण विरक्त होऊन आपले जीवन पांडुरंग चरणी समर्पित केले ह्याचे वर्णन करताना सेना महाराज म्हणतात, “म्हणोनि लागलो सरणासी | संसारासी त्यागिले |”[१२०]

पंढरीची वारी करण्यास त्यांना अत्यंत आनंद वाटत असे. ते म्हणतात, “जाता पंढरीसी सुख वाटे जीवा | आनंदे केशवा भेटतांचि ||”

सेना महाराजांनी सर्व तीर्थांच्या यात्रा केल्या होत्या. पण त्यांना सर्व तीर्थक्षेत्रांपेक्षा पंढरपूर क्षेत्रच आवडले होते. ते म्हणतात, “या सुखाची उपमा नाही त्रिभुवनी | पाहिली शोधोनी अवघी तीर्थे |”

सेना महाराजांना पांडुरंगाचे प्रत्यक्ष दर्शन झाले होते, ते म्हणतात, “बहु जन्मी केला लाग | सेना देखे पांडुरंग || धन्य धन्य दिन | तुमचे झाले दरषण ||”[१२१]

ईश्वरप्राप्तीचा सर्वात सोपा, सुलभ मार्ग म्हणजे नामभक्ती आहे. योग, तपाचरण, व्रताचरण, तीर्थयात्रा ह्या सर्वापेक्षा नामोच्चारण, नामस्मरण हाच एकमेव श्रेष्ठ मार्ग आहे असे सांगताना सेना महाराज म्हणतात,

“म्हणा हरि हरि | अवघे सकल नर नारि ||

तीही लोकी श्रेष्ठ | नामवरिष्ठ सेवी हे ||”

पण तरीही सर्व लोक मायापाशात अडकून संसारात रममाण झालेले पाहून त्यांचा सात्विक संताप सांगतांना संतसेना महाराज म्हणतात, “नाम घेता विठोबाचे | काय तुझ्या बा चे जाते ||”

पण नामसंकीर्तनास संतसंगाचीही जोड हवी, ईश्वरप्राप्तीचा मार्ग संतच जीवाला दाखवतात. म्हणून सेना महाराज म्हणतात, शरण जाईन संतास | संतांच्या उपदेशानेच आपल्या जीवनाचे सार्थक झाले हे सांगताना सेना महाराज सांगतात,

“संते सांगितले काही | ते म्या ह्रदयी धरले ||”

संतांमुळेच माझा उध्दार झाला, हे सांगताना व त्यांच्याविषयी आपल्या मनातला कृतज्ञता भाव व्यक्त करताना सेना महाराज म्हणतात,

“उदार तुम्ही मायबाप कृपावंत | केवढा केला उपकार |

काय वाणूं मी पामर | जड जीवा उध्दार केला |

मार्ग सुपंथ दाविला | सेना म्हणे उतराई |

होता न दिसे काही ||”

सेना महाराज स्वत:स पामर समजतात व सांगतात की, माझ्यासारखा पामर जर भवसागर तरून गेला तर मग जो कोणी जीव मी गेलेल्या मार्गाने जाईल त्याचा नक्कीच उध्दार होईल. ते म्हणतात,

"चित्त शुध्द करा | न देई दुजियासी थारा |

हेच शस्त्र निर्वाणीचे सेना म्हणे धरा साचे ||"

बहुतेक संत जन्म-मृत्यूच्या येरझाऱ्या चुकाव्यात म्हणुन परमेश्वराकडे मागणे मागतात. पण संत सेनास महाराज पांडुरंगाजवळ मागणे मागताना म्हणतात,

"सुखे घाली जन्मासी | हेचि बरे की मानसी ||

वारी करीन पंढरीची | जोडी ही माझी साची ||[११२]

हरिदासाची करीन सेवा | तेणे सुख थोर जीवा ||

सेना म्हणे सर्व संग | केला त्याग यासाठी |"

श्री गुरूग्रंथसाहिबातील अंग ६९५ वरील राग धनासरी मध्ये संत सेना यांचा एक शब्द आहे.[१२३] इ.स.१४४० मध्ये संत सेना महाराज यांचा मृत्यू झाला.[१२४]

**७. भक्त पीपाजी :-**

संत पीपाजींचा जन्म एका रजपूत राजघराण्यात झाला. ते राजपदी विराजमान झाले. एक बलाढय राजा म्हणून त्याचा संपूर्ण राजस्थानात लौकिक होता.[१२५] 'गागरौन' ही त्यांची राजधानी होती. ते धार्मिक वृत्तीचे होते. पण त्यांच्या अंगी थोडे अहंकारही होता. एकदा त्याच्या गागरौन नगरीत साधुसंतांचा एक जत्था आला. राजाने आपल्या अधिकाऱ्यांद्वारा त्यांचा सत्कार केला. पण तो संतांच्या दर्शनास मात्र गेला नाही. साधुसंत नाराज झाले. त्यांनी ईश्वराची प्रार्थना केली, हे देवा, "ह्या राजाच्या मनातील अहंकार दूर कर." असे म्हणून त्यांनी गागरौनचा त्याग केला. भगत पीपाजी चौहान होते. त्यांचा जन्म इ.स.१४२६ मध्ये झाला. ते राजस्थानातील गधहोनचा राजा होते.[१२६]

महाराज पीपाजींना साधुसंत नाराज होऊन आपले नगर सोडून गेल्याची वार्ता समजली. ते अंतर्मुख झाले. आपले काय चुकले ह्याचा ते विचार करू लागले. रात्री त्यांचे आराध्य दैवत श्रीदेवी त्यांच्या स्वप्नात आली. तिने त्यास सांगितले, हे राजा ! तुझ्या अंगी धार्मिक वृत्ती आहे. अनेक सद्‌गुण आहेत. पण तुझ्या अंगी आपण बलाढ्य राजे आहोत ह्याचा अहंकार आहे तो सोड. गुरू कर. त्यास मनोभावे शरण जा. त्यानेच तुझा उध्दार होईल. तूझा गुरू रामानंद काशीक्षेत्री वास करीत आहे तेथे जाऊन तू गूरू कर.[१२७] संत पीपाजी हे सगुणोपासक होते. दुर्गादेवीचे भक्त होत, नंतर ते भक्त स्वामी रामानंदाचे शिष्य झाले.[१२८] महाराज पीपाजींनी दुसऱ्या दिवशी काशीस जाण्यासाठी प्रस्थान केले. यथावकाश ! ते काशीस पोहोचले. गुरू करण्यासाठी राजवस्त्रे परिधान करून ते रामानंदाचे निवासस्थानी आले. पण रामानंदांनी त्यास भेट

देण्याचे नाकारले. त्यांनी निरोप दिला की, "मी राजे महाराजे यांची भेट घेत नाही. जो प्रभुप्राप्तीची आस धरून विनम्रभावाने माझ्याकडे येतो, त्याच्याचसाठी माझे दार सदैव उघडे असते."[१२९]

महाराज पीपाजींना आपली चूक कळली. त्यांनी राजवस्त्रांचा त्याग केला. साधी श्वेतवस्त्रे धारण केली व रामानंदांना शरण गेले व म्हणाले, महाराज, मी आपणास शरण आलो आहे. माझा स्वीकार करा व मला आपला शिष्य करून घ्या. रामानंद म्हणाले, राजा माझा शिष्य होणे इतके सोपे नाही. ईश्वरप्राप्तीचा मार्ग हा काट्याकुट्यांनी भरलेला आहे. त्यासाठी केवळ वेश पालटून भागत नाही. अग्निदिव्य करावे लागते. असे करण्यासाठी तुम्ही तयार आहात का ? क्षणाचाही विलंब न करता पीपाजी उध्दारले, स्वामीजी काय वाटेल ते दिव्य करावयास सांगा. हा आपला दास ते करण्यास सिध्द आहे. त्यावर रामानंद त्यांना म्हणाले, जा पलिकडच्या विहिरीत जाऊन जीव दे. पीपाजी आता पूर्ण बदलले होते. त्यांनी क्षणाचाही विलंब न करता विहिरीकडे धाव घेतली. आता ते विहिरीत उडी मारणार इतक्यात रामानंदांच्या इतर शिष्यांनी त्यास अडवले व रामानंदापुढे आणून उभे केले. पीपाजी आपल्या कसोटीत पूर्ण उतरला आहे ह्याची रामानंदांना खात्री पटली व त्यांनी पीपाजींना शिष्य म्हणून स्विकार केला. आता महाराज पीपाजींचे भक्त पीपामध्ये रुपांतर झाले. भक्त पीपाजी यांच्या एक पद श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये राग धनासरी मध्ये आहे.[१३०] रामानंदाकडे काही दिवस राहिल्यावर त्यांच्याच आज्ञेने ते गागरौनला परत गेले. आता पीपाजी पूर्ण बदलले होते. ते आपला राज्यकारभार उत्तम प्रकारे करतच होते. पण आता ते साधुसंतांची सेवाही जातीने करू लागले. तरीही त्यांच्या चित्तास समाधान नव्हते. गुरूच्या विरहाने त्यांचा जीव कासावीस होत असे. त्याने तसे रामानंदांना कळवले व त्यांना गागरौनला येण्याचे आमंत्रण दिले. शिष्याची ही इच्छा पूर्ण करण्यासाठी रामानंद गागरौनला जाण्यासाठी निघाले. त्या वेळी त्यांचेबरोबर कबीर, रविदास आदि त्यांचे शिष्यही होते. गागरौनच्या वेशीपाशी पीपाजींनी त्यांचे भव्य स्वागत केले. त्यांना पालखीत बसवून ती पालखी स्वत:च्या खांद्यावर वाहून त्यांना आपल्या राजवाड्यात घेऊन गेले.

काही दिवस राहिल्यावर रामानंदांनी द्वारकेस जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. पीपाजीही त्यांच्या बरोबर निघाले. त्यांच्या बरोबर त्यांची राणी सीतादेवीही निघाल्या. पुढे रामानंदांनी काशीकडे प्रयाण केले पण पीपाजी व सीतादेवी मात्र काही काळ द्वारकेतच राहिले. एक दिवस भगवान श्रीकृष्ण व देवी रुक्मिणी यांचे प्रत्यक्ष दर्शन व्हावे म्हणून त्या दोघांनी समुद्रात स्वत:स सर्मपित केले. पण आख्यायिका असे सांगते की, सात दिवसांनंतर ते दोघे समुद्रातून बाहेर आले. तेव्हा दोघांचे कपडे कोरडे होते. आता पीपाजींना विदेही अवस्था व पूर्ण वैराग्य प्राप्त झाले होते. असे सांगतात की, त्यांच्या सहवासात येणारे वाघ सिंहादी हिंस्त्र प्राणीही पूर्णपणे अहिंसक बनत. पीपाजी सांगत, जे ब्रम्हांडी ते सारे मानवी शरीरात सामावलेले आहे. म्हणून पूजेसाठी, ईश्वरप्राप्तीसाठी कोणत्याही बाह्य साधनाची गरज नाही. मनाने मनातच परमेश्वराची आराधना करावी.

ईश्वर निर्गुण निराकार असून सर्वव्याप्त व सदैव अस्तित्वमान आहे. सर्व जीव हे त्यानेच निर्माण केले असून तो सर्व चराचरांचा एकमात्र स्वामी आहे.[१३१] ईश्वर प्राप्तीसाठी सद्‌गुरूचे मार्गदर्शन आवश्यक आहे. गुरूशिवाय ईश्वरप्राप्ती नाही. मनोभावे गुरूसेवा केली तरच मोक्षाचे दार उघडते. सत्‌संग हा परीसस्पर्शाप्रमाणे आहे. सतसंगाने आयुष्य सार्थकी लागते. ईश्वरप्राप्तीसाठी नामस्मरणासारखा सहज सोपा मार्ग नाही. सारी ईश्वराचीच लेकरे त्यामुळे कोणी उच्च नाही. कोणी नीच नाही. सारे समान हा पीपाजींचा शिकवणीचा गाभा होय. बारमेर जिल्ह्यातील समदडी गावी त्यांचे भव्य मंदिर आहे. दरवर्षी चैत्र महिन्याच्या पौर्णिमेचा मोठी जत्रा भरते. श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये त्यांच्या एका रचनेचा समावेश आहे. भक्त पीपाजी यांच्या १ पदाचा श्री गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट आहे. त्या पदाचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे, "मी जगाचे अनेक भाग शोधले. परंतु या शरीरातच नऊ खजिने पाहिले. जेव्हा माझ्यावर रामकृपा झाली, तेव्हापासून जन्म आणि मरणापासून मी मूक्त झालो. विश्वामध्ये जे काही आहे ते माझ्या देहात आहे. जो कोणी याचा शोध घेईल त्याला ते मिळेल. राम किंवा देव हा परमतत्व आहे."[१३२] भगत पीपाजी यांचे १ पद राग धनासरी गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट आहे.[१३३]

**<u>८. भक्त सूरदास:-</u>**

भक्त सूरदास हे हिंदी साहित्यातील थोर कवी म्हणून प्रसिध्द आहेत. त्यांनी कृष्णभक्तीपर अनेक रचना केल्या आहेत व ते श्रेष्ठ कृष्णभक्त म्हणून जगविख्यात आहेत. ते जन्मांध होते. सूरदासांचा जन्म संवत १५३५ इ.स.१४७७ मध्ये उत्तर प्रदेशातील 'सीही' अथवा 'सीरी' नावाच्या एका लहान खेडेगावात एका गरीब ब्राम्हण कुटुंबात झाला.[१३४] असेही सांगीतले जाते की सूरदास हा राजा पृथ्वीराज चौहान याच्या राजसभेतील राजकवीचा वंशज होता. भक्त सूरदासजींचा जन्म ब्राम्हण कुळात झाला. मुळात त्यांचे नाव श्री मदन मोहनजी होते.[१३५] राजा अकबराच्या राज्यात उत्तरेतील अवध प्रांतात संदिलाचे गव्हर्नर म्हणून त्यांची नेमणूक झाली होती.[१३६] लहानपणापासूनच ह्याला कृष्णभक्तीची आवड लागली व तो पूर्वजांकडून लाभलेल्या काव्यप्रतिभेमुळे कृष्णभक्तीपर काव्य करु लागला. त्याला ईश्वरकृपेने सुमधुर आवाजही प्राप्त झाला होता. त्यामुळे तो भक्तीरंगात रंगून पदे गात असे व ती ऐकणारे श्रोतेही भक्तीरसात तल्लीन होत. सुरदास यांनी सुरसागर याची रचना केली.[१३७]

घरी अठरा विश्वे दारिद्र्य व त्यातून तो आईबाबास भार वाटू लागला. ही वस्तूस्थिती जाणून त्याने लहान वयातच घराचा त्याग केला व सारा भार श्रीकृष्णावर टाकून तो भक्तीगीते गात निघाला. वाटेत तो एक कोरड्या विहिरीत पडला. तेथे तो सात दिवस अन्न पाण्यावाचून पडून होता. पण त्याचेही त्यास काही वाटले नाही. तो अखंड कृष्णभक्तीत रंगून गेला. त्याची ही दृढभक्ती पाहून भगवान श्रीकृष्ण त्यास प्रसन्न झाले. प्रत्यक्ष प्रकट होऊन त्यांनी त्यास विहिरीतून बाहेर काढले व त्यास दृष्टीही प्रदान केली. भगवान श्रीकृष्णाचे ते मनोहारी रूप पाहून सूरदास तृप्त झाला. आपल्या भक्तीचे सार्थक झाले असे त्यास वाटले.

त्याने ते रूप आसुसल्या नजरेने आपल्या मनोहारी रूप पाहिले. ह्याशिवाय जगात अन्य पाहण्यासारखे उरले तरी काय आहे ? मला अन्य काहीही बघण्याची इच्छा नाही. माझ्यावर कृपा करा व मला परत अंध करा. आपले रूप ह्रदयात साठवून मी पुढील आयुष्य व्यतीत करीन माझ्यावर आपली अशीच सदैव कृपा राहो.[१३८]

तेथून तो पुढे निघाला व एका खेडेगावात झोपडी बांधून राहू लागला. ईश्वरीकृपेने त्यास शकुन व भविष्य सांगण्याची सिध्दी प्राप्त झाली. त्यामुळे आसपासच्या गावातील लोक त्याला शकुन विचारायला व भविष्य जाणून घेण्यासाठी येऊ लागले. येतांना धान्य, पैसे, कपडा इ. वस्तू आणू लागले. त्यामुळे सुबत्ता नांदू लागली. त्यामुळे त्याच्या कृष्णभक्तीत मात्र व्यत्यय येऊ लागला. तो वैतागला. त्याने ते गाव सोडले व इतरत: भटकू लागला. वयाच्या अठराव्या वर्षी तो मथुरेला गेला पण तेथेही भविष्य जाणून घेण्यासाठी त्याच्याभोवती गर्दी जमू लागली. त्याने मथुरेचाही त्याग केला व तीर्थाटन करत यमुना किनारी गौघाटावर त्याने आपला मुक्काम ठोकला. त्या ठिकाणी त्याने बारा वर्षे एकांतात राहून तो कृष्णभक्तीत रममाण झाला.

इ.स.१५०९ साली स्वामी वल्लभाचार्य तीर्थयात्रेसाठी वृंदावनास आले.[१३९] हे दक्षिणेतील शुध्दाद्वैत मताचे प्रवर्तक होते. तेथे त्यांची व सूरदासाची भेट झाली. त्याच्या भावपूर्ण काव्यावर व मधुर आवाजावर ते प्रसन्न झाले. पण सूरदासाच्या पदांमध्ये नैराश्यचाच सूर पाहून त्यांना वाईट वाटले. ते म्हणाले, “अरे तुझ्या नावात सूर म्हणजे शूर आहे. तर मग असे रडगाणे का गातोस ? मर्दासारखा पुढे हो. भगवंताची लीला अगाध आहे. सर्व दु:ख दूर करणारी आहे. मनाला आनंद देणारी आहे. त्याची लीला कर त्यांचे नामस्मरण कर. बघ तुला कसा आत्मिक आनंद मिळतो.” सूरदास म्हणाले, “महाराज आजपर्यंत मी सतत दु:खच भोगत आलो आहे. भगवंताच्या त्या आनंददायी लीला मला कधी कळल्याच नाहीत. मी तुम्हाला शरण आलो आहे. मला आपला शिष्य म्हणून स्वीकारा व मला मुक्तीचा मार्ग दाखवा.”

श्रीमत् वल्लभाचार्यांनी त्यास मधुराभक्तीचे रहस्य उलगडून सांगितले. व त्यास आपला शिष्य करून घेतले. त्यास पुष्टीमार्गाची दीक्षा दिली. व त्याची श्रीनाथजी मंदिराचा कीर्तनकार म्हणून नेमणूक केली. तेव्हापासून जीवनाच्या अंतापर्यंत सूरदास तेथेच कीर्तन करत राहीले. आता सुरदासाची कीर्ती सर्वत्र पसरली. तानसेनही त्याची पदे गाऊ लागला. असेच एक पद ऐकून अकबराने त्या पदाच्या रचनाकाराबद्दल तानसेनकडे विचारणा केली. तानसेनाने अंध कवी सूरदासांची सविस्तर माहिती दिली. अकबराची जिज्ञासा जागृत झाली व तानसेनास घेऊन तो श्रीनाथजी मंदिरात सूरदासांना भेटण्यासाठी आला. त्या वेळी सूरदास कृष्णलीला वर्णन करतणारे पदगाण्यात तल्लीन होऊन गेले होते. अकबर ते पद ऐकून आनंदीत झाला. त्याने सूरदासांना खूप मोठे द्रव्य व काही गावे इनाम देऊ केली व त्यास स्वत: अकबराची स्तुती करणारे पद रचण्याची विनंती केली. सूरदासांनी ते द्रव्य व इनाम घेण्याचे तत्क्षणी नाकारले. सूरदास म्हणाले, “हे बादशहा! हा सूरदास श्रीकृष्णाशिवाय अन्य कोणाचीही स्तुती करत नाही. ह्या जिव्हेने आजपर्यंत

कृष्णाशिवाय अन्य कशाचाच उच्चार केलेला नाही. तू येथून ताबडतोब निघून जा. परत मला तुझे तोंडही दाखवू नकोस."

आता सूरदास वृध्द झाले होते. आपले आयुष्य संपत आल्याचा त्यांना साक्षात्कार झाला. त्यांनी शांतपणे श्रीनाथ मंदिराचा निरोप घेतला व श्रीकृष्णाने जेथे रासलीलेचे सौख्य अनुभवले त्या पारसौलीच्या चंद्रसरोवराच्या तीरी आले व समाधी लावून बसले. तो दिवस होता माघ शुध्द २ सवंत १६४० म्हणजेच इ.स.१५८२ साली तेव्हा त्यांचे वय १०५ वर्ष होते, ह्यादिवशी सूरदासांनी आपली इहलोकीची यात्रा संपवून ते कृष्णरूपाशे एकरूप झाले.[१४०] भक्त सुरदासजी यांचा एक अभंग श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये आहे. त्या अभंगाचा अर्थ पुढील प्रमाणे आहेत, "हे माझ्या मना ! बेमुखान अथवा जो देवापासून दूर गेला आहे त्यांची संगत सोडली पाहिजे."[१४१]

भक्त सूरदास यांचे एक पद शिखांचे पाचवे गुरू अर्जुन देवजी यांच्या शब्द सोबत लिहल्या गेली आहे. भक्त सुरदास यांच्या पदाचे नाव सारंग महला ५ सूरदास असे आहे. संत सूरदास हे सम्राट अकबर यांचे प्रमुख अहलकार होते. यांचा जन्म ब्राह्मण समाजात झाला.[१४२]

**९.भक्त जयदेव :-**

भक्त जयदेव यांचा जन्म इ.स. ११७० मध्ये बंगाल राज्यातील वीरभूमी जिल्ह्यातील केंदली गावात झाला.[१४३] भक्त जयदेव हे बाराव्या शतकात होऊन गेलेले थोर संस्कृत कवी व महान कृष्णभक्त होते. त्यांचे 'गीतगोविंद' हे प्रदीर्घ काव्य सुप्रसिध्द आहे.[१४४] जयदेव यांचा जन्म ओरिसा प्रांतातील प्राची नदीच्या खोऱ्यात वसलेल्या 'केंद्रबिल्व' ह्या गावी झाला. ह्यास 'केंदुबिल्व' असेही म्हणतात. हे गाव आता 'केंदुली सासन' ह्या नावाने ओळखले जाते. हे गाव जगन्नाथपूरीजवळ आहे. त्यांच्या पित्याचे नाव भोजदेव व मातेचे नाव वामदेवी असे असून ते जातीने ब्राम्हण होते. त्या काळी 'केंदुबिल्व' हे वैष्णव पंथाचे महत्वाचे केंद्र होते. जयदेव शिक्षणासाठी कोणार्कजवळ 'कुर्मपट्टक' येथे शिक्षणासाठी गुरूगृही पाठविण्यात आले.[१४५] तेथे त्याने संस्कृत भाषेचे व वैष्णव पंथाचे शिक्षण घेतले. त्यांचा विवाह पद्मावती ह्यांच्याशी झाला. पद्मावती ह्या कोनार्कच्या मंदिरातील नर्तिका होत्या. भक्त जयदेव यांना संस्कृत शाळेत पाठविले होते. त्यानी संस्कृत भाषेचे चांगले ज्ञान मिळविले. लहानपणापासूनच ते भजने रचीत होते. स्वत:ची मधुर कवने गात असत, कवी आणि गायक असणाऱ्या भक्त जयदेवजींची कीर्ती ऐकून राजा लछमनसेनने त्यांना शोधून आणण्यासाठी आपल्या माणसांना पाठविले होते. राजदरबारी त्यांची कवी म्हणून नियुक्ती केली होती. पण तेथे फार काळ ते रमू शकले नाहीत.[१४६] लोकांना आध्यात्मिक ज्ञान द्यावे म्हणून ते तेथून एके दिवशी निघून गेले. त्यांनी लिहिलेले 'गीतगोविंद' हे काव्य सौंदर्य व गेयता ह्यासाठी प्रसिध्द आहे.

केंदुबिल्व सोडून जयदेव जगन्नाथूपरी येथे आले. तेथील भक्तीमय वातावरणात ते रंगून गेले. ते कृष्णभक्त झाले व तेथेच त्यांना 'गीतगोविंद' हे महाकाव्य लिहले. ह्या काव्यात प्रामुख्याने निम्बार्काचार्याच्या वैष्णव मताचा व राधा-कृष्ण भक्तीचा ऊहापोह केला आहे. भक्त जयदेव ह्यांच्या चरित्राबद्दल फारच थोडी माहिती प्राप्त आहे. लिंगराज मंदिर, मधुकेश्वर मंदिर व सिंहाचल मंदिर येथील शिलालेखावरून उपलब्ध झालेल्या माहितीनूसार भक्त जयदेव यांनी 'कुर्मपट्टक' येथे संस्कृत बरोबरच काव्यशास्त्र, संगीत व नृत्यशास्त्राचेही शिक्षण घेतले होते. भक्त जयेदवजी यांचे दोन अभंग श्री गुरूग्रंथसाहिबा यात समाविष्ट आहेत.[१४७] सदर दोन पदे ही राग कूजरी व मारू राग यामध्ये समाविष्ट आहे.[१४८]

**१०.स्वामी रामानंद :-**

स्वामी रामानंदांचा जन्म इ.स.१२९९ मध्ये श्रीक्षेत्र प्रयागच्या जवळच असलेल्या 'मालको' ह्या गावी झाला.[१४९] स्वामी रामानंदजी हे रामानुज संप्रदायातील स्वामी राघवाचार्यजींचे शिष्य होते. भारतातील भक्ती चळवळीचे अग्रेसर सन्माननीय संस्थापक होते. त्यांनी काशीमध्ये प्रवचने करण्यास सुरुवात केली. त्यांचे पाचशे शिष्य होते त्यापैकी कबीरजी, रविदासजी, पीपाजी, सेनजी व धनाजी या पाच जणांचे अभंग श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत.[१५०] त्यांच्या वडिलांचे नाव पुण्यसदन व आईचे नाव सुशीलादेवी असे होते. स्वामी रामानंदांचे मूळ नाव 'रामदत्त' असे होते.[१५१] त्या वेळच्या प्रथेप्रमाणे रामदत्ताची वयाच्या आठव्या वर्षी मुंज करण्यात आली व त्यांना शिक्षणासाठी गुरूगृही पाठवण्यात आले. रामदत्त अत्यंत कुशाग्र बुध्दीचा असल्याने त्याने केवळ चार वर्षात बहुतेक सर्व शास्त्रांचा अभ्यास पूर्ण केला. वयाच्या बाराव्या वर्षी त्यास पुढील शिक्षणसाठी काशीक्षेत्री पाठविण्यात आले. तेथे त्यांनी स्वामी राघवानंद यांच्याकडे पुढील शिक्षणास सुरूवात केली. राघवानंद हे दक्षिणकडील 'विशिष्टाद्वैत' तत्वज्ञानाचे उद्‍गाते रामानुजाचार्य यांचे शिष्य होते. स्वामी राघवानंदांना रामानंद हा अत्यंत हूशार, प्रखर बुध्दीमत्तेचा विद्यार्थी असल्याचे जाणवले व थोड्याच दिवसात तो त्यांचा पट्टशिष्य झाला.[१५२]

शिक्षण पूर्ण झाल्यावर राघवानंदांनी रामानंदास संपूर्ण भारत भ्रमण करून, सर्व तीर्थांची यात्रा करून येण्यास सांगितले. त्याप्रमाणे रामानंद यात्रा करत बद्रीनाथ येथे पोहोचले. तेथे त्याने बराच काळ तपश्चर्या केली व पुढे गंगेच्या काठाकाठाने प्रवास करत गंगा जेथे सागरास मिळते त्या गंगासागर तीर्थावर येऊन पोहोचले. तेथेही त्यांनी बराच काळ ओंकाराचे ध्यान केले. ते ठिकाण कपिल मुनींचे तपस्थान असल्याचा त्यांना दृष्टांत झाला. तेथे त्यांनी कपिल मुनींचे मंदिर बांधले. संपूर्ण भारताचे भ्रमण करून रामानंद काशीक्षेत्री परत आले.[१५३]

भारत भ्रमणाच्या काळात त्यांना अनेक अनुभव प्राप्त झाले. अनेक सिध्दी प्राप्त झाल्या. त्यांच्या असे लक्षात आले की, सर्व भारतवासी यांच्या मनात एकच सांस्कृतिक विचारधारा वाहत आहे पण जातिभेदाने, वर्णभेदाने, उच्चनिच ह्या भेदामुळे ती सांस्कृतिक विचारधारा क्षीण झाली असून हिंदू समाज

विस्कळीत झाला आहे. सारे भेदाभेद नष्ट करून सारा हिंदू समाज एकसंघ करण्याची गरज आहे. राघवानंदांकडे परत आल्यावर त्यांनी आपली मते विचार स्पष्टपणे त्यांच्यापूढे व आपल्या इतर गूरूबंधू पुढे मांडले. पण ते त्यांना रूचले नाहीत. अत्यंत जड अंत:करणाने रामानंदांनी आपल्या गुरूंना वंदन करून त्यांचे आशीर्वाद घेऊन ते आपल्या वेगळ्या वाटेने निघाले. आता त्यांनी आपला वेगळा पंथ निर्माण केला. त्यास 'रामावतपंथ' असे म्हणतात. तर रामानंदांच्या अनुसयायांना 'रामानंदी' असे म्हणतात.

**रामानंदांची शिकवण :-**

रामानंदांच्या मते ईश्वरप्राप्ती हेच मानवजन्माचे अंतिम उद्दिष्ट आहे. त्यामुळे ईश्वरभक्ती करण्याचा अधिकार सर्वच मानवांना आहे. त्यात स्त्री-पुरूष असा भेद करता कामा नये. तसेच तो माणूस कोणत्याही वर्णाचा असो, जातीचा असो. सर्व जाती वर्णाच्या लोकांना ईश्वरभक्ती करण्याचा पूर्ण अधिकार आहे असे ते सांगतात. ईश्वरभक्तीसाठी कोणत्याही कर्मकांडाची आवश्यकता नाही. तर प्रभुबद्दल आत्यंतिक प्रेम असणे आवश्यक आहे.

केवळ प्रभुनामाच्या सतत उच्चारानेच माणसाची आध्यात्मिक उन्नती होते व ईश्वरप्राप्ती होते. 'हरी मुखे बोला, हरी मुखे बोला' हीच त्यांची शिकवण होती. त्यांनी आपल्या १११ वर्षाच्या प्रदिर्घ आयुष्यात मोगली अत्याचाराचे भीषण प्रकार पाहिले होते व समाज जीवंत राहायचा असेल तर हाती शस्त्र घेतल्याशिवाय पर्याय नाही म्हणून त्यांनी कोदंडधारी राम हा समाजापूढे आदर्श ठेवला. 'इदं ब्रम्ह इदं क्षात्र' ही त्यांची शिकवण होती. म्हणूनच त्यांनी सर्वत्र आखाडे निर्माण केले. तेथे ब्रम्हविद्ये बरोबरच शस्त्रविद्याही दिली जात असे. स्वामी रामानंदांचे प्रमुख सात आखाडे होते. ते आपल्या शिष्यांना सांगत. जात पात विसरून जा. जातीचा नामोल्लेखही करू नका. आपण सारे त्या सर्वत्र रममाण असलेल्या प्रभुरामाचे नाव घ्या व नामभक्तीत रंगून जा.[१५४]

त्यांच्या ह्या शिकवणीमुळे त्यांना सर्व जातीतील स्त्री-पुरूष शिष्य म्हणून लाभले. त्यातील प्रमुख शिष्य खालील प्रमाणे आहेत. १) अनंतानंद २)सुखानंद ३)नदहर्यानंद ४)सुरसुरानंद ५)भावानंद ६)पीपा ७)कबीर ८)सेना ९)धन्ना १०)रैदास ११)पद्मावती (महिला) १२)सुरसरी(महिला) सुरसरी ही सरसुरानंद ह्यांची पत्नी होती.

स्वामी रामानंद हे सर्वार्थाने क्रांतदशी महापुरूष होते व गुरूकृपेने त्यांना दीर्घायुष्यही लाभले होते. त्यांच्या कार्याने भक्तीसाधनेची एक प्रचंड लाटच संपूर्ण उत्तर भारतात पसरली. त्या लाटेतील मेरूमणी म्हणजे रामचरित मानस लिहिणारे थोर कवी संत तुलशीदास होत. आपले जीवितकार्य पूर्ण झाले आहे असे त्यांच्या लक्षात आल्यावर वयाच्या १११ व्या वर्षी स्वामी रामानंदांनी आपला देहाचा त्याग केला व त्यांच्या आत्मा रामरूपात विलीन झाला. त्यांच्या एका पदाचा शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिब यात समावेश आहे.[१५५] स्वामी रामानंदजी यांच्या श्री गुरूग्रंथसाहिबातील पदाचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे, जेव्हा कुठे मी जातो दगडात,

पाण्यात, मी तुला तेथे पाहतो. मी सर्व वेदांमध्ये, पुराणांमध्ये तुला पाहिले, शोधले आहे. जर तू तेथे सापडत नाहीस तरच एखाद्याला तीर्थस्थळी जावे लागेल. संत रामानंद यांचा मृत्यू इ.स.१४६७ मध्ये झाला.[१५६]

**११. भक्त परमानंद :-**

भक्त परमानंद हे संत नामदेव महाराज यांचे समकालीन मराठी संत होते. ते जातीने तेली होते. ते महाराष्ट्रातील सोलापूर जिल्ह्यातील बार्शी ह्या गावाचे रहिवासी होते. महाराष्ट्रातील सोलापूर जिल्ह्यातील बार्शी गावात ब्राम्हण कुळात संत परमानंद यांचा जन्म झाला.[१५७] त्यांना जोगा परमानंद असे म्हणत व बार्शी गावातील भगवंत मंदिरातील भगवंताचे ते उपासक होते. रोज सकाळी उठून घरापासून लोटांगण घालत बरोबर आरतीच्या वेळी भगवंताच्या मंदिरात पोहोचायचे असा त्यांचा नित्यक्रम होता. हा नेम त्यांनी अनेक वर्षे पाळला. त्यांच्या ह्या भक्तीमुळे एका श्रीमंत गृहस्थांच्या मनात भक्तीभाव जागृत झाला व त्याने त्यांना अत्यंत मौल्यवान असा रेशमी पितांबर नेसवला. त्या पितांबरामुळे त्या दिवशी त्यांचे चित्त दोलायमान झाले. पितांबर मळू नये म्हणून ते अत्यंत जपून दंडवत घालू लागले. परिणामी ते मंदिरापाशी पोहोचले तोपर्यंत आरती होऊन गेली होती. आपण ह्या पितांबरी पायी भगवंताच्या आरतीस मुकलो ह्याचे त्यांना फार वाईट वाटले. खऱ्या भगवंत भक्ताने काम, क्रोध, मोह, मद, मत्सर व दंभ ह्या षड्रिपूंपासून सदैव सावध राहिले पाहिजे ह्याचे त्यांना स्मरण झाले. त्यांनी तेथल्या तेथे तो रेशमी पितांबर फाडून चिंध्या करून तेथेच टाकून ते घरी गेले. परमानंद यांनी परमानंद सागर, परमादास पद, दान लीला आणि ध्रुव चरित्र इ. लिखाण केले.[१५८]

आता ते पूर्ण विरक्त झाले व भगवंत भक्तीत पूर्णपणे रंगून गेले. अखेर संसाराचा त्याग करून ते उत्तरेकडे निघून गेले. सखोल चिंतनाअखेर त्याच्या लक्षात आले की, ईश्वर केवळ मूर्तीत नसून तो सर्व विश्वात, चराचरात भरलेला आहे. आता मूर्तिपूजक परमानंद विश्वंभरा चा निर्गुण निराकार प्रभु परमात्म्याचा उपासक बनला. लवकरच परमानंद बार्शी सोडून उत्तरेत गेले. तेथे त्यांनी भक्तीमार्गाचा प्रचार व प्रसार केला. त्यांचे एक पद श्री गुरूग्रंथसाहिब ह्या धर्मग्रंथात आहे. आयुष्याच्या अखेरच्या काळात ते बार्शीत परत आले व भगवंत मंदिराशेजारी ते समाधिस्त झाले.[१५९] श्री गुरूग्रंथसाहिबा मध्ये संत परमानंदजी यांचा एक अभंग अथवा पद समाविष्ट आहे.[१६०] संत परमानंद आपल्या पदात सांगतात की, "हे मानवा! पुराणे ऐकून तू काय काय शिकलास ? भक्ती वाढली नाही, ना भुकेल्याला तू पैसे दिलेस. तुझ्या मनातून हिंसा गेली नाही. ना जिवंत प्राण्यांबद्दल दया वाढली परमानंद म्हणतात तू केव्हाही साथसंगत अथवा भक्तांची संगत केली नाहीस आणि प्रवचने वाचली नाहीस." भक्त परमानंद यांचे एक पद राग सारंग गुरूग्रंथसाहिब मध्ये आहे.[१६१]

**१२. भक्त त्रिलोचन :-**

भक्त त्रिलोचनजींचा जन्म पंढरपूर येथे इ.स.१२६७ मध्ये झाला.[१६२] हे संत नामदेवांच्या समकालीन संत होते. त्रिलोचन म्हणजे तीन डोळे असलेला. दोन चर्म व तिसरा ज्ञानचक्षू. त्रिलोचन याचा अर्थ परमज्ञ

ानी असा आहे.  संत त्रिलोचनजी परमज्ञानी होते म्हणून त्यांचे नाव त्रिलोचन असे विख्यात झाले.  श्री गुरूग्रंथसाहिबामधील संत नामदेवांच्या पदांमध्ये त्यांच्या नावाचा उल्लेख आढळतो.  भाई गुरूदासजी यांच्या रचनेतही त्यांचा व नामदेवांचा उल्लेख केला गेला आहे.  भक्त रविदासांच्या रचनांमध्येही भक्त त्रिलोचनजींचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केलेला आढळतो.[१६३]

त्रिलोचनजींच्या वाणीवरून त्यांच्या भक्तीमार्गाच्या पूर्ण ज्ञानाचा परिचय होतो.  ते सांगतात, परमेश्वर प्राप्तीसाठी कर्मकांड, तीर्थयात्रा, भक्तीचा बाह्य देखावा, भस्म लावणे इत्यादीची आवश्यकता नाही.  हे सर्व निरर्थक आहे.  प्रभुनामाचे उच्चारण, मनन, चिंतन हाच प्रभुप्राप्तीचा साधा सोपा मार्ग आहे,  असे ते सांगत. त्यासाठी सद्‌गुरूची आवश्यकता आहे.  संत त्रिलोचन हे एक संतान नसलेले एक श्रीमंत व्यापारी होते. मायेच्या मोहात पडून मनुष्य प्रभूपासून दूर जातो पण ही माया नश्वर आहे.  प्रभुनाम हेच एकमेव शाश्वत धन आहे.  माणूस आपल्या कर्मानुसार फल प्राप्त करतो.  ते कोणीही चुकवू शकत नाही असे हे सांगतात.  जन्म मरण ह्याची कर्माशी सांगड आहे ह्याकडे लक्ष वेधून माणसाने आपले मन प्रभुनामाशी एकरूप करावे असे ते सांगतात.[१६४] परमात्म्याशी एकरूप होणे हीच एकमेव उत्तम अवस्था आहे, असे त्यांचे सांगणे होते.  शीखांचा धर्मग्रंथ श्री गुरूग्रंथसाहिब यामध्ये संत त्रिलोचन यांचे चार पदांचा समावेश करण्यात आला आहे.[१६५]  श्री गुरूग्रंथसाहिबातील पदाचा थोडक्यात अर्थ पुढील प्रमाणे आहे.

"तुम्ही जप का करता ?  तुम्ही तप का करता ?  तुम्ही पाणी का घुसळत आहात ?  त्या निर्बन ला देवाला नेहमी मनात ठेवा आणि त्याचे देवाचे ध्यान करा.  ज्याने चौऱ्यांशी लक्ष जीव प्रकार निर्माण केले आहेत."

**<u>१३. भक्त साधना :-</u>**

पाकिस्तानातील हैद्राबाद सिंध प्रांतातील सेहवन खेड्यात भक्त साधनाजींचा जन्म झाला.  ते मुस्लिम कसाई जातीतील होते.[१६६] आयुष्यभर बकरी मारून त्यांचे मास विकण्याचे काम केले.  जरी त्यांचा धंदा कसायाचा होता तरी ते नेहमी देवाचे ध्यान करीत.  त्यांनी आपले आयुष्य अतिशय पवित्रतेने व्यतीत केले.  त्यामुळे पुढे ते थोर संतांच्या मालिकेत जाऊन बसले.  त्यांचा एक अभंग श्री गुरूग्रंथसाहिबा यात आहे. भक्त साधना हे प्रेमभक्ती पंथाचे अनुयायी होते.  पंडित तारासिंघजींच्या मते सधना कसाई जन्माने मुसलमान असूनही व्यवसाय सोडून हिंदू धर्मातील भक्तीपंथाकडे वळले.[१६७] त्यामुळे मुसलमान त्यांना काफीर म्हणू लागले.  काजी लोकांनी बादशहाकडे त्यांच्याविषयी तक्रार केली की, ह्यास कडक शासन करावे नाहीतर हा मुसलमानांना हिंदू मताकडे वळवील.

गुरूग्रंथसाहिब मध्ये भक्त साधना यांचे एक पद राग बिलावल मध्ये आहे.[१६८] ते सिंधमधील सिहवा गावचे रहिवासी होते.  संत नामदेवांचे समकालीन होते.  ते व्यवसायाने कसाई होते.[१६९]

त्यांच्या श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये समाविष्ट असलेल्या पदामध्ये एकही शब्द उर्दू वा फारशी नाही ह्यावरून प्रो. साहिब सिंग साधना हिंदू होता असे मानतात. ते पुढे असेही सांगतात की, साधना कसाई होता व मांसाचे वजन करताना तो ज्या दगडाचा वापर करीत असे तो दगड नसून शाळिग्राम होता. एकदा एक आत्मसाक्षात्कारी साधूच्या ते लक्षात आले. त्याने साधनास उपदेश केला व त्यामुळे साधनास आपली चूक कळून आली व त्याला उपरती झाली. त्याने आपला व्यवसाय नव्हे तर संसाराचाही त्याग करून तो प्रभुभक्तीकडे वळला. आता तो प्रभुनामात पूर्णपणे रंगून गेला होता. भक्त साधना खरोखरच विरक्त झाला आहे की नाही पाहण्यासाठी प्रभूने एक माया केली. एक सुंदर स्त्री त्यांच्याकडे आली व माझा स्वीकार करा अशी त्यास विनंती करू लागली. तिने नाना प्रयत्न केले पण साधनाचे चित्त जराही विचलित झाले नाही. तो आपल्या ध्येयावर दृढ राहिला. हावभावाने सधना वश होत नाही असे पाहिल्यावर तिने साधना वर आरोप केला की सधनाने तिच्या पतिचा वध केला. धमकावून आपल्याशी संबंध ठेवण्यासाठी आग्रह करू लागली. आता साधना मोठ्या संकटात सापडला. पण तो आपला निश्चयापासून थोडाही ढळला नाही व त्याने प्रभूची प्रार्थना सुरू केली. साधना म्हणतात, हे प्रभू ! तू भक्ताच्या प्रतिष्ठेचे रक्षण करतोस अशी तुझी ख्याती आहे. मी अनंत योनीतून जन्ममरणाच्या चक्रात फिरून थकून गेलो आहे. ज्याप्रमाणे चातक स्वाती नक्षत्राच्या एका थेंबाकरीता आसूसलेला असतो त्याप्रमाणे मी तुझ्या कृपेसाठी आसुसला आहे. मी ह्या संकटात, भवसागरात बुडत आहे. मला यातुन बाहेर काढ. मला तार. ह्या जगात माझे असे काहीही नाही सारे काही मी तुलाच अर्पण केले आहे. आता माझी लाज तुझ्या हाती आहे. हे प्रभु ! हीच माझी तुझ्या चरणी प्रार्थना आहे.[१७०]

"मै नाही कछु हऊ नाही किछु आहि न मोरा ।।

अऊसर लजा राखि लेहु सधना जन तोरा ।।"[१७१]

परमेश्वर कृपेने साधनाचे संकट दूर झाले. तो प्रभू परमात्म्याच्या कसोटीत पूर्ण उतरला व प्रभूने त्याचा स्वीकार केला. सरहिंदजवळ तो प्रभुरूपात विलीन झाला.

**<u>१४. भक्त भीखनजी :-</u>**

भक्त भीखनजींची दोन पदे श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये समाविष्ट आहेत.[१७२] भीखनजी जन्माने मुसलमान होते. त्यांचा जन्म इ.स. १४८० साली उत्तर प्रदेशात 'पकैनी' या भागात काकोरी येथे झाला.[१७३] ते मुस्लीम शरियतचे जाणकार विद्वान होते. त्यांना संपूर्ण कुराण मुखोद्‌गत होते व ते कुराणाचा पाठ सात वेगवेगळ्या प्रकारे करीत असत. ते स्वत: सुफी संत होते. ते हजरत-पीर-सय्यद-मीर-इब्राहीम यांचे शिष्य होते.[१७४] त्यांनी अनेक सुफी संतांना कूराणाचा अर्थ समजावून सांगीतला होता. भीखनजी जन्माने मुसलमान असले. तरी त्यांनी हिंदू धर्मग्रंथांचा अभ्यास केला होता व त्यामुळे त्यांच्या चिंतनावर हिंदू तत्त्वज्ञानाचा फार मोठा प्रभाव जाणवतो.[१७५] प्रा. साहिब सिंग यांच्या मते शेख भीखनजी हे अकबराच्या दरबारी नौकरीस होते. वयाच्या ९३ व्या वर्षी इ.स.१५७४ मध्ये त्यांची ते अनंतात विलीन झाले.

श्री गुरूग्रंथसाहिबातील पदाचा अर्थ, "माझी जीभ उच्चार करते, माझे कान ऐकतात आणि माझे मन ध्यान करते. म्हणून मी खूष आहे. आणि समाधानी आहे. भिकनजी म्हणतात माझे दोन्ही नेत्र समाधानी आहेत आणि ज्या कोणाला मी पहातो त्यात मला तो देव दिसतो." संत भीखन जी यांचा मृत्यू इ.स.१५७४ मध्ये झाला.[१७६]

**१५. भक्त बेणीजी :-**

भक्त बेणीजी यांचा जन्म १५ व्या शतकात मध्यप्रदेशात एक ब्राह्मण परिवात झाला.[१७७] भक्त वेणीजींच्या तीन पदांचा समावेश श्री गुरूग्रंथसाहिब या शीखांच्या धर्मग्रंथात केला असला तरी त्याविषयी कोणतीही माहिती उपलब्ध नाही. भक्त बेणीजी हे इतर संतांच्याही आधी होऊन गेले असावेत असा तर्क करण्यात येतो. त्यांची जन्मभूमी व कर्मभूमी बिहार होती असे म्हणतात.[१७८] बिहारच्या अशती या खेड्यात एका ब्राम्हण कुटुंबात बेनीजींचा जन्म झाला. त्यांचे नाव ब्रह्मभट बेनी असे होते.[१७९] त्यांचे तीन अभंग श्री गुरूग्रंथसाहिबा मध्ये समाविष्ट आहे. श्री गुरूग्रंथसाहिबात भक्त बेनीजी यांच्या पदाचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे, जो आपले शरीर आणि आत्मा कृष्णाच्या प्रेमाला अर्पण करतो तो सदा जागृत असतो आणि केव्हाही खोटे बोलत नाही. मनामध्ये गुरूंच्या सूचनांचे पालन करतो.[१८०] भक्त बेणीजी यांचे ३ पदे गुरूग्रंथसाहिब यात समाविष्ट आहेत.[१८१]

**४.४.२ श्री गुरूग्रंथसाहिबातील चार गुरसिक्खांची संक्षिप्त चरित्रे :-**

**१) भाई मरदाना :-**

भाई मरदाना हे एक अलौकिक व्यक्तीमत्व आहे. जसे प्रभू रामचंद्र व हनुमान तसे श्री गुरू नानकदेव व भाई मरदाना होते. मरदाना हा जणू नानकांना बहिश्वर प्राण होता. जेथे श्री गुरू नानक देव तेथे भाई मरदाना त्यांच्या सेवेत हजर होत असे. अगदी अखेरच्या श्वासापर्यंत गुरूसेवेचे अखंड व्रत मरदानाने चालु ठेवले होते. भाई मरदाना यांचा जन्म रायभोए की तलवंडी येथे इ.स. १४५९ साली झाला.[१८२] श्री गुरू नानकदेवाचा जन्मही ह्याच गावी झाला. भाई मरदाना यांच्या वडीलाचे नाव बादरे व आईचे नाव माई लख्खो अथवा लखोजी असे होते. भाई मरदाना हे श्री गुरू नानकदेवांपेक्षा १० वर्षानी मोठे होते. ते जातीने मुसलमान होते व गावचे मिराशी होते. श्री गुरू नानकदेवांचे वडील श्री काळूराम हे गावातील प्रतिष्ठित व्यक्ती असल्याने त्यांच्याकडे भाई मिराशी होते. श्री गुरू नानकदेवांचे वडील श्री काळूराम हे गावातील प्रतिष्ठित व्यक्ती असल्याने त्यांच्याकडे भाई बारदेजी यांचे जाणे येणे होत असे. त्यांच्या बरोबर भाई मरदाना ही नानकांच्या घरी जाऊ-येऊ लागला व दोघांची छान मैत्री जमली. मरदाना हा गुरूनानक यांचा पट्टशिष्य मानला जातो.[१८३]

भाई मरदाना हा वाद्यवाजनात तरबेज होता. विशेषत रबाब हे त्याचे आवडते वाद्य होते. 'रबाबी' या नावाने देखील तो ओळखला जातो. तो रबाब वाजवे तर गुरू नानक आपल्या सुमधूर आवाजात प्रभू भजने

गात असत. तासनतास दोघांच्या मैफल रंगत असे. ह्या सर्वामुळे दोघांमध्ये एक अतूट नाते निर्माण झाले.[१८४] पण नियतीने वेगळेच वळण घेतले. नानकांचे लक्ष व्यवसायात नसे. ते सदैव ईश्वर भजनात निमग्न असते. त्यामुळे काळूरामजी अत्यंत अस्वस्थ होते. त्यांना नीट मार्गावर आणण्यासाठी नानकी ही गुरू नानकांची बहीण गुरू नानकांना आपल्या घरी सुलतानपूरला घेऊन गेली. सुलतानपूर येथे नानकांमध्ये खरोखरच परिवर्तन घडून आले. ते नोकरी करू लागले. आणि त्यांनी विवाह करण्यास संमती दिली. त्यांचा विवाह सुलक्षणादेवी यांच्याशी बटाला येथे झाला. त्यासाठी तलवंडीहून जी मंडळी बटाळा येथे आली, त्यात अर्थात भाई मरदाना हाही होता. अशा रीतीने काही काळाच्या विरहानंतर ह्या दोघा मित्राची पुर्नभेट झाली ती मात्र भाई मरदानाच्या मृत्यूपर्यंत कायम टिकली.[१८५]

नानकांच्या विवाहानंतर मित्रा-मिंत्राच्यात गप्पा चालत्या असतांना नानकांनी मरदानास विचारले, “माझ्या विवाहानिमित्त मी तुला काय भेट देऊ ?” मरदाना लगेच उत्तरला, “मला एक छानसे रबाब दे.” नानकांनी ही लगेच एक रबाब मरदानास भेट म्हणून दिले. त्या दिवसापासून नानक, मरदाना व त्याचा रबाब हे सदैव एकत्रच राहिले. मरदाना नानकांबरोबर सुलतानपूरला आला व तेथे नोकरी करू लागला. श्री गुरू नानकदेवांना ‘वई’ नदीतील तीन दिवसांच्या अहोरात्र तपश्चर्येनंतर साक्षात्कार झाला, व त्यांनी संसार सोडून परिक्रमेसाठी सुलतानपूर सोडण्याचे ठरवले. मरदानानेही आपली नोकरी सोडून आपल्या रबाबासह नानकांना साथ देण्याचे ठरवले व तो ही नानकांबरोबर बाहेर पडला. इ.स. १४९७ बिआस नदी ओलांडून गुरू नानक मरदाना सोबत परिक्रमेसाठी निघाले. रस्त्यात एका निर्जन स्थळी ते विश्रांतीसाठी थांबले. तेथे भजन करता करता नानकजी समाधी मग्न झाले. दुपार झाली. मरदाना भुकेने व्याकूळ झाला. त्याने नानकांना तसे सांगितले. गुरू नानक म्हणाले, “थोडा धीर धर. परमेश्वरास सगळयांची काळजी आहे. योग्य वेळी योग्य गोष्ट घडेल. तू सारा भार सोडून ईश्वर भजनात निमग्न हो.” एवढे बोलून नानक परत नामस्मरणात दंग झाले.

थोड्याच वेळात त्याच मार्गाने एक श्रीमंत माणूस चालला होता. त्याचे लक्ष श्री नानकदेवांकडे गेले. हे एक सत्पुरूष आहेत हे जाणून त्याने गुरू नानक व मरदाना यांना सुग्रास भोजन दिले. तो गेल्यावर श्री गुरू नानक व मरदाना प्रवास करत करत आसम प्रदेशात येऊन पोहोचले. तो प्रदेश त्या काळी जादूटोण्यासाठी प्रसिध्द होता. त्या प्रातांतल्या स्त्रिया आपल्या मंत्र प्रभावाने पुरूषास बकरी बनवीत, अशी आख्यायीका होती. ह्याचा प्रत्यय मरदानास आला. एका जादूगार स्त्रीने मरदानास बकरी बनवून त्यास ती आपल्या घरी घेऊन गेली. श्री गुरू नानकांनी आपल्या अंतर्ज्ञानाने हे जाणले. ते त्या स्त्रिच्या दारी आले. श्री गुरू नानकदेवांनी त्या स्त्रीस आपल्या आध्यात्मिक शक्तीची चुणूक दाखवली व मरदानास सुखरूप सोडवून आणले.

आसाम प्रदेशात मरदानाच्या जीवनातील असाच एक भयानक प्रकार घडला. श्री गुरूनानकदेव व मरदाना घनदाट जंगलातून जात असता एकाएकी धरणीकंप झाला. मोठे वादळ आले. धुवाधार पाऊस सुरू झाला. मोठमोठे वृक्ष उन्मळून पडले. मरदाना खूप घाबरला. त्याला वाटले महाप्रलयच झाला आहे. आपण आता ह्यातच मरून जाणार. तो भीतीने गर्भगळीत झाला. त्याला काहीही सुचेनासे झाले. पण नानक मात्र शांत होते. ते प्रभुनामात तल्लीन होते. नानक मरदानास म्हणाले, "घाबरू नकोस, प्रभु परमात्म्यानेच त्याचे हे रौद्ररूप आपणास दाखवले आहे. सारे कुविचार दूर सार व आपले चित्त एकाग्र करून प्रभुनामाचे स्मरण कर. तो आपल्याला ह्यातून तारून नेईल, हा विश्वास बाळग." आणि झालेही तसेच, थोड्याच वेळात वादळ थांबले. गुरू नानक व मरदाना पुन्हा आपल्या मार्गस्थ झाले.[१८६]

आपल्या दुसऱ्या उदासींच्या पदयात्रेच्या अखेरीस त्यांच्या एक शिष्याने, खत्री करोडीमल याने रावी नदीच्या तीरावरील एक विशाल भूखंड श्री गुरू नानकदेवजी यांना दान दिला होता. तेथे त्यांनी एक धर्मशाळा बांधून वाटसरूंची सोय केली होती. दुसऱ्या उदासीनंतर श्री गुरू नानकदेवांनी मरदानास त्या भूखंडावर वास्तव्य करण्यास सांगितले व ते पुढे उत्तरयात्रेस निघून गेले. श्री गुरू नानकदेव आपली उत्तरयात्रा संपवून परत रावी नादीच्या तीरी जेथे त्यांनी मरदानास ठेवले होते त्या ठिकाणी आले. पाहाता तो काय ? मरदानाने त्या मरूभूमीचे नंदनवन करून टाकले होते. प्रत्यक्ष परमेश्वरास तेथे वास्तव्य करण्याचा मोह व्हावा अशी ती देवभूमीच जणू झाली होती. श्री गुरू नानकांनी त्या जागेचे नाव 'करतारपूर' असे ठेवले व आपली अंतिम उदासी संपवून श्री गूरू नानकदेव आपल्या आई, वडील, पत्नी व मुलांना घेऊन करतारपूर येथे कायम वास्तव्यासाठी आले.

इ.स. १५३४ साली मरदाना आत ७५ वर्षाचे झाले होते. अतिश्रमाने थकून गेले होते. श्री गुरूनानकदेवांच्या संगतीत आपले अंतिम क्षण मोजत होते. अखेर तो दिवस उगवला. श्री गुरू नानकदेवांनी मरदानास विचारले, "भाई मरदाना तुझा अखेरचा क्षण जवळ येऊन ठेपला आहे, तू मूसलमान कुळात जन्मला आहेस, तुझा अंत्यसंस्कार कसा व्हावा असे तुला वाटते ?" मरदाना म्हणाल, "मी कोण आहे हे मी केव्हाच विसरलो आहे. माझे व्यक्तीमत्व मी तूमच्यात कधीच विलीन केले आहे. मला आता स्वतंत्र अस्तित्व उरलेच नाही ? तुमचा धर्म तोच माझा धर्म आहे, तुम्हास योग्य वाटेल तसाच माझा अंत्यविधी करावा."[१८७] लवकरच मरदानाने आपली इहलोकीची यात्रा संपवली व श्री गुरू नानकांचा हा पहिला शिष्य स्वर्ग लोकी निघून गेला व त्याचा रबाब कायमसाठी स्तब्ध झाला. श्री गुरू नानकदेवांनी मरदानाच्या देहावर अग्निसंस्कार केला व त्याच्या आत्म्यास सत्‌गती प्राप्त करून दिली. गुरू नानक यांची पश्चिमेकडील शेवटची यात्रेहुन परत येतांना अफगानिस्तान येथील खुरम्म नदीजवळ भाई मरदाना यांनी गुरू नानक यांच्या मांडीवर अंतिम श्वास घेतला.[१८८]

**<u>२) बाबा सुंदरजी :-</u>**

बाबा सुंदरजी यांचा जन्म इ.स. १५६० साली गोविंदवाल शहरी झाला.[१८९] त्यांचे पिता बाबा आनंदजी हे श्री गुरू अमरदास यांचे सुपूत्र होत म्हणजेच बाबा सुंदरजी हे श्री अमरदासजी यांचे नातू होते.[१९०] बाबा सुंदरजी हे एक श्रध्दाळू शीख भक्त होते.

श्री गुरू अमरदासजींचा जेव्हा अंत्यसमय जवळ आला, तेव्हा त्यांनी आपल्या प्रिय शिष्यांना व आप्तस्वकीयांना जवळ बोलावून घेतले व त्यांना उपदेश केला की, मृत्यू जीवात्मा परमात्म्याच्या परम ज्योतीत एकरूप होऊन जातो. बाबा सुंदरजींनी हा उपदेश लेखबध्द केला. गुरू अमरदास यांच्या विचारांचे त्यांनी संकलन केले. समाजातील जाचक रूढी परंपराविषयी आवाज उठवला. त्यांच्या प्रकरणाचे नाव "रामकली साद" आहे. रामकली हे गायनशास्त्रातील रागाचे नाव आहे. 'साद' म्हणजे हाक होय. तो रामकली रागात निबध्द असून श्री गुरू ग्रंथ साहिबमध्ये पृष्ठ ९२३ वर अंकित केला गेला आहे. बाबा सुंदरजी यांची सहा कडवी आहेत आणि ती श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट केलेली आहेत. बाबा सुंदरजींनी आपल्या वयाच्या अवघ्या ४३व्या वर्षी म्हणजे इ.स.१६०३ मध्ये गोविंदवाल येथे जगाचा निरोप घेतला.[१९१] बाबा सुंदरजी यांची बाणी सदु राग रामकली श्री गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट आहे.[१९२] बाबा सुंदरजी यांनी एक 'सद्द' चे लिखाण केले.[१९३]

**<u>३)राय बलवंडजी :-</u>**

राय बलवंडजी आणि राय सत्ताजी हे दोघे मुस्लिम भाऊ पंजाब मधील जिंद राज्यातील जत्तपूर लम्मा खेड्यात रहात होते. ते मीरासींच्या 'मोखद' यालाच गाणारी त्या काळची शुद्र जात म्हणत.[१९४] बलवंड रायजी हे जातीने डोंब रबाबी होते.[१९५] त्यांचा आवाज अत्यंत सुरेल व वाणी अतिमधुन होती. ते सारंगी वाजवीत असत आणि गुरुसाहेबांच्या दरबारात कीर्तन करत असत, गुरू अर्जुनदेवांच्या गुरू दरबारात कीर्तन करत असत. त्यांच्या कीर्तनशैलीने भारून जाऊन खूप मंडळी त्यांच्या कीर्तनासाठी जमत असत.[१९६] कीर्तनातील कार्यामूळे गुरू अर्जूनदेवाने त्यांनी 'राय' ही पदवी दिली होती. गुरु अर्जुनदेवाच्या काळापर्यंत फक्त मुस्लिम संगीतकार आणि गायकच गुरुबानी अथवा गुरुचे अभंग गात असत, नंतर शीख लोकांना पण या कार्याचे शिक्षण दिले गेले.

बलवंडच्या मुलीचे लग्न ठरले. त्याने श्री गुरू अर्जुनदेवांना विनंती केली की, माझ्या मुलीच्या लग्नासाठी त्यांनी काही आर्थिक साहाय्य करावे. श्री गुरू अर्जुनदेव म्हणाले, उद्या तुझ्या कीर्तनात जी काही दक्षिणा जमेल ते सर्व पैसे तुझे. परंतु बलवंडच्या दुर्दैवाने त्या दिवशी कीर्तनात फारच थोडे पैसे जमा झाले. बलवंड निराश झाला. ह्या संधीचा फायदा घेऊन काही लोकांनी बलवंडजी यांना सांगितले की, श्री गुरू अर्जुन देवांचे तुला पैसे मिळू नयेत म्हणून हे रचलेले कारस्थान आहे. आणि यामुळे बलवंडजी अधिकच रागात आले. दुसरे दिवशी भर गुरू दरबारात बलवंड श्री गुरू अर्जुन देवांना उद्देशून म्हणाला, मला पैसे मिळू नयेत म्हणून तुम्ही रचलेला हा कट होता. हे माझ्या आता लक्षात आले आहे. पण खरे तर माझे

कीर्तन ऐकण्यास लोक जमतात व त्यामुळे तुम्हाला पैसे मिळतात. आमच्यामुळे तुमचा लोक आदर करतात. नाहीतर तुम्हाला कोण विचारेल ? हे शब्द ऐकून श्री अर्जुनदेवांना संताप आला. त्यांनी बलवंडला ताबडतोब गुरू दरबार सोडून जाण्यास सांगितले व सर्व शिखांना त्याच्यांशी कोणताही व्यवहार न करण्याची आज्ञा केली व स्वत: कीर्तनास उभे राहिले. त्या दिवशीचे ते कीर्तन फारच अप्रतिम झाले. हाच क्रम पुढे कित्येक दिवस चालू होता. राय बलवंडजी हे सुप्रसिध्द किर्तनकार होते. राय बलवंडजी यांनी ५ पौंड्या रचना केली.[१९७]

आता बलवंडला पश्चाताप झाला. भाई पृथ्वीचंदच्या बोलण्याला फसून गुरू महाराजांची निंदा केली. अहंकाराने प्रेरित होऊन गुरू महाराजांचा भर दरबारात अपमान केला हे शल्य त्याला बोचू लागले. तो सरळ श्री गुरू अर्जुन देवजींकडे गेला. त्यांचे पाय धरून त्यांची क्षमा मागू लागला. श्री गुरू अर्जुन देवांनीही त्यास क्षमा केले. गुरू दरबारात बलवंडचे कीर्तन पूर्ववत सुरू झाले. बलवंडनेही पुढे मन:पूर्वक गुरू सेवा केली. श्री गुरू अर्जुन देव गुणांचे पारखी होते. त्यांनी बलवंडचे गुण पारखले होते. म्हणूनच त्यांनी बलवंडास 'राय' ही पदवी बहाल केली. तेव्हापासून बलवंगडूम हा 'बलवंड राय' ह्या नावाने ओळखला जाऊ लागला. बलवंड यांनी रामकली रागात गुरूस्तुतीपर वार रचना केली असून ती श्री गुरू ग्रंथ साहिबमध्ये पृ.क्र.९६६ ते ९६८ यावर आहे.[१९८] राय बलवंदजी यांची पाच अभंग अथवा पदे श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत.[१९९] बलवंदजी म्हणतात, माता खिवी जी दुसरे गुरु श्री अंगददेजीच्या पत्नी ह्या थोर महिला होत. त्या सर्वांना डेरेदार वृक्षासारखी सावली देतात. गुरुच्या संपत्तीची व्यवस्था व वाटणी त्या लंगर मध्ये अमृताप्रमाणे चांगल्या तुपाच्या खिरीच्या वाटपाव्दारे करीत. गुरुसिख चे चेहरे आनंदाने सुखाने चमकतात आणि मन्मुख ने गुरू अगंद देवांनी केलेल्या पुरुषी कष्टांना पसंत केले होते. असा हा माता खिवीचा पती जो पृथ्वीचा भार सहन करतो.[२००]

**४) सत्ताडूम :-**

सत्ताडूम आणि बलवंडराय हे दोघे सख्खे भाऊ होते.[२०१] बलवंडराय यांच्या बरोबरच तोही गुरू अर्जुनदेवांच्या गुरू दरबारात कीर्तन करत असे व त्यानंतरही भाई सत्ताजी श्री गुरू हरि गोबिंदजींच्या गुरू दरबारात कीर्तन करत असे. भाई सत्ताजींवर श्री गुरू हरि गोबिंदजींचे अपार प्रेम होते. सत्ताजी हे एक सुप्रसिध्द किर्तनकार होते. सत्ताजींचा अतिंम संस्कार श्री गुरू हरि गोबिंदजींनी स्वहस्ते केला. रामकली रागातील वार रचनेच्या शेवटच्या ३ पौंड्या ह्या भाई सत्ताजींच्या असून त्या श्री गुरू ग्रंथसाहिब मध्ये पृ.क्र. ९६८ वर अंकित केल्या केल्या आहेत.[२०२]

**४.४.३ श्री गुरूग्रंथसाहिबातील अकरा भाटांची चरित्रे अथवा माहिती ::-**

'भट' हा शब्द त्या लोकांसाठी वापरला जात होता, जे लोक आपल्या मालकाची रक्षा करत असत आणि आपल्या मालकाकडून युध्द अथवा लढाई करत असत व आपल्या मालकाबद्दल नेहमी इमानदारीने

राहत असत आणि आपले जीवन पुर्ण पणे मालकासाठी जगत असत. आणि 'भट' या शब्दाचा दुसरा अर्थ असा की, जी व्यक्ती शुरवीर व यौध्दा व्यक्तींचे गुणगान करणारी अशी व्यक्ती होय.[२०३] श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये सहा गुरू, पंधरा संत, चार शीख यांच्या बरोबरच अकरा भटांची अथवा भाटांची वाणी संकलित केलेली आहे. पण त्या पैकी कोणाचीच चरित्रे उपलब्ध नाहीत.[२०४] मुळ संस्कृत शब्द भ्रित मूळ संस्कृत धातू भ्रि ह्या पासून 'भट' हा शब्द आला आहे. ह्यासच मराठी मध्ये भाट ही संज्ञा आहे. भट अथवा भाट हा समाज मूळ राजस्थानात निर्माण झाला, ह्या समाजातील लोक राजे लोकांची वंशावळ लिहीत व राजांच्या आणि त्यांच्या पूर्वजांनी गाजवलेल्या शौर्याची रसभरीत वर्णने करीत. एवढेच नव्हे तर ते शुर लढवय्येही होते.

राजा पृथ्वीचंदला महमद घोरीच्या कैदेतून सोडविणारा व पृथ्वीचंदसाठी हसत हसत प्राणार्पण करणारा चांदभट याची कथा राजस्थानातील प्रत्येकाला माहित आहे. ही भट जमात नवव्या शतकापासून हे कार्य करत आली आहे. पुढे ह्या जमातीचा प्रसार राजस्थानाबरोबरच सिंघ, पंजाब प्रातांतही झाला. श्री गुरू नानकांच्या अद्वितीय कार्याने मोहीत होऊन ते नानकांच्या आश्रयाला आले. त्यापैकी काहींनी गुरूच्या स्तुतिपर काव्ये केली. गुरूंची चरित्रे जनतेस सांगितली. गुरूंचा उपदेशही आपल्या रसाळ वाणीने जनसामान्यांपर्यत पोहोचवला. शिखांबरोबरच अनेक भटांनी देशाच्या व धर्मांच्या रक्षणार्थ आपल्या प्राणाचे बलिदान दिली. श्री गुरूग्रंथसाहिबात ११ भटांच्या १२३ पदांचा समावेश करण्यात आला आहे.[२०५]

### १) **भट भीखाजी :-**

श्री गुरू नानकदेवांच्या जीवनात सुलतानपूरला विशेष स्थान आहे. येथेच ते नोकरीस लागले. भट भीखाजी रईया यांचे सुपूत्र होते.[२०६] भट भिखाजी यांचा जन्म सुलतानपूर येथे झाला.[२०७] संसारास पडले. येथेच त्यांना वही नदी तीरी आत्मसाक्षात्कार झाला व येथूनच ते धर्म प्रचारार्थ बाहेर पडले. त्यांचे वडील भट रइआजी हेही सुलतानपूरचे रहिवासी होते. त्यांच्या कानावर नानकांच्या अनेक कथा पडत होत्या. त्यांनी प्रभावित होऊन भट रइआजी व त्यांचे सारे गणगोत शीख गुरूच्या भजनी लागले. भट रइआजी यांचे जेष्ठ पुत्र भीखाजी अथवा भिखनजी हे शीख गुरूंचे पहिले भाट आहेत. भट कीरत जी, मथुरा जी, व जालप जी हे त्यांचे तीन सुपूत्र होते. भट कीरत जी, मथुरा जी व जालप जी यांनी गुरू अमरदास, गुरू रामदास, व गुरू अर्जुन यांचे वर्णन केले आहे.[२०८] त्यांच्या दोन रचनांचा समावेश श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये पृष्ठ क्र. १३९६ वर केलेला आहे.[२०९]

### २) **भट कीरतजी** :-

भट कीरतजी हे भट भिखाजींचे पुत्र होते.[२१०] ते ही गुरू हरिगोविंद रायजींच्या काळात गुरू दरबारात भाट होते. त्यांची ८ पदे श्री गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट केलेली आहेत. त्यापैकी ४ सवयै महले तीजे की

मध्ये तर उरलेली ४ महले चार मध्ये आहेत. भट कीरतजी हे गुरू हरिगोविंदराय यांच्या सैन्यात होते आणि देश व धर्म रक्षणार्थ मोगलांविरूध्द लढतांना हुतात्मा झाले.[२११]

**३) भट जालपजी** :-

भट जालपजी हे भिखाजींचे दुसरे पुत्र होते. भट जालप जी यांना 'जल' नावाने देखील ओळखले जाते.[२१२] त्यांच्या मनात सर्वच शीख गुरूंच्या प्रती अनन्य श्रध्दा व भक्ती वास करत होती. पण त्या सर्वांत श्री गुरू अमरदासांबद्दलच्या त्यांच्या भावना अधिक खोलवर रुजलेल्या होत्या. हे त्यांच्या सवये महले तीजेकी मधील ५ पदांवरून लक्षात येते. सदर पदे श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये पृष्ठ क्र. १३९४ वर अंकित केलेल्या आहेत.[२१३]

**४) भट मथूराजी :-**

भट मथुराजी हे भट भिखाजींचे तिसरे पुत्र होते. भट मथुराजी हे आपले पिता व अन्य दोन बंधुसह गुरू सेवेत समर्पित होते.[२१४] भट मथूराजी यांची १४ पदे श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट आहेत.[२१५] त्यांनी चौथे गुरू श्री गुरू रामदास यांच्या स्तुतिपर ७ पदे लिहिली असून ती सवयै महले चौथे के या शीर्षकाखाली श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये पृष्ठ क्र. १४०४ व १४०५ वर अंकित केलेली आहेत. तसेच पाचवे गुरू श्री गुरू अर्जुन देव यांच्यावर केलेल्या ७ पदांचा अंतर्भाव श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये सवयै महले पंजवे के ह्या शीर्षकाखाली करण्यात आला आहे.[२१६] भट मथूराजी हे श्रीगुरूग्रंथसाहिबा ला परमात्मा स्वरूप मानत होते.[२१७]

**५) भट सलहजी :-**

भट भिखाजींचे धाकटे बंधू व भट सेखेजी यांचे सुपूत्र होते.[२१८] भट सलहजी यांच्या वडीलांचे नाव भाई सेखे होते.[२१९] त्यांनीही श्री गुरू अमरदास यांच्या स्तुतिपर एक पद रचले असून ते सवयै महले तीजे के या शीर्षकाखाली तर श्री गुरू रामदास यांच्या स्तुतिपर रचलेली दोन पदे सवयै महले चौथे की या शीर्षकाखाली श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत.[२२०]

**६) भट भलहजी** :-

भट भलहजी हे सलहजींचे बंधू भिखाजींचे पुतणे होत.[२२१] श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये भट भलहजी यांचे १ पद समाविष्ट आहे.[२२२] यांचे श्री गुरू अमरदासजी यांची स्तुती करणारे गीत श्री गुरूग्रंथसाहिबमध्ये सवयै महले तीजेके ह्या मध्ये श्री गुरूग्रंथसाहिब पृष्ठ क्र. १३९६ वर अंकित केले गेले आहे.[२२३]

**७) भट नलहजी** :-

भट नलहजी हे भट सेखेजी व भट भिखाजींचे पुतणे होत. भट नलहजी हे 'दास' या उपनावाने ओळखल्या जातात.[२२४] यांचे आणखी एक सुपुत्र यांनी श्री रामदासजी यांची स्तुती करणारी सोळा पदे रचली असून ती सवयै महले चौथे के ह्या शीर्षकाखाली श्री गुरूग्रंथसाहिब मध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत.

ते दास ह्या उपनावाने ओळखले जातात व त्यांच्या काही पदात हीच नाममुद्रा अंकित केली गेली आहे.[२२५] 'गोविंदवाल' या शहराला भट नलह जी स्वर्गाचा दर्जा देतात.[२२६]

**८) भट बलहजी** :-

भट बलहजी हे भट सेखेजी यांचे सुपूत्र व भट भिखाजी यांचे पुतणे होत.[२२७] त्यांची पाच पदे सवयै महले चौथे के या शीर्षकाखाली श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट केली असून ती श्री गुरू रामदास यांच्या स्तुतिपर रचण्यात आली आहेत.[२२८]

**९) भट कलसहार** :-

भट कलसहार हे भक्त चौखेजी यांचे सुपुत्र व भट भिखाजी यांचे पुतणे होत.[२२९] त्यांची एकून ५४ पदे श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट असून त्यांनी ती पहिल्या पाचही गुरूच्या स्तुतिपर लिहिलेली आहेत.[२३०] ही ५४ पदे सवयै महले पहले के १०, महले दूजे के १०, तीजे कै ९, चौथे के १३ , व पंजवे के १२ ह्या प्रमाणे गुरूग्रंथसाहिबामध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत. ह्या सर्व पदांत त्यांनी आपला उल्लेख कलसहार बरोबर कधी कलह, कल, किंवा टल असाही केलेला आढळतो.[२३१] भट गयंद जी हे भट कलसहार यांचे भाऊ होते. टल किंवा कलह हे यांचे उपनाव होते.[२३२]

**१०) भट गयंदजी** :-

भट गयंदजी हे भट कलसहारजी यांचे धाकटे बंधू भाई चौखेजी यांचे सुपुत्र व भट भिखाजी यांचे पुतणे होत.[२३३] भट गयंदजी यांनी श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये श्री गुरू रामदास यांच्यावर १३ पदे रचली आहेत.[२३४] व ती सवयै चौथे की या शीर्षकाखाली श्री गुरूग्रंथसाहिबामध्ये पृष्ट क्र. १४०१ ते १४०३ वर आहेत.[२३५]

**११) भट हरीबंसजी** :-

भट हरीबंसजी हे भट गोखे यांचे सुपूत्र होते.[२३६] भट हरिबंसजी यांनी शिखांचे पाचवे गुरू श्री गुरू अर्जुनदेवजी यांच्या स्तुतिपर २ पदांची रचना केल्या आहेत त्या श्री गुरूग्रंथसाहिबातील पृष्ट क्र. १४०९ वर अंकित केल्या आहेत.[२३७] भट हरिबंस जी यांनी गुरू ज्योति ची महिमा व महत्त्व सांगीतले आहे.[२३८]

**सारणी क्र.४.१ गुरुग्रंथसाहिबातील पदे व त्यांचे लेखक.**

| अ.क्र. | लेखक | काळ | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | गुरू नानक | १५ वे शतक | ९७४ |
| २ | गुरू अंगद | १६ वे शतक | ६२ |
| ३ | गुरू अमरदास | १६ वे शतक | ८६९ |
| ४ | गुरू रामदास | १६ वे शतक | ६७९ |
| ५ | गुरू अर्जुन | १६ वे शतक | २३१२ |
| ६ | गुरू तेगबहादूर | १७ वे शतक | ११६ |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | भगत जयदेव | १३ वे शतक | २ |
| ८ | भगत फरीद | १३ वे शतक | ११६ |
| ९ | भगत रामानंद | १४ वे शतक | १ |
| १० | भगत नामदेव | १४ वे शतक | ६१ |
| ११ | भगत त्रिलोचन | १४ वे शतक | ४ |
| १२ | भगत परमानंद | १४ वे शतक | १ |
| १३ | भगत धन्ना | १४ वे शतक | ३ |
| १४ | भगत भिखन | १४ वे शतक | २ |
| १५ | भगत बेनी | १४ वे शतक | ३ |
| १६ | भगत पिपा | १४ वे शतक | १ |
| १७ | भगत सेन | १४ वे शतक | १ |
| १८ | भगत सुरदास | १४ वे शतक | १ |
| १९ | भगत साधना | १४ वे शतक | १ |
| २० | भगत रविदास | १५ वे शतक | ४० |
| २१ | भगत कबीर | १५ वे शतक | ५३२ |
| २२ | बाबा सुदंर | १५ वे शतक | १ |
| २३ | सत्ताडुम | १५ वे शतक | ३ |
| २४ | बलवंत | १५ वे शतक | ५ |
| २५ | भक्त केशर | १५ वे शतक | ५४ |
| २६ | भक्त बल्ह | १५ वे शतक | ५ |
| २७ | भक्त भल्हा | १५ वे शतक | १ |
| २८ | भक्त भिका | १५ वे शतक | २ |
| २९ | भक्त गायंद | १५ वे शतक | १३ |
| ३० | भक्त हरबन्स | १५ वे शतक | २ |
| ३१ | भक्त जलाप | १५ वे शतक | ५ |
| ३२ | भक्त किरत | १५ वे शतक | ८ |
| ३३ | भक्त मथूरा | १५ वे शतक | १४ |
| ३४ | भक्त नल्ह | १५ वे शतक | १६ |
| ३५ | भक्त साल्ह | १५ वे शतक | ३ |
| ३६ | भाई मरदाना | १५ वे शतक | १ |

**आलेख क्र.४.१ गुरुग्रंथसाहिबातील पदे व त्यांचे लेखक.**



**सारणी क्र.४.२ गुरुग्रंथसाहिबाचे लेखक अथवा वाणीकार.**

| अ.क्र. | लेखक | संख्या |
|---|---|---|
| १ | शिख गुरू | ६ |
| २ | इतर भाषिक संत | १५ |
| ३ | भटांची संख्या | ११ |
| ४ | गुरसिक्ख | ४ |
| | **एकूण** | **३६** |

**आलेख क्र.४.२ गुरुग्रंथसाहिबाचे लेखक अथवा वाणीकार.**



**सारणी क्र.४.३ गुरुग्रंथसाहिबातील शिख गुरू व त्यांची पदांची संख्या.**

| अ.क्र. | शिख गुरूंची नावे | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | गुरू नानक | ९७४ |
| २ | गुरू अंगद | ६३ |
| ३ | गुरू अमरदास | ८६९ |
| ४ | गुरू रामदास | ६३८ |
| ५ | गुरू अर्जुन | २३१२ |
| ६ | गुरू तेगबहाद्दूर | ११६ |
| | **एकूण** | **४९७२** |

**आलेख क्र.४.३ गुरुग्रंथसाहिबातील शिख गुरू व त्यांची पदांची संख्या.**



**सारणी क्र.४.४ गुरुग्रंथसाहिबातील इतर भाषीक संत व त्यांची पदांची संख्या.**

| अ.क्र. | संतांची/भक्तांची नावे | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | शेख फरीदजी | ११६ |
| २ | संत त्रिलोचन | ४ |
| ३ | संत साधना | १ |
| ४ | संत रामानंद | १ |
| ५ | संत नामदेव | ६१ |
| ६ | संत बेणी | ३ |
| ७ | संत जयदेव | २ |
| ८ | संत भिखन | २ |
| ९ | संत सेनजी | १ |
| १० | संत सूरदास | १ |
| ११ | संत परमानंद | १ |
| १२ | संत पीपाजी | १ |
| १३ | संत धन्ना | ३ |
| १४ | संत रविदास | ४० |
| १५ | संत कबीर | ५३२ |
| | **एकूण** | **७६९** |

**आलेख क्र.४.४ गुरुग्रंथसाहिबातील इतर भाषीक संत व त्यांची पदांची संख्या.**



## सारणी क्र.४.५ गुरुग्रंथसाहिबातील भाटांच्या पदांची संख्या.

| अ.क्र. | भाटांची संख्या | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | भट हरिबंसजी | २ |
| २ | भट बल्हजी | ५ |
| ३ | भट मथुराजी | १४ |
| ४ | भट गयंदजी | १३ |
| ५ | भट नल्हजी | १६ |
| ६ | भट भल्हजी | १ |
| ७ | भट सल्हजी | ३ |
| ८ | भट भिखाजी | २ |
| ९ | भट किरतजी | ८ |
| १० | भट जालपजी | ५ |
| ११ | भट कलसहारजी | ५४ |
| | **एकूण** | **१२३** |

## आलेख क्र.४.५ गुरुग्रंथसाहिबातील भाटांच्या पदांची संख्या.



**सारणी क्र.४.६ गुरुग्रंथसाहिबातील गुरसिक्खांच्या पदांची संख्या.**

| अ.क्र. | गुरसिक्खांची नावे | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | राय बलवंड | ५ |
| २ | भाई सत्ताडूम | ३ |
| ३ | बाबा सूंदरजी | १ |
| ४ | भाई मरदाना | १ |
| | **एकूण** | **१०** |

**आलेख क्र.४.६ गुरुग्रंथसाहिबातील गुरसिक्खांच्या पदांची संख्या.**



**सारणी क्र.४.७ गुरुग्रंथसाहिबातील पदांचे राग**

| अ.क | रागांचे नाव | अ.क | रागांचे नाव |
|---|---|---|---|
| १ | राग सिरी रागु | १६ | राग बिलावल |
| २ | राग माझ | १७ | राग गोंड |
| ३ | राग गउड़ी | १८ | राग रामकली |
| ४ | राग आसा | १९ | राग नट नाराईन |
| ५ | राग गूजरी | २० | राग मारु |
| ६ | राग देवगंधारी | २१ | राग माली गउड़ा |
| ७ | राग बिहागड़ा | २२ | राग तुखारी |
| ८ | राग वडहंसु | २३ | राग केदारा |
| ९ | राग सोरठि | २४ | राग भैरउ |
| १० | राग धनासरी | २५ | राग बसंत |
| ११ | राग जैतसरी | २६ | राग सारंग |
| १२ | राग टोडी | २७ | राग मलार |
| १३ | राग बैराड़ी | २८ | राग कानड़ा |
| १४ | राग तिलंग | २९ | राग प्रभाती |
| १५ | राग सूही | ३० | राग कलिआण |
|  |  | ३१ | राग जैजावंती |

**संदर्भ ग्रंथ :-**


१. Singh Patwant, (२०००). The Sikhs Alfred A Knopf Publishing, p.no.१७.

२. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.११७.

३. Deol Harnik, (२०००). Religion and Nationalism in India, Routledge, p.no.२२.

४. Ibid p.no.२२.

५. Singh Mann, (२००१). The Making of Sikh Scripture, Published by Oxford University Press, Oxford, p.no.५.

६. Singh Kohli Surindar Singh Kohli, (१९९३). History of Punjabi Literature, National Book, p.no.४८.

७. Dass Nirmal, (२०००). Songs of the Saints from the Adi Granth, Suny Press, p.no.१३.

८. Shapiro, Michael, (२००२). Songs of the Saints from the Adi Granth, Journal of the American Oriental society, p.no.९२४.

९. Brekke Torkel, (२०१४). Relidion, War and Ethics: A Sourcesbook of Textual Traditions ( Editors, Gregory M. Reichberg and Henrik Syse), Cambridge University Press, Cambridge, p.no.६७३.
१०. Christopher Shackle, Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus:Selections from the Sikh Scriptures, Routledge, p.no.xviii-xix.
११. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.३४.
१२. Shackle, Christopher; Mandair, Arvind-Pal Singh, (२००५). Teachings of the Sikh Gurus: Selections from the Sikh Scriptures, United Kingdom:Routledge, p.no.xviii.
१३. कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहादुर, गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे,खंड २, दुसरी आवृत्ती, पृ.क्र.९०.
१४. Pashaura Singh; W.H.McLeod, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Rowman & Littlefield Publishers, p.no.३९९-४००.
१५. Singh Khushwant, (१९९१). A History of the Sikhs: Volume १, १४५९-१८३९, Oxford University Press, Oxford, p.no.३४.
१६. Ernest Trumpp, (२००४). The Adi Granth of the Holy Secriptures of the Sikhs India : Munshiram Monoharlal Publishers, p.no.xxxi.
१७. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.११८.
१८. Singh Khushwant, (१९९१). A History of the Sikhs: Their Religious Biliefs and Practices, Sussex Academic Press, p.no.५४-५५.
१९. Ibid, p.no.५४-५५.
२०. Christopher Shackle; Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus: Selections from the Sikh Scriptures, Routledge, p.no.xviii-xix,xxii.
२१. Gopal Singh (Translated), Mahalla Nawan:Compostitions of Guru Tegh Bahadur-The Ninth Guru(from Sri Guru Granth Sahib):Bani Guru Tega Bahadara - Tegh Bahadur, Allied Publishers, p.no.xxviii-xxxiii, १५-२७.
२२. Christopher Shackle, Mandair Arvind, (२०१३). Teacings of the sikh Gurus:Selections from the Sikh Scriptures, Routledge, ISBN ९७८११३६४५१०८९, p.no.xviii-xix.
२३. Shackle Christopher Mandair ; Singh Arvind Pal, (२००५). Teachings of the Sikh Gururs:Selections from the Sikh Scriptures, Routledge, United Kingdom, p.no.xviii.
२४. Ibid, p.no.xv-xvi.
२५. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवाचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मस प्रकाशन,औरंगाबाद, पृ.क्र.४०.
२६.Louis Fenech, (२०१४). In The Ozford Handbook of Sikh Studies, Editors : Pashaura Singh, Louis E. Fenech, Oxford University Press, ISBN ९७८०१९९६९९३०८, p.no.३६.
२७. मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औरंगाबाद, पृ.क्र.११८.
२८.कित्ता, पृ.क्र.१२०.
२९. Teece, Geoff, (२००४). Sikhism:Religion in Focus, Black Rabbit Books Publicaion, ISBN ९७८१५८३४०४६९०, p.no.४.

३०. Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhism:A Guide for the Perplexed, Bloomsbury Academic, ISBN ९७८१४४११०२३१७, p.no.१३१.
३१. Jeffrey Haynes, (२००८). Routledge Handbook of Relision and Politics, (१ ed.), Routledge Publication, p.no.३१६.
३२. Singh Nirmal, (२००८). "१०" Searches in Sikhism thought understnading observance, New Delhi, Hemkunt Publishers, p.no.१८४.
३३. Dale Hoiberg ; Ramchandani Indu, (२०००). Students Britanniaca India, Popular Prakashan, p.no.२०७.
३४. Singh Mann Gurinder, (२००१). The making of Sikh Scripture, Oxford University Press, Oxford, p.no.५.
३५. Ruhel Giriraj, (२००३). Glory of Indian Culture, Diamond Pocket Books P.Ltd, p.no.९६.
३६. Priyamvada Amrita, (२००७). Encylopaedia of Indian Music, p.no.२५२.
३७. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.४.
३८. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१३३.
३९. Fowler Jeaneane, (१९९७). World Religions: An Introduction for Students, Sussex Academic Press, p.no.३५४.
४०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१४२१.
४१. सरना परमजीत सिंह ; दलजीत सिंह, (२००८). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गुरद्वारा प्रबंधक कमेटी, गुरउपदेश प्रिंटर्स, न्यु दिल्ली, पृ.क्र.८.
४२. FowlerJeaneane, (१९९७). World Relitions : An Introduction for Students, Sussex Academic Press, p.no.३५५.
४३. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१११.
४४. सरना परमजीत सिंह ; सिंह दलजीत, (२००८). गुरू ग्रंथ साहिब-जीवन युक्ति, धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग), दिल्ली सिक्ख गुरव्दारा प्रबंधक कमेटी, दिल्ली. पृ.क्र.२०.
४५. ज्ञानी सिंघ नरैण, (२००९). श्री गुरू भगत माल सटीक, प्रकाशक भ.चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, पृ.क्र.४३०.
४६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५२२.
४७. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०६.
४८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५२२.
४९. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०६.
५०. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५२२.

बेनु बाजाव उगो |' या शब्दांत, अनाहत नादाच्या साहाय्याने परब्रम्हात रमून जाण्यातील आत्मानंद नामदेवांनी उत्तरेतील आपल्या बांधवांत सांगितला आहे.[५७] पंजाबातील आपल्या सुमारे अठरा वर्षाच्या वास्तव्यात नामदेवांनी अनेक शिष्यांना परमार्थ विचार समजावून सांगितला. अशाप्रकारे त्यांनी हिंदी संतमताची स्थापना केली.

नामदेव थोर भक्त होते, तसेच ते कुशल संघटकही होते. संत बहिणाबाई एका अभंगात म्हणतात, त्याप्रमाणे संत कृपेने वारकरी पंथांचे भक्तीमंदिर बांधून पूर्ण झाले. ज्ञानदेवांनी त्या मंदिराची पायाभरणी केली. ज्ञानेश्वरीच्या माध्यमातून त्यांनी वारकरी पंथास तत्वज्ञानाचे अधिष्ठान प्राप्त करून दिले. 'नामा तयाचा किंकर | तेणें केलासे विस्तार ||' असे बहिणाबाई सांगतात. ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान नामदेवांनी आपल्या अभंगवाणीने सुबोध व रसाळ करून सांगितले. ज्ञानदेव हे वारकरी संप्रदायाचे प्रवर्तक आहेत आणि नामदेव हे त्या संप्रदायाचे प्रवर्धक आहेत. भजन-कीर्तनाच्या संप्रदायाची नामदेवांनी केलेली उभारणी. महाराष्ट्रातील संतांची त्यांची मांदियाळी, पंजाबातील भक्तांचे त्यांचे शिष्यमंडळ, गुरूग्रंथातील त्यांची पदरचना, भूपाळ्या-आरत्या-बोबडा-भारूडे अशा विविध रचनांतून त्यांनी साधलेला लोकाभिमुख दृष्टिकोन, हे त्यांच्या समाजप्रबोधनाचे तेजस्वी पैलू आहेत.[५८] संत तुकारामाला गुरूपदेश झाल्यानंतर कवित्वाची स्फूर्ती झाली. संत नामदेवांनी पांडूरंगासवे स्वप्नात येऊन जागे केले आणि कवित्व करावयास सांगितले. वारकरी संप्रदरायाच्या संघटनेचे कार्य नामदेवांनी ज्ञानदेवांच्या हयातीतच केले. पण ज्ञानदेवांनी समाधी घेतल्यानंतरही पन्नास वर्ष महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर त्यांनी विठ्ठलभक्तीचा ध्वज फडकाविला, सर्वांना प्रेमभक्तीने भारले. नामसंकीर्तनाची परंपरा सुरू केली आणि वारकरी संप्रदाय प्रभावशाली बनविला. संत नामदेवांनी प्रपंचाची भक्ती केली नाही. त्यांनी भक्तीचाच प्रपंच केला. संत नामदेवांच्या इतर अभंगातून त्यांच्या साधक जीवनातील प्रबळ अशा मनोवृत्तींचा उत्कट अविष्कार झाला आहे.

संत नामदेव महाराज यांचे काही अभंग खालील प्रमाणे आहेत.

१)हरीनामगंगे सुस्नात पै झाला ।
नाम्याजवळी आला केशिराज ।।[५९]

संत नामदेव महाराज वरील अभंगात म्हणतात की, नामाचे सामर्थ्य न कळण्याइतके मोठे आहे. अनाकलनीय असे आहे. नामाचे सामर्थ्य सांगण्यास निघालेला वेद देखील मौनावला.[६०] शास्त्रे, पुराणे यांना देखील नामाचे सामर्थ्य समजले नाही. एवढेच नव्हे तर साक्षात् शेषाची तोंडे देखील नामाच्या सामर्थ्य वर्णनास कमी पडल्यामुळे मौनावली. त्यासाठी श्री नामदेव महाराजांनी काही पुराणातली उदाहरणे दिली आहेत. पुढे ते म्हणतात तर मग इतर सामान्य जन नामाचे महत्त्व काय जाणणार ?[६१] नामाचे सामार्थ्य नेणे वेदशास्त्र । शेषाची वक्त्रे मौनावली ।। १ ।।

२)ऐेसिया नामापरते नाही सार ।

गिरिजेसी शंकर उपदेशी ।। ७ ।।[६२]

संत नामदेव महाराज सांगतात की, नामभक्ती योगाचे महत्व इतके आहे की, रामनाम स्मरण केले किंवा नुसते रामनामाचे भजन ऐकले तरी यम जवळ येत नाही दूर पळून जातो. ज्या नामाला, नामाच्या स्मरणाला साक्षात् यम देखील घाबरतो त्या हरीचे नाम जर पाठ केले.[६३] त्याचा जप केला तर ज्या ऋध्दीसिध्दी प्राप्त करून घेण्यासाठी अनेक तप, योग, याग यांचे अनुष्ठान करावे लागते त्या या नामधारक भक्तापाशी येऊन त्याचे दास्यत्व पत्करून काम करतात. अनेक साधनांचे शेवटी साध्य काय ? तर परमेश्वराप्राप्ती करून घेणे हे आहे.

३)नामा हे महिमान जाणे ।

घेतो विठ्ठलाची आण ।।[६४]

संत नामदेव महाराज वरील अभंगात सांगतात की, नामाचा महिमा वर्णन करावयाचा झाला तरी तो किती करावा ? याला काही सीमा नाही, परंतु एवढे मात्र खरे की नाम घेताना ते दृढनिष्ठापूर्वक, अत्यंत प्रेमपूर्वक असे घेतले पाहिजे. केवळ मिरवण्यासाठी वा वरवर दाखविण्यासाठी नाम घेतल्यास त्याचा काही उपयोग नाही. त्यामुळे त्याचे योग्य ते फल प्राप्त होणार नाही. म्हणून नाम हे सोपे असले, नामाचा महिमा अगाध असला तरी ते भावपूर्वक घेणे महत्त्वाचे व आवश्यक आहे.

४)सर्वकाळ पुण्याच्या राशी । हरिनाम आलिया जिव्हेसी ।।

नित्य अनुष्ठानाच्या राशी । कोटी तप ।।[६५]

संत नामदेव महाराज वरील अभंगात सांगतात की, हरीनामोच्चारण व नामस्मरण करण्यामुळे जे पुण्य होते त्याची कोणत्याही प्रकाराने गणना करता येत नाही. मोजमाप करता येत नाही.[६६] अशाच प्रकारे नामाचे माहात्म्य सांगत असताना श्री नामदेवराय सांगतात. सतत हरी नाम घेण्याने प्राप्त होणारे पुण्य हे किती असते ? तर रोज अनेक तपे करून त्याच्या राशी, त्याच प्रमाणे अनुष्ठानांच्या राशीच्या राशी, तसेच कोटी यज्ञाने मिळणारे जे पुण्य, ते एका नामाच्या सर्वकाळ जपाने प्राप्त होते. कोटी यज्ञ करणे हे इतके सोपे काम नाही. एक तर कर्मयोग हा आचरणास कठीण असतो, हे आपण यापूर्वी देखील पाहिले आहे. त्यानुसार कोटी यज्ञ करून त्यापासून पुण्याची व त्याद्वारे परमेश्वराची प्राप्ती करून घेणे हे अवघड आहे, परंतु सोप्या अशा एका नामाने ते सहज प्राप्त होते. तसेच नाम घेणारा एकटा नामधारकच फक्त त्याच्या नामस्मरणाच्या जोरावर तरून जातो, असे नाही तर त्याचा वंशज त्यामुळे धन्य होतो.

५)सिध्दीचें सहज भक्तीचे हे बीज ।

केशवी दिले मज म्हणे नामा ।।[६७]

संत नामदेव महाराज सांगतात की, इतर कोणत्या तरी दैवताची पूजा करण्यापेक्षा पंढरपूरात जे प्रत्यक्ष परब्रह्म आहे त्याची पूजा करा. सहज सिध्दी प्राप्त करून घेण्याचे हे बीज आहे.

६) नामा जपे नामावळी । अखंड जप हेंचि सदाकाळी ।

हरिनामे पिटोनि टाळी । हाचि तरणोपाय सकळांचा ।। ४ ।।

संत नामदेव महाराज सांगतात की, आपल्या जीवाला सतत देवाच्या नामस्मरणात गुंतवा, आणि त्यामुळे आपल्या जीवाचे हरि, माधव, यादव, केशव, गोविंद, कृष्ण इ.नामस्मरणाने सर्वकाळ रंजन होईल. मनाला या नामाच्या मनोरंजामुळे आनंद मिळेल. असे आनंदाने सतत नाम घेण्याचे गर्भवासाच्या यातना, नाना योनीत जन्म घेणे हे तर चुकते पण साक्षात् यम, कळिकाळ हा यातना देत नाही तर तो त्या भक्ताच्या जवळ यायलाच घाबरतो तो दूर पळून जातो. त्यासाठी श्री नामदेवराय म्हणतात की, नामाचा सतत जप करीत राहणे, टाळी वाजवावी आणि हरिनामसंकिर्तन करणे हरिनाम हाच एक सगळ्या उपायांचा तरणोपाय आहे.

७)नामाजपे ध्यानी मनी। अखंड विठ्ठल हरी कीर्तनी ।।

तेणे जपे ये मेदिनी । कोटी यज्ञ घडले ।। ४ ।।[६८]

संत नामदेव महाराज वरील अभंगात सांगतात की, मी मुखाने नामजप करतो, तो श्री विठ्ठलेशच माझ ाा ध्यानी आणि माझ्या मनी आहे. जो कोणी अखंड हरिकीर्तन करतो, त्यामुळेच या पृथ्वी तलावर कोटी यज्ञ घडले, असे त्याचे पुण्य फल होते.

८)नामा जपे ठेवूनि चित्त । अखंडचरणी झाला रत ।

पुरले आमचे मनोरथ । सर्व कृतार्थ पै झाला ।। ४ ।।[६९]

संत नामदेव वरील अभंगात सांगतात की, मी अखंड नाम जप करतो आणि माझे चित्त नामस्मरण करीत असताना अखंड हरी चरणी रत झालेले असते. गुंतलेले असते. त्यामुळेच माझ्या मनीचे जे कृतार्थतेचे मनोरथ ते सर्व पूर्ण झाले.

९)दो अक्षरी राम जप परम ।

नलगे तुज नेम नाना पंथ ।। ३ ।।[७०]

संत नामदेव महाराज सांगतात की, नाना पंथांच्या वा साधनांच्या वाचून किंबहूना ! अन्य निरपेक्षतेने 'नाम- जमयज्ञ' ही परम साधना म्हणजे दोन अक्षरी 'राम' नामजप हीच आहे.

१०)नामा म्हणे ब्रह्म हेचि निरूपण ।

सर्व काम पूर्ण याच्या नाम ।। ४ ।।

संत नामदेव महाराज सांगतात की, विठ्ठलाच्या चरणी अखंड दृढ विश्वास ठेवून नामस्मरण केले पाहिजे. ब्रह्म नामाच्या साधनेने साधक पूर्णकाम होतो, असा हा नाम-साधनेचा महिमा आहे.

११)नामा म्हणे आम्हा दीनांचे माहेर ।

तो एक उदार पांडुरंग ।। ४ ।।[७१]

संत नामदेव सांगतात की, परमात्म्याचे ठिकाणी परम म्हणजे निरतिशय अशी जी प्रीति, तीच भक्ति होय. त्या परम-प्रेम लक्षण वृत्तिपूर्वक नाम घेणे, हीच 'नामभक्ती' देव पदवीच्या प्राप्तीचे, सुलभ व निश्चित फलप्रदातृत्व संपन्न साधन असल्याचे सांगितले आहे.

१२)लंकेसी उरलें बिभिषणाचे घर । हृदयी सीतांवर धरिला म्हणोनि ।। ६ ।।

नामा म्हणे स्वामी स्मरावे गोविंदा । चुके भवबाधा संसाराची ।। ७ ।।

संत नामदेव महाराज सांगतात की, ज्यावेळी हनुमानरायांनी लंका पेटवून दिली त्यावेळी सगळी लंका पूर्ण पेटली, पण बिभीषणाचे घर, निवासस्थान मात्र तसेच्या तसे अगदी सुरक्षित राहिले. याचे कारण बिभीषणाच्या रामभक्ती हेच होते. संसारातली संकटे किंवा भवबाधा पार करून जाण्याकरीता श्री गोविंदाचे नामस्मरण करावे, अशी ही नामभक्ती वा नामचिंतन याची महती आहे. सेतुबंधनाच्या वेळी सगळी वानरसेना प्रभु रामचंद्राचे नाव घ्यायची आणि एकेक भले मोठेच्या मोठे दगड उचलायची. श्रीरामाचे नाव घेण्यामुळे त्यांना ते मोठे दगड उचलणे अतिशय सोपे वाटले. त्याचप्रमाणे ते दगड पाण्यात टाकून सेतू तयार करावयाचा होता. त्याला काही खाली आत्तासारखा सिमेंट कॉंक्रीटचा पाया भरला नव्हता. केवळ श्रीरामाचे नाव तोंडाने घ्यायचे, ते त्या दगडावर लिहायचे आणि ते दगड नामोच्चारणपूर्वक समुद्रात फेकायचे. ते दगड बुडाले नाहींत, वा वाहुनही गेले नाहीत एकढे मोठे जड आणि चेतन नसलेले ते जड असे दगड त्या समुद्रात तरंगले. ते केवळ नामाच्या बळावरच. त्यामुळे संत नामदेव सांगतात की, रामनाम घेतल्यामूळे आपले जीवन या भवसागरातून पार होईल.

१३) कलियुगी धर्म हरीचे नाम । शुकदेवे म्हणून वाखाणिले ।। १८ ।।

नामयाचा स्वामी पंढरीचा रावो । रुखमाईचा नाहो गाऊं गीती ।। १९ ।।

संत नामदेव महाराज वरील अभंगात सांगतात की, हरि-नाम हे एक पूर्ण अमृतच आहे. म्हणूनच साक्षात् शंकरानी देखील उमेला, पार्वतीला नामाचाच उपदेश केला. नाम हेच भवसागर तारक असा मंत्रच आहे. नामाचे श्रवण कीर्तन हेच एक काशी क्षेत्र आहे. सगळ्या शास्त्राचे सार हरिनाम आहे आणि या हरिनामाचा कळिकाळाला एक प्रकारे त्रासच होतो. त्याच हरिनामाच्या संकीर्तनाने पतित पावन होतात. एवढेच नाही तर आता कलियुगात तर इतर धर्म, शास्त्र, वेद पुराणे यांचे महत्व पटणे अवघड आहे म्हणूनच शुक्राचार्यानी भागवतात कलियुगाचा धर्म काय ? तर एकमेव हरि हरि म्हणणे, 'हरिनाम' हाच कलियुगाचा धर्म आहे असे सांगितले.

१४) नामा म्हणे नाम प्रेम उच्चारण ।

सर्वही कारण होईल तुझे ।। ४ ।।[७२]

संत नामदेव महाराज सांगतात की, आमच्या सारख्या कशाचे बंधन नाही. आम्ही आमचे नामस्मरण सतत चालू ठेवणार विठोबाचे गुणगान सतत चालू ठेवणार. त्यामुळे आम्हाला भवसिंधू, भवसागर तरून जाण्यास आपोआपच पायवाट तयार झाली. जे नामघोषाचा गजर करतात, त्यांना ही पायवाट फार सोपी आहे. प्रेमपूर्वक, दृढ प्रेमाने नाम घेत टाळी पिटू लागतो. कारण आमच्या हृदयकमळावर विठोबाचे नाम विराजमान झालेले आहे.

१५)नामा म्हणे श्रीराम हेचि वचन आम्हा ।

नित्य ते पौर्णिमा सोळा कळी ।। ४ ।।

संत नामदेव महाराज सांगतात की, विवेक वैराग्यादि साधनांच्या प्राप्तीसाठी वेगळे प्रयत्न करावे लागत नाहीत. नामाच्या साधनेने त्यांची आपोआपच प्राप्ती होते. एका नामात, वाचेने नामस्मरण करण्यात रंगून जाण्याने इतर कोणत्याही मंत्रांची गरज भासत नाही. म्हणूनच श्री नामदेवराय म्हणतात की ही आमची नित्य पौर्णिमा आहे. पौर्णिमेच्या दिवशी चंद्र हा पूर्ण असतो व त्यामुळे मंद, सुशीतल व शांत असा सर्वत्र उजेड पडतो. चंद्र हा शीतल आहे. त्याप्रमाणे आम्हाला नाम हाच जणू पौर्णिमेचा सुशीतल चंद्रच आहे.

संत नामदेव महाराजांनी कीर्तनाच्या माध्यमातून समाजातील अस्पृश्यता निवारण्याचे कार्य केले. संत नामदेव महाराजांनी लिहिलेल्या अभंग व पदांमूळे समाजप्रबोधनाचे कार्य झाले. संत नामदेव महाराजांनी त्या काळात अस्पृश्यता व जातीयता यांना दूर करण्याचा प्रयत्न केला. संत नामदेव महाराजांनी लिहिलेल्या ६१ हिंदी पदांना शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबात स्थान मिळाले आहे. संत नामदेव महाराजांच्या हिंदी पदानां शीख धर्मांच्या धर्मग्रंथात स्थान मिळाले यावरून संत नामदेव महाराजांचे कार्याची महती लक्षात येते. संत नामदेव महाराज हे संत ज्ञानेश्वराचे पहिले अधिकृत चरित्रकार होते. प्रसिध्द विव्दान डॉ कालेवरट आणि प्रो. मुकूंद लाट यांच्या मतानुसार संत नामदेव महाराज यांचे पदे अथवा अभंग अथवा बाणी पुढील तीन भागात विभागता येते.

१) मराठी अभंग संग्रह यात १८० पदे आहेत.

२) दादू पंथी पंचवाणी ज्यात भक्त दादू, कबीर, रविदास, हरदास आणि संत नामदेव यांची १३० पदे आहेत.

३) श्री गुरूग्रंथसाहिब या ग्रंथात संत नामदेव यांची ६१ पदे आहेत. त्यातील २५ पदे पंचवाणी मध्ये उपलब्ध आहेत. ३६ पदे असे आहेत जी श्री गुरूग्रंथसाहिब या ग्रंथाशिवाय इतरत कोठेही मिळत नाहीत.

संत नामदेव यांची श्री गुरूग्रंथसाहिबातील ६१ पदे ज्या रागात आहेत ते राग पुढील प्रमाणे आहेत.[७३]

**सारणी क्र.५.१ संत नामदेव महाराज यांचे ६१ पदे व त्यातील संगीत राग**.

| अ.क्र. | राग | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | गाउड़ी | १ |
| २ | आसा | ५ |
| ३ | गुजरी | २ |
| ४ | सोरठि | ३ |
| ५ | धनासरी | ५ |
| ६ | टोडी | ३ |
| ७ | तिलंग | २ |

| ८ | बिलावल | १ |
|---|---|---|
| ९ | गौंड | ७ |
| १० | रामकली | ४ |
| ११ | माली गउड़ा | ३ |
| १२ | मारू | १ |
| १३ | भैरउ | १२ |
| १४ | बसंत | ३ |
| १५ | सारंग | ३ |
| १६ | मलार | २ |
| १७ | कानड़ा | १ |
| १८ | प्रभाती | ३ |
| | **एकुण** | **६१** |

**आलेख क्र.५.१ संत नामदेव महाराज यांचे ६१ पदे व त्यातील संगीत राग.**




संत नामदेव यांच्या ६१ पदांतील ११ पदे दोन कडव्याची, १२ पदे तीन कडव्यांची, ३१ पदे चार कडव्यांची, ५ पदे पाच कडव्यांची, १ पद हे ९ कडव्यांचे आणि १ पद हे १८ कडव्यांचे आहे. संत नामदेव

महाराजांनी आपले विचार खुपच प्रभावीपणे मांडली आहेत. या पदामध्ये साधूकड़ी, मराठी, हिंदी, पंजाबी या भाषा पहावयास मिळतात. त्याचप्रमाणे उर्दू, फारसी शब्दांचा देखील यांत उपयोग होतो. [७४]

संत नामदेव यांची गुरूग्रंथसाहिबा मधील रागु गउडी चेती हे पद पुढील प्रमाणे आहे.

---

**पद क्र.-१**

**ओ सतिगुर प्रसादि ||**

देवा पाहन तारीअले ||

राम कहत जन कसन तरे || १ || रहाउ ||

तारीले गनिका बिनु रूप कुबिजा

बिआधि अजामलु तारीअले ||

चरन बधिक जन तेऊ मुकति भए |

हउ बलि बलि जिन राम कहे || १ ||

दासी सुत जनु बिदरू सुदामा | उग्रसैन कउ राज दीए ||

जपहीन तपहकुलहीन क्रमहीन,

नामे के सुआमी तेउ तरे || २ || १ || [७५]

---

**पदाचा अर्थ** :- ओ सतिगुर प्रसादि || -ईश्वर एकच आहे. तो ओंकारस्वरूप आहे. सतगूरूकृपेने तो प्राप्त होतो.

देवा, तुझ्या नावाने समुद्रावर दगड तरले, तर तुझ्या नामाचा जप करणारा तुझा भक्त कसा तरणार नाही? वरील पदात संत नामदेव महाराज त्यांचे आराध्य दैवत श्री विठ्ठल यांच्या नावाने प्रार्थना करतात की, "हे देवा तुम्ही दगडावर राम-राम लिहून समुद्रावर त्या दगडांना तारले तर मनुष्य का तरणार नाही, सेतुबंधनाचे वेळी रामनाम कोरलेल्या शिळा जर समुद्रावर तरंगू शकतात तर ज्यांच्या मनात सदैव रामनाम आहे अशी माणसे का बरे हा भवसागर पार करू शकणार नाहीत."[७६]

गणिका, कान्होपात्रा, कुरूप, कुब्जा दासी, विकारी अजामीळ अशांनाही तू तारलेस, तुझ्या पायाला बाण मारून तुझा वध करणाऱ्या शिकाऱ्यासही तू तारलेस, हे रामनाम स्मरता त्यांच्यावरून मी आपला जीव ओवाळून टाकतो. कान्होपात्रासारखी हीन कुळातील वेश्या, कुरूप कुब्जा, तामसी व्याध अजामीळ हे प्रभुनामाच्या आधारे मुक्त झाले. कृष्णाच्या चरन कमलावर बाण मारणारा शिकारी ही मुक्त झाला.[७७] वेश्या गणिका पोपटाला राम-राम शिकवत असतांना तिचा उद्धार झाला, अजामील नावाचा ब्राम्हण एका भिल्ल जातीच्या स्त्रीसोबत नैतिक संबंध ठेऊन भ्रष्ट झाला होता; परंतु त्याच्या मुलाचे नाव नारायण असल्यामुळे आणि मुलाला मृत्यूच्यावेळी नारायण नावाने आवाज दिल्यामुळे त्या अजामील नावाच्या बाम्हणाचा उध्दार झाला. त्याचप्रमाणे श्रीकृष्णाच्या पायावरी पद्माला हरणाचा डोळा समजून श्रीकृष्णाच्या पायावर बाण मारणाऱ्या

शिकाऱ्याला पश्चाताप केल्यामुळे श्रीकृष्णाने मोक्ष दिला. मी त्या सर्वांना शरण जातो. ज्यांनी देवाचे रामनामाचे नामस्मरण केले, देवाची आठवण केली.

दासी पुत्र विदूर, दरिद्री सुदामा यांना सुखी करून, कंसाला ठार केल्यावर उग्रसेनला राज्य दिलेस, मी नामदेव जपहीन, तपहीन, कुलहीन, कर्महीन, म्हणजे सर्वथा पतित असलो तरीही माझ्या प्रभूच्या कृपेने वरील सर्व भक्तांप्रमाणेच तरून जाईन.[७८] दासीपुत्र विदूर, गरीब सुदामा भवसागर पार करुन गेले. उग्रसेनास राज्यप्राप्ती झाली.[७९] हा सारा प्रभुनामाचा महिमा आहे. दासीपुत्र विदूर श्रीकृष्ण भक्तीने त्याचा उध्दार झाला. सुदामा ब्राम्हण जो निर्धन असून श्रीकृष्णाचा वर्गमित्र होता जेव्हा तो श्रीकृष्णास भेटण्यासाठी गेला तेव्हा त्याला मनाप्रमाणे फलप्राप्ती झाली. राजा उग्रसेन जो कंसाचा बाप होता श्रीकृष्णाचे स्मरण केल्याने त्याचा उध्दार झ ाला व त्याच्या पुत्राने हिसकाऊन घेतलेले त्याचे सर्व राज्यसत्ता त्या उग्रसेनास मिळाली. एवढी उदाहरणे देऊन संत नामदेव म्हणतात,"हे देवा ! मी तर जपहीन, तपहीन, कूळहीन, कर्महीन, असल्यामुळे अनन्यभावाने शरण आलो आहे. तूच माझे रक्षण कर. ह्या भवसागरातून मला तारून ने."

संत नामदेव महाराज वरील पदांमध्ये सांगतात की, आपले सर्वस्व अर्पण करून जो रामनामाचा जप करतो तो प्रत्येक मनुष्य भवसागरांमधून मुक्तता प्राप्त करतो. रामनामाचे नामस्मरणाचे महत्त्व या पदांमध्ये संत नामदेव महाराजांनी सांगीतले आहे. हे पद राग-गौडीचैती मध्ये आहे.

---

**पद क्र.- २**

**रागु आसा**

ओ सतिगुर प्रसादि

एक अनेक बिआपक पूरक, जत देखउ तत सोई ॥

माइआ चित्र बचित्र बिमोहित, बिरला बूझै कोई ॥ १ ॥

सभु गोबिंदु है, सभु गोबिंदु है ॥

गोबिंद बिनु नही कोई ॥

सूतु एकु मणि सत सहंतस जैसे ,

ओति पोति प्रभु सोई ॥ १ ॥ रहाउ ॥

जलतरंग अरू फेन बुदबुदा, जल ते भिन्न न होई ॥

इहु परपंचु परब्रम्हकी लीला,

बिचरत आन न होई ॥ २ ॥

मिथिला भरमु अरू सुपन मनोरथ, सति पदारथु जानिआ ॥

सुक्रित मनसा गुर उपदेसी, जागत ही मनु मानिआ ॥ ३ ॥

कहत नामदेउ हरिकी रचना, देखउ रिदै बीचारी ॥

घट घट अंतरि सरब निरंतरि, केवल एक मुरारी ॥ ४ ॥ १ ॥ आसा ॥[८०]

---

**पदाचा अर्थ :-**सर्व जगात तो एकमात्र गोविंद भरून राहिला आहे हे सांगताना संत नामदेव महाराज सांगतात की, वस्तुत: परमेश्वर एकच आहे. पण तो सर्व सृष्टीला व्यापून राहिला आहे. जेथे पाहावे तेथे तोच दिसतो पण मायेच्या ह्या चित्रविचित्र खेळाने मोहित झालेल्यांना मात्र हे समजत नाही. क्वचितच एखाद्याला ह्या सत्याचा बोध होतो. तो परमात्माच सर्वत्र आहे व तोच ही लीला करीत आहे हे ओळखणारा तो वेगळा महान पुरूष आहे.[८१] प्रभु एकच असून सर्व सृष्टीला व्यापून राहिला आहे. जेथे पाहावे तेथे तोच आहे. परंतु मायेच्या विविध स्वरूपात मोहून गेल्यामुळे प्रभूचे सर्वव्यापी एकत्व कोण वेगळ्यास समजू शकते.

सर्वत्र एकच एक गोविंद भरलेला आहे. सर्व काही गोविंद आहे. गोविंदाविना कोणी दुसरे नाही. परमात्मा एकच आहे; मात्र त्याची रूपे अनेक आहेत. प्रत्येक जागी परमात्मा आहे. तुम्ही जिथे जिथे आस्थेने पाहता तेथे तेथे तुम्हाला परमात्मा दिसेल. जिवाला भयानक अशी माया आपल्यामध्ये व्यापून टाकते. माया नावाचा पडदा असल्यामुळे जीव आणि ब्रम्हा यांचा मेळ बसत नाही. ज्या प्राण्यावर ईश्वराची कृपा होते तोच मायेपासून दूर जातो व भगवंतांच्या भक्तिभावामध्ये तल्लीन होतो आणि त्याला सर्व ठिकाणी ईश्वर दिसतो. जसे एका धाग्यात अनेक मणी ओवून गोळा केलेले असतात, तसेच प्रभु सर्वांच्या ठायी ओतप्रत आहे. गोविंद या एकमेव परमेश्वराशिवाय काहीही नाही. माळेमध्ये असंख्य मणी असतात. पण ते सारे मणी एकाच सूत्राने एकत्र बांधले गेलेले असतात. त्याप्रमाणेच ह्या सृष्टीतील सर्व जीव वेगवेगळे दिसत असले, तरी त्या सर्वांमध्ये तो परमात्मा वास करून राहिला आहे.[८२] त्याचप्रमाणे सर्व प्राणीमात्रांचा एकच आधार ईश्वर परमात्मा आहे.

पाण्याची लाट, पाण्याचा फेस, पाण्याचा बुडबुडा, हे सारे पाणीच आहे. पाण्यावर उठणाऱ्या लाटा, पाण्याचा फेस, पाण्यावर दिसणारो बुडबुडे हे पाण्याचा एक भाग आहे, पाण्याहून भिन्न नाहीत. पाण्यापासून वेगळे असे काही नाही. लाट फुटल्यावर त्याचे पाणीच होते. तीच गोष्ट फेसाची, बुडबुड्यांची आहे. ते पाण्यानेच बनतात व अंतत: ते पाण्यात मिसळतात अथवा पाणीच बनतात. पाण्याची लाट, फेस बुडबुडे बाह्त: वेगळे दिसत असले तरी ते वस्तुत: एकच पाणी असते. ती पाण्याची वेगवेगळी रूपे आहेत. तसेच ह्या सृष्टीत बाह्यत: विविधता दिसत असली, तरी सर्व त्या एका परमात्म्याचीच विविध रूपे आहेत. त्या सर्वांत तो परमात्माच विराजमान आहे. त्या एका परमात्म्याचीच ही सारी लीला आहे. हे सारे जग प्रभूचा खेळ असून तो चालू झाला तरीही प्रभूपासून निराळा होत नाही.[८३]

हे जग, ही सृष्टी ही केवळ मायाजाल आहे, भ्रमजाल आहे, स्वप्नवत आहे. पण सामान्य माणूस हे सारे खरेच आहे असे मानतो, कारण सत्याचे त्यास ज्ञानच नसते. सत्य स्वरूप प्रभुला ओळखल्यावर जग म्हणजे एक खोटा भ्रम आणि मानवाचे मनोगत स्वप्नासारखे ठरतात. पण सतगुरूच्या उपदेशाने व मार्गदर्शनाने त्यास त्या परमेश्वराची, त्या एकमेव सत्याची जाणीव होते. गुरूउपदेशाने मन पवित्र होऊन

आत्मजागृती झाल्यावर मनाने हे सत्य समजून मान्य केले, आणि त्या एकमेव सत्याची परमेश्वराची जाणीव आपल्याला होते.

संत नामदेव महाराज सांगतात की, ह्रदयात विचार करून प्रभूची रचना पाहून तुम्हाला कळेल की, सर्वत्र केवळ प्रभूच व्यापून भरून उरला आहे. मनात त्या हरीच्या रचनेचा विचार दृढ झाला की, मग प्रत्येक वस्तूत तो एकमेव परमात्मा भरून राहिला आहे ह्याचे ज्ञान प्राप्त होते.

संत नामदेव महाराज वरील पदात सांगतात की, ईश्वर सर्व ठिकाणी व्याप्त असून त्याला बघण्यासाठी गुरूकृपा लागते. जेव्हा गुरूकृपा होते तेव्हा त्या व्यक्तीला सर्व ठिकाणी ईश्वर परमात्म्याचे दर्शन होते.[८४] परमेश्वर एकच आहे. आणि तो परमेश्वर सर्व सृष्टीला व्यापून राहिला आहे. मनुष्याला गुरूउपदेश झाला की सत्य उपदेश होतो. आणि ईश्वर सर्वांच्या ह्रदयात बसलेला आहे. हे पद राग-आसावरी मध्ये आहे.

---

**पद क्र.- ३**

**रागु आसा**

आनीले कुंभ, भराईले ऊदक, ठाकुर कउ इसनानु करऊ ||
बइआलिस लख जी जल महि होते, बीठलु भैला काइ करउ || १ ||
जत्र जाउ तत बीठलु भैला ||
महा अनंद करे सद केला || १ || रहाउ ||
आनीले फूल, परोईले माला ठाकुर की हउ पूज करऊ ||
पहिले बासु लई है भवरह, बीठल भैला काइ करऊ ||
आनीले दूधु रीधाईले खीर, ठाकुर कउ नैवेदु करऊ ||
पहिले दूधु बिटारिओ बछरै, बीठलु भैला काइ करऊ ||
ईभै बीठलु ऊभै बीठलु, बीठल बिनु संसार नही ||
थान थनंतरि नामा प्रणवै, पूरि रहिओ तूं सरब मही || ४ || २ || आसा ||[८५]

---

**पदाचा अर्थ** :-संत नामदेव महाराज सदर पदामध्ये ईश्वराचे अस्तित्व सर्वव्यापी असून ईश्वरांची आराधना उपासना करण्यासाठी वेगवेगळ्या विधींचा अंगीकार केला जातो त्यातून ईश्वराला प्रसन्न केले जाते. परमेश्वर सर्वत्र आहे हे समजावून देतांना संत नामदेव महाराज सांगतात की, मी घडा घेऊन प्रभूच्या स्नानासाठी निर्मळ पाणी आणले. पण त्यात आधी असंख्य जीवांनी . माशांनी स्नान केले होते. ते मासे हे विठ्ठलाचे रुप होते.[८६] परमेश्वरा तुझ्या स्नानासाठी घागर भरून पाणी घेऊन भगवंताला स्नान घालण्याची इच्छा आहे. पाण्यामध्ये बेचाळीस लाख जीव विद्यमान आहेत तर पाणी कसे पवित्र राहील. ईश्वराचे अस्तित्व सर्व व्यापी असल्याने त्याने या जीवरूपात आधीच स्नान केलेली आहे. ज्याला स्नान घालायचे तेच विठ्ठल झाले होते. आता काय

करू ? जिकडे मी जातो तिकडे प्रभूच भरलेला आहे, तो अनंत खेळ करीत असून महाआनंदाचा भोग घेत आहे.

फुले आणुन माळा केल्या, प्रभूच्या पुजेसाठी माळ केली, परंतु त्या फुलांचा वास भ्रमरांनी आधीच घेतला होता. भ्रमरांमध्ये विठ्ठल आहे. भ्रमरच विठ्ठल बनले ! आता काय करु ? दुध आणून नैवेद्य करण्यासाठी खीर शिजवली, परंतु वासरांनी आधीच दूध विटाळून टाकले होते. वासरूच विठ्ठल बनले, आता काय करू ? सर्व व्यापी ईश्वराची अस्तित्वाने ईश्वररुपी दुधाचा उपभोग घेतला जातो. तू सर्वत्र, जळीस्थळी, प्रत्येक ठिकाणी तुच आहे. उपासना औपचारिक होऊच शकत नाही. तू सूष्टीच्या सर्व कणाकणांमध्ये तुझे वास्तव्य आहे.[८७]

इकडे विठ्ठल ! तिकडे विठ्ठल ! विठ्ठलाविना संसार नाही. संत नामदेव महाराज विनवून सांगतात, हे प्रभू, तू सर्व ठिकाणी व्यापून उरला आहेस. जिकडे पाहिले तर विठ्ठल, तिकडे पाहिले तरी तेथेही विठ्ठल आहे. जिकडे पाहावे तिकडे विठ्ठलच दिसतो. संत नामदेव महाराज म्हणतात, हे प्रभो ! जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी, जड, चेतन सर्वत्र तू आणि तूच आहेस. तू नाहीस असे एकही स्थान सापडणार नाही. सर्व स्थानस्थानांतरात त्या एकमात्र परमेश्वराचेच वास्तव्य आहे.[८८]

संत नामदेव महाराज या पदात सांगतात की, परमेश्वर हा सर्वत्र आहे. सृष्टीतील चराचरात परमेश्वर आहे.[८९] जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी, जड, चेतन इ. सर्वत्र परमेश्वर आहे. आणि परमेश्वर नाही असे या विश्वात एकही स्थान नाही. हे पद राग-आसावरी मध्ये आहे.

---

**पद क्र.- ४**

**रागु आसा**

मनु मेरो गजु, जिहबा मेरी काती ॥
मपि मपि काटउ जमकी फासी ॥ १ ॥
कहा करउ जाती, कह करउ पाती ॥
राम को नामु जपउ दिन राती ॥ १ ॥ रहाउ ॥
रांगनि रांगउ सीवनि सीवउ ॥
राम नाम बिनु घरिअ न जीवउ ॥ २ ॥
भगति करउ हरिके गुन गावउ ॥
आठ पहर अपना खसमु धिआवउ ॥ ३ ॥
सुईने की सुई, रूपेका धागा ॥
नामे का चितु हरि सउ लागा ॥ ४ ॥ ३ ॥ आसा ॥[९०]

---

**पदाचा अर्थ :-**मराठी संतमालिकेत सर्व जातीच्या संतांचा अंतर्भाव होतो. बहुतेक संतांनी आपल्या व्यवसायात प्रभूचे रूप पाहिले व त्याच रुपकात ईश्वरभक्तीचा दृष्टांत दिला. उदा. संत सावता माळी म्हणतात, "सावत्याने केला मळा, विठ्ठल नामी गोविला गळा ||"

संत नरहरी सोनार म्हणतात,"आम्ही सोनार, सोनार | करतो नामाचा व्यवहार ||"

संत नामदेव महाराज हे शिंपी होते त्यानी या पदात शिंपी व्यवसायाचे रूपक देऊन आध्यात्मिक संदेश दिला आहे. माझे मन हा माझा गज (कपडा मोजण्याचे माप)आहे. माझ्या मनात सदैव परमेश्वराचे चिंतन चालू असते. व माझी जीभ ती माझी कात्री आहे. त्या जिभेने सदैव नामस्मरण चालू असते.[११] ही कात्री मोजून यमरूपी फाशीच्या दोरीला मापत आहे. क्रमाक्रमाने यमाचा फास मोजून मोजून कापण्याचा कामी मी आपल्या मनाचा व जिभेचा उपयोग करतो. संत नामदेव महाराज हे शिंपी जातीचे होते, आणि म्हणूनच महाराष्ट्रातील शिंपी जात ही 'नामदेव शिंपी' या नावाने ओळखली जाते. महाराष्ट्रातील शिप्यांच्या पुष्कळ पोटजाती आहेत. त्यांत नामदेव शिंपी सर्वात श्रेष्ठ समजतात.[१२]

संत नामदेव महाराज म्हणतात की, मला जातीपातीशी काय घेणे ? तर दिवसरात्र राम नामचा जप करीत असतो. मी स्वत:ला रामरूपी शिलाईने शिवत असतो. ईश्वराच्या नामस्मरणाशिवाय क्षणभरही मी जीवंत राहू शकत नाही. परमात्म्यांशी भक्ती करीत राहतो. आठही प्रहर मी माझ्या मालकाला स्मरणात ठेवत असतो. राम नामाचा जाप अथवा जप ही एक अशी शिलाई आहे की, ज्याची सुई सोन्याची व दोरा चांदीचा आहे. सदैव माझे मन शिलाईरूपी नामस्मरणात गुतंलेले आहे.[१३] उच्च, नीच जात त्याच्याशी मला काही कर्तव्य नाही, मी तर दिवसरात्र रामनामाचा जप करत असतो.

कपडयांची रंगणी व शिवण्याचे काम करतो, परंतु प्रभुनाम स्मरणावाचुन एक घटकाभरही मी जगू शकत नाही. भक्तीपूर्वक हरिचे गुणगान करतो, अष्टौप्रहर माझ्या मालकाचे ध्यान करीत असतो.[१४] सोन्याची म्हणजे अमूल्य सुई व रुप्याचा मौल्यवान दोरा करून मी आपले चित्त हरिशी (प्रभूशी जोडलेले आहे.

संत नामदेव महाराज शिंपी समाजाचे असल्याने त्यांनी भक्तीचा संबंध दर्शविण्यासाठी मीटर गज, कात्री, इत्यादींचा वापर केलेला. आपल्या कामातच आपण ईश्वराचे नामस्मरण सहजतेने करू शकतो त्यासाठी फावल्या वेळी मुळीच गरज नसून प्रापंचिक जबाबदाऱ्या पूर्ण करतही नामस्मरण करता येते, हे या पदातून संत नामदेव महाराजांनी सांगीतले आहे. संत नामदेव महाराज सांगतात की, परमेश्वर भक्तीत कुठेही जातीपातीचा संबंध येत नाही. ईश्वरभक्तीत जातीपातीला मुळीच स्थान नाही. देव भावाचा भुकेला आहे.

संत नामदेव महाराज म्हणतात, प्रभू ध्यानरूपी सोन्याच्या सुईत प्रभुनामाचा रुप्याचा धागा ओवून मी माझे चित्त प्रभूशी घट्ट शिवून प्रभूशी एकरूप केले आहे. हे पद राग-आसा मध्ये आहे.

---

**पद क्र. - ५**

**<u>रागु आसा</u>**

सापु कुंच छोडै, बिखु नही छाडै ॥

उदक माहि जैसे बगु धिआनु माडै ॥

काहे कउ कीजै धिआनु जपंना ॥

जब ते सुधु नाही मनु अपना ॥ १ ॥ रहाउ ॥

सिंधच भोजनु जो नरू जानै ॥

ऐसे ही ठग देउ बखानै ॥ २ ॥

नामे के सुआमी लाही ले झगरा ॥

राम रसायन पीओ रे दगरा ॥ ३ ॥ ४ ॥ आसा ॥[९५]

---

**<u>पदाचा अर्थ</u> :-** प्रभुप्राप्तीसाठी मनाच्या शुध्दतेची फार आवश्यकता आहे. मन शुध्द नसेल तर वरवरच्या देखाव्याचा जरासुध्दा उपयोग नाही हे सांगताना संत नामदेव अनेक दृष्टांत देतात. संत नामदेव महाराज म्हणतात की, साप कात टाकतो पण विष किंवा विषाचे दात सोडत नाही. कात टाकलेला साप खुप सुंदर आणि टवटवीत दिसतो पण तो महाविषारी असतो. त्याचप्रमाणे बगळा पाण्यात ध्यान लावून बसतो. पाण्यात ध्यानस्थ उभा असलेला बगळ्याचे असते.[९६] त्याचे ते ध्यान खरे असते का ? मुळीच नाही. एखादी मासोळी त्याच्या जवळ येऊ लागली की तो लगेच ध्यान सोडून ती मासोळी पकडतो. उपरोक्त रचनेनुसार संत नामदेव शुध्द अंत:करणाला महत्त्व देत ईश्वरांची आराधना करतांना ते अत्यावश्यक आहे. कपटाने केलेल्या ईश्वराच्या स्मरणाला काहीच अर्थ नाही. साप जसा कात टाकतो; परंतु विष आहे तसेच राहते. पाण्यातील ध्यानस्थ बगळा ही शिकारीसाठी अचेतन बनतो. त्यातून इतरांना फसविणे हा त्याचा हेतू असतो.

जोपर्यंत आपले मन शुध्द होत नाही तोपर्यंत ध्यान किंवा जपजाप्य कशासाठी करायचे ? त्याचा काहीही उपयोग नाही. तुमच्या मनात एक व ओठात एक असे असेल तर प्रभुचे स्मरण निरर्थक ठरते. दुसऱ्याला फसविण्याला बदलून घेण्याची संधी दिली. त्यातील शुध्द अंत:करणाने रामनामाचे स्मरण करावे. जोपर्यंत मन विषय विकारापासून मुक्त होत नाही, मन शुध्द नाही तोवर हे जपजाप्य, पुजाअर्चा, व्रतवैकल्ये ह्या बाह्य दिखाऊ उपचारांचा काही उपयोग नाही.

ज्याला शिकार करून म्हणजे दुसऱ्यांना लुबाडून पोट भरण्याचे ज्ञान आहे, अशा माणसाला ठकांचा राजा म्हटले जाते. शिकाऱ्याला शिकार मारून खाण्यातच आनंद वाटतो. तसे लोकांना लुबाडून आपला खिस्सा भरणाऱ्या माणसास लबाडांचा राजाच म्हटले पाहिजे. संत नामदेव महाराज सांगतात की, माझ्या स्वामीने माझे हे सगळे झगडे मिटवून टाकले आहेत. मी रामनामात पूर्णपणे रममाण झालो. हे दुनियादारी करणाऱ्या पाषाणह्रदयी दगलबाजांनो, तुम्हीही रामनामरूपी अमृत प्राशन करा व संसारातील सर्व पापातून मूक्त व्हा.[९७]

संत नामदेवांच्या प्रभूने हे सर्व वाद संपवले आहेत. लुबाडणाऱ्या, निर्दयी माणसाला रामनामाचे अमृत प्राशन करण्यास सांगतात. संसारातील सर्व रोगातून मुक्त होण्याचा हा एकमेव उपाय आहे. तुम्ही सुध्दा पापापासून अलिप्त होऊ शकतात. नामस्मरण तेही प्रामाणिकपणे हे संत नामदेवांना अभिप्रेत आहे. हे पद राग-आसा मध्ये आहे.

---

**पद क्र.- ६**

**रागु आसा**

पारब्रम्ह जि चीन्हसी, आसा ते न भावसी ॥
रामा भगतह चेतीअले, अचिंत मनु राखसी ॥१ ॥
कैसे मन तरहिगा रे, संसारू सागरू बिखै को बना ॥
झूठी माइआ देखि कै, भूला रे मना ॥ १ ॥ रहाउ ॥
छीपे के घरि जनमु दैला, गुर उपदेसु भैला ॥
संतह कै परसादि नामा हरि भेटुला ॥ २ ॥ ५ ॥[९८]

---

**पदाचा अर्थ :-**ज्याने परब्रम्ह जाणले, परब्रम्हाची अनुभूती ज्याने प्राप्त केली अशा माणसाला संसारातील आशा आकांक्षा, आवडत नाहीत. जे कोणी परब्रम्ह ओळखतील त्यांना आशा, तृष्णा, मनीषा, वासना ह्यांची आवड राहणार नाही. प्रभु चिंतन करणाऱ्या भक्तांचे मन निश्चित होईल. तो मोहमायेच्या, विषयवासनांच्या पलीकडे जातो. ज्याच्या मनात रामभक्ती जागृत झाली. तो मनुष्य संसाराच्या चिंतेतून मुक्त होतो. त्याचे मन निश्चिंत होते, स्थिर होते. जो मनुष्य भगवान परमात्म्याचा अनुभव करेल त्याला कोणत्याच गोष्टीबद्दलचा लोभ, लालसा, वासना, मायाजाळ, अयोग्य भासेल. तो देवाचीच भक्ती करेल व त्यातच त्याचे मन गुंतून राहील.

हे जग विषय विकाराचे मोहमायाजालाचे जंगल आहे. ह्या जगाच्या मायापाशात मन पुरेपूर गुंतून पडले आहे, ह्यातून त्याची सुटका कशी होणार ? हा जीव, ह्या भवसागर कसा तरून जाणार ? हे मन, हा भवसागर विषयांचा जंगल बनलेला आहे, तू तो कसा तरून पार करशील ? तू तर मायेच्या मोहक स्वरूपाला भुलला आहेस. संसाररूपीसागर अनेक विकारांनी भरलेला आहे. संत नामदेव महाराज स्वत:च स्वत:ला प्रश्न विचारतात की, हे माझ्या मना, तू या भवसागरातून कसा तरशील, कसा बाहेर येशील ? हे संसार ही खोटारडी माया असून ती सर्वांना भुलवीत आहे. ती तुला माझ्याकडे आकर्षित करीत आहे. [९९]

श्री नामदेव सांगतात की, मी शिंपी जातीत जन्मलो. पण मला सतगुरू भेटले. गुरू उपदेश मिळाला. संतसंगत लाभली. त्यांच्याच आशिर्वादाने मला हरी भेटला.[१००] कोण, कोणत्या जातीत जन्मला. उच्च वा नीच. ह्याला काही महत्त्व नसते. सतगुरूकृपेने व सत् संगाने माणूस हा भवसागर पार करू शकतो. प्रभुने

संत नामदेवास शिप्यांच्या घरी जन्म दिला. गुरूउपदेश झाला आणि संतकृपेने नामा हरिला भेटला म्हणजे संत नामदेवांना प्रभूची प्राप्ती झाली.

वरील पदात संत नामदेव महाराज सांगतात की, जीवनात गुरू उपदेश फार महत्त्वाचा असतो. संतमंडळीच्या कृपा आशिर्वादाने ईश्वरासोबत भेट झाली, असे ते मानतात. शुध्द मनाने नामस्मरण केल्यामुळेच ईश्वर प्राप्ती शक्य आहे. हे पद राग-आसा मध्ये आहे.

---

**पद क्र.७**

**रागु गुजरी घरु १**

१ ओ सतिगुर प्रसादि ||

जौ राजु देहि त कवन बडाई ||

जौ भीख मंगावहि त किआ घटि जाई || १ ||

तूं हरि भजु मन मेरे पढु निरबानु ||

बहुरि न होइ तेरा आवन जानु || १ || रहाउ ||

सभ तै उपाई भरम भुलाई ||

जिस तूं देवहि तिसहि बुझाई || २ ||

सतिगुरु मिलै त सहसा जाई ||

किसु हउ पूजउ दूजा नदरि न आई || ३ ||

एकै पाथर कीजै भाउ ||

दूजै पाथर धरीए पाउ ||

जे ओहु देउ त ओहु भी देवा ||

कहि नामदेउ हम हरि की सेवा || ४ || १ ||[१०१]

---

**पदाचा अर्थ :-**जर प्रभू राज्य देईल तर त्यात काय विशेष आहे ? तो तर त्याचा सहज खेळ आहे, आणि त्याने भीक मागायला लावली तर माझे काय कमी होईल ? ईश्वर हा महान असून त्यासाठी अवघड काहीच नाही. एखाद्या व्यक्तीला राजा तर एखाद्याला रंक बनवितो. मी स्वत: तर मोह मायापासून कोसो दूर आहे.

हे माझ्या मना, प्रभू म्हणजे एक अनिर्वाच्य पदार्थ आहे. त्याची भक्ती कर म्हणजे तू मुक्त होशील. पुन्हा तुला जन्म-मरणाच्या फेऱ्यात पडावे लागणार नाही. हे मन तू ईश्वराच्या गुणाचे वर्णन कर. ईश्वराने मला कोणत्याही भूमिकेचा स्वीकार करावयास लावले तर मला त्याची खंत नाही. ईश्वराच्या वर्णनाने तू म्हणजेच मनुष्य हा जन्म मृत्यूच्या फेऱ्यातून वाचाशील. म्हणजेच मुक्त होशीलच. हे देवा ! जरी तू मला राज्य दिलेस, तरी मला त्याचे काहीही मोठेपण वाटणार नाही. जरी तू माझ्या हाती भिकेचा कटोरा दिलास, तरी

मला त्यात काहीही कमीपणा वाटणार नाही, कारण काय द्यायचे, काय नाही हे तूच ठरवणार आहेस. तूच सर्व कर्ता आहेस. मी मला तुझे चरणी समर्पित केले आहे. तुझ्या इच्छेप्रमाणेच मी माझे जीवन जगणार आहे.[१०२]

हे प्रभु, संपूर्ण सृष्टी तूच निर्माण केली आहेस व मायेच्या भ्रमात तिला अडकवून ठेवले आहेस, ज्याला तू हे सत्य समजावून देतोस तोच समजतो. हे भगवंता हा सारा संसार ईश्वरानेच निर्माण केलेला आहे व माणसाला भ्रमात टाकले. ज्या व्यक्तीवर तुमची कृपा होईल तोच व्यक्ती या विषयाचे रहस्य जाणील. हे परमेश्वरा तूच ही सृष्टी निर्माण केलीस. पण तिला मोहमायेने व्यापून टाकले. सारे जीव त्या मोहमायेच्या विळख्यात अडकून पडले आहेत. कोणालाच हे सत्य समजत नाही. फारच थोडे असे सांगतात की, ज्यांच्यावर तुझी कृपा होते, तेच फक्त हे सत्य जाणतात.[१०३] मला सतगुरू भेटले. त्यांच्या, त्या सतगुरुंच्या, उपदेशाने माझ्या साऱ्या शंकांचे निरसन झाले. सारे संशय दूर झाले. आता ज्याची मी पूजा करावी असा, परमेश्वर तुझ्या वाचून मला अन्य कोणीही दिसत नाही.

सदगुरू भेटले तरच संशय मिटतात, मी कोणाची पूजा करू ? तुझ्यावाचून दुसरे कोणी दृष्टीस दिसत नाही. संत नामदेव महाराज म्हणतात की, मी कोणाची पुजा करू तुमचे अस्तित्व नसलेले ठिकाण कदापीही आढळणारच नाही. एका दगडावर आस्था ठेवून प्रेम केले जाते म्हणजेच त्याची पुजा केली जाते त्याचवेळी दगडाने बनविलेल्या पायरीवर पाय ठेवला जातो. पहिला दगड जर देव असेल तर दुसरा दगड सुध्दा देवच असायला हवा; परंतु हे कदापीही होत नाही या सर्व बाबी नाकारत निरामय, निराकार अशा ईश्वरांची पुजा करील.[१०४] एकाच दगडावर आपण श्रध्दा ठेऊन आपण त्याची पुजा करतो आणि दुसऱ्या दगडावर आपण पाय ठेवतो जर तो देव आहे, तर हाही देवच आहे. संत नामदेव महाराज म्हणतात, मी आपल्या प्रभूची सेवा करीत राहीन.[१०५] संत नामदेव महाराज म्हणतात की, एक दगड आपण देव्हाऱ्यात ठेवतो आणि त्याची देव म्हणून पूजा करतो. दुसऱ्या दगडाची पायरी करतो व त्याला पायदळी तुडवतो. खरे पाहता दोन्हीही दगड सारखेच अथवा एकाच ठिकाणाहून आणलेले असतात. एक देव तर दुसराही देव. सारीच परमेश्वराची रुपे आहेत म्हणजेच मी सदैव त्या निरंकार परमेश्वराचीच पूजा करतो. हे पद राग-गुजरी मध्ये आहे.

---

**पद क्र.८**

**रागु गुजरी घरु १**

मलै न लाछै पारमलो परमलीओ बैठी री आई ॥

आवत किनै न पेखिओ कवनै जाणै री बाई ॥

कउणु कहै किणि बूझिऐ रमईआ आकुलु री बाई ॥ १ ॥ रहाउ ॥

जिउ आकासै पंखीअलो खोजु निरखिओ न जाई ॥

जिउ जल माझै माछलो मारगु पेखणो न जाई ॥ २ ॥

जिउ आकासै घडू अलो म्रिग त्रिसना भरिआ ॥

नामेचे सुआमी बीठलो जिनि तीनै जरिआ ॥ ३ ॥ २ ॥[१०६]

---

**पदाचा अर्थ :-** संत नामदेव महाराज म्हणतात की, परमेश्वर सर्वत्र आहे. त्याचे अस्तित्वही निरनिराळ्या रूपात जाणवते. पण प्रत्यक्ष तो दिसत मात्र नाही. हे सांगण्यासाठी संत नामदेव अनेक दृष्टांत देतात. ते म्हणतात-परमेश्वर कसा आहे ? तो अत्यंत शुध्द, निर्मळ, कलंकाचा कवलेशही नसलेला, अत्यंत सात्त्विक असा आहे. त्याच्या सात्त्विकतेचा सुगंध सर्वत्र दरवळून राहिला आहे, पण हा सुगंध येतो कुठून हे मात्र कोणालाही सांगता येत नाही.[१०७] त्याला कोणीही निर्माण केले नाही. तो स्वयंभू आहे. त्याला कोणीही पाहिला नाही. ज्याने तीनही ताप दूर केले, असा माझा विठ्ठल आहे. ज्याप्रमाणे आकाशात पक्षी फिरत असतात. आकाशात पक्षी उडतांना दिसतो, परंतु त्याचा मार्ग दिसत नाही. पाण्यात मासा फिरताना दिसता, त्याचाही मार्ग दिसत नाही. आकाशरूपी हंडी पाण्याने भरल्यासारखी भासते, हे तीनही ज्याप्रमाणे अदृश्य असूनही भासमान आहेत, त्याप्रमाणे तीनही लोक व्यापून उरलेला प्रभु विठ्ठल अदृश्य असूनही त्याचे अस्तित्व जाणवते हे निश्चित आहे.

मोकळ्या जागेवरून, डोंगरावरून, माळावरून मृगजळ अथवा क्षितीज दिसते. पण त्याचे निश्चीत स्थान मात्र कोणीही सांगू शकत नाही. त्याचप्रमाणे संत नामदेवाचा स्वामी विठ्ठल सर्वत्र भरून राहिला आहे. तो नाही असे स्थान नाही, अशी वस्तू नाही. पण काय आश्चर्य आहे पाहा, असा हा परमेश्वर कोणालाही दिसत नाही. कोणीही पाहिला नाही. ज्याप्रमाणे मोकळ्या जागेमधील मृगजळ दिसत नाही. त्याचप्रमाणे ईश्वर निराकार निरामय आहे. ईश्वराला पाहणे अशक्य जरी असले तरी देखील त्याचे अस्तित्व मान्यच करावे लागते.[१०८]

संत नामदेव महाराज या पदामध्ये सांगतात की, ईश्वराला पाहणे अशक्य जरी असले तरी देखील ईश्वराचे अस्तित्व मान्यच करावे लागते. ईश्वराचे अस्तित्व हे सर्वत्र आहे.[१०९] हे पद राग-गुजरी मध्ये आहे.

---

**पद क्र.९**

**रागु सोरठि घरु २**

१.ओं सतिगुर प्रसादि ॥

जब देखा तब गावा ॥

तउ जन धीरजु पावा ॥ १ ॥

नादि समाइलो रे सतिगुरु भेटिले देवा ॥ १ ॥ रहाउ ॥

जह झिलि मिलि कारु दिसंता ॥

तह अनहद सबद बजंता ॥

जोती जोती समानी ॥

मै गुर परसादी जानी ॥ २ ॥

रतन कमल कोठरी ॥

चमकार बीजुल तही ॥

नैरे नाही दूरि ॥

निज आतमै रहिआ भरपूरि ॥ ३ ॥

जह अनहत सूर उज्यारा ॥

तह दीपक जलै छंछारा ॥

गुर परसादी जानिआ ॥

जनु नामां सहजि समानिआ ॥ ४ ॥ १ ॥[११०]

---

**पदाचा अर्थ :-**जेव्हा मी प्रभूचे गुणगान करतो, तेव्हा मला त्याचा साक्षात्कार होतो व मग मला धीर येतो. जेव्हा जेव्हा मी ईश्वराला बघतो तेव्हा तेव्हा त्याचे गुणगान गातो. त्यामूळे मला परमशांती मिळते. हा भवसागर तरून जाण्याचे धैर्य मला प्राप्त होते. ईश्वराच्या गुणांचे वर्णन केल्याने माझ्या मनाला धैर्य मिळते. माझ्या मनाला सहारा मिळतो.

जेव्हा मला सदगुरू भेटले तेव्हा मी शब्दब्रम्हात विलीन झालो. जेव्हा मला सतगुरू भेटले तेव्हापासून मी नामस्मरणाव्दारे ईश्वरामध्ये मिसळून गेलो. प्रभुकृपेने मला सदगुरू मिळाले. त्यांनी केलेल्या मार्गदर्शनानेच मी प्रभुनामाशी एकरूप झालो आहे. माझे अस्तित्व त्या परमात्म्याच्या स्वरूपात विलीन झाले. पूर्वी माझ्या ठायी असलेला आत्मप्रकाश खूप क्षीण होता, मंद होता. त्याठिकाणी मी आता अविरत अनाहत नादाची अनुभूती अनुभवतो. माझी आत्मज्योत त्या परमात्म्याच्या परमज्योतीत विलीन झाली. हे सर्व मला गुरूकृपेने प्राप्त झाले आहे.

जेथे मंद प्रकाश दिसतो, तेथेच अनाहत नाद ऐकू येतो. तेथे प्रकाशमय प्रभूचे तेज पसरलेले आहे, ते सद्‌गुरूकृपेने ओळखले. तुझ्या कमळरूपी कोठडीमध्ये विजेचा लख्ख प्रकाश पडतो. दूर नव्हे, अगदी जवळ माझ्या आत्म्यामध्येच मला परमेश्वर भरलेला दिसतो.[१११] जिथे मला तेज प्रकाश दिसतो तिथे मला ईश्वराचे दर्शन होते आणि दर्शन झाल्यानंतर अनहूनपणे माझ्या तोंडातून ईश्वराचे चिंतन शब्द निघतात माझ्या मनामध्ये आंतरआत्म्यामध्ये जी हालचाल निर्माण होते की हा प्रकाश परमपिता परमेश्वराचे विखुरलेले रूप आहे. त्या प्रकाशामध्ये मला गुरूकृपेने लाभलेले आहे. ह्रदय रुपी कोठीमध्ये जे रत्न भरलेले आहेत त्यांचा विजेप्रमाणे प्रकाश आहे तो सारा प्रकाश माझ्या ह्रदयामध्ये बसलेला आहे. ज्या ह्रदयामध्ये ईश्वर बसलेला आहे त्या ठिकाणी हजारों सुर्यांचा प्रकाश आहे. हा प्रकाश कधी मिटणारा नाही. आता तो परमेश्वर माझ्यापासून जराही दूर नाही. माझ्या अंतर्यामी तो पुरेपूर भरून राहिला आहे. आता माझ्या अंतरात तो ओंकाररूपात अनाहत

नाद सूर्यासारखा तळपत आहे. पूर्वी तेथे मंद प्रकाश होता. हे सारे ज्ञान मला गुरूकृपेमुळे प्राप्त झाले.[११२] आता हा दासानुदास नामदेव त्या दिव्य परमात्म्यात पूर्णपणे सामावून गेला आहे.

तेथे शब्द नाम रूपी सूर्य तळपत असल्याने जगातील इतर सर्व ज्योती मंद जळणाऱ्या दिव्याप्रमाणे दिसतात. सद्‌गुरूकृपेने हा अनुभव आल्याने नामदेव आपल्या सहज अवस्थेत नामरूपात विलीन होऊन गेला आहे. सूर्य, चंद्र, व तारे यांचा प्रकाशसुध्दा इथे मंद-मंद वाटतो. ही सर्व माझ्या गुरूंची कृपा आहे. गुरूंच्या कृपेमुळेच मी ईश्वराला माझ्या हृदयामध्ये सामावून ठेवले आहे.

संत नामदेव महाराज वरील पदात सांगतात की, गुरू कृपेनेच ईश्वराची प्राप्ती होते. या पदात ईश्वराचे व गुरूचे महत्व सांगीतले आहे. हे पद राग-सोरठ मध्ये आहे.

संत नामदेव वरील पदात सांगतात की, " जब देखा तब गावा ‖ तउ जन धीरजु पावा ‖ १ ‖"[११३]

गुरू नानक देवजी सांगतात की, "जा तिसु भावा तद ही गावा ।। ता गावे का फ्लु पावा ।।"[११४]

संत नामदेव व श्री गुरू नानक देवजी यांच्या वरील पदात समानता दिसून येते. संत नामदेव महाराज सांगतात की, मला प्रभु परमेश्वरामुळे गुरू मिळाला आहे, तर श्री गुरू नानक सांगतात की, प्रभु परमेश्वराच्या कृपेमुळे मला गुरू मिळाले आहेत. श्री गुरू नानक यांनी जेव्हा वरील पद रचले होते तेव्हा त्याच्या जवळ संत नामदेव यांचे सदर पद होते. यावरून दोघांच्या विचारात बऱ्याच प्रमाणात समानता आहे असे दिसून येते.[११५]

---

**पद क्र.१०**

**रागु सोरठि घरु ४**

पाड पडोसणि पूछिलै नामा का पहि छानि छवाई हो ‖
तो पहि दुगणी मजूरी दैहउ मोकउ बेढी देहु बताई हो ‖ १ ‖
री बाई बेढी देनु न जाई ‖
देखु बेढी रहिओ समाई ‖
हमारै बेढी प्रान अधारा ‖ १ ‖ रहाउ ‖
बेढी प्रीति मजूरी मांगै ‖ जउ कोऊ छानि छवावै हो ‖
लोग कुटंब सभहु ते तोरै ‖ तउ आपन बेढी आवै हो ‖
ऐसो बेढी बरनि न साकउ ‖ सभ अंतर सभ ठांई हो ‖
गूंगै महा अम्रित रसु चाखिआ ‖ पूछे कहनु न जाई हो ‖ ३ ‖
बेढी के गुण सुनि री बाई ‖ जलधि बांधि धू थापिओ हो ‖
नामे के सुआमी सीअ बहोरी ‖ लंक भभीखण आपिउ हो ‖ ४ ‖ २ ‖[११६]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव महाराजांना घराशेजारी राहणारी एक शेजारीण एकदा नामदेवांना विचारते, "तुमचे हे सुंदर घर कोणत्या कारागिराने बांधले ? मला त्याचे नाव, पत्ता सांगा. मला तुमचे घर खुप आवडले आहे, मी त्या मजुराला कारागीराला तुम्ही दिलेल्या मजुरीपेक्षा दुप्पट मजुरी देऊन तुमच्या सारखे माझे सुंदर घर बांधेल." ह्या प्रश्नावर संत नामदेवांनी दिलेले उत्तर मोठं मनोज्ञ आहे. ते म्हणतात-"अगं बाई ! त्या कारागिराचे असे नाव, गाव सांगता येणार नाही ? अग तो साऱ्या चराचराला व्यापून राहिला आहे. जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र परमेश्वर आहे. पण तो दिसत मात्र नाही. जेव्हा कोणाला छप्पर बांधायचे असते, तेव्हा तो कारागीर प्रीतीरूपी मजूरी मागतो. लोकांतून, स्वत:च्या कुटुंबातूनही तो वेगळा काढतो आणि मग तो प्रसन्न होऊन येतो. तो माझा जीव की प्राण आहे. तोच माझा एकमेव आधार आहे आणि त्याची मजुरी विचाराल तर त्याचे मोल पैशात, सोन्यारुप्यात करताच येत नाही. अगं, तो माझा कारागिर भावाचा भुकेला आहे. भक्तीचा, प्रेमाचा भुकेला आहे. जर तुम्ही त्याच्यावर जिवापाड प्रेम करून त्याच्या भक्तीत रंगून गेलात तर तो आपणहून तूमच्या साहाय्याला धावून येईल. पण त्यासाठी तुम्हाला या साऱ्या जगाच्या पसाऱ्यापासून अगदी आपल्या जिवलग कुटुंबापासूनही विरक्त व्हावे लागेल. मग तो तुमचा एकमेव आधार बनतो. त्या दिव्य कारागिराचे वर्णन करण्यास जगातले सर्व शब्द अपूरे पडतील. त्याचे वर्णन मी कधीच करून शकत नाही. एखाद्या मुक्या माणसाला तुम्ही अमृत प्यायला द्या आणि विचारा की अमृताची चव कशी आहे ? तो ती वर्णन करूच शकणार नाही. माझी ही स्थिती तशीच झाली आहे.[११७] पण तू विचारतेस आहेस तर ऐक बाई त्याचे गुण खालील प्रमाणे आहेत, "त्या कारागिराने समुद्रावर सेतू बांधला. त्याने त्याच्या प्रिय भक्ताला ध्रुवाला अढळ पद प्रदान करून दिले. सीतेची रावणाच्या पाशातून सुटका केली व परमभक्त विभीषणास लंकेचे राज्य दिले." त्या जगत्पालक परमपित्याची जो श्रध्दायुक्त अंत:करणाने भक्ती करतो, त्याला तो सदैव आधार देतो.

संत नामदेव महाराज शेजारणीला त्या कारागीराबद्दल सांगतात की, "तो कारागिर सर्व व्यापक आहे. तो सृष्टीच्या कणाकणांमध्ये बसलेला आहे. तो कारागीर माझ्या जीवनाचा सहारा आहे. माझे संपूर्ण आयुष्य त्यांच्याच सहाऱ्याने मी जगत आहे. तो केवळ माझ्याच जीवनाचा सहारा नसून सर्व जीवजंतूचा तो सहारा आहे. त्याला फक्त प्रेमरूपी मजुरीची आवश्यकता आहे.[११८] जो व्यक्ती ईश्वराच्या रंगामध्ये रंगून जातो. तो ईश्वराचा बनतो ईश्वर त्या व्यक्तीचे मजुरी करतो आणि त्या व्यक्तीचे सर्व कार्य तो स्वत: करतो; मात्र मनुष्याला त्याच्या भक्तिभावामध्ये एवढे लीन व्हावे लागते की त्याला त्याच्या शरीराची व मनाची सुध्दा काळजी करायला नको. त्या कारागिराने सर्व विश्व बनविले असून या सृष्टीचा तो कर्ता-करविता आहे. त्याचे वर्णन होऊच शकत नाही. तो सर्व जीवांमध्ये असतो.[११९] हे पद राग-सोरठ मध्ये आहे.

---

**पद क्र.११**

**रागु सोरठि घरु ३**

अणमड़िआ मंदलु बाजै ॥
बिनु सावण घनहरु गाजै ॥
बादल बिनु बरखा होई ॥
जउ ततु बिचारै कोई ॥ १ ॥
मोकउ मिलिओ रामु सनेही ॥
जिह मिलिऐ देह सुदेही ॥ १ ॥ रहाउ ॥
मिलि पारस कंचनु होइआ ॥
मुख मनसा रतनु परोइआ ॥
निज भाउ भइआ भ्रमु भागा ॥
गुर पूछे मनू पतिआगा ॥ २ ॥
जल भीतरि कुंभ समानिआ ॥
सभ रामु एकु करि जानिआ ॥
गुर चेले है मनु मानिआ ॥
जन नामै ततु पछानिआ ॥ ३ ॥ ३ ॥[१२०]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव महाराज या पदाव्दारे भगवत भेटीच्या प्रसन्नतेचे वर्णन करतांना असे म्हणतात की, माझ्या मनामध्ये आत्मिक आनंदाचा मेंदूरूपी तबला, कातड्याने मढवलेली नसूनही वाजू लागला आहे, पावसाळा नसतानाही मेघगर्जना होऊ लागली आहे. ढगावाचून पाऊस पडत आहे, हे सारे जेव्हा कोणी ईश्वरी स्वरूपाचे सत्य विचारात घेतो, तेव्हाच समजते. ज्या भक्ताने प्रभू परमात्म्याचे मूळ स्वरूप जाणले आहे, त्याच्याशी एकरूप झाला आहे, त्याच्या अंतरात आत्मिक आनंदाच्या न मढवलेल्या तबल्यातून मंद ध्वनी निनादू लागतात. श्रावन नसतानांही ढगांचा गडगडाट ऐकू येऊ लागतो. आकाशात मेघ नसतानाही नामरुपी पावसाच्या सरी कोसळतात. पण हे त्यांच्याच बाबतीत सत्य आहे, ज्याने त्या प्रभू परमात्म्याचे सत्यस्वरूप जाणले आहे.[१२१] माझ्या हृदयामध्ये आनंद ही आनंद असतो. जेव्हा मला ईश्वराचे प्रेम मिळाले, त्यांचे दर्शन झ ाले तेव्हा माझे खऱ्या अर्थाने चांगले व स्वच्छ शरीर झाले. माझे लोखंडरुपी शरीर त्या परीसाच्या स्पर्शाने शुध्द सोने बनले.

राम सखा मला भेटल्याने जन्म सफल झाले. देहसुख प्राप्त झाले. परिसाच्या स्पर्शाने जीवाचे सोने झ ाले. मुखात व मनात रामनामरूपी रत्न ओवले. आत्मानुभूतीची प्राप्ती झाल्याने भ्रांति पळाली. गुरूला शंका विचारून मन नि:शंक झाले.[१२२] मला माझा तो प्राणसखा, तो राम, प्राप्त झाला आहे. त्यामूळे आता माझ्या जीवनाचे सार्थक झाले आहे. परिसाच्या स्पर्शाने जसे लोखंडाचे सोने होते तसेच गुरूच्या उपदेशाने माझे मन

शांत झाले आहे. माझ्या मनातील सर्व भय, भ्रम नष्ट झाले आहेत. आता तनमनात मी नामरूपी रत्न धारण केला आहे. मग काय ? मी मनाने व मनाने रामरत्न माझ्या हृदयात साठविले. आणि माझे जीवन सफल झ ाले. हे रत्न भेटल्यामुळे माझा सारा भ्रम, भिती व दुनियेची भिती दूर झाली आहे. सर्व ठिकाणी मला ईश्वरच दिसत आहे.[१२३]

समुद्राच्या पाण्यात घट बुडावा तसा जीवआत्मा-परमात्म्यात विलीन झाला. सर्वत्र एकच प्रभू भरला असल्याची जाणीव झाली. गुरू-शिष्याची मने एकरूप झाली, दास संत नामदेवांनी सत्य ओळखले. ज्याप्रमाणे कुंभातील पाणी समुद्रात ओतल्यावर समुद्राचे पाणी व कुंभातील पाणी एकरूप होऊन जाते, त्याचप्रमाणे मला आता सर्वत्र रामच राम परमेश्वर दिसत आहे. सर्व काही रामरुप आहे असे जाणवते आहे. गुरू आणि शिष्य यांची मने एकरुप होऊन गेली आहेत. मला माझ्या गुरूवर अपार विश्वास आहे.[१२४] गुरूकृपेमुळे मनुष्याला जीवनाचे सत्य समजते. गुरूकृपेमुळेच संत नामदेवांच्या जीवनाचे सत्य ओळखले आहे. हे पद राग-सोरठ मध्ये आहे.

---

**पद क्र.१२**

**राग़ु धनासरी**

१. ओं सतिगुर प्रसादि ||

गहरी करि कै नीव खुदाई ऊपरि मंडप छाए ||
मारकंडे ते को अधिकाई जिनि त्रिण धरि मुंड बलाए || १ ||
हमरो करता रामु सनेही ||
काहे रे नर गरबु करत हहु बिनासि जाइ झूठी देही || १ || रहाउ ||
मेरी मेरी कैरउ करते दरजोधन से भाई ||
बारह जोजन छत्रु चलै था देही गिरझन खाई || २ ||
सरब सोइन की लंका होती रावन से अधिकाई ||
कहा भइओ दरि बांधे हाथी विन महि भई पराई || ३ ||
दुरबासा सिउ करत ठगउरी जादव ए फल पाए ||
क्रिपा करी जन पुने ऊपरी नामदेउ हरि गुन गाए || ४ || १२ ||[१२५]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव महाराजांनी वरील पदात सांगतात की, बंधुंनो, खोल पाया खणवून त्याच्यावर तुम्ही महाल-माड्या बांधल्या, पण अत्यंत दीर्घायुष्य असलेल्या मार्कंड्येय ऋषींनी कधीही घर बांधले नाही. ते डोक्यावर, गवताचा भारा घेऊन हिंडत व तेच त्यांचे घर, तोच त्यांचा बिछाना, तेच पांघरुन, त्यांच्याहून कोण अधिक जगला. थंडी, वारा, ऊन, पाऊस ह्यापासून रक्षण व्हावे व दीर्घायुष्य प्राप्त व्हावे, म्हणून तू खूप खोल

पाया खणलास, त्यावर पक्की इमारत बांधली. काय झालं ? वाढलं आयुष्य ? अरे ते अमरत्व प्राप्त केलेले मार्कंड्येय ऋषी पहा. कोणत्याही प्रकारचे घर न बांधता ते दिर्घायुषी झाले आहेत.

आमचा निर्माता रामसखा आहे. कशाला रे मानवा गर्व करतोस ? ह्या मायामय खोट्या देहाचा नाश होणारच आहे. माझ्यासाठी तो प्रभू राम माझा सखा आहे, तोच माझा तारणहार आहे. हे मानवा तू, तुझ्या देहाचा का वृथा गर्व करतोस. असे हा नश्वर देह अखेर नष्टच होणार आहे [१२६]

दुर्योधनासारखा प्रतापी तो प्रबळ वीर, ज्यांचा भाऊ, ते कौरव मी-मी करीत होते आणि ज्यांच्या माथी बारा योजनांचे छत्र असे एक योजन म्हणजे चार कोस पण जेव्हा ते कुरूक्षेत्रावर मरण पावले, तेव्हा त्यांचे देह गिधाडांनी खाल्ले. अरे, ते दुर्योधन आणि त्याचे ते शंभर भाऊ कौरव माझं माझं म्हणून किती गर्व करत होते. त्यांचा सैन्यतळ बारा योजनेचा म्हणजेच अठ्ठेचाळीस कोस पसरलेला होता. काय त्यांची दशा झाली ? अरे, त्यांची प्रेते गिधाडांचे अन्न बनले.[१२७]

रावणासारखा ज्या सुवर्ण लंकेचा स्वामी होतो, ती क्षणात परक्याची झाली. त्यांच्या दारी बांधलेल्या हत्तींचे काय झाले ? तो चौदा चौकड्यांचा स्वामी, त्या स्वर्णमयी लंकेचा राजा रावण, ज्याच्या दारी असंख्य हत्ती झुलत होते, त्याचे काय झाले ? क्षणात सर्व वैभव नष्ट झाले.

दुर्वास ऋषींची कुचेष्टा करण्यासाठी यादवांनी जे कपट आचरण केले, त्याचे फळ त्यांना मिळाले. त्यांचा निर्वंश झाला, हे पुराणात प्रसिध्दच आहे. मग नामदेवांवर कृपा झाली. ती माझ्या प्रभूचे गुणगान करत राहील. दुर्वास ऋषींची कुचेष्टा करणाऱ्या, आपल्याच मस्तीत धुंद झालेल्या, यादवांचे काय झाले माहित आहे ना ! पाहता पाहता त्यांचा निर्वंश झाला. वृथा गर्व करण्याचा परिणाम हा असाच होतो. संत नामदेव महाराज म्हणतात, त्या प्रभू रामचंद्राने माझ्यावर कृपा केली. आता मी त्या हरीचे सदैव गुणगान करीत राहणार आहे.

संत नामदेव महाराज या पदांमध्ये सांगतात की, मनुष्य शरीर नाशवंत आहे.[१२८] कोणीही आपल्या संपत्तीचा, शक्तीचा, साम्राज्याचा, वैभवाचा अभिमान करू नये. परमात्मा आपल्या सेवकांवर व भक्तांवर कृपा करत असतो व जे अहंकारी, घमंडी असतात त्यांचा नाश करत असतो. मनुष्यामध्ये अहंकार नसावा, कारण अहंकार हा विनाशाचे कारण आहे. हे पद राग-धनासरी मध्ये आहे.

---

**पद क्र.१३**

**रागु धनासरी**

दस बैरागनि मोहि बसि कीनी पंचहु का मिट नावउ ॥

सतरि दोइ भरे अम्रित सरि बिखु कउ मारि कढावउ ॥ १ ॥

पाछै बहुरि न आवनु पावउ ॥

अम्रित बाणी घट ते उचरउ आतम कउ समझावउ ॥ १ ॥ रहाउ ॥

बजर कुठारू मोहि है छीनां करि मिंनति लगि पावउ ॥

संतन के हम उलटे सेवक भगतन ते डर पावउ ॥ २ ॥

इह संसार ते तब ही छूटउ जउ माइआ नह लपटावउ ॥

माइआ नाउ नरभ जोनि का तिह तजि दरसनु पावउ ॥ ३ ॥

इतु करि भगति करहि जो जन तिन भउ सगल चुकाइऐ ॥

कहत नामदेउ बाहरि किआ भरमहु इह संजन हरि पाइऐ ॥ ४ ॥ १३ ॥[१२९]

---

**पदाचा अर्थ :-**सद्‌गुरूंच्या चरणी विनंती करून मी मृत्यूच्या भीतीची यमाच्या हातातील कठोर कुऱ्हाड काढून घेतली आहे. आत्मरूपी वैराग्याच्या ज्या दहा स्त्रिया, त्या म्हणजे माझी ही दहा इंद्रिये, पाच कर्मेंद्रिये तर पाच ज्ञानेंद्रिये मी ताब्यात ठेवली आहेत. पाचही विषयांचे नावसुध्दा पुसून टाकले आहे. आत्मा हा मुळात विरागी आहे. पण त्याच्या दहा राण्यांमूळे तो संसारात अडकतो. त्या दहा राण्या म्हणजे माणसाची दहा इंद्रिये त्यात पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये होय. त्यामुळे माणूस संसारात अडकून पडतो. संत नामदेव म्हणतात त्या दहा इंद्रियांना मी ताब्यात ठेवले आहे व त्यामुळेच मी पाचही विकारांना काम,क्रोध, मोह, मद, मत्सर यांना माझ्या मनातून हद्दपार केले आहे. माझ्या दोनही मुख्य नाड्यात म्हणजेच माझ्या रोमरोमात, अंग-प्रत्यंगात प्रभूनामरूपी अमृत भरून घेऊन मायारूपी विष शरीरातून काढून टाकले आहे.

नाव व रूप ज्या जीवाच्या दोन उपाधी अहंतेच्या विषाने भरलेल्या होत्या, त्या नाम अमृताने भरून त्यातील विष नष्ट केले. आता पुन्हा मी जन्माला येणार नाही. मनापासून नाम अमृताची वाणी मी उच्चारतो व तसे करण्यास स्वत:ला समजावतो. मी, माझ्या आत्म्यास विषय विकारांपासून परावृत्त केल्यामुळेच, प्रभूनामाचे अंत:करणपूर्वक स्मरण व उच्चारण करीत आहे. त्यामुळे माझ्या जन्ममरणाच्या चक्रातून मुक्तता झ ाली आहे. मी आता कोणालाही भीत नाही.

मायेच्या ठिकाणी मी संतांचा दास बनलो आहे. यमाच्या ठिकाणी मी भक्तांच्या धाक बाळगतो. मी आता संताचा दासानुदास झालो आहे व भक्तांबद्दल माझ्या मनात आदरयुक्त भीती आहे. मी सदगुरूंच्या चरणावर स्वत:स समर्पित करून त्याच्याकडून प्रभूनामरूपी कुऱ्हाड प्राप्त केली आहे व त्या कुऱ्हाडीने मोह मायेचे व काळाचे सर्व पाश मी तोडून टाकले आहेत.

मायेचा लेप लागू दिला नाही, तरच परत जन्म-मरणरूपी संसारातून सुटका होते, गर्भ अवस्थेतूनच मायेचा संबंध जीवाशी जडलेला असतो. म्हणून गर्भावस्था म्हणजे पुनर्जन्म त्यागून मी परत प्रभूचे दर्शन घेईन.[१३०] जर मी मायेच्या पाशात स्वत:स अडकवून घेतले नाही तरच ह्या संसारातून माझी सुटका होईल. पण माया माणसाच्या गर्भावस्थेपासूनच त्यास चिकटलेली आहे. तिच्यापासून सुटका करून घेतली पाहिजे.

जे भक्त अशा प्रकारे भक्ती करतात ते भयमुक्त होतात, नामदेव म्हणतात-जनहो, देवाला बाहेर कशाला शोधत फिरता, वर सांगितलेल्या संयमानेच तुम्हाला त्याची प्राप्ती होईल. दशइंद्रियांना काबूत ठेवून

पंचविकारांपासून मुक्त होऊन मोहमायेचे पाश तोडून टाकतो, तो सर्व भयांपासून मुक्त होतो. संत नामदेव महाराज सांगतात की, उगाच इकडे तिकडे बैरागी होऊन भटकण्यात काहीही लाभ होत नाही. जो प्रभूनामात तल्लीन होईल त्याचे जीविताचे सार्थक होईल त्यास परमेश्वराची प्राप्ती होईल.[१३१]

संत नामदेव महाराज वरील पदात सांगतात की - हे मना ! तु बाहेर का भटकतोस संयम ठेव तुला भगवान परमात्म्यांचे दर्शन होईल. दहा इद्रियांना वशीभूत करा. काम,क्रोध, मोह, लोभ व अहंकार या पाच विकारांना नष्ट करा. व आपल्या रोमारोमांत ईश्वराच्या अमृत नामाची साठवण करा. मायेपासून अलिप्त झाल्यानंतर मानव जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो व आत्मा परमात्म्यामध्ये वास करतो. जीवाला ब्रम्हाचे दर्शन होते.[१३२] हे पद राग-धनासरी मध्ये आहे.

---

**पद क्र.१४**

**रागु धनासरी**

मारवाड़ि जैसे नीरु बालहा बेलि बालहा करहला ||
जिउ कुरंक निसि नादु बालहा तिउ मैरे मनि रामहआ || १ ||
तेरा नामु रुडी रुपु रुड़ो अति रंग रुड़ो मेरो रामइआ || १ || रहाउ ||
जिउ धरणी कउ इंद्रु बालहा कुसम बासु जैसे भवरला ||
जिउ कोकिल कउ अंबु बालहा तिउ मेरै मनि रामईआ || २ ||
चकवी कउ जैसे सूरु बालहा मान सरोवर हंसुला ||
जिउ तरुणी कउ कंतु बालहा तिउ मेरै मनि रामईआ || ३ ||
बारिक कउ जैसे खीरु बालहा चात्रिक मुख जैसे जलधरा ||
मछुली कउ जैसे नीरु बालहा तिउ मेरै मनि रामईआ || ४ ||
साधिक सिध सगल मुनि चाहहि बिरले काहू डीठुला ||
सगल भवण तेरो नामु बालहा तिउ नामे मनि बीठुला || ५ || १४ ||[१३३]

---

**पदाचा अर्थ :-**मारवाडात जसे पाणी प्रिय, उंटाला जसे वेल प्रिय, हरणाला जसा रात्रीच्या वेळी पारध्याने वाजविलेल्या वाद्यांचा मोहक नाद प्रिय, तसा माझ्या मनाला रामप्रभू प्रिय वाटतो. मारवाड प्रदेशातील, राजस्थानातील वाळवंटातील लोकांना जसे पाणी प्रिय असते, उंटाला हिरवीगार वेल प्रिय असते, हरणाला रात्री होणारा आवाज प्रिय असतो, तसा माझ्या मनाला तो राम प्रिय आहे.[१३४]

हे प्रभू, तुझे नाम, तुझे रुप, तुझे मन सर्वच सुंदर आहे. रामराया तुझे नामगोड आहे, तुझे रुप गोड आहे, तुझे अंतरंगही गोड आहे, तू सर्वांग सुंदर आहे. जमिनीला जसा पाऊस प्रिय, भ्रमराला जसा फुलांचा वास प्रिय, कोकिळेला जसा आम्रवृक्ष प्रिय वाटतो, तसा माझ्या मनाला प्रभु प्रिय वाटतो. ज्याप्रमाणे धरणीला

पाऊस प्रिय असतो, भ्रमराला फुलांचा सुगंध प्रिय असतो, कोकिळेला आम्रवृक्ष प्रिय असतो, त्याप्रमाणे माझ्या मनाला तो राम प्रिय आहे.[१३५] चकवी पक्ष्याला सूर्य, हंसाला मानस सरोवर, तरूणीला पती, तसा माझ्या मनाला प्रभू राम प्रिय वाटतो.

बालकाला दुध, चातकाला मेघाची जलधार, माशाला पाणी, त्याप्रमाणे माझ्या मनाला श्रीराम प्रिय वाटतो.[१३६] ज्याप्रमाणे बालकाला दुध प्रिय असते, चातकाला स्वाती नक्षत्राच्या जलबिंदू प्रिय असतो, माशाला पाणी प्रिय असते त्याप्रमाणे माझ्या मनाला राम प्रिय आहे.

साधक, सिध्द, मुनी हे सर्व प्रभूची इच्छा करतात, पण तो क्वचितच कोणाला तरी दर्शन देतो. हे प्रभू, सगळ्या जगाला तुझे नाम प्रिय आहे, तसेच ह्या नामदेवाला मनाला विठ्ठल प्रिय आहे. साधक, सिध्द सर्व ऋषीमुनी तुला प्राप्त करण्यासाठी आसुसलेले असतात, पण क्वचितच कोणास प्रभूचे दर्शन प्राप्त होते. त्रिभुवनातील साऱ्या जीवांना तुझे नाम प्रिय आहे. त्याप्रमाणे नामदेवाला विठ्ठल प्रिय आहे. हे प्रभू ! तुला तुझे साधक सिध्द ऋषी-मुनी धुंडत असतात. त्यासाठी ते वेगवेगळे प्रयत्न करत असतात. साधना करीत असतात, परंतु तुमची कृपादृष्टी एखाद्यावरच होते. सारे विश्व तुला पसंत करते तुझी आठवण करते. साऱ्या विश्वाला तू प्रिय आहेस. तुझे नाव प्रिय आहे त्याचप्रमाणे माझ्या मनाला सुध्दा 'विठ्ठल' प्रिय आहे.

प्रस्तुत पदात संत नामदेव म्हणतात की, साऱ्या विश्वाला तू प्रिय आहेस, तुझे नाव प्रिय आहे त्याचप्रमाणे माझ्या मनाला सुध्दा 'विठ्ठल' प्रिय आहे.[१३६] हे पद राग-धनासरी मध्ये आहे.

---

**पद क्र.१५**

**राग धनासरी**

पहिल पुरीए पुंडरक बना ॥

ताचे हंसा सगले जनां ॥

क्रिस्ना ते जानऊ हरि हरि नाचंती नाचना ॥ १ ॥

पहिल पुरसाबिरा ॥

अथोन पुरसादमरा ॥

असगा अस उसगा ॥

हरिका बागरा नाचै पिंधी महि सागरा ॥ १ ॥ रहाउ ॥

नाचंती गोपी जंना ॥

नईआ ते बैरे कंना ॥

तरकु न चा | भ्रमीआ चा ॥

केसवा बचउनी अईए मईए एक आन जीउ ॥ २ ॥

पिंधी उभकले संसारा ॥

भ्रमि भ्रमि आए तुमचे दुआरा ॥

तू कुनुरे ॥ मै जी ॥ नामा ॥ हो जी ॥

आला ते निवारणा जम कारणा ॥ ३ ॥ १५ ॥[१३८]

---

**पदाचा अर्थ :-**संसार बंधनातून सुटण्याच्या हेतूने सदगुरूचरणी शरण आलेल्या नामदेवांना त्यानी विचारले, "तू कोण आहेस ?" "मी नामदेव नावाचा एक हीन जीव आहे." असे उत्तर ऐकून श्रीसदगुरूंनी विचारले, "तू का आला आहेस?" "यम यातनांचे कारण असलेल्या गृहप्रपंच्यातून माझी सुटका करा, असा उपाय सांगा की, जेणे करून मी कर्म बंधनातून मुक्त होईन."

नामदेवांची विनंती ऐकून सदगुरू सांगतात, "प्रथम परमेश्वरापासून निर्माण झालेली सृष्टी कमलवनासारखी सुंदर दिसत होती, त्या कमळाभोवती सारे जीव हंसाप्रमाणे नाचू लागले. जशा गोपी श्रीकृष्णाच्या प्रेरणेने नाचल्या, त्याप्रमाणे प्रभूच्या प्रेरणेने सर्व जीव नाचत आहेत." सर्वप्रथम ही सृष्टीएखाद्या कमलपुष्पांच्या पुष्करणीसारखी होती. पवित्र मंगल सारे जीव त्यात हंसासारखे आनंदाने विहरत होते. परमात्म्याने उत्पन्न केलेली सृष्टी ज्याप्रमाणे गोपी कृष्णाभोवती फेर धरून नाचतात, त्याप्रमाणे हे सारे जीव त्या परमात्म्याभोवती रूंजी घालीत होते. सर्वप्रथम फक्त परमात्मा एकमात्र पुरूष होता. त्यानंतर त्या अकाल पुरूषापासून माया उत्पन्न झाली व त्यांच्या संयोगातून ही सारी सृष्टी निर्माण झाली. त्यामूळे जे काही आहे ते सारे प्रभू परमात्म्याचेच आहे. कोणताही तर्क वितर्क करीत बसू नकोस. सारे भ्रामक विचार सोडून दे. सर्व स्त्री पूरूष त्या परमात्म्याचेच बोल बोलत आहेत. त्याच्याच इच्छेप्रमाणे वागत आहेत. नामदेव म्हणतात, हे प्रभू ! मी ही असाच एक जीव ह्या संसाराच्या रहाट गाडग्याप्रमाणे फिरून फिरून तुझ्या दारी आलो आहे.

प्रथम पुरूष व नंतर प्रकृती प्रकट झाली. जे तिचे ते सगळे त्यांचेच आहे. हे सगळे त्यांचेच आहे. हा सगळा पसारा प्रभूच्या विहाराचे उद्यान आहे. सर्वप्रथम फक्त परमात्मा एकमात्र पुरूष होता. त्यानंतर त्या अकाल पुरूषापासून माया उत्पन्न झाली व त्यांच्या संयोगातून ही सारी सृष्टी निर्माण झाली. त्यामूळे जे काही आहे ते सारे प्रभू परमात्म्याचेच आहे.

रहाट-गाडग्याच्या पाण्याच्या थेंबाप्रमाणे सगळे जीव खाली-वर होत आहेत. ह्या जीवरूपी गोपी नाचत आहेत, त्यांना नाचवणारा प्रभूविना दुसरा कोणी नाही. सारे जीव, सारे स्त्री पुरूष ह्या जगात नृत्यात मग्न आहेत. ह्या सर्वांत तो एकमात्र परमात्माच विराजमान आहे अन्य कोणीही नाही, ह्याबद्दल तू मनात शंकासुध्दा आणू नकोस. सर्व जीव रहाट-गाडग्यासारखे फिरत आहेत. ते कर्मबंधनात जखडलेले आहेत. तू तर्क-वितर्क करू नकोस, त्यामूळे तू भ्रमात पडशील. भगवंतांनी सांगितलेले आहे, "मी व जीव दोन्ही एकच आहोत."[१३९]

वरील पदांत संत नामदेव महाराज स्वत:ला माया मोह हे मरणाचे मुळ आहेत त्यापासून मला वाचव असे ईश्वराला विनंती करत आहेत. सर्व सृष्टी ईश्वराच्या इशाऱ्यावर चालते. हा सारा संसार ईश्वराचाच

अंश आहे.[१४०] संत नामदेव महाराज म्हणतात-ईश्वरा कृपा करून मला ह्या संसाराच्या जंजाळातून मुक्त करा ! यमाच्या तावडीतून सोडवा. हे पद राग-धनासरी मध्ये आहे.

---

**पद क्र.१६.**

**रागु धनासरी**

पतित पावन माधउ बिरढु तेरा ||
धंनि ते वै मुनि जन जिन धिआइओ हरि प्रभु मेरा || १ ||
मेरै माथै लागीले धूरि गोबिंद चरनन की ||
सुरि नर मुनि जन तिनहू ते दूरि || १ || रहाउ ||
दीनका दहआलु माधौ गरब परहारी ||
चरन सरन नामा बलि तिहारी || २ || १६ ||[१४१]

---

**पदाचा अर्थ :-**हे प्रभु, पतितांना पावन करणारा असे तुमचे ब्रीद आहे. ज्यांनी माझ्या माधवाचे ध्यान केले ते ऋषीमुनी खरोखरच धन्य आहेत. हे माधवा, पतितांना पावन करणारा असे तुमचे ब्रीद आहे. ज्या मुनिजनांनी, माझ्या हरीचे, त्या प्रभूचे ध्यान केले ते धन्य होत.[१४२] सुर-असुरांना, मानवांना, ऋषीमुनींना, दुर्लभ असलेल्याना माझ्या प्रभूची चरणधूळ माझ्या मस्तकाला लागली आहे. देव, मानव, मुनिजनांनाही जी दुर्मिळ आहे अशी प्रभू चरणाची धूळ माझ्या मस्तकी विराजमान झाली आहे.

बलाढ्यांचा गर्व हरण करणारा व दीन-दुबळ्यांवर दया करणारा असा माझा प्रभु आहे. हे दीन वत्सल प्रभु, तुझ्या पायी शरण आलेला मी नामदेव माझा जीव ओवाळून टाकत आहे. हे माधवा, तू दीनांवर दया करणारा, दीन दयाळ आहेस तू सत्तेने मत्त झालेल्यांचे गर्वहरण करतोस. हा नामा तुझ्या चरणांना शरण आला आहे. मी नामा तुमच्यावरून माझा जीव ओवाळून टाकतो. माझ्या प्राणांची कुरवंडी करतो.[१४३]

वरील पदांत संत नामदेव महाराज म्हणतात की, हे प्रभू ! तुझा स्वभाव पापी लोकांना पवित्र करण्याचा आहे. मुनि जन हेच धन आहे. ज्यांनी माझ्या प्रभुचे नामस्मरण केलेले आहे. माझ्या कपाळाला जी धुळ लागलेली आहे ती धूळ ऋषीमूनींना सुध्दा मिळत नाही. गरिबांवर दया करणारे, गरिबांचे पालनहार, रक्षणकर्ते व उध्दारक असे प्रभू आहेत.[१४४] अभिमान गर्व असलेल्यांना तूम्ही नष्ट केलेले आहे. मी नामदेव तूमच्या चरणी शरण आलेलो आहे. मी माझे सर्वस्व तुम्हाला अर्पण केलेले आहे. हे पद राग-धनासरी मध्ये आहे.

---

**पद क्र.१७**

**रागु टोडी**

१. ओं सतिगुर प्रसादि ||

कोई बोलै निरवा कोई बोलै दूरि ॥

जल की माछुली चरै खजूरि ॥ १ ॥

कांइ रे बकबादु लाइओ ॥

जिनि हरि पाइओ तिनहि छुपाइओ ॥ १ ॥ रहाउ ॥

पंडितु होइ कै बेदु बखानै ॥

मूरखु नामदेउ रामहि जानै ॥ २ ॥ १७ ॥[१४५]

---

**पदाचा अर्थ :-** कोणी म्हणतात- प्रभु जवळ आहे, कोणी म्हणतात तो दूर आहे, हा तर्क म्हणजे पाण्यात राहण्यासाठीच जन्मलेल्या माश्याने खजुराच्या झाडावर चढण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे. ईश्वर जवळच आहे. कोणी म्हणतात- तो फारच दूर आहे. पण हे सारे निरर्थक आहे.

कशाला रे ही निरर्थक बडबड करता ? ज्या कोणाला प्रभूची प्राप्ती होते तो ती स्वत:च्या मनात लपवून ठेवतो.[१४६] अरे, जे घडणे अशक्य आहे, त्याची उगाच चर्चा कशाला ? त्या प्रभू परमात्म्याचा पार कोणाला तरी कधी लागलाय का ? अरे, कशाला हा निरर्थक गोष्टी करतो ? कारण ज्यांनी परमेश्वरास प्राप्त केले आहे, ते त्याची कधी दवंडी पिटत नाहीत. आपली अनुभूती आपल्यापाशीच ठेवतात व जगात इतर सामान्य जनांप्रमाणेच व्यवहार करीत राहतात.[१४७]

पंडीत बनून कोणी वेदांसबंधी व्याख्यान द्यावे. मी, नामदेव मूर्ख असलो तरी माझ्या प्रभूला जाणतो. पंडीत जनहो, विव्दानांनो तुम्ही खुशाल वेदांवर चर्चा करीत बसा, वेदांवर व्याख्याने झोडत राहा, काही उपयोग नाही. अशाने ईश्वर प्राप्त होत नाही.[१४८] मी, ह्या अडाणी मूर्ख नामदेवांने ईश्वराने जाणले आहे व त्याच्या नामाशी एकरूप झालो आहे. हे पद राग-तोडी मध्ये आहे.

---

**पद क्र.१८**

**रागु टोडी**

कउन को कलंकु रहिओ, राम नामु लेत ही ॥

पतित पवित भए, रामु कहत ही ॥ १ ॥ रहाउ ॥

राम संगी नामदेव जन कउ प्रतगिआ आई ॥

एकादसी ब्रतु रहै, काहे कउ तीरथ जाई ॥ १ ॥

भनति नामदेउ सुक्रित सुमति भए ॥

गुरमति रामु कहि को को न बैकुंठि गए ॥ २ ॥ १८ ॥[१४९]

---

**पदाचा अर्थ :-** रामनाम घेऊनही ज्याचे दोष नाश पावले नाहीत, असा कोण आहे ? शब्दाच्या उच्चाराबरोबरच महापापीही पवित्र झाले. सांगा बरे, रामाच्या नामाचा जप करणाऱ्यांपैकी कोणाच्या माथीचा कलंक पूसला गेला नाही ? ज्याने ज्याने रामाच्या नामाचा आसरा घेतला त्या प्रत्येकांची सर्व पापे, सर्व कलंक नष्ट झाले.[१५०]

लोकांची खात्री झाली आहे की, मी नामदेव प्रभु रामाच्या सहवासात असतो, एका प्रभूच्याच दिशेने जीवनाचा प्रवास मी करीत असल्याने तीर्थयात्रेला जाण्याची काहीच आवश्यकता नाही. प्रभूच्याच मार्गाने नित्य ते सर्व व्यवहार करण्याचे व्रत घेतले म्हणजे पूरे आहे. रामाचे नाव घेताच पतित पावन होऊन जातात. त्या प्रभुरामाच्या संगतीत राहिल्याने नामदेवास आता हे स्पष्ट झाले आहे की रामनामच तारक आहे. आता मी कशाला एकादशीचे व्रत करु ? कशाला तीर्थ यात्रेला जाऊ ? त्याची आता मला नामदेवाला काहीही गरज वाटत नाही.[१५१]

संत नामदेव म्हणतात-सदाचरणी भक्तांची बुध्दी शुध्द होते. प्रभु नाम उच्चाराने कित्येक भक्त तरून गेले. कोणा-कोणाची म्हणून नावे सांगावीत ? संत नामदेव सांगतात, माझ्या चांगल्या कर्मामुळे माझी बुध्दीही चांगली झाली आहे. ज्याने गुरूच्या उपदेशाने रामनाम घेतले त्यातला कोणीतरी वैकुंठाला पारखा झाला आहे का ? सर्वजणांना सुखे प्राप्त झाली. नामस्मरणाने मनुष्यास उत्तम पदवी प्राप्त होऊन वैकुंठी प्रयाण करण्यास यशस्वी होते.

वरील पदांत संत नामदेव महाराजांनी रामनामाचे अनन्यसाधारण महत्व विशद केले आहे. रामनामाच्या जपाने मनुष्यातील सर्व दोष नाहीसे होतात. पापी व्यक्ती देखील रामनामाच्या जपाने शुध्द पवित्र बनतो. नामस्मरणाने मनुष्यास उत्तम पदवी प्राप्त होऊन वैकुंठी प्रयाण करण्यास यशस्वी ठरले.[१५२] हे पद राग-तोडी मध्ये आहे.

---

**पद क्र.१९**

**रागु टोडी**

तीनि छंदे खेलु आछै ॥ १ ॥ रहाउ ॥

कुंभार के घर हांडी आछै, राजाके घर सांडी गो ॥

बामन के घर रांडी आछै, रांडी सांडी हांडी गो ॥ १ ॥

बाणीए के घर हींगु आछै, भैसर माथे सींगु गो ॥

देवल मधे लींगु आछै, लींगु सींगु हींगु गो ॥ २ ॥

तेली कै घर तेलु आछै, जंगलमधे बेलगो ॥

माली के घर केल आछै, केल बेल तेल गो ॥ ३ ॥

संतां मधे गोबिंदु आछै, गोकल मधे सिआम गो ॥

नामे मधे रामु आछै, राम सिआम गोबिंद गो ॥ ४ ॥ १९ ॥[१५३]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव महाराजांनी ह्या छंदात तीन प्रकारच्या प्रसंगाचा खेळ एकत्रित केला आहे. तीन शब्दांचा हा खेळ आहे. तीन शब्दांची गंमत आहे.

कुंभाराच्या घरी हंडी म्हणजे मातीचे मडके असते, राजाच्या घरी सांडी म्हणजे ऊंडीण असते, ब्राम्हणाच्या घरी पोथ्या असतात, रांडी, हांडी, सांडी. वाणी लोकांच्या घरी हिंग, म्हशीच्या डोक्यावर शिंग, देवळात लिंग असते, लिंग, हिंग, शिंग, तेल्याच्या घरी तेल, जंगलात बैल, माळयाच्या घरी केळ झाड किंवा फळ असते, तेल, बैल, केळ.

संतांत गोविंद, गोकुळात श्रीकृष्ण, हृदयात राम आहे. राम, श्याम, गोविंद हे तिन्ही आहेत. वरील पदांमध्ये रांडी या शब्दाचा आणखी एक अर्थ असा होतो की रांडी म्हणजे विधवा स्त्री होय.[१५४] ब्राम्हण समाजाच्या घरी बहिणी विधवा झाल्यानंतर आपले उर्वरित आयुष्य भावाकडे घालवत असे.[१५५] संत नामदेव सांगतात की रामनामाशिवाय नामदेवजी जगूच शकत नाही. हे पद राग-तोडी मध्ये आहे.

---

**पद क्र.२०**

**रागु तिलंग**

१ ओ सतिगुर प्रसादि ॥

मै अंधुले की टेक तेरा नामु खुंदकारा ॥

मै गरीब मै मसकीन तेरा नामु है आधारा ॥ १ ॥ रहाउ ॥

करीमां रहीमां अलाह तू गंनी ॥

हाजरा हजूरि दरि पेसि तूं मंनी ॥ १ ॥

दरिआउ तू दिहंद तू बिसीआर तू धनी ॥

देहि लेहि एकु तूं दिगर को नही ॥ २ ॥

तूं दानां तूं बीनां मै बीचारू किआ करी ॥

नामे चे सुआमी बखसंद तूं हरी ॥ ३ ॥ ॥ २० ॥[१५६]

---

**पदाचा अर्थ :-**हे प्रभु, मी आंधळा असून तुझ्या नामाचा आधार ही माझी काठी आहे. मी गरीब, निराधार, अनाथ आहे. मला तुझ्या नामाचाच आधार आहे.[१५७] हे परमेश्वरा ! मी आंधळा, तुझे नाम हीच माझी काठी आहे. तूच माझा आधार आहे. मी गरीब, क्षूद्र, कीटकासमान आहे. तुझे नाम हाच माझ्या जीवनाचा आधार आहे.[१५८]

तू दयाळू, कृपाळू, सर्वांचा स्वामी व दाता आहेस. तू जेथे, तेथे सर्वत्र भरून उरलेला तू भक्तांच्या मनात कायम राहणारा आहेस.[१५९] तू करीम, तू रहीम, तू कृपाळू, तू दयाळू, तू अल्ला, तूच माझा मालक आहेस, तूच माझा धनी आहेस, तूच माझा दाता आहे, तूच सर्वज्ञानी आहेस, तूच सर्व व्यापी आहेस, तूच भक्तांच्या मनात सदैव भरून राहिला आहेस.

तू अनंत ऐश्वर्याचा स्वामी असून, तू सर्वांना देणारा आहेस, देणारा, तसेच परत घेणारा तू एकटाच आहेस, दुसरा कोणी नाही. तू दयेचा सागर आहेस. तूच दाता आहेस. तू सर्वात मोठा धनवान आहेस. तुझ या खेरीज अन्य कोणी नाही.[१६०]

तू सर्वज्ञ, तू सर्वद्रष्टा आहेस. मी तुझ्यासंबंधी विचार करू शकत नाही, हे श्रीहरी, तू माझा नामदेवाचा मालक व दाता आहेस. तू सर्वज्ञ आहेस. तू सर्वव्यापी आहेस. मी तूझे काय वर्णन करू ? माझ ी ती पात्रताच नाही. हे हरी, नामदेवांच्या स्वामी तू अत्यंत कृपावंत आहेस.

वरील पदात संत नामदेव महाराज सांगतात की, मनुष्य ज्या शरीरावर गर्व करतो ते शरीर नश्वर आहे.[१६१] परमेश्वर सर्वांचा आधार व तसेचच कर्ताधर्ता आहे. परमेश्वर ज्ञानी असून तो सर्व गोष्टी चांगल्या प्रकारे जाणून घेतो. संत नामदेव म्हणतात की, परमेश्वराचे वर्णन मी करूच शकत नाही. परमेश्वर सर्व शक्तीमान व पालनकर्ता आहे. हे पद राग-तिलंग मध्ये आहे.

---

**पद क्र.२१**

**रागु तिलंग**

हले यारां हले यारां खुसि खबरी ॥
बलि बलि जांउ हउ बलि बलि जांउ ॥
नीकी तेरी बिगारी आले तेरा नाउ ॥ १ ॥ रहाउ ॥
कुजा आमद कुजा रफती कुजा मे रवी ॥
व्दारिका नगरी रासि बुगोइ ॥ १ ॥
खूबु तेरी पगरी मीठे तेरे बोल ॥
व्दारिका नगरी काहे के मगोल ॥ २ ॥
चंदीं हजार आलम एकल खानां ॥
हम चिनी पतिसाह सांवले बरनां ॥ ३ ॥
असपति गजपति नरह नरिंद ॥
नामे के स्वामी मीर मुकुंद ॥ ४ ॥ २१ ॥[१६२]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव म्हणतात की, "अरे मित्रा, काही आनंदाची खबर ? म्हणजे तू मजेत तर आहेस ना ? मी तूझ्यावरून कुरबान होऊन जातो. तुझी बिगार चाकरी मला प्रिय आहे. तुझे नाव उच्च आहे. हे मित्रा, हे प्रिय मित्रा काही खुशखबर आहे का ? मी तुझ्यावर माझा जीव समर्पित करतो. तुझी मी चाकरी करतो. तुझे नामही श्रेष्ठ आहे." तू कोठून आलास ? कोठे गेला होतास ? आता कुठे जात आहेस ? ही व्दारका नगरी आहे, म्हणून इथं खरं सांग. व्दारकानगरीत रासक्रीडाही तूच करतोस. तूच सर्वव्यापी आहेस.

तुझी पगडी सुंदर, तुझे बोलणे मधुर, ह्या व्दारकानगरीमध्ये कोठले आहेत मोगल ? देवा, जरी वेष व भाषा तुझी मोगली आहे तरी तू मोगल आहेस हे मला पटत नाही. तुझे स्वरूप सुंदर आहे. व्दारका नगरीतच नव्हे तर इस्लाम धर्माच्या मक्का-मदिना मध्ये सुध्दा तूच आहेस. तू माझा कृष्णासारखाच आहे.

तू हजारो भुवनांचा एकमात्र स्वामी आहेस. मी तुला ओळखले आहे. तू सावळा श्रीकृष्ण आहेस, व्दारकेचा राजा आहेस. लाखो भवनांचा तू एकमात्र स्वामी आहेस. मी ओळखले आहे की तूच तो श्यामलवर्णी श्रीकृष्ण आहेस. तूच तो अश्वपती, गजपती, नरांचा नरेंद्र, नाम्याचा स्वामी मुकुंद आहेस. संत नामदेवांच्या या पदात हिंदी पंजाबी भाषेचे शब्द आलेले आहेत. [१६३] संत नामदेव म्हणतात - तू सूर्य, तूच चंद्र, तूच ब्रम्हा आणि तूच माझा प्रभु सरदार मुकुंद मुक्तीदाता आहेस.

संत नामदेव वरील पदात सर्वधर्मसमभावाची भावना दिसून येते. संत नामदेव म्हणतात की, व्दारका नगरीतच नव्हे तर इस्लाम धर्माच्या मक्का-मदिना मध्ये सुध्दा तूच आहेस. यावरून सर्व वेगवेगळया धर्मांचे प्रमुख एकच असल्याचे संत नामदेव सांगतात. तू हजारो भुवनांचा एकमात्र स्वामी आहेस, असे वर्णन संत नामदेव करतात.[१६४] हे पद राग-तिलंग मध्ये आहे.

---

**पद क्र.२२**

**राग बिलावल**

१ ओ सतिगूर प्रसादि ||

सफल जनमु मो कउ गुर कीना ||

दुख बिसारी सुख अंतरि लीना || १ ||

गिआन अंजनु मो कउ गुरि दीना ||

राम नाम बिनु जीवनु मन हीना || १ || रहाउ ||

नामदेइ सिमरनु करि जानां ||

जग जीवन सिउ जीउ समानां || २ || २२ ||[१६५]

---

**पदाचा अर्थ :-** सदगुरूंनी माझ्या जन्माचे सार्थक केले, माझ्या दु:खाचा नाश करुन मला सुखमय केले. सदगुरूंनी माझे जीवन सफल केले, दु:ख नष्ट करून माझे जीवन सुखी केले.[१६६]

सद्‌गुरूने मला ज्ञान अंजन देऊन दिव्यदृष्टी दिली, मला कळून आले की, एक रामनाम जर नसले तर, जीवन म्हणजे निव्वळ शारीरिक कसरत, म्हणजे निव्वळ बिगारच आहे. त्यात मनाची उभारी नाही. सद्‌गुरूंनी माझ्या डोळ्यांत ज्ञानांजन घालून रामनामाशिवाय जीवन म्हणजे निव्वळ व्यर्थ, प्राणहीन, नीरस होय, ह्याचे ज्ञान दिले.

नामदेव म्हणतात - हरीचे स्मरण करून मला हे सर्व समजले व या सर्व समजण्याने माझा आत्मा परमात्म्याशी एकरूप झाला. रामनामाचे स्मरण करून नामदेवाने हे जाणले की ह्या जगात नामाशिवाय जीवन जगणे तुच्छ आहे, बेकार आहे, नामाशिवाय जीवन व्यर्थ आहे. नामदेवाने ईश्वराचे स्मरण करून त्या प्रभू परमात्म्यास जाणले आहे व त्याचे नामदेवाचे मन त्या परमात्म्यात लीन होऊन गेले आहे. संत नामदेव आता परमात्म्याशी एकरूप झाला आहे.[१६७]

संत नामदेव वरील पदांत सांगतात की - सद्‌गुरूच्या ज्ञानामुळेच मी पूर्णपणे बदललो आहे. सद्‌गुरूमुळे माझ्या दु:खाला पूर्णपणे विसरलो आहे. आणि त्यांनीच मला जीवन जगण्याचा अर्थ समजला आहे. आतापर्यंत माझे जीवन केवळ व्यर्थ होते. सद्‌गुरूंच्या नामस्मरणामुळे मला जीवनाचा अर्थ मिळाला आहे. हे पद राग-बिलावल मध्ये आहे.

---

**पद क्र.२३**

**रागु गोंड घरु १**

१ ओं सतिगुर प्रसादि ॥

असुमेध जगने ।

तुला पुरख दाने ।

प्राग इसनाने ॥ १ ॥

तउ, न पुजहि हरि कीरति नामा ।

अपुने रामहि भजु रे मन आलसीआ ॥ १ ॥ रहाउ ॥

गइआ पिंडु भरता ।

बनारसि असि बसता ।

मुखि बेद चतुर पड़ता ॥ २ ॥

सगल धरम अछिता ।

गुर गिआन इंद्रि द्रिड़ता ।

खटु करम सहित रहता ॥ ३ ॥

सिवा सकति संबादं ।

मन छोडि छोडि सगल भेदं ॥

सिमरि सिमरि गोबिंद ।

भजु नामा तरसि भव सिंध ॥ ४ ॥ २३ ॥[१६८]

---

**पदाचा अर्थ :-** कोणी मनुष्य जरी अश्वमेघ यज्ञ करेल, सुवर्णतुला करून ते दान करेल आणि प्रयाग इत्यादी तीर्थस्थानावर स्नान करेल तरीही हे सर्व कर्म प्रभुच्या स्तुतीप्रशंसेची, प्रभूनामाची बरोबरी करू शकत नाही, तरी हे माझ्या आळशी मना, आपल्या प्रिय प्रभूंचे स्मरण कर. तू अश्वमेध यज्ञ केलास, सुवर्णतुला करून ते वारवार दान केलेस, प्रयाग ला जाऊन गंगास्नान केलेस तरी हरीनामाची सर काही त्याला येणार नाही. संत नामदेव सांगतात की, मन हे आळशी आहे, त्या मनाला प्रभुरामाचे नामस्मरण करण्याचा सल्ला देतात.[१६९]

जरी कोणी मनुष्य गयेला जाऊन पित्रानिमित्त पिंड भरवेल, जरी तो काशीनजिक वाहणाऱ्या 'अस' नदीच्या काठी राहात असेल, जरी त्यास चारी वेद तोंडपाठ असतील, तरी मानव सर्व कर्मधर्म करत असेल, आपल्या गुरूकडून उपदेश घेऊन इंद्रियास काबूत ठेवत असेल, जरी तो ब्राम्हणासारखे सर्व सहा कर्म करत असेल तरी हे माझ्या मना, तू हे सर्व सोडून टाक. गयेला जाऊन पिंडदान केलेस, काशी क्षेत्रात जाऊन राहिलास, तोंडाने चारही वेदांचे पठण केलेस. धर्मपुस्तकांचे रामायणाचे इत्यांदीचे पठण, ती सर्व कर्मे सोडून टाक. ती सर्व प्रभूपासून दूर करणारी आहेत. हे नामदेव, गोविंद भजन कर, प्रभु नामस्मरण कर, नामस्मरण करुनच संसार पार होशील.[१७०] सगळी षटकर्मे केलीस, तरी हे सर्व निरर्थक आहे. हे मना ! शिव व शक्ती संवाद ह्या पोथीचे वाचन करणे त्यावर चर्चा करणे वा अन्य भेदाभेदांविषयी विचार करणे सोडून दे. नामदेव सांगतात, तू गोविंदाचे स्मरण कर. त्याचेच भजन कर. त्यानेच तू हा भवसागर तरून जाशील.[१७१]

वरील पदांत संत नामदेव महाराजांनी नामस्मरण व सद्गुरू यांचे महत्त्व अनन्यसाधारण असून आत्मिक सुखाची, आनंदाची बरोबरी कोणत्याच कर्मकांडातून मिळणार नाही. प्रयाग या ठिकाणी तीन नद्यांच्या पवित्र संगमावर स्नान, गयेला जावून पिंड दान, वेदाचे पठण, हे करून जवढे आत्मिक समाधान मिळते. त्यापेक्षा कित्येकपट अधिक आत्मिक, मिथ्याकांड सोडून दे फक्त प्रभूचे स्मरण, ध्यान, मनन, चिंतन कर त्यामूळे जीवनाचा भवसागर सहजतेने पार होईल, असे सांगीतले आहे.[१७२] हे पद राग-गौड मध्ये आहे.

---

**पद क्र.२४**

**रागु गोंड**

नाद भ्रमे जैसे मिरगाए ।

प्रान तजे वा को घिआनु न जाए ॥ १ ॥

ऐसे रामा ऐसे हेरउ ।

राम छोडि चित् अनत न फेरउ ॥ १ ॥ रहाउ ॥

जिउ मीना हेरै पसूआरा |

सोना गढते हिरै सुनारा || २ ||

जिउ बिखई हेरै पर नारी |

कउडा डारत हिरै जुआरी || ३ ||

जह जह देखउ, तह तह रामा ||

हरिके चरन नित घिआवै नामा || ४ || २४ ||[१७३]

---

**<u>पदाचा अर्थ</u> :-**मी आपल्या चित्तास प्रिय प्रभूचे स्मरणाशिवाय इतर कोणत्याही बाजूस जावू देत नाही, जसं हरीण स्वत:स विसरून नादा मागे धावतो, जीव देऊन टाकतो परंतु त्यास तो नाद विसरत नाही. तसाच मीही प्रभूकडे पहात असतो.[१७४] ज्याप्रमाणे आवाजाला विसरून हरिण त्या दिशेने प्राण जाईपर्यत धावत सुटतो. त्याप्रमाणे मी माझ्या मनास प्रभुनामाशिवाय अन्यत्र कोठेही भटकू शकत नाही. माझ्या मनात रामाशिवाय अन्य काहीही नाही.

जसा मासेमार माश्यांकडे पाहातो, जसे सोनं घडवताना सोनार सोन्याकडे लक्षपूर्वक पाहातो, जसे विकारी पुरूष परनारीकडे लक्षपुर्वक पाहातो, जसे जुगारी जुगारातील कवड्या टाकून त्यावर लक्षपूर्वक पाहतो, तसाच मी, नामदेवही, नित्य आपल्या प्रभूचे स्मरण करतो आणि जिकडे पाहतो तिकडे प्रभूच पाहतो.[१७५] माझे लक्ष त्या प्रभुरामावर केंद्रित असते. नामदेव म्हणतात, मी जिकडे जिकडे पाहतो तिकडे तिकडे मला माझा प्रभुरामच दिसतो. मी सदैव हरीच्या चरणाचे ध्यान करतो.[१७६]

या पदात संत नामदेव रामनामाशी किती एकरूप आहे हे विविध उदाहरणावरून सांगण्याचा प्रयत्न करतात. संत नामदेव सांगतात की - मी सर्वत्र रामालाच पाहतो, सतत प्रभूचरणी, हरिच्या चरणी माझे चित्त असते. हे पद राग-गौड मध्ये आहे

---

**<u>पद क्र.२५</u>**

**<u>रागु गोंड</u>**

मो कउ तारि ले रामा तारि ले |

मै अजानु जनु तरिबे न जानउ,

बाप बीठुला बाह दे || १ || रहाउ ||

नर ते सुर होइ जात निमख मै सतिगुर बुधी सिखलाई |

नर ते उपजि सुरग कउ जीतिओ सो अवखध मै पाई || १ ||

जहा जहा धूअ नारदु टेके नैकु टिकावहु मोहि |

तेरे नाम अविलंबि बहुतु जन उधरे नामे की निज मति एह || ४ || २५ ||[१७७]

---

**पदाचा अर्थ :-**हे माझ्या रामा, मला संसार समुद्रातून तारून ने, वाचव. हे माझ्या विठ्ठल बापा ! मला आपल्या हाताचा आधार दे, मी तुझा अज्ञान सेवक आहे, मला पोहता येत नाही. रामा, माझ्या सख्या ! मी अडाणी, मला हा भवसागर पोहता येत नाही रे. मला तारून ने. हे बाप! विठ्ठला, मला तुझ्या मदतीचा हात दे व ह्या भवसागरातून तारून ने.[१७८]

हे बाप विठ्ठला, मला ही गुरूभेट घडव, गुरू उपदेश कृपेने क्षणातच मानवातून देव होता येते, हे बाप्पा, कृपा कर, मलाही ते औषध प्राप्त व्हावे ज्याने मनुष्य जन्म घेऊन स्वर्गास जिंकले जावू शकते म्हणजे स्वर्गाचीही काळजी राहात नाही.[१७९] माझ्या सतगुरूंनी मला सांगितलंय की, रामकृपेने क्षणार्धात नराचा नारायण होतो. ज्या योगे मनुष्यास स्वर्गाची दारे खुली होतात ते नामरूपी औषध मला सतगुरू कृपेने प्राप्त झाले आहे.

हे माझ्या रामा, तू ज्या ज्या आत्मिक ठिकाणी ध्रुव आणि नारदांसारख्या भक्तांना पोचवलेस, मलाही कायमसाठी त्या ठिकाणी पोचव, मज नामदेवाचा दृढ निश्चय आहे की तुझ्या नामाचा अवलंब करून अनंत जीव संसार समुद्रातील विकारांपासून सुखरूप पार होतात. नामदेव म्हणतात - हे रामा ! तुझ्या केवळ नामस्मरणाने अनेक जीव हा भवसागर तरून गेले. हे प्रभु ! तु ध्रुवाला, नारदाला ज्या अमरपदाला नेऊन ठेवलेस त्याच अढळपदी मला नेऊन ठेव.

वरील पदात संत नामदेव म्हणतात की, हे ईश्वरा ! माझा उध्दार कर ! मला समजत नाही मी अज्ञानी आहे. संसाररूपी भवसागरात तरने मला कदापीही शक्य नाही. मी तुझ्या कृपेने वाचू शकेल. मला जन्म मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त कर. हे ज्या अवस्थेमध्ये आज ध्रुव व नारदाचे स्थान आहे. तसेच मलाही तुझ्या चरणी स्थिर व अढळ स्थान दे तुझ्या नामामुळे अनेक लोकांचा उध्दार झाला आहे. माझी अंत:करणातून हीच इच्छा आहे. हे पद राग-गौड मध्ये आहे.

---

**पद क्र. २६**

**रागु गोंड**

मोहि लागती तालाबेली |

बछरे बिनु गाइ अकेली || १ ||

पानीआ बिनु मीनु तलफै |

ऐसे राम नामा बिनु बापुरो नामा || १ || रहाउ ||

जैसे गाइ का बाछा छूटला |

थन चोखता माखनु घुटला || २ ||

नामदेउ नाराइनु पाइआ |

गुरू भेटत अलखु लखाइआ || ३ ||

जैसे बिरवै हेत पर नारी ||

ऐसे नामे प्रीति मुरारी || ४ ||

जैसे तापते निरमल घामा |

तैसे राम नामा बिनु बापुरो नामा || ५ || २६ ||[१८०]

---

**पदाचा अर्थ :-** वासरापासून विरहित होऊन जशी गाय घाबरते तशीच मला प्रभू विरहातून तडफड होते. वासरू दूर गेल्यावर जशी गाईच्या मनाची तगमग होते, तशी ईश्वरापासून ताटातूट झाल्यामुळे माझ्या जीवाची अवस्था होते आहे.

पाण्याविना जसा मासा तडफडतो तसा मी नामदेव प्रभु नामाविना घाबरतो. पाण्याबाहेर मासोळी जशी तडफडते त्याप्रमाणे हा गरीब, बापडा नामदेव रामनामाशिवाय व्याकूळ झाला आहे.[१८१] गायीचे वासरू जसे बांधलेल्या ठिकाणाहून सुटून गायीचे स्तन चोखते आणि गटागटा दूध पिते, तसाच जेव्हा नामदेवाला सद्‌गुरू भेटले, तेव्हा मला अलक्ष प्रभूची जाण झाली, मला प्रभु भेटले. खुंटाला बांधलेलं वासरू खुंटावरून सुटले तर ते लगेच गाईकडे धावत जाते, कासेत तोंड घालून सड चोखून सरसर दूध पिऊ लागते. त्याचप्रमाणे मी ह्या संसारबंधनातून सुटून केव्हा एकदा प्रभुनामाचे रसपान करतो असे मला झाले आहे.[१८२]

विकारी माणसास जशी परनारी प्रिय वाटते, तसेच नाम्यालाही प्रभु प्रिय वाटतो. प्रभुनामापासुन विरहित होऊन मी नामदेव असा घाबरतो जसे तापलेल्या ऊन्हात जीवांची लाही लाही होते. संत नामदेव सांगतात, सद्‌गुरूच्या कृपेने त्या अव्यक्त प्रभू परमात्म्याला मी पाहिले आहे. जसे परस्त्री पाहून, विषयासक्त माणसाला जीव तडफडतो, तसा नामदेवाचा जीव त्या मुरारीच्या प्राप्तीसाठी तडफडतो आहे. संत नामदेव म्हणतात- रणरणत्या उन्हाने जशी जीवाची अवस्था होते तशी रामनामाशिवाय हा बिचारा नामदेव तडफडतो आहे.

संत नामदेव वरील पदांत सांगतात - मी भगवंतापासून दूर राहूच शकत नाही. रामनामाशिवाय मला समाधान मिळत नाही. मी एक क्षणभरसुध्दा रामनामाशिवाय राहू शकत नाही. हे पद राग-गौड मध्ये आहे.

---

**पद क्र.२७**

**रागु गोंड घरु २**

१ ओं सतिगुर प्रसादि

हरि हरि करत मिटे सभि भरमा |

हरिको नामु लै ऊतम धरमा |

हरि हरि करत जाति कुल हरी |

सो हरि अंधुले की लाकरी || १ ||

हरए नमसते हरए नमह ।

हरि हरि करत नही दुखु जमह ॥ १ ॥ रहाउ ॥

हरि हरनाखस हरे परान ।

अजैमल कीओ बैकुंठहि थान ।

सुआ पड़ावत गनिका तरी ॥

सो हरि नैनहु की पूतरी ॥ २ ॥

हरि हरि करत पूतना तरी ।

बाल घातनी कपटहि भरी ।

सिमरन द्रौपद सुत उधरी ।

गऊतम सती सिला निसतरी ॥ ३ ॥

केसी कंस मथनु जिनि कीआ ।

जीअ दानु काली कउ दीआ ।

प्रणवै नामा ऐसो हरी ।

जासु जपत भै अपदा टरी ॥ ५ ॥ २७ ॥[१८३]

---

**पदाचा अर्थ :-**या पदाव्दारे संत नामदेव महाराज पुराण कथेचे वर्णन करतात, हरीचे नामस्मरणाचे महत्व सांगून दुष्ट लोकांचा सुध्दा भगवंतासोबत सहवास आल्याने कसा उध्दार होतो याचे दाखले दिले आहेत. त्या प्रभूस माझा नमस्कार आहे ज्याचे स्मरण करता यमाचे दु:ख राहात नाही. हरी हरी असे नामस्मरण केल्याने मनातील सर्व भ्रम, सर्व विकल्प दूर होतात. हरिनामासारखा उत्तम धर्म दुसरा कोणताही नाही. हरिनाम हाच श्रेष्ठ धर्म होय. हरिनाम जपाने जात कुल आदी उच्च-नीच भाव नष्ट होतात. सर्वत्र हरीच आहे, सारे समान आहेत हे कळते. म्हणून म्हणतो की, हरी ही आंधळ्याची काठी आहे. समाजाच्या एकात्मतेचा आधार आहे. अशा ह्या हरीला माझा नमस्कार असो. मी हरीला वंदन करतो. हरी हरी अशा नामजपाने मृत्यूचे भय नष्ट होते. हरी नामाचा उच्चार केल्यामुळे सर्व भ्रम भिती समाप्त होते. हरी या नामाचे स्मरण करणे हा उत्तम धर्म आहे. हरीचे नामस्मरण केल्याने लहान-मोठ्याचा झगडा समाप्त होतो. हरी स्मरण आंधळ्या माणसाच्या काठीप्रमाणे आहे.

हरिनाम स्मरण करता सर्व भटकंती नाश पावतात, हे बंधु, नामस्मरण कर. नामस्मरणच सर्वश्रेष्ठ धर्म आहे. नामस्मरण करता जात, कुळ यातील वाद दूर होऊन जातात. ते हरिनामच आंधळयांचा आधार काठी आहे.

प्रभूने हिरण्यकश्यपू राक्षसास मारले, अजामिळ पापीस वैकुंठात स्थान दिले. पोपटास हरिनाम पढवणारी कान्होपात्राही विकारांपासून दूर झाली, तोच प्रभु माझ्या डोळ्यांची बाहुली झाला आहे. तोच माझ

यासाठी सर्वस्व झाला आहे. हरीने हिरण्यकश्यपूचा ज्याने विष्णुभक्त प्रल्हादाला छळले, त्याचा वध केला. त्याला वैकुंठात स्थान दिले. ज्या गणिकेने आपल्या पाळलेल्या पोपटाला हरिनाम घेण्यास शिकविले, त्या गणिकेचा उध्दार केला. असा हा हरी, मला प्राणप्रिय आहे. माझ्या डोळ्यातील बाहुलीच आहे.[१८४] हरीने हिरण्यकश्यप नावाच्या राजाचा प्राण घेतला, परंतु त्याचा उध्दार सुध्दा केला.

बालहत्या करणारी कपटी पूतनादायीही तरली, जेव्हा तिने हरिनाम स्मरण केले, स्मरणकृपेने द्रौपदीची अब्रू वाचली आणि सती अहिल्येचाही उध्दार झाला. बालकृष्णाचे कपटाने प्राणहरण करण्यासाठी आलेल्या पुतना राक्षसीणीच्या तोंडून अंत:काळी हरीचे नाम आल्यामुळे तिचीही संसारसागरातून सुटका झाली. हरीला मारण्यासाठी पुतना नावाच्या राक्षसीनीने आपल्या स्तनांना विष लावले आणि ते स्तन श्रीकृष्णाच्या तोंडात दुध पिण्याकरीता दिले. श्रीकृष्णाने त्या पुतनेचे दुध प्राशन करताच ती मरण पावली. कृष्णाने तिला आई समजून तीचा उध्दार केला तिला स्वर्गात पाठविले. हरीच्या स्मरणाने द्रौपदीच्या अब्रूचे रक्षण झाले. श्रीकृष्णाचा जप केल्यामुळे ज्या द्रोपदीला भरलेल्या सभेत कौरव विवस्त्र करत होते तेथे हरीने तिचे रक्षण केले. गौतम ऋषीची पत्नी अहिल्या गौतमांच्या शापाने शिळा होऊन पडली होती. श्रीरामांच्या परदस्पर्शाने तिचा उध्दार झाला.[१८५]

त्या प्रभूनेच केशी आणि कंसाचा नाश केला होता, आणि काली नागास जीवदान दिले होते. कंस श्रीकृष्णास आपला वैरी मानत असे. श्रीकृष्णाने कंसाच्या केसाला पकडून त्याला ठार मारले. कालिया नावाचा साप यमुना नदीमध्ये बसून विष सोडत होता. जेणेकरून श्रीकृष्ण व त्याचे सवंगडी येऊन पाणी पिऊन मृत्यूमुखी पडतील अशा कालिया नावाच्या सापाला यमुना नदीमधून बाहेर काढून श्रीकृष्ण ने जीवनदान दिले.[१८६] नामदेव विनंती करीत आहेत - प्रभू असा कृपाळू आहे की त्याचे नामस्मरण करता सर्व भय आणि अडचणी पळून जातात. त्या हरीने केशी, कंस आदि दुष्ट राक्षसांचा संहार केला. पण कालिया शरण आल्याने त्यास जीवदान दिले. ज्या हरीचे स्मरण केल्याने जीवाची सर्व संकटे टळतात, अशा त्या हरीस नामदेव सदैव प्रणाम करतो, त्याचेच नामस्मरण करतो. ज्या श्रीकृष्णाच्या नामस्मरणाने जीवनातील भिती व संकटे दूर होतात. यमाची भीती पळून जाते. हे पद राग-गौड मध्ये आहे.

---

**पद क्र.२८**

**रागु गोंड**

भैरउ भूत सीतला धावै ।
खर बाहन उहु छार उडावै ॥ १ ॥
हउ तउ एक रमइआ लैहउ
आन देव बदलावनि दैहउ ॥ १ ॥ रहाउ ॥
सिव सिव करते जो नरु धिआवै ।
बरद चढे डउरु ढमकावै ॥ २ ॥

महा माई की पूजा करै ।
नर सै नारि होइ अउतरै ॥ ३ ॥
तू कहीअत ही आदि भवानी ।
मुकति की बरीआ कहा छपानी ॥ ४ ॥
गुरमति राम नाम कहु मीता ॥
प्रणवै नामा इउ कहै गीता ॥ ५ ॥ २८ ॥[१८७]

---

**पदाचा अर्थ :-** जो मनुष्य भैरवाकडे जातो म्हणजे भैरवाची आराधना करतो, तो जास्तीत जास्त भैरवासारखाच होऊन जातो. जो शितलादेवीची आराधना करतो, तो शितळा देवीसारखाच गाढवांची सवारी करतो. आणि धूळ उडवत राहातो. जो माणूस भैरव, भूत, शितलादेवी यांचा धावा करतो, तो पुढील जन्मी गाढव होऊन आपल्या खुरांनी धुळ उडवीत चालतो. [१८८]

हे पंडित, मी तर एक सुंदर रामनामच घेईन, तुमची इतर दैवते मी त्या नामाच्या मोबदल्यात देऊन टाकीन, म्हणजे प्रभूनामाची मोबदला तुमच्या कोणत्याही दैवतांची गरज नाही. मी मात्र इतर सर्व देवदेवतांच्या बदल्यात एकमेव रामाचा स्वीकार करतो.[१८९]

जो मनुष्य शिवनाम जप करतो तो जास्तीत जास्त शिवरूप होऊन शिव वाहन बैलावर बसून धूळ उडवीत स्वारी करतो. आणि डमरू वाजवतो. जो माणुस महामायेची पूजा करतो तो पुढील जन्मी स्त्रीदेह धारण करतो.

हे भवानी, तू सर्वांची आद्य म्हणवतेस परंतु, आपल्या भक्ताला मुक्ती देते वेळी तूही कोठे लपून राहतेस हे कळत नाही. मी नामदेव विनंती करतो - हे पंडित परमेश्वर, सद्‌गुरूंकडून उपदेश घेउन प्रभूनामाचा आधार घे, तुझे धर्मपुस्तक गीताही हेच सांगत आहे. हे भवानी माते, तू सर्व जगाची जननी, आदिमाता पण तुही आपल्या भक्तांना मुक्ती देताना का बरं लपून बसतेस ? संत नामदेव सांगतात - हे मित्रा ! अन्य सारी देवदैवते सोडून दे, गुरूपासून ज्ञान घेऊन त्याला शरण जाऊन रामनामाचा स्वीकार कर, अरे गीतेचाही हाच उपदेश आहे. [१९०]

संत नामदेव महाराज वरील पदात एकेश्वरवाद संकल्पनेचे समर्थन करतात. व ते सांगतात की मनुष्याला रामनाम जपण्याचा मार्ग जपण्याचा सल्ला देतात. अकाल पुरूषाचे नामस्मरण केल्याने जीवात्म्याला मुक्ती मिळते. नामदेव महाराज सर्वांना अशी विनंती करतात की गीतेमध्ये जो नामस्मरणाचा मार्ग सांगितला आहे व मनुष्याने त्याच मार्गाने चालले पाहिजे. [१९१] हे पद राग-गौड़ मध्ये आहे.

---

**पद क्र.२९**

**रागु बिलावल गोंड**

आजु नामे बीठल देखिला मूरख को समझाऊ रे ॥ १ ॥ रहाउ ॥

पांडे तुमरी गाइत्री लोधे का खेतु खाती थी ॥

लै करि ठेगा टगरी तोरी लांगत लांगत जाती थी ॥ १ ॥

पांडे तुमरा महादेउ धउले बलद चड़िआ आवत देखिआ था ॥

मोदी के घर खाणा पाका वा का लडका मारिआ था ॥ २ ॥

पांडे तुमरा रामचंद्रु सो भी आवतु देखिआ था ।

रावन सेती सरबर होई, घर की जोइ गवाई थी ॥ ३ ॥

हिंदु अंन्हा तुरकू काणा ।

दुहां ते गिआनी सिआणा ।

हिंदू पूंजै देहुरा मुसलमाणु मसीत ।

नामे सोई सेविआ जह देहुरा न मसीत ॥ ४ ॥ २९ ॥[१९२]

---

**पदाचा अर्थ :-**निरनिराळ्या देवदेवतांचे पूजन करणाऱ्या भक्तांना उद्देशून नामदेव म्हणतात की लोकांनो ! आज मी प्रत्यक्ष परमात्मा पाहिला आहे. हे मुर्खांनो, तुम्ही एवढे देव देव करूनही तुम्हास परमेश्वराचे दर्शन का होत नाही हे मी तुम्हाला सांगतो.[१९३] हे पंडीत, मी तर या जन्मीच प्रभुदर्शन घेतले आहे परंतु तू मुर्खच राहिला तुला दर्शन झाले नाही, ये मी तुझ्यासारख्या मुर्खास समजावतो की तुला दर्शन का झाले नाही.

पंडिता, तू गाईला पूज्य मानतोस. तिच्यात सर्व देव आहेत असे मानतोस. पण तीच तुझी गोमाता लोधाच्या शेतात घुसून पीक खाऊ लागली तेव्हा त्या लोधाने दांडके घेऊन तिची तंगडीच मोडली आणि ती लंगडी झाली. अरे जी स्वत:चे रक्षण करू शकली नाही ती तुझे काय रक्षण करणार.

हे पंडिता ! तुझा तो महादेव बैलावर बसून मोदीच्या घरी गेला. मोदीने त्याला भोजन दिले पण ते न आवडल्याने त्याने मोदीच्या मुलाला मारून टाकले. अशा क्रोधी देव तुला कशी मुक्ती देईल.

हे पंडिता ! तू रामाची उपासना करतोस, पण त्या रामचंद्राला रावणाने त्याची बायको पळवून नेली म्हणून त्याच्याशी युध्द करावे लागले, असा देव तुझे कसे रक्षण करणार ?

संत नामदेव सांगतात, मूर्तिपूजक हिंदू आंधळे आहेत. तर मूसलमान काणे आहेत. कारण हिंदू देवळात जाऊन मूर्तीची उपासना करतात तर मुसलमान मशिदीत जाऊन अल्लाची प्रार्थना करतात. ते हेच समजतात की, देव देवळात आहे, अल्ला मशिदीतच आहे. त्या दोहोंपेक्षा ज्ञानी माणूस चांगला कारण तो परमात्म्याचे सत्य स्वरूप जाणतो. अरे, तो प्रभू परमात्मा देवळात नाही, मशिदीत नाही. तो निर्गुण निराकार परमात्मा सर्वत्र आहे. तुमच्या अंतरात आहे. जो कोणत्याही मंदिरात व मशिदीत नाही. त्या निर्गुण निराकार परमेश्वरास नामदेवाने आपल्या अंतरातच पाहिला आहे व तो त्याचीच सेवा करतो.[१९४]

संत नामदेव महाराज हास्य रसाच्या माध्यमातून नामस्मरणापेक्षा देवी-देवतांना छोटे समजतात व म्हणतात की आज मी ईश्वराला पाहिले आहे. संत नामदेव असे म्हणतात की मी तर फक्त निर्गुण-निराकाराची साधना करतो. जो मंदिर किंवा मजिदीमध्ये नसतो. तर त्याचा वास प्रत्येक ठिकाणी असतो. तो सर्व ठिकाणी व्यापलेला आहे मी फक्त त्याचेच नामस्मरण करतो कारण तो इतरांपेक्षा मोठा आहे. हे पद राग-बिलावल गौड़ मध्ये आहे.

---

**पद क्र.३०**

**रागु रामकली**

१ ओ सतिगुर प्रसादि ॥ घर १

आनीले कागदु काटीले गूडी आकास मधे भरमीअले ।

पंच जना सिउ बात बतऊआ चीतु सु डोरी राखीअले ॥ १ ॥

मनु राम नामा बेधीअले ।

जैसे कनिक कला चितु मांडीअले ।

आनीले कुंभु भराईले ऊदक राज कुआरि पुरंदरीए ।

हसत विनोद बीचार करती है चीतु सु गागरि राखीअले ॥ २ ॥

मंदरू एकु दुआर दस जा के गऊ चरावन छाडीअले ।

पांच कोस पर गऊ चरावत चीतु सु बछरा राखिअले ॥ ३ ॥

कहत नामदेउ सुनहु त्रिलोचन बालकु पालन पउढीअले ॥

अंतरि बाहरि काज बिरुधी चीतु सु बारिक राखीअले ॥ ४ ॥ ३० ॥[१९५]

---

**पदाचा अर्थ :-**लहान मुलगा कागद कापून सुंदर पतंग बनवतो व आकाशात उडतो. पतंग आकाशात उडत असताना तो मुलगा आपल्या सवंगड्यांबरोबर गप्पागोष्टी करत असतो. पण त्याचे चित्त मात्र पतंगाकडे असते. पतंगाच्या दोरीतच असते.[१९६] जसे सोनार सोन्याचा अलंकार घडवीत असताना गिऱ्हाइकाशी, आल्या-गेल्याशी बोलत असतो पण त्याचे चित्त मात्र आपण घडवित असलेल्या दागिन्याकडेच सदैव असते. तसे माझे मन त्या प्रभूच्या नामात, रामनामात गुंगून गेलेले असते. मुली शहरातून आपले कुंभ पाण्याने भरून डोईवर ठेवतात आणि घरी जाताना मैत्रिणींशी हसत, गप्पा मारीत, विनोद करीत जात असतात, पण त्यांचे सारे लक्ष त्या कुंभातील जलाकडे असते. एक थेंबही सांडू देत नाहीत. एक गाईचा गोठा आहे. त्याला दहा दारांतून मोकाट सुटतात. दूर पाच कोस चरायला जातात. पण त्यांचे चित्त मात्र गोठ्यात असलेल्या आपल्या वासरांकडे गुंतलेले असते.[१९७] देह हे एक मंदिर आहे, त्यात प्रभू परमात्मा वास करत आहे. माणसाची दहाही इंद्रिये दैनंदिन व्यवहारासाठी दहाही दिशांना भटकत असतात पण जो खरा भक्त असतो तो सारे व्यवहार

करीत असतांनाही त्याचे सारे चित्त त्या हृदयमंदिरात असलेल्या प्रभू परमात्म्याकडेच सदैव लागलेले असते.[१९८] संत नामदेव त्रिलोचनला सांगतात- आणखी ऐक - घरातली माता सदैव कामासाठी आतबाहेर करीत असते पण तरीही तिचे चित्त मात्र सदैव पाळण्यात झोपलेल्या आपल्या बाळाकडे असते. तसे माझे मन सदैव रामनामात गुंग झालेले आहे.[१९९]

संत नामदेव महाराज त्रिलोचनास सांगतात की- मनुष्याने आपल्या हाता-पायाने जरी कार्य केले तरी मुखामध्ये त्याच्या नेहमी राम-राम असणे गरजेचे आहे.[२००] हे पद राग-रामकली मध्ये आहे.

---

**पद क्र.३१**

**रागु रामकली**

बेद पुरान सासत्र आनंता गीत कबित न गावउगो |

अखंड मंडल निरंकार महि अनहद बेनु बजावउगो || १ ||

बैरागी रामहि गावउगो | सबदि अतीत अनाहदि राता |

आकुल कै घरि जाउगो || १ || रहाउ ||

इडा पिंगुला अउरु सुखमना पउनै बंधि रहाउगी |

चंदु सूरजु दुइ सम करि राखउ ब्रहम जोति मिलि जाउगो || २ ||

तीरथ देखि न जल महि पैसउ जीअ जंत न सतावउगो ||

अठसठिं तीरथ गुरु दिखाए घट ही भीतरि न्हाउगो || ३ ||

पंच सहाई जन की सोभ भलो भलो न कहावउगो |

नामा कहै चितु हरि सिउ राता सुन्न समाधि समाउगो || ४ || ३१ ||[२०१]

---

**पदाचा अर्थ :-**सद्‌गुरूंच्या शब्दकृपेने मी वैराग्यमय विरक्त होऊन प्रभूगुण गात आहे, मी अविनाशी प्रभूच्या प्रेमरंगात रंगलो आहे, आणि सर्व कुळव्यापी प्रभूचरणी पोचलो आहे. मला वेदशास्त्र, पुराण इत्यादी आणि गीत - कवीता गाण्याची आवश्यकता नाही, कारण मी अविनाशी ठिकाण असणाऱ्या निरंकारात एकरूप होऊन अनाहत बासरी वाजवीत आहे. वेद, पुराणे, शास्त्रे, देवादिकांची स्तवन गीते मी गात नाही. कुठल्याही कर्मकांडात मी रस घेत नाही. अखंड मंडलाकार सृष्टीचा जो स्वामी त्या मायातीत निर्गुण-निराकार परब्रम्हाच्या अनाहत वेणुनादातच मी तल्लीन होऊन जातो.[२०२]

प्रभूच्या स्तुतिप्रशंसेने चंचल मनास रोखून धरून प्रभू चरणी टिकवलेले आहे, ह्याच माझ्या इडा, पिंगला, सुषुम्ना आहेत, मला प्राणायाम करण्याची आवश्यकता नाही कारण मी प्रभु ज्योतीत टिकून आहे. त्रिगुणाने लिप्त, शब्दांपासून दूर राहून अनाहत नादात तल्लीन होऊन सर्व भेदाभेदापलीकडे असलेल्या त्या परब्रम्हाशी एकरूप होऊन जातो. योग शास्त्रातील प्राणायाम, बंध आदिंच्या साहाय्याने इडा, पिंगळा, सुषुम्ना

या नाड्यांतून चैतन्य-शक्ती प्रभावित करण्यापेक्षा चंद्रनाडी, सुर्यनाडीस समान लेखुन त्या सर्वांपलीकडे असणाऱ्या त्या आत्मरूपी परब्रम्ह ज्योतीत मी विलीन होतो.

मी तीर्थस्थानाचे दर्शनही करत नाही, मी तिथल्या पाण्यात बुडी मारत नाही आणि मी त्या पाण्यात राहणाऱ्या जीवास भीतीही दाखवत नाही. मला तर माझ्या गुरूंनी माझ्या अंतरातच अडुसष्ट तीर्थे दाखवून दिली आहेत.[२०३] तीर्थस्थानी जाऊन तीर्थात स्नान करण्यात मला मुळीच रूची नाही. त्या पाण्यात डुबक्या मारून त्यात शांतपणे विहरणाऱ्या जीवजंतूंना निष्कारण त्रास देणे मला आवडत नाही.

संत नामदेव म्हणतात - कर्मकांड, तीर्थस्नान इत्यादींनी लोक जगात मान प्राप्त करू इच्छितात, परंतु मला त्या कर्मांच्या आधारे मित्र-परिवारात मान-सन्मान मिळविण्याची गरज नाही, मला कोणी चांगले म्हणावे त्याचीही मला गरज नाही. माझे चित्त प्रभुप्रेमात रंगून गेले आहे. मी तर सुन्न समाधीत टिकून राहिलो आहे. माझ्या गुरूकडून मी जाणले आहे की, सर्व अडुसष्ट तीर्थे आपल्या अंतरातच सामावलेली आहेत. त्या अंतरातील तीर्थातच मी स्नान करतो. संत नामदेव म्हणतात-नानाविध कर्मकांडात लिप्त राहून पंचविकारांनी वेढलेल्या जनसामान्यांकडून भलावण करून घेणे मला आवडत नाही. मला त्याची आवश्यकता नाही. त्यापेक्षा मी माझे चित्त हरिनामात लीन करून निर्विकल्प समाधीमध्ये स्थित राहिन. [२०४]

वरील पदांत संत नामदेव महाराज सांगतात-वेद, पुराण, किंवा योग मात्र यांनी दाखविलेल्या रस्त्यापेक्षा मी माझ्या गुरूंनी दाखविलेल्या रस्त्यानेच जाणे पसंद करेल. माझे मन रामनामात रमले आहे. मी त्यांच्या नाम समाधी मध्येच विलीन होऊन जातो. संत नामदेव महाराज सांगतात की- माझ्या समोर चंद्र आणि सूर्य सारखेच आहेत. मी तर ब्रम्हाच्या ज्योतीमध्ये मिसळून जाईल आणि हरिभक्त होईल. मी तीर्थावर जाऊन स्नान करणार नाही. माझ्या गुरूंनी माझ्या शरीरामध्येच तीर्थ दाखविले आहे.[२०५] हे पद राग-रामकली मध्ये आहे.

---

**<u>पद क्र.३२</u>**

**<u>रागु रामकली</u>**

माइ न होती बापु न होता करमु न होती काइआ ।

हम नहि होते तुम नहि होते कवनु कहां ते आइआ ॥ १ ॥

राम कोइ न किसही केरा ।

जैसे तरवरि पंखि बसेरा ॥ १ ॥ रहाउ ॥

चंदु न होता सुरू न होता पानी पवनु मिलाईआ ।

सासतु न होता बेदु न होता करमु कहां ते आइआ ॥ २ ॥

खेचर भूचर तुलसी माला गुर परसादी पाइआ ।

नामा प्रणवै परम ततु है ॥ सति गुर होइ लखाइआ ॥ ३ ॥ ३२ ॥[२०६]

---

**पदाचा अर्थ :-** हे प्रभु तुझ्याविना इतर कोणीही कोणाचा सहाय्यक नाही. कोणतेही कर्म या जीवास जन्म मरणात आणणारे नाही आणि कोणतेही कर्म किंवा प्राणायाम इत्यादी या जीवास फेऱ्यातून काढण्यास समर्थ नाही. जसे झाडांवर पक्ष्यांचा थवा असतो त्या प्रमाणे तू पाठवलेले जीव जेथे येतात आणि तू स्वत:स त्यांना आपल्याशी जुळवतोय. ज्या वेळी आई नव्हती, वडील नव्हते, हे मानवी शरीरही नव्हते, मी नव्हतो, तुम्ही नव्हतात, मग कोण, कोठून, कसे आले ? ही सृष्टी कशी निर्माण झाली ? हे प्रभुरामा, ह्या जगात कोणी कोणाचे नाही. जशी फुलपाखरं विश्रांती घेण्यासाठी थोडावेळ झाडावर बसतात आणि मग आकाशात उडून जातात त्याप्रमाणे हा सृष्टीचा पसारा आहे.

जर हा सर्व कर्मांचा खेळ असेल तर मग जेव्हा आईही नव्हती पिताही नव्हता, मनुष्य शरीरही नव्हते तर त्यांनी केलेले कर्म कोठून आले ? तेव्हा कोणीही जीव नव्हता, तेव्हा हे प्रभु, तुझ्याशिवाय इतर कोणत्या ठिकाणी कोणता जीव जन्मला असता ? माणसे ह्या जगात काही काळासाठी येतात आणि निघूनही जातात. या जगात कोणी कोणाचे नसते. जेव्हा चंद्रही नव्हता सूर्यही नव्हता, जेव्हा पाणी, पवन इत्यादी तत्वही अजून जन्मले नव्हते, जेव्हा कोणतेही वेद-शास्त्रही नव्हते तेव्हा हे प्रभु, कर्माचे अस्तित्व नव्हते. जेव्हा चंद्र, सुर्य नव्हता, जल-वायू सर्व काही प्रभू परमात्म्यातच लीन झालेले होते. जेव्हा कोणतीही शास्त्रे नव्हती, वेद नव्हते, काही नव्हते, तेव्हा हे प्रभु हे सर्व कर्मकांड कोठून आले ?

संत नामदेव म्हणतात, कोणी प्राणायाम करतो, कोणी तुळशीमाळ धारण करतो, परंतु मला माझ्या गुरूच्या कृपेने सर्व समजले आहे. गुरूस भेटून मला ही गोष्ट समजली आहे की खरा सहाय्यक तो सर्व उच्च प्रभु आहे जो जगाचा मूळ आहे, त्याने जग बनवले आणि तोच संसारसमुद्रातून पार करतो. खेचरी, भूचरी इत्यादी योग प्रकाराने होणारे ज्ञान, तुळशीमाळा घेऊन जप-तप केल्याने होणारे ज्ञान, सारे काही मला गुरूकृपेने प्राप्त झाले आहे. संत नामदेव म्हणतात, ते परमतत्व, साऱ्या सृष्टीचे मूळतत्व तो प्रणव ओंकार आहे. त्याच्या नामस्मरणानेच मुक्ती प्राप्त होते. हे ज्ञान सद्‌गुरूकडुनच समजते.[२०७]

संत नामदेव महाराज वरील पदात या पृथ्वीतळावर काहीच नव्हते, वेद आणि शास्त्र काहीच नव्हते तर कर्म कोठून आले ? प्राणाला वर खाली नेण्याचे साधन व तुळसींची माळ गुरूंच्या कृपेने मिळाली आहे. जो भाव साधनांव्दारे प्राप्त होतो तो भाव मला साधना न करता गुरू कृपेने प्राप्त झाला आहे. माझ्यावर गुरूकृपा झाली. ईश्वर परम तत्व आहे आणि या परमतत्त्वाची प्राप्ती मला फक्त गुरूमुळेच झाली.[२०८] हे पद राग-रामकली मध्ये आहे.

---

**पद क्र.३३**

**रागु रामकली घरु २**

बानारसी तपु करै उलटि तीरथ मरै अगनि दहै

काइआ कलपु कीजै ।

असुमेध जगु कीजै सोना गरभ दानु दीजै

राम नाम सरि तउ न पूजै ॥ १ ॥

छोडि छोडि रे पाखंडी मन कपटू न कीजै ॥

हरि का नामु नित नितहि लीजै ॥ १ ॥ रहाउ ॥

गंगा जउ गोदावरी जाईऐ कुंभि जउ केदार न्हाईऐ

गोमती सहस गऊ दानु कीजै ॥

कोटि जउ तीरथ करै तनु जउ हिवाले गारै

राम नाम सरि तऊ न पूजै ॥ २ ॥

असु दान गज दान सिहजा नारी भूमि दान

ऐसो दानु नित नितहि कीजै ॥

आतम जउ निरमाइलु कीजै आप बराबरी

कंचनु दीजै राम नाम सरि तऊ न पुजै ॥ ३ ॥

मनहि न कीजै रोसु जमहि न दीजै दोसु निरमल

निरबाण पदु चीन्हि लीजै ।

जसरथ राइ नंदु राजा मेरा रामचंदु प्रणवै नामा

ततु रसु अंम्रितु पीजै ॥ ४ ॥ ३३ ॥[२०९]

---

**पदाचा अर्थ :-**हे माझ्या पाखंडी मना, कपट करू नकोस, हे कपट सोड, सोड हे कपट. तू प्रभुनामाचे स्मरणच नित्य केले पाहिजे. हे माझ्या मना, जरी कोणी मनुष्य काशीला जाऊन उलट लटकवून तप करेल, तीर्थस्नानावर शरीर त्याग करेल, तीर्थस्नानावर शरीर त्याग करेल, जरी कोणी अश्वमेध यज्ञ करेल, किंवा सोने दान करेल. गुप्तदान करेल तरीही ही सर्व कामे प्रभूनामाची बरोबरी करू शकत नाहीत.[२१०] हे प्राण्या ! तू वाराणशी क्षेत्रात जाऊन स्वत:ला उलटे टांगून तपश्चर्या कर, तीर्थस्थानी मरण यावे म्हणून तेथे वास कर. स्वत:चा देह अग्नीत जाळून घे, कायाकल्प करून घे, अश्वमेध यज्ञ कर, गुप्तपणे सुवर्णदान कर, पण रामनामाची सर ह्या कशालाही नाही.

हे माझ्या मना, कुंभमेळ्यात गंगा किंवा गोदावरी तीर्थावर जावे, केदार तीर्थावर जावे, केदार तीर्थावर स्नान करावे किंवा गोमती नदीच्या काठी हजार गायी दान कराव्यात, हे मन, जर कोणी कोट्यावधी तीर्थयात्रा करेल, जर आपले शरीर हिमालय पर्वतात गाडून टाकेल, तरीही ही सर्वकामे प्रभुनामाची बरोबरी करू शकत नाहीत. हे मना ! हे सारे पाखंड सोडून दे. मनातले कपट काढून टाक आणि सदासर्वदा त्या हरिनामात निमग्न राहा. गंगाकाठी जा, गोदावरी काठी जा किंवा केदारनाथला कुंभमेळ्यात जाऊन तीर्थस्नान कर, गोमतीकाठी जाऊन हजार गायीचे दान कर, अरे, कोटी कोटी तीर्थांत स्नान कर किंवा शरीर हिमालयाच्या

बर्फात गाडून घे, कशाकशाचा काहीही उपयोग नाही. ह्यापैकी कोणतेही कृत्य रामनामाची बरोबरी करू शकत नाही.

हे माझ्या मना, जरी घोडे दान करावेत, हत्ती दान करावेत, शैय्यादान करावेत, नारी दान भूमी दान इत्यादी दान करावी, असे जरी दोन नित्य करत राहावे, जर स्वत:सही अर्पन करावे, जर सुवर्ण तुला करून दान करावे, तरीही हे मन, ही सर्व कामे प्रभुनामाची बरोबरी करू शकत नाहीत. अश्वदान कर, गजदान कर, नारीदान कर, शय्यादान कर, भूमिदान कर, सदासर्वदा अशी दाने कर, स्वत:चा जीव ओवाळून टाक, प्राणाचे निर्माल्य कर, सुवर्णतुला करून स्वत:च्या वजनाइतके दान कर, पण ह्या कशाचीही रामनामाची बरोबरी होऊच शकत नाही.[२११] हे जीव, जर नित्य अशीच कामे करत राहत असेल आणि नामस्मरण करत नसेल तर मनात तक्रार करू नकोस, यमास दोष देऊ नकोस की तो का आला आहे ? या गोष्टी यमापासून सुटका करून देणाऱ्या नाहीत. हे जीव, पवित्र, वासना रहित अवस्थेशी परिचय करून घे. नामदेव विनंती करतात-सर्व रसांचा मूळ रस नामामृतच प्राशन केले पाहिजे. हे नामामृतच मज नामदेवाचा राजा रामचंद्र आहे जो राजा दशरथाचा पुत्र आहे. हे मना ! एवढे सगळे केले तरी यमाचा फास काही चुकत नाही. म्हणून तू रागराग करू नकोस. तो त्याचे काम करीतच राहणार. अरे त्या निर्मल निर्वाणरूपी प्रभू परमात्म्याच्या पदचिन्हांचा आश्रय घे. प्रभूचे नाम हाच माझा दशरथ नंदन राम आहे, तोच नामदेवाचा प्रभू आहे. त्याला शरण जा आणि त्या प्रणव ओंकाररूपी मूळतत्त्वाचे रसामृत प्राशन कर.

संत नामदेव सांगतात-कोणतीही गोष्ट, वस्तू रामनामाची बरोबरी करूच शकत नाहीत.[२१२] हे मानवा तू मनामध्ये राग येऊ देऊ नकोस. आपल्या मनाला पवित्र कर, यमाला दोष देऊ नकोस. राजा दशरथाचे पुत्र श्रीरामचंद्र माझा ईश्वर आहे त्याचे नामस्मरण करून अमृत प्राषण कर तू त्या रामाचाच होशील आणि राम तुझाच होईल.[२१३] हे पद राग-रामकली मध्ये आहे.

---

**पद क्र.३४**

**रागु मालीगउड़ा**

१ ओं सतिगुर प्रसादि

धनि धनि ओ राम बेनु बाजै ।

मधुर मधुर धुनि अनहत गाजै ॥ १ ॥ रहाउ ॥

धनि धनि मेघा रोमावली ।

धनि धनि क्रिसन ओढै कांबली ॥ १ ॥

धनि धनि तू माता देवकी ॥

जिह ग्रिही रमइआ कवलापती ॥ २ ॥

धनि धनि बनखंड बिंद्राबना ।

जह खेलै स्त्री नाराइना ‖ ३ ‖

बेनु बजावै गोधनु चरै |

नामे का सुआमी आनद करै ‖ ४ ‖ ३४ ‖[२१४]

---

**पदाचा अर्थ :-**मी रामजींच्या वाजत असलेल्या बासरी वरून स्वत:ला ओवाळून टाकतो. मोठ्या गोड स्वरात एकरस निनादत आहे. मी ओवाळून टाकतो स्वत:ला त्या कांबळी वरून जी श्रीकृष्णांनी आपल्या खांद्यावर ओढलेली आहे. हे माय देवकी, मी तुझ्यावरूनही स्वत:ला ओवाळून टाकतो, ज्याच्या घरी सुंदर रामजी, कृष्णजी जन्म घेतला.[२१५] धन्य आहे वनातील तो भाग, ते वृंदावन, जेथे श्रीनारायण श्रीकृष्ण रूपात खेळतात. नामदेवांचा प्रभु कृष्णरूपात बासरी वाजवत आहे, गायी चारत आहे आणि आनंद रंग बनवित आहे. श्रीकृष्णाच्या बासरीवादनाने, सहवासाने अस्तित्वाने गोकुळ धन्य झाले. बासरीवर ताल धरणारे मेघाचे आवाज श्रीकृष्णाने अंगावर घेतलेली कांबळ, त्याची लेकरेही ईश्वराला अस्तित्वाने धन्य झाली.[२१६]

प्रभू परमात्म्याचे बासरीवादन ऐकून धन्य झाल्यासारखे वाटते. त्यातून निघणारा तो दिव्य अनाहत नाद मधुर मधुर वाटतो. ज्या लोकरीचे कांबळे श्रीकृष्णाने पांघरले आहे, ती लोकर धन्य होय. तो श्रीकृष्णही धन्य होय. माता देवकी महान आहे कारण माता देवकीच्या घरी विष्णूचा अवतार कृष्णाच्या रुपाने जन्म झ ाला. वृंदावन आणि ते अरण्य देखील धन्य झाले. कृष्णाचे खेळणे, गाई घेऊन मधून गोड बासरीवादन या सर्व गोष्टी करत माझा परमेश्वर सर्वांना आनंदी सुखी करत आहेत.[२१७] संत नामदेव भक्तांचे प्रतिपालन राम आणि कृष्ण यांच्या माध्यमातून प्रकट झालेल्या चमत्कारांचे वर्णन करतात आणि साधकास ईश्वर भक्तीसाठी प्रवृत्त करतात. हे पद राग-माली गउडा मध्ये आहे.

---

**पद क्र.३५**

**रागु मालीगऊड़ा**

मेरो बापु माधउ तू धनु केसौ सांवलीओ बीठुलाई ‖ १ ‖ रहाउ ‖

कर धरे चक्र बैकुंठ ते आए गज हसती के प्रान उधारीअले |

दुहसासन की सभा द्रोपती अंबर लेत उबारीअले ‖ १ ‖

गोतम नारी अहलिआ तारी पावन केतक तारीअले |

ऐसा अधमु अजाति नामदेउ तउ सरनागति आईअले ‖ २ ‖ ३५ ‖[२१८]

---

**पदाचा अर्थ :-** हे माझ्या बापा माधवा, हे केशवा, हे सावळया, हे विठ्ठला तू धन्य आहेस. हे माधवा, हत्तीच्या रुपात चक्र धारण करून तूच वैकुंठातून आला होतास आणि मगरीने पकडलेल्या हत्तीचे तूच रखण केले होतेस. हे माझ्या बापा, तारणहारा, माधवा, केशवा, सावळया विठ्ठला तू धन्य आहेस. त्या गजेंद्राला

संकटमुक्त करण्यासाठी तू हाती चक्र घेऊन वैकुंठाहून ह्या भूलोकी येऊन त्यास तारलेस. दु:शासन जेव्हा भर दरबारात द्रौपदीचे वस्त्रहरण करीत होता, तेव्हा तूच तिचे लज्जारक्षण केलेस. गौतमपत्नी अहिल्या जी शिळा होऊन पडली होती, तिचाही उध्दार केलास, आणखी कितीतरी पातक्यांना पावन करून त्यांचा उध्दार केलास. क्षुद्र, हीन-कुलीन असा हा नामदेव तुला शरण आला आहे. हे प्रभु ! माझे रक्षण कर, माझा उध्दार कर.

संत नामदेव वरील पदात सांगतात की परमेश्वराने घेतलेले सर्व अवतार हे भक्ताच्या रक्षणासाठी घेतलेले आहे. भक्ताचे रक्षण नानाविध प्रकारे कसे केले जाते यांचे देखील वेगवेगळे दाखले दिलेले आहेत. परमेश्वराला वेगवेगळ्या नावाने ओळखले जाते.[२१९] कौरवाच्या सभेमध्ये जेव्हा द्रौपदीचे वस्त्रहरण केले जात होते, तेव्हा द्रौपदीने नामस्मरण करून तुला स्मरले आणि क्षणातच तिला तू वस्त्र पुरविले. हे सावळ्या प्रभु, दु:शासनाच्या सभेत द्रौपदीचे वस्त्रहरण होताना तूच तिची अब्रु वाचवली होतीस. गौतम ऋषीच्या पत्नीला पावन, मुक्त व पवित्र केले. शिळेला झालेल्या तुझ्या पदस्पर्शाने ती मुक्त झाली. मी नामदेवही मोठा नीच आणि खालच्या जातीतला आहे. मी तुला शरण आलो आहे. मी खालच्या जातीचा नामदेव तुला शरण आलो. माझा उध्दार कर अशी विनम्र विनंती तो करतो.[२२०] हे पद राग-माली गउड़ा मध्ये आहे.

---

**पद क्र.३६**

**राग़ु मालीगउड़ा**

१ ओं सतिगुर प्रसादि

सभै घट रामु बोलै रामा बोलै ‖ राम बिना को बोलै रे ‖ १ ‖ रहाउ ‖

एकल माटी कुंजर चीटी भाजन है बहु नाना रे |

असथावर जंगम कीट पतंगम, घटि घटि रामु समाना रे ‖ १ ‖

एकल चिंता राखु अनंता अउर तजहु सभ आसा रे |

प्रणवै नामा भए निहकामा को ठाकूर को दासा रे ‖ २ ‖ ३६ ‖[२२१]

---

**पदाचा अर्थ :-** हे बंधू, सर्व घटकात प्राण्यांमध्ये म्हणजे शरीरात प्रभु बोलतो.[२२२] प्रभूविना इतर कोणीही बोलत नाही. या पदात संत नामदेव महाराज सांगतात की, ईश्वर हा चराचरात व्यापून उरलेला आहे त्याची उपासना करण्यासाठी एकरूप होणे गरजेचे आहे. रामाचे अस्तित्व सर्वव्यापी असून तो चराचरांत वसलेला आहे. मातीची वेगवेगळ्या प्रकारची भांडी तयार केली जातात. भांड्याचा आकार भिन्न असला तरी देखील सर्व एकाच मातीपासून तयार केलेली आहे. जड चेतन लहान मोठ्या सर्व जीवांमध्ये एकच राम वसलेला आहे. हे मनुश्य मना ! हे जीवा ! तू फक्त रामावर विश्वास ठेव. दुसरी सर्व आशा, वासना मिटवून टाक. निस्वार्थी ईश्वरात विलीन झाल्यावर मालक नोकर, दास, लहान मोठा असा भेदच शिल्लक राहत नाही.[२२३]

हे बंधु, जसे एकाच मातीतून विविध प्रकारची भांडी बनवली जातात, तसेच हत्तीपासून ते मुंगीपर्यंत, निर्जीव पदार्थ आणि जीव असणारे पदार्थ आणि जीव असणारे पदार्थ, कीटक, पतंग इत्यादी प्रत्येक घटकात प्रभू परमेश्वर सामावलेला आहे.[२२४] हे पद राग-मली मउडा मध्ये आहे.

---

**पद क्र.३७**

**रागु मारू**

१ ओं सतिगुर प्रसादि ॥

चारि मुकति चारै सिधि मिलि कै दुलह प्रभ की सरनि परिओ |

मुकति भइओ चउहूं जुग जानिओ जसू कीरति माथै छत्रु धरिओ ॥ १ ॥

राजा राम जपत को को न तरिओ |

गुर उपदेसि साध की संगति भगतु भगतु ताको नामु परिओ ॥ १ ॥ रहाउ ॥

संख चक्र माला तिलकु बिराजित देखि प्रतापु जमु डरिओ |

निरभऊ भए राम बल गरजित जनम मरन संताप हिरिओ ॥ २ ॥

अंबरीक कउ दीओ अभै पढु राजु भभीखन अधिक करिओ |

नउ निधि ठाकुरि दई सुदामै धूअ अटलु अजहु न टरिओ ॥ ३ ॥

भगत हेति मारिओ हरनाखस् नरसिंघ रुप होइ देह धरिओ |

नामा कहै भगति बसि केसव अजहूं बलि के दुआर खरो ॥ ४ ॥ ३७ ॥[२२५]

---

**पदाचा अर्थ :-**प्रकाशरुपी प्रभूचे नामस्मरण करून अनंत जीव तरले आहेत. ज्या कोणी माणसांनी आपल्या गुरूच्या उपदेशाप्रमाणे मार्गक्रमण करून साथसंगत केली, त्यांचे नाव भक्त पडले. जगात चार प्रकारची मुक्ती मानली गेली आहे. ह्या चारही मुक्ती अठरा सिध्दींबरोबर पति प्रभूच्या चरणी टिकून आहेत, जो मनुष्य त्या नामस्मरण करतो त्यास ही सर्व प्रकारची मुक्ती प्राप्त होते तो मनुष्य त्या प्रभुचे नामस्मरण करतो त्यास ही सर्व ठिकाणी कीर्ति होते, महिमा होतो, त्याच्या डोक्यावर छत्र झुलतात. जेव्हा भक्त, पती परमात्म्यास शरण जातो तेव्हा त्याला चारही मुक्ती चारही सिध्दी प्राप्त होतात.[२२६] तो मुक्त होऊन चारही युगात नामवंत होतो, यशवंत होतो, कीर्तिमंत होतो व त्याच्या माथ्यावर सदैव प्रभुकृपेने छत्र प्राप्त होते. त्याप्रभुरामाचा जप करणारे कोण म्हणून तरले नाहीत ? सारेच प्रभुनामाने हा भवसागर तरून गेले. जो गुरूच्या उपदेशाप्रमाणे आचरण करतो, साधुसंतांच्या संगतीत राहतो, तो भक्त म्हणून ओळखला जातो.[२२७]

प्रभूचे शंख, चक्र, माळा, तिलक इत्यादी प्रताप पाहून यमराजही घाबरून जातो. ज्यांनी त्या प्रभूचे प्रताप त्यांच्या अंतरी उफाळून येतात. त्यांचे जन्म-मरणाचे क्लेश नष्ट होतात. रामनामाचा आश्रय घेणारा सर्व भयांपासून मुक्त होतो. त्याच्या अंगी रामबळ येते व तो सर्व क्लेषापासून जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो.

अंबरीषने नामस्मरण केले, प्रभूने त्यास निर्भयतेची उच्च पदवी प्रदान केली आणि दुर्वासऋषी त्यास कोणतीही इजा पोहचवू शकला नाही. प्रभूने बिभीषणास राज्य देऊन मोठे बनवले, गरीब सुदाम्यास खजिने दिले, ध्रुवास अढळपद दिले जे आजपर्यंत कायम आहे. त्या प्रभू परमात्म्याने आपला भक्त राजा अंबरीष याला अभयपद दिले, बिभीषणाला राज्य देऊन त्यास रावणाहून मोठा केला. सुदाम्यास सर्व ऐश्वर्य प्रदान केले, तर ध्रुवबाळास अढळपद दिले.

भक्त प्रल्हादासाठी नरसिंहाचे रूप धारण करून हिरण्यकश्यूस ठार मारले. प्रभूने आपले भक्त प्रल्हादासाठी नरसिंग अवतार धारण केला आणि हिरण्यकश्यपूस मारले. नामदेव म्हणतात- प्रभु आपल्या भक्तांच्या अधिन आहे. पहा आजतागायत आपला भक्त राजा बळीच्या दारापुढे प्रभु उभा आहे.

नामस्मरण हे अप्रतिम भक्ती साधन आहे की त्यातून खऱ्या अर्थाने मुक्ती मिळते. रामाचे नाम घेणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा उध्दार झालेला आहे. गुरूचा उपदेश व सहवासाने तो मायेच्या भवसागरातून तरण्यास मदत करतो. नामस्मरणामुळे तो जन्म मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त होतो. संत नामदेव महाराज म्हणतात- नामस्मरणामुळे राजा अंबरीष ला जीवदान मिळाले, बिभिषनाला राज्य, सुदाम्याला धन, ध्रुवाला अढळपद मिळाले. भक्त प्रल्हादांचे रक्षण करण्यासाठी नरसिंहाचा अवतार धारण करून हिरण्यकश्यपला मारले. भक्तांच्या रक्षणासाठी प्रभू केशव हा बळीच्या दारात अजूनही उभा आहे. असे संत नामदेव सांगतात.

[२२८] हे पद राग-मारू मध्ये आहे.

---

**पद क्र.३८**

**रागु भैरव घरु १**

१ ओं सतिगुर प्रसादि ॥

रे जिहबा करउ सत खंड ।

जामि न उचरसि श्रीगोबिंद ॥ १ ॥

रंगी ले जिहबा हरि कै नाइ ।

सुरंग रंगीले हरि हरि धिआइ ॥ १ ॥ रहाउ ॥

मिथिआ जिहबा अवरें काम ।

निरबाण पदु इकु हरि को नामु ॥ २ ॥

असंख कोटि अन पुजा करी ।

एक न पुजसि नामै हरी ॥ ३ ॥

प्रणवै नामदेउ इहु करणा ।

अनंत रुप तेरे नाराइणा ॥ ४ ॥ ३८ ॥[२२९]

---

**<u>पदाचा अर्थ</u> :-**मी आपली जीभ प्रभू नामात रंगवली आहे, प्रभु नामस्करण न केल्यास तर मी तिचे शंभर सुंदर रंगात रंगवले आहे. जर तू श्रीगोविंदाचे नामोच्चण केले नाहीस तर तुझे तुकडे तुकडे करून टाकीन. तू तूझी जीभ हरीच्या रंगाने रंगवून टाक व हरीनामाने तुझे जीवन सुंदर कर. जीवनाचे सार्थक कर.

हे बंधु, आता कधीही जर माझी जीभ प्रभु नामस्मरण न करील तर मी तिचे शंभर तुकडे करीन आता नाम रंगात अशी रंगली आहे की ती कधीही नामस्मरण विसरणार नाही. इतर कार्यात गुंतलेली जीभ व्यर्थ आहे कारण प्रभूचे नामच वासनारहित अवस्था निर्माण करते. अन्य सर्व कर्मकांडे फोल आहेत. हरीचे नामच अखेर निर्वाणपद प्राप्त करून देईल.[२३०]

जर मी इतर असंख्य देवतांची पूजा करीन तरीही ते सर्व एकत्र येऊन सुध्दा प्रभुनामाची बरोबरी करू शकत नाहीत. जर तू त्या एकमात्र हरीची पूजा न करता अन्य कोटी कोटी देवतांची नानाप्रकारे पूजाअर्चा केलीस तरी ती व्यर्थ आहे.

नामदेव विनंती करतात की, प्रभू तुझी अनंत रूपे आहेत, प्रभू तुझे गुणगान करणे, हेच काम माझे आहे. हे मानवा तू सदैव म्हण, हे प्रभू नारायणा ! तुझी रूपे अनंत आहेत. मी सदैव तुझे नामोच्चरण करीत राहीन. आणि प्रभू तुझे अनंत रूपे आहेत.

संत नामदेव वरील पदात प्रभू नामस्मरणाला महत्त्व देतात. नामस्मरण करण्यासाठी जिभेवर ताबा मिळविला पाहिजे. नामस्मरण जर तू केले नाही तर मी तूझे तुकडे तुकडे करेल असा दम देतात. हरीच्या रंगात रंगून जा हरिचा रंग खूप सुंदर असल्याने तू जप करत रहा. हरी जपाने मोक्षाची प्राप्ती होते. संत नामदेव सांगतात की, माझ्या जिभेवर तुझे एकच नामस्मरण करण्याचे काम आहे.[२३१] हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**<u>पद क्र.३९</u>**

**<u>रागु भैरउ</u>**

परधन परदारा परहरी ।<br>
ता कै निकटि बसै नरहरी ॥ १ ॥<br>
जो न भजंते नाराइणा ।<br>
तिन का मै न करउ दरसना ॥ १ ॥ रहाउ ॥<br>
जिन कै भीतरि है अंतरा ।<br>
जैसै पसु तैसे ओइ नरा ॥ २ ॥<br>
प्रणवति नामदेउ नाकहि बिना ।<br>
ना सोहै बतीस लखना ॥ ३ ॥ ३९ ॥[२३२]

---

**पदाचा अर्थ** :-जी माणसे प्रभूचे भजन करीत नाहीत, मी त्यांचे दर्शन करीत नाही, म्हणजे मी त्यांच्याशी काही एक संबंध ठेवत नाही. संत नामदेव म्हणतात की, सर्व विषयवासनांचा त्याग करून फक्त नामस्मरनच खरे ठरू शकते असा विश्वास भक्तांना देतात.

नारायणाचे भजन करून ज्या माणसाने परधन आणि परनारीचा त्याग केला आहे, प्रभु अशा माणसाच्या अंग-संग असतो, सोबत असतो. मनुष्याने परधनापासून अलिप्त राहावयास हवे. परस्त्री वासनेपासून दूर होत वाईट गोष्टीचा त्याग करतो तोच खरा पुरूष होय. ज्या माणसांच्या अंतरी प्रभूपासून अंतर आहे ती माणसे पशु समानच आहेत. नामदेव विनंती करतात-माणसात सौंदर्यात जरी सर्व बत्तीसच्या बत्तीस लक्षणे असली, परंतु जर त्यास नाकच नसेल तर तो सुदंर दिसत नाही. इतर सर्व गुण असेच आहेत धन इत्यादी असूनही जर मनुष्य नामस्मरण करत नाही तर तो कोणत्याही कामाचा नाही.[२३३] नामस्मरण केले नाही तर मनुष्य जीवन व्यर्थ ठरते. मुक्तीचा एकच मार्ग ठरू शकतो तो म्हणजे फक्त नामस्मरण होय. हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४०**

**रागु भैरउ**

दूधु कटोरै गडवै पानी ।
कपल गाइ नामै दुहि आनी ॥ १ ॥
दुधू पीउ गोबिंदे राइ ।
दुधू पीउ मेरो मनु पती आइ ।
नाही त घर को बापु रिसाइ ॥ १ ॥ रहाउ ॥
सोइन कटोरी अम्रित भरी ।
लै नामै हरि आगै धरी ॥ २ ॥
एकु भगतु मेरे हिरदे बसै ।
नामे देखि नराइनु हसै ॥ ३ ॥
दुधू पीआइ भगतु घरि गइआ ॥
नामे हरि का दरसनु भइआ ॥ ४ ॥ ४० ॥[२३४]

---

**पदाचा अर्थ** :-हे प्रकाशरूप गोविंदा, दुध प्या, जेणेकरून माझ्या मनास शांती मिळेल. हे गोविंदा जर तू दूध प्यायले नाहीस तर माझा आत्मा दु:खी होईल. हे गोविंदराया, तुझ्या सेवक नाम्याने कपिल गायीची धार काढून आणली आहे, दूध भांड्यात पाणी ठेवले आहे आणि कटोऱ्यात दूध ठेवले आहे.[२३५] संत नामदेवांनी बालपणीचा प्रसंग विशद केला आहे. संत नामदेवाचे वडील दामासेठी कापड विकण्यासाठी बाहेरगावी गेले

होते. नियमितपणे नैवेद्य दाखविण्यासाठी परंपरा घरात अनेक वर्षापासून चालत होती. ती परंपरा खंडीत पडू नये यासाठी आईने बाल नामदेवाला सोन्याच्या वाटीत दुध देवून पाठविण्यात आले.

नामअमृताने भरलेली पवित्र हृदयरूपी कटोरी नाम्याने आपल्या हरीपुढे ठेवली, म्हणजे प्रभु नामस्मरणाने निर्मळ झालेले हृदय नामदेवानी आपल्या प्रभूपुढे उघडून ठेवून दिले. नामदेव आंतरिक भावनेने प्रभूपुढे प्रार्थना करतो आणि म्हणतो, हे प्रभु मी आणलेले दुध प्राशन कर.

नाम्यास पाहून प्रभु प्रसन्न होतो आणि म्हणतो, माझा अनन्य भक्त माझ्या हृदयात नित्य राहतो. गोविंदरायास दूध पाजून भक्त नामदेव स्वयं स्वरूपात टिकला, आणि त्या स्वयं स्वरूपात मज नाम्यास प्रभूचे दर्शन झाले. नामदेवाचा प्रभूस दुध प्राशन करण्याचा आग्रह व नामदेवाचा बाल हट्ट, भोळा भाव पाहून परमेश्वराला हसू तसेच आनंद होत होता. बाल नामदेवाकडून दुध प्राशन केले. हरीचे दर्शन देत ईश्वरालाही एकनिष्ठ, नि:स्वार्थी भक्त आवडतात. अशा रीतीने नामदेवास हरीचे दर्शन झाले.[२३६] हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४१**

मै बउरी मेरा रामु भतारू |<br>
रचि रचि ता कउ करउ सिंगारू || १ ||<br>
भले निंदउ भले निंदउ भले निंदउ लोगु |<br>
तनु मनु राम पिआरे जोगू || १ || रहाउ ||<br>
बादु बिबादु काहु सिउ न कीजै |<br>
रसना राम रसाइनु पीजै || २ ||<br>
अब जीअ जानि ऐसी बनि आइ |<br>
मिलउ गुपाल नीसानु बजाई || ३ ||<br>
उसतति निंदा करै नरू कोई |<br>
नामे श्रीरंगु भेटल सोई || ४ || ४१ ||[२३७]

---

**पदाचा अर्थ** :-संत नामदेव सांगतात की, आपले ईश्वराशी नाते पती पत्नीचे आहे. माझं तन आणि मन माझ या प्रभूकरीता आता उरले आहे. आता जगाने मला वाईट म्हणावे मला आता निंदा करणाऱ्यांची पर्वा नाही, निंदा ऐकून मी आता दु:खी होत नाही.

मी आपल्या प्रभूपतीची नार बनले आहे, प्रभु माझा पती आहे आणि मी त्याच्यासाठी वेडी आहे. त्यास भेटण्यासाठी मी भक्ती आणि चांगल्या गुणांचे सुंदर सुंदर शृंगार करीत आहे. तो प्रभुराम माझा पती आहे, त्याच्या दर्शनासाठी, त्याच्या मिलन व्हावे म्हणुन मी वेडीपिशी झाले आहे. त्याच्यासाठीच मी नानापरीने शृंगार केला आहे. कोणी भले निंदा करो, त्याच्याशी वाद घालण्याची मला गरज नाही. जिभेने प्रभुनामाचे

श्रेष्ठ अमृतपान केले पाहिजे. लोकांनी माझी निंदा करावी, मला नाव ठेवावे याची मला पर्वा नाही. माझे मन सारे सारे काही मी माझ्या प्रियतम रामास सर्मपित केले आहे. माझे मन आता त्याच्याशी एकरूप झाले आहे. प्रभूंशी परिचय होऊन आता माझ्या ह्दयांतरी अशी अवस्था बनली आहे की मी लोकांच्या निंदेकडून बेफिकीर होऊन आपल्या प्रभूस भेटत आहे. आता मी कशाला कोणाशी वादविवाद करत बसू ? वाद घालायला माझ्या जिभेला आता वेळ कुठे आहे ? माझी जीभ अथवा वाचा रामनामात अमृतपान करण्यात रंगून गेली आहे.

कोणी मला चांगले म्हणावे अथवा वाईट म्हणावे आता या गोष्टींची मला पर्वा राहिली नाही, मला नामदेवाला लक्ष्मीपती भेटला आहे. आता कोणी निंदो, कोणी वंदो मला उघडपणे ढोल ताशे वाजवित माझ्या प्रियतम गोपालास भेटण्यास जात आहे. मला नामदेवाला तो श्रीरंग प्रत्यक्ष भेटला आहे. माझ्या जीवनाचे सार्थक झाले आहे.

संत नामदेव महाराज सांगतात की, आपले ईश्वराशी नाते पती पत्नीचे आहे. जीव स्त्री आहे तर पुरूष ब्रम्हा आहे. एखाद्याने माझी निंदा किंवा स्तुती केली तरी चालेल मला तर माझा प्रियकर, प्रभु, लक्ष्मीपती, परमेश्वर भेटला आहे, हे जगाला मी ओरडून सांगायला तयार आहे, असे भावरूपी विचार सांगायला मी तयारच आहे.[२३८] हे पद राग-भैरव मध्ये आहे.

संत नामदेव महाराज वरील पदात सांगतात की, “मै बउरी मेरा रामु भतारू | रचि रचि ता कउ करउ सिंगारू ||”[२३९] गुरू अमरदास सांगतात की, “मै कामणि मेरा कंतु करतारु ।। जेहा कराए तेहा करी सीगारु ।।”[२४०]

वरील पदामध्ये संत नामदेव व गुरू अमरदास यांच्या विचाराची समानता दिसून येते. संत नामदेव म्हणतात की, लोकांच्या निंदा स्तुति ची मला काळजी नाही. तर गुरू अमरदास म्हणतात की, निंदा स्तुति याची काळजी यामुळे नाही की मला सर्व काही प्रभु परमेश्वरात दिसत आहे. या वरील दोन्ही पदे श्री गुरूग्रंथसाहिब या धर्मग्रंथात आहेत.[२४]

---

**पद क्र.४२**

**रागु भैरउ**

कबहू खीरि खाड घीउ न भावै ||

कबहू घर घर टूक मगावै ||

कबहू कूरनु चने बिनावै || १ ||

जिउ रामु राखै तिउ रहिऐ रे भाई |

हरि की महिमा किछु कथनु न जाई || १ || रहाउ ||

कबहु तुरे तुरंग नचावै |

कबहु पाइ पनहीओ न पावै || २ ||

कबहू खाट सुपेदी सुवावै |

कबहू भूमि पैआरू न पावै || ३ ||

भनति नामदेउ इकु नामु निसतारै |

जिह गुरू मिलै तिह पारि उतारै || ४ || ४२ ||[२४२]

---

**पदाचा अर्थ** :-ह्या जगात काय काय गमती आहेत पाहा-एखाद्यास कधी कधी सुग्रास भोजन (खीर, साखर, तूप) मिळत असूनही आवडत नाही, तर कधी कधी माणसाला भीक मागून मिळणाऱ्या शिळ्यापाळ्या भाकर तुकड्यावर गुजराण करावी लागते, तर कधी कधी उकिरडा फुंकून चणे वेचण्याची त्याच्यावर पाळी येते.[२४३] हे प्रभु ज्या अवस्थेत आम्हास ठेवतो त्याच अवस्थेत राहिले पाहिजे. श्रीमंतीचा गर्व आणि गरीबाचे घाबरणे यापासून निर्लेप राहिले पाहिजे. आता मी कशाला कोणाशी वादविवाद करत बसू ? वाद घालायला माझ्या जिभेला आता वेळ कुठे आहे ? प्रभु किती मोठा आहे ते सांगता येत नाही, आमच्या सुख-दु:खाचे रहस्य तोच जाणतो.[२४४]

कधी कोणी मनुष्य इतका श्रीमंत असतो की तो सुंदर घोडे नाचवतो म्हणजे त्याच्याकडे असे घोडे आहेत जे चालताना जणू नाचत असतात, पदरी सुंदर तेज घोडे बाळगून सदैव त्यावर स्वार होऊन हिंडतो. एखादा इतका गरीब असतो, तर कधी त्यास पायात घालण्यासाठी जोडेही मिळत नाहीत. कधी तो प्रभु कोणा माणसास पांढरा शुभ्र बिछाना असणाऱ्या पलंगावर निजवतो तर कधी त्यास खाली अंथरण्यासाठी काहीच नसते. तो प्रभु परमात्मा कोणाला इतके ऐश्वर्य देतो की, तो सदैव पराच्या गादीवर लोळतो. तर कोणी इतका दुर्भागी असतो की, त्याच्याजवळ झोपायला हातभर जागाही नसते.[२४५]

नामदेव म्हणतात, एक प्रभु नामच आहे जे या दोन्ही अवस्थेतून पार नेऊ शकते, ज्या माणसास गुरू भेटतो त्यास प्रभु श्रीमंतीचा गर्व आणि गरीबीच्या घबराटीपासून पार उतरवतो. प्रभुनामच सर्व परिस्थितीतून तारून नेते. जो प्रभूस शरण जातो त्यास तो प्रभू परमात्मा भवसागर पार करून नेतो. संत नामदेव सांगतात की, परमेश्वराने ज्या स्थितीने ठेवले तसेच जगावे. नामस्मरणाच्या शक्तीने मनुष्य निरपेक्ष बनतो. ईश्वराला प्रसन्न करण्यासाठी नामस्मरणाशिवाय दुसरी उपासना पध्दत होऊच शकत नाही. हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४३**

**रागु भैरउ**

हसत खेलत तेरे देहुरे आइआ |

भगति करत नामा पकड़ि उठाइआ || १ ||

हीनडी जाति मेरी जादिम राइआ |

छीपे के जनमि काहे कउ आइआ || १ || रहाउ ||

लै कमली चलिओ पलटाइ |

देहुरै पाछै बैठा जाइ || २ ||

जिउ जिउ नामा हरि गुण उचरै ||

भगत जनां कउ देहुरा फिरै || ३ || ४३ ||[२४६]

---

**पदाचा अर्थ :-** हे प्रभु, शिंप्याच्या घरी का जन्माला आलो ? लोक माझी जात अत्यंत खालची आहे असे म्हणतात. मी तर हसत-खेळत तुझ्या मंदिरात आलो होतो परंतु लोक मला खालच्या जातीचा समजतात, त्यामुळे मला नाम्यास त्यांनी भक्ती करताना पकडून मंदिरातून उठवले.[२४७] आनंदाने हसत खेळत तुझी भक्ती करण्याकरीता तुझ्या देवळात येऊन बसलो. पण काय रे दैवा ! लोकांनी मला उठवून बाहेर हाकलून दिले, कारण काय ? तर मी हीन कुळात जन्मलो म्हणून. हे माझ्या यादवराया परमेश्वरा ! हीन जातीत म्हणजेच शिंप्याच्या घरी तू मला का बरे जन्माला घातलेस.[२४८]

मी आपली कांबळी घेऊन तेथून निघून चालू लागलो आणि हे प्रभू, तुझ्या मंदिराच्या पाठीमागे येऊन बसलो. हरी परमेश्वरा मी तुझ्या किर्तनात नामस्मरणात मी गुंतून गेलो, तल्लीन झालो. परंतु हे प्रभू आश्चर्य घडले. जो जो नामा आपल्या प्रभूचे गुणगान करतो तो तो त्याचे मंदिर भक्तासाठी, त्याच्या सेवकासाठी फिरत आहे. म्हणजे देवाने नामदेवांकडे तोंड केले. संत नामदेवांच्या किर्तनाच्या दिशेने मंदीर फिरले. मी तुझ्या मंदिरामध्ये येऊन पूजा करू शकत नाही. मंदिराच्या मागील बाजूस जाऊन भजन, प्रभुचे नामस्मरण व गुणगान गायला सुरूवात केली. ईश्वराने नामदेवानी श्रध्दा, भाव व भक्ती पाहून आपल्या मंदिराचे तोंड फिरविले. ईश्वर भक्तांच्या पाठीशी आहे. तो त्यांची लाज, मान राखण्यासाठी सदैव तत्पर असतो. पूर्वीच्या काळी समाजातील उपेक्षित तथा खालच्या जातीच्या लोकांना प्रवेश दिला जात नव्हता. नागनाथ मंदिराच्या पुजाऱ्यांनी नामदेवाला प्रवेश नाकारल्याने ते मंदिराच्या मागील भागाकडे जावून कीर्तन नामस्मरण करून मंदिराचा गाभारा फिरविला. हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४४**

**रागु भैरउ घरू २**

१ ओं सतिगुर प्रसादि ||

जैसी भूखे प्रीति अनाज |

त्रिखावंत जल सेती काज |

जैसी मूड कुटुंब पराइण |

ऐसी नाम प्रीति नाराइण || १ ||

नामे प्रीति नाराइण लागी |

सहज सुभाइ भइओ बैरागी ॥ १ ॥ रहाउ ॥

जैसी पर पुरखा रत नारी |

लोभी नरू धन का हितकारी |

कामी पुरख कामनी पिआरी |

ऐसी नामे प्रीति मुरारी ॥ २ ॥

साई प्रीति जि आपे लाए |

गुर परसादी दुबिधा जाए |

कबहु न तूटसि रहिआ समाइ |

नामे चितु लाइआ सचि नाइ ॥ ३ ॥

जैसी प्रीति बारिक अरू माता |

ऐसा हरि सेती मनु राता |

प्रणवै नामदेउ लागी प्रीति ॥

गोबिंदु बसै हमारै चीति ॥ ४ ॥ ४४ ॥[२४९]

---

**पदाचा अर्थ :-**मज नामदेवांनी प्रिती प्रभूशी जुळली आहे, या प्रितीकृपेनेच मी कोणतेही इतर विशेष प्रयत्न केल्याविनाच विरक्त बनलो आहे. जसे भुकेल्या माणसाला अन्न प्रिय वाटते, जसे तहानलेल्यास पाण्याची गरज भासते, जसे कोणी मूर्ख मनुष्य आपल्या परिवाराच्या आधारे राहातो, तसे मज नाम्याने प्रभूशी प्रेम जुळले आहे. एखादा भुकेला माणूस जसा अन्नासाठी आसुसलेला असतो, तहानलेला माणुस पाण्यासाठी व्याकूळ होतो, जसा मूर्ख माणूस आपल्या प्रपंचात गुंतून पडतो तशी माझ्या मनात नारायणाबद्दल प्रीती वसलेली आहे. नामदेवाच्या मनात नारायणाबद्दल प्रीती उत्पन्न झाली आणि अगदी सहजपणे, स्वाभाविकपणे तो विरक्त झ ाला.

जसं कोणी स्त्री परपुरुषाच्या प्रेमात पडते, जसं कोणा लोभी माणसास धन प्रिय वाटते, जसं कोणा विकारी माणसास स्त्री आवडते, तसेच नाम्यास प्रभु गोड वाटतो. ज्याप्रमाणे एखादी वाईट स्त्री पर पुरूषाशी रत होते, लोभी माणूस धनाचा लालची असतो, कामवासनेने उन्मत्त झालेला माणूस कामिनीची आसक्त धरतो, तसा नामदेव त्या मुरारीच्या प्रेमाने व्याकूळ झाला आहे. हे प्रभू, तूच मला खरी प्रीती कशी असते ते शिकवलस. आता सतगुरू प्रसादाने माझ्या मनातील द्वंद्व नष्ट झाले. आता मी परमेश्वराशी पूर्णपणे एकरूप झालो आहे. त्याच्यात आणि माझ्यात अतूट नाते निर्माण झाले आहे. आता ह्या नामदेवाचे चित्तही त्या सत नामात विलीन झाले आहे.[२५०]

परंतु खरे पवित्र प्रेम तेच आहे जे प्रभु स्वत: कोणा माणसाच्या हृदयात उत्पन्न करेल. गुरूकृपेने त्या माणसातील माझे-तुझे याची भावना संपून जाते. त्याचे प्रभूशी जुळलेले प्रेम कधीही तुटत नाही. तो नित्य

प्रभूचरणीत जुळून राहतो. मज नामदेवावरही प्रभूची कृपा झाली आहे. आणि नाम्याचे चित्त नित्य कायम राहाणाऱ्या हरिनामात टिकले आहे.

जसं आई-मुलाचे प्रेम असते, तसंच माझे मन प्रभुचरणी रंगून गेले आहे. नामदेव विनंती करतात प्रभूशी माझी प्रिती जुळली आहे, प्रभु आता नित्य माझ्या ह्दयात निवास करतो. प्रभू परमात्म्यात आणि माझ यात अतूट प्रेम निर्माण झाले आहे. आता तो सदैव माझ्या ह्दयात वास करतो.

संत नामदेव म्हणतात-संसाराच्या सर्व प्रिय गोष्टींच्या माध्यमातून ईश्वर प्रिय गोष्टींच्या माध्यमातून ईश्वर प्रियतेचे महत्व सांगतात. ज्याप्रमाणे भुक लागलेल्या मनुष्याचे अन्नाकडे लक्ष असते, तहानलेल्या माणसाचे लक्ष पाण्याकडे, स्त्रीचे संसाराकडे लक्ष या बाबी सर्वमान्य आहे, परंतु संत नामदेव आसक्ती प्रभु नामाकडे असते. विषय लोलुप स्त्री परपुरूषाच्या सहवासाला, स्वार्थी माणूस धनाची लालसा आसक्ती करतो. नामदेवाला मुरारी, कृष्णाची ओढ आहे. चिंता, वासना, दुविधा नामस्मरणातून नष्ट होतात. ज्याप्रमाणे आई व बाळाचां प्रेम निरागस असते तसेच ईश्वराप्रती असावे. संत नामदेव म्हणतात-माझ्या ह्दयातच ईश्वर आरूढ झालेला आहे.[२५१] हे पद राग-भैरव मध्ये आहे.

---

**पद क्र.४५**

**रागु भैरउ**

घर की नारि तिआगै अंधा |
परनारी सिउ घालै धंधा |
जैसे सिंबलु देखि सूआ बिगसाना |
अंत की बार मूआ लपटाना || १ || रहाउ ||
पापी का घरू अगने माहि |
जलत रहै मिटवै कब नाहि || १ ||
हरि की भगति न देखै जाइ |
मारगु छोडि अमारगि पाइ |
मुलहु भूला आवै जाइ |
अंम्रितु डारि लादि बिखु खाइ || २ ||
जिउ बेस्वा के परै अखारा |
कापरू पहिरि करहि सींगारा |
पूरे ताल निहाले सास |
वा के गले जम का है फास || ३ ||
जा के मसतकि लिखिओ करमा |

सो भणि परि है गुर की सरना ||

कहत नामदेउ इहु बीचारू |

इन बिधि संतहु उतरहु पारि || ४ || ४५ ||[२५२]

---

**पदाचा अर्थ :-**पापी माणसाचे ठिकाण कधीही न विझणाऱ्या अग्नीतच असते. आंधळा, पापी आपली बायको सोडून देतो आणि परनारीला मिठी मारतो. परनारीस पाहून तो असाच प्रसन्न होतो जसा पोपट सिंबल वृक्षास पाहून प्रसन्न होतो, परंतु त्या सिंबल वृक्षास पाहून त्यास काहीच प्राप्त होत नाही उलट तो स्वत:चा जीव गमावून बसतो. विकारी, पापी मनुष्यही अशाच प्रकारे मरून जातो. आंधळा माणूस घरच्या बायकोला सोडून परस्त्रीशी रत होतो. सिबल वृक्षाच्या फळांनी मोहित झालेला पोपट त्या सिंबल वृक्षाच्या जंजाळात अडकुन त्यातच मरतो. त्याचप्रमाणे पापी माणूस सदैव पापाग्नीतच जळत राहतो. तो अग्नी कधी विझतच नाही. संत नामदेव महाराज असे सांगतात की, मनुष्य उलट्या कामामध्ये अधिक व्यस्त असतो. अज्ञानामूळे सरळ काम मनुष्य सोडून देतो. ज्याप्रमाणे मनुष्य आपली बायको सोडून दुसऱ्यांच्या बायकामागे फिरत असतो. जसा पोपट सिम्बल नावाच्या वृक्षाची फुले पाहून जाळ्यात अडकतो. तसा पापी मनुष्य वाईट कर्माच्या आगीमध्ये वास्तव्य करतो. जेथे प्रभु भक्ती होते त्या ठिकाणी जाऊन विकारी मनुष्य कधीही पाहात नाही. जीवनाचा सरळ मार्ग सोडून विकारांच्या कुमार्गावर तो चालू लागतो. जगाचे मूळ प्रभूशी तुटून जन्म-मरणाच्या फेऱ्यात तो पडतो. नाम अमृत टाकून तो विकारांचे विष घेतो. [२५३] माणसे प्रभु भक्तीच्या मार्गाकडे कधी वळतच नाहीत. सन्मार्ग सोडून नेहमी कुमार्गाकडेच धाव घेतात आणि त्या भूलभुलय्यात अडकून पडल्यामुळे ती आपल्या मुळ स्वरूपाला, ईश्वर रुपाला, विसरून जाऊन जन्ममरणाच्या चक्रात सदैव फिरत राहतात. अमृत सोडून विषयविकाररूपी विषय त्यांना गोड वाटते व ते विषयविकारांना मिठी मारून बसतात. जिथे ईश्वरभक्ती असते. त्या ठिकाणी मनुष्य जात नाही. जीवनाचे सार तत्व मनुष्य विसरून जातो. ज्याने मानवाची निर्मिती केली त्या ईश्वराला विसरून मनुष्य जन्म-मरणाच्या फेऱ्यामध्ये अडकतो.

ज्याप्रमाणे वेश्या मुजरा करतात, सुंदर सुंदर पोषाख घालून शृंगार पोषाख घालून शृंगार करतात. वेश्या नाचते मोठ्या काळजीपूर्वक आपले सुर-ताल जुळविते, या विकारी जीवनामुळेच तिच्या गळयात यमाचा फास पडतो. जेव्हा वेश्येच्या रंगमहाली नाच गाण्याचा फड उभा राहतो, त्या वेळी ती वेश्या मोहक वेशभूषा करून, नाना प्रकारच्या शृंगार करून, लयबध्द तालासुरांनी गिऱ्हाइकांना मोहित करण्यासाठी कसून प्रयत्न करते. आसक्त माणूस तिच्या ह्या नखऱ्याने हावभावाने बेभान होऊन तिच्या अगदी निकट जाऊन तिच्या श्वासात श्वास मिसळून बेधुंद होऊन जातो. अशा माणसाच्या गळ्यात शेवटी यमाचा फास पडतो. [२५४] अमृताची घागर सोडून विषाचा प्याला प्यायला लागतो. ज्याप्रमाणे एखाद्या वेश्येच्या घरी माणसांची गर्दी होते, आखाडा लागतो, तमाशा होतो, मूजरा होतो, सुंदर कपडे परिधान करून श्रृंगार करून जेव्हा ती स्त्री सुंदर नृत्य

करते तेव्हा हा विषयासक्त मनुष्य स्वास पडल्याशिवाय राहत नाही; परंतु ज्या माणसाने कपाळावर चांगलं लिहिलेलं असतं तो मनुष्य गुरूंच्या शरणांगतीला जातो.

संत नामदेव महाराज हे एक विचार करण्यासारखे वचन सांगतात, ज्या माणसाच्या मस्तकी प्रभुकृपेचा लेख लिहिलेला आहे तो विकारांकडून दूर होउन सद्‌गुरूंना शरण जातो, हे संतजन हो, गुरूचरणी लागूनच संसार समुद्रातील विकारांपासून पार होऊ शकतो. ज्याच्या ललाटी त्या प्रभू परमात्म्याने नामाचा कर्मलेख लिहिला असेल तो सद्‌गुरूला शरण जातो. संत नामदेव हाच विचार सांगतात- साधक हो ! हा भवसागर तरून जाण्याचा हाच एक मार्ग आहे. गुरूकृपेने त्या मनुष्याला संतसंगती प्राप्त होते. तो विषय विकारांपासून दूर राहतो. संत नामदेव महाराज आपल्या विचारानुसार म्हणतात की चांगल्या विधि केल्याने जीवात्मा भवसागर पार करून मुक्त होतो. हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४६**

**रागु भैरउ**

संडा मरका जाइ पुकारे |
पडै नही हम ही पचि हारे |
राम कहै कर ताल बजावै चटीआ सभै बिगारे || १ ||
राम नामा जपिबो करै |
हिरदै हदि जी को सिमरनु धरै || १ || रहाउ ||
बसुधा बसि कीनी सभ राजे बिनती कहै पटरानी |
पूतु प्रहिलादु कहिआ नहीं मानै तिनि तउ अउरै ठानी || २ ||
दुसट सभा मिलि मंतर उपाइआ करसह अउध घनेरी ||
गिरि तर जल जुआला भै राखिओ राजा रामि माइआ फेरी || ३ ||
काढि खडगु कालु मै कोपिओ मोहि बताउ जु तुहि राखै |
पीत पीतांबर त्रिभवन धणी थंभ माहि हरि भाखै || ४ ||
हरनाखसु जिनि नखह बिदारिओ सुरि नर कीए सनाथा ||
कहि नामदेउ हम नरहरि धिआवहि रामु अभै पर दाता || ५ || ४६ ||[२५५]

---

**पदाचा अर्थ :-**भक्त प्रल्हादाच्या चरित्राचे वर्णन करतात. प्रल्हाद नित्य प्रभु नामस्मरण करतो, प्रभुचे स्मरण आपल्या ह्रदयात धारण करून ठेवतो. संड आणि मरका या प्रल्हादाच्या दोन्ही गुरूजनांनी हिरण्यकश्यपूजवळ तक्रार केली. आम्ही थकलो आहोत, प्रल्हाद शिक्षण घेत नाही, तो हाताने टाळ वाजवतो आणि प्रभूचे गायन करतो, इतर सर्व विद्यार्थी त्याने बिघडवले आहेत. भक्त प्रल्हादाचे गुरू भक्त प्रल्हादाच्या वडिलांकडे जाऊन

तक्रार करतात. भक्त प्रल्हाद राम नामाचे सारखे उच्चारण करत असून हाताने टाळ्या वाजवत असतो. त्याच्यासोबत त्याचे सर्व मित्र रामनामाचे उच्चारण करत असून सर्व सवंगडी त्याच्या नादाला लागले आहे. ते सर्व बिघडून गेले आहेत व रामनामाचा जप करत आहेत. त्यांच्या हृदयामध्ये रामनामाचा जप चालला आहे.[२५६] प्रल्हादाची आई (कयाधु) जी पट्टराणीही आहे ती प्रल्हादापुढे विनवणी करते. त्याला समजावण्याचा प्रयत्न करते. ती प्रल्हादास सांगते तुझ्या पित्याने संपूर्ण धरती आपल्या ताब्यात ठेवली आहे. त्याची आज्ञा मोडू नकोस. परंतु पुत्र प्रल्हाद आईचे म्हणणे ऐकत नाही, त्याने तर काही तरी वेगळेच ठरवलेले दिसते. सर्व पृथ्वीतलावर त्याचं राज्य आहे. त्यांच्या आज्ञेशिवाय इथे काहीच होत नाही आणि तू त्यांचा मूलगा असून त्याचं ऐकत नाहीस.

दुष्टांनी एकत्र येऊन निर्णय केलेला जर प्रल्हाद ऐकत नाही तर आम्ही त्यास मारून टाकू. परंतु जगाच्या मालक प्रभूने आपल्या मायेचा स्वभावच बदलून टाकला. प्रभूने प्रल्हादास डोंगरातून, वृक्षातून, पाण्यातून, आगीतून, या सर्वांपासून वाचवले. प्रल्हादाने आपल्या मनामध्ये एकच निश्चय केलेला असतो. तो आईचे म्हणने सुध्दा मान्य करत नाही तेव्हा राजभवनामध्ये सर्व दुष्ट लोकांची सभा होऊन भक्त प्रल्हादाला ठार मारण्याचा निर्णय होतो. डोंगरावरून ढकलून दिल्याने, पाण्यामध्ये बुडविल्याने व आगीमध्ये जाळल्याने सुध्दा भक्त प्रल्हाद मरत नाही. या गोष्टींचा भक्त प्रल्हादावर काहीच परिणाम होत नाही व तो थोडासुध्दा विचलित होत नाही; कारण भक्त प्रल्हादावर ईश्वराची माया आहे. स्वत: प्रभू त्याचे रक्षण करतो. [२५७]

आता अंतरातून घाबरलेला परंतु बाहेरून क्रोध दाखवून, मृत्यूरूपी तलवार काढून हिरण्यकश्यपू म्हणाला, मला सांग आता कोण ह्या तलवारीपासून तुला वाचवू शकणार आहे. तेव्हा प्रल्हाद उत्तर देतो की, ज्याने पिवळे वस्त्र धारण केलेले आहे असा तिन्ही जगाचा स्वामी तोच माझे रक्षण करतो. तो आपल्या भक्ताची लाज राखण्यासाठी तत्पर असतो. या खांबामध्ये सुध्दा तो आहे. ईश्वराने नरसिंहाचा अवतार होऊन आपल्या नखाने हिरण्यकश्यपाचे पोट फाडले आणि हे सिध्द केले की ईश्वर नेहमी आपल्या भक्तांचे रक्षण करतो. तो आपल्या भक्ताची लाज राखण्यासाठी तत्पर असतो. जगाचा मालक प्रभु, खांबातूनच बोलतो. तो परमेश्वर सर्व चराचरांमध्ये आहे.

संत नामदेव म्हणतात-ज्या प्रभूने हिरण्यकश्यपूस नखाने चिरून टाकले, देव आणि मानवास धीर दिला, मीही त्या प्रभूस स्मरतो, आठवण करतो. प्रभुच निर्भय पद देणार आहे. त्या श्री नरहरीची मी आराधना करतो. ईश्वराने नरसिंहाचा अवतार घेऊन आपल्या नखाने हिरण्यकश्यपाचे पोट फाडले आणि हे सिध्द केले की ईश्वर नेहमी आपल्या भक्तांचे रक्षण करतो. संत नामदेव महाराज म्हणतात की आम्ही तर सर्वकाळ नरहरि नावाचा जप करतो तो राम आम्हाला तर अभय देणारच.[२५८] हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४७**

**रागु भैरउ**

सुलतानु पुछै, सुनु बे नामा ।

देखउ राम तुम्हारे कामा ॥ १ ॥

नामा सुलताने बांधिला ॥

'देखउ तेरा हरि बीठूला' ॥ १ ॥ रहाउ ॥

'बिसमिलि गऊ देहु जीवाई ।

नातरू गरदनि गरदनि मारउ ठाइ' ॥ २ ॥

बादिशाह ऐसी किउ होइ ॥

बिसमिलि कीआ न जीवै कोइ ॥ ३ ॥

मेरा कीआ कछू न होई ॥

करि है रामु होइ है सोइ ॥ ४ ॥

बादिसाहु चढिओ अहंकार ।

गज हसती दीनो चमकारि ॥ ५ ॥

रूदनु करै नामै की माइ ।

छोडि रामु की न भजहि खुदाइ ॥ ६ ॥

न हउ तेरा पुंगडा न तू मेरी माइ ।

पिंडु पड़ै तउ हरि गुन गाइ ॥ ७ ॥

करै गजिंदु सुंड की चोट ।

नामा उबरै हरिकी ओट ॥ ८ ॥

काजी मुलां करहि सलामु ।

इनि हिंदू मेरा मलिआ मानु ॥ ९ ॥

बादिशाह बेनती सुनेहु ॥

नामे सर भरि सोना लेहु ॥ १० ॥

"मालु लेउ तउ दौजकि परउ" ।

दीनु छोडि दुनीआ कउ भरउ ॥ ११ ॥

पावहु बेड़ी हाथहु ताल ।

नामा गावै गुन गोपाल ॥ १२ ॥

गंग जमुन जउ उलटी बहै ।

तउ नामा हरि करता रहै ॥ १३ ॥

सात घडी जब बीती सुणी ।

अजहु न आइओ त्रिभवन धणी || १४ ||

पाखंतण बाज बजाइला ||

गरूड चढे गोबिंद आइला || १५ ||

अपने भगत परि की प्रतिपाल |

गरुड चढे आए गोपाल || १६ ||

कहहि त धरणि इकोडी करउ ||

कहहि त ले करि ऊपरि धरउ || १७ ||

कहहि त मुई गऊ देउ जीआइ |

सभु कोई देखें पतीआइ || १८ ||

नामा प्रणवै सेलमसेल ||

गऊ दुहाइ बछरा मेलि || १९ ||

दुधहि दुहि जब मटुकी भरी |

ले बादिशाह के आगे धरी || २० ||

बादिसाहु महल महि जाइ |

अउघट की घट लागी आइ || २१ ||

काजी मुलां बिनती फुरमाइ |

बखसी हिंदू | मै तेरी गाइ || २२ ||

नामा कहै सुनहु बादिसाह |

इहु किछु पतीआ मुझै दिखाइ || २३ ||

इस पतिआ का इहै परवानु |

साचि सीलि चालहु सुलितान || २४ ||

नामदेउ सभ रहिआ समाइ |

मिलि हिंदू सभ नामे पहि जाइ || २५ ||

जउ अब की बार न जीवै गाइ |

त नामदेव का पतीआ जाइ || २६ ||

नामे की कीरति रही संसारि |

भगत जनां ले उधरिआ पारि || २७ ||

सगल कलेस निंदक भइआ खेदु ||

नामे नाराइन नाही भेदु || २८ || ४७ ||[२६०]

**पदाचा अर्थ :-**सुलतान महंमद बिन तुघलक हा मोगल राजा नामदेवास म्हणतो, हे नामदेवा ऐक, मी तुझ्या रामाची कामे पाहू इच्छितो. मला नामदेवास बादशहानी बंदिस्त केले आणि म्हणू लागला मी तुझा हरी, तुझा विठ्ठल पाहू इच्छितो. माझी ही मेलेली गाय जिवंत कर, नाही तर तुलाही येथेच आत्ताच ठार मारेन.[२६१]

तेव्हा नामदेव नम्रपणे म्हणाले, "बादशहा असे कसे घडू शकते ? कधी कोणी मेलेला जिवंत झाला आहे का ?" आणि अजूनही एक गोष्ट आहे जे काही प्रभु करतो तेच सारे होते, मी केल्याने काही होऊ शकत नाही. प्रभूराम जे ठरवतो तेच घडते.[२६२]

हे उत्तर ऐकून बादशहाला राग येतो, त्याने एक मोठा हत्ती प्रेरित करून नामदेवाच्या अंगावर सोडला. नामदेवाची आई गोणाई रडत होती, नामदेवाची आई गोणाई नामदेवाला म्हणू लागली, "हे नामा, तू रामाचे नाव सोडून दे आणि तुझ्या मुखात खुदा, खुदा का म्हणत नाहीस ?" संत नामदेवाने उत्तर दिले मी तुझा पुत्र नाही आणि तू माझी आई नाहीस, जरी माझे शरीर नाश झाले, माझे प्राण गेले तरीही मी नामा हरीगुण गात राहीन. इकडे काय चमत्कार झाला तो मस्तवाल हत्ती आपल्या सोंडेचा वार करतो, परंतु नामदेवास कोणतीही इजा होत नाही, नामा त्यातून वाचतो, कारण तो प्रभू राम नामदेवाचे रक्षण करतो. बादशहा मनात विचार करतो की, मला माझ्या धर्मांचे पुढारी काझी आणि मौलवी तर सलाम करतात परंतु ह्या हिंदूने माझा मानभंग केला आहे. सर्व हिंदू एकत्र आले आणि म्हणू लागले, हे बादशहा आमची एक विनंती ऐका, "नामदेवाच्या वजनाएवढे सोने आम्ही तुम्हाला देतो, त्यास सोडून टाका." बादशहांनी उत्तर दिले, "हे कसे शक्य आहे ? जर मी लाच घेईन तर मी नरकात पडेन, कारण असे करूनही मजहब (धर्म) सोडून धन एकत्र करेन." नामदेवाच्या पायात बेड्या आहेत, परंतु तरीही तो हातात टाळ घेऊन प्रभूचे गुणगान करतो. हातात बेड्या, पायात साखळदंड अशाही स्थितीत नामदेव हरिभजनात तल्लीन होऊन गेले होते. गंगा-यमुना उलट दिशेने वाहू लागल्या तरीही नामदेव हरिगुण गात राहिल आणि कोणत्याही दबावात येऊन खुदा-खुदा म्हणणार नाही. गायीस जिवंत करण्यासाठी बादशहांनी एका प्रहराची म्हणजेच आठ घटका मुदत दिली होती, जेव्हा सात घटका झालेल्या ऐकल्या तेव्हा नामदेवाने विचार केला की अजूनपर्यंतही त्रिलोकीचा मालक प्रभू परमात्मा आलेला नाही. नामदेव आर्त सुरात भगवंताची प्रार्थना करत होते आणि चमत्कार झाला, आपल्या भक्तांच्या रक्षणार्थ तो भक्त वत्सल त्याच वेळेस पंखाच्या फडफडींचा आवाज आला, भगवान विष्णू गरुडावर स्वार होऊन आले. प्रभु गरुडस्वार होऊन आले आणि त्यांनी आपल्या भक्ताचे रक्षण केले. गोपाल विष्णू म्हणाले, "हे नामदेव तू जर म्हणशील तर मी ही धरती तिरपी करून उलटवून टाकतो, तू जर म्हणशील तर मेलेल्या गायीस जीवदान देतो." त्यावर नामदेव म्हणतात, हे देवा त्या गाई-वासराची भेट घडव. यामुळे सर्व लोकांचे समाधान होईल. गोपाळाच्या अशा कृपेने मी नामदेवाने लोकांस विनंती केली-वासरास गायीपुढे सोडा त्यांनी तसेच केले, गाय क्षणात जीवंत झाली व पान्हवली. नामदेवाने गायीचे दुध काढून मडके भरून बादशहासमोर

ठेवले. दूध घेऊन जेव्हा ती मडकी भरली तेव्हा ती मडकी बादशहापुढे ठेवली. बादशहाला झालेला चमत्कार पाहून घाम फुटला, बादशहाला काय करावे हे कळेना, बादशहा महालाकडे निघून गेला आणि तेथे त्याच्यावर अवघड प्रसंग आला. म्हणजे तो घाबरून गेला. त्याने आपल्या काझी आणि मौलवीव्दारा विनंती केली,"हे हिंदु मला आज्ञा कर. जी आज्ञा तू करशील ते मी शिरोधार्य मानेन. मला माफ कर ! मी तुझी गाय आहे. माझे रक्षण कर."

नामदेव बादशहाला म्हणतो,"हे बादशहा, मला एक आश्वासन वचन दे की, तू या पुढे सत्य मार्ग अवलंबशील आणि चांगल्या स्वभावात राहाशील. सत्य आणि शीलाने राज्य करशील." सर्वत्र नामदेवांचाच गाजावाजा होऊ लागला. ह्या प्रसंगामुळे नामदेवाचा सर्वत्र गाजावाजा झाला. गावातील सर्व हिंदू एकत्र येऊन संत नामदेवाजवळ येऊन म्हणू लागले जर त्या वेळी गाय जिवंत झाली नसती तर नामदेवाचा देवावरचा विश्वास उडाला असता. बादशहाने नामदेवास जर मारले असते तर नामदेवाची सारी पत धुळीला मिळाली असती. परंतु प्रभुने आपल्या भक्तास, आपल्या सेवकास चरणी लावून पार केले आहे, नामदेवांची कीर्ति जगात टिकून राहिली आहे, की कीर्ति ऐकून निंदकास मोठे क्लेश आणि दुःख झाले आहे कारण त्यांना माहीत नाही की नामदेवात आणि प्रभूत आता कोणतेही अंतर राहिले नाही. संत नामदेव व नारायण यांत काहीही भेद नाही.[२६३]

वरील पदांमध्ये बादशहा मुहंमद बिन तुघलक यांना असे सांगण्यात आले की संत नामदेवांच्या आशिर्वादाने एक मेलेला मनुष्य जिवंत झाला तेव्हा बादशहाने संत नामदेव महाराजांना मेलेली गाय जिवंत करण्याचे सांगीतले. आणि जेव्हा ती गाय जीवंत झाली तेव्हा मात्र बादशहा संत नामदेवाच्या शरण आला आणि नामदेवाची माफी मागीतली. सतं नामदेवाने बादशहाला सांगीतले की तु यापुढे सत्य व शिलाने वागशिल. या प्रसंगामुळे भगवंताने भक्ताची लाज राखली नामदेवाचे नाव अख्या विश्वामध्ये झाले. ईश्वराने नामदेवावर एवढी कृपा केली, की नामदेव नारायण एकरूप झाले. या प्रसंगामुळे हिंदू व मुस्लीम दोघेही संत नामदेवाना ईश्वराचे दुत मानू लागले.[२६४] हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४८**

**रागु भैरउ**

जउ गुरदेउ त मिलै मुरारि |

जउ गुरदेउ त उतरै पारि |

जउ गुरदेउ त बैकुंठ तरै |

जउ गुरदेउ त जीवत मरै || १ ||

सति सति सति सति सति गुरदेव |

झूठु झूठु झूठु झूठु आन सभ सेव ॥ १ ॥ रहाउ ॥

जउ गुरदेउ त नामु द्रिड़ावै ।

जउ गुरदेउ न दह दिस धावै ।

जउ गुरदेउ पंच ते दूरि ॥

जउ गुरदेउ न मरिबो झूरि ॥ २ ॥

जउ गुरदेउ त अम्रित बानी ॥

जउ गुरदेउ त अकथ कहानी ।

जउ गुरदेउ त अम्रित देह ।

जउ गुरदेउ नामु जपि लेहि ॥ ३ ॥

जउ गुरदेउ भवन त्रै सुझै ।

जउ गुरदेउ ऊच पद बुझै ।

जउ गुरदेउ त सीसु अकासि ।

जउ गुरदेउ सदा साबासि ॥ ४ ॥

जउ गुरदेउ सदा बैरागी ।

जउ गुरदेउ परनिंदा तिआगी ।

जउ गुरदेउ बुरा भला एक ।

जउ गुरदेउ लिलाटहि देख ।

जउ गुरदेउ कंधु नहि हिरै ।

जउ गुरदेउ देहुरा फिरै ।

जउ गुरदेउ त छापरि छाई ।

जउ गुरदेउ सिहज निकसाई ॥ ६ ॥

जउ गुरदेउ त अठसठि नाइआ ।

जउ गुरदेउ  तनि चक्र लगाइआ ।

जउ गुरदेउ त दुआदस सेवा ॥

जउ गुरदेउ सभै बिखु मेवा ॥ ७ ॥

जउ गुरदेउ त संसा टुटै ।

जउ गुरदेउ त जमते छुटै ।

जउ गुरदेउ त भउ जल तरै ।

जउ गुरदेउ त जनमि न मरै ॥ ८ ॥

जउ गुरदेउ अठदस बिउहार ।

जउ गुरदेउ अठारह भार |

बिनु गुरदेउ अवर नही जाइ |

नामदेउ गुरकी सरणाई ॥ ९ ॥ ४८ ॥[२६५]

---

**पदाचा अर्थ :-**जर सद्‌गुरूची भेट झाली तर मुरारीच भेटल्यासारखे आहे. कारण गुरूकृपेनेच परमेश्वर प्राप्त होतो. जर सतगुरू प्रसन्न झाले तर माणूस भवसागर पार करून जातो व त्यास वैकुंठाची प्राप्ती होते. मग तो लौकिक अर्थाने जिवंत असतो पण त्याचे सर्व प्रकारचे विकार नष्ट झालेले असतात. इतर सर्व दैवतांची पूजा व्यर्थ आहे, सद्‌गुरूची सेवाच नित्य स्थिर राहाणारी आहे. जर सद्‌गुरू भेटले तर प्रभु भेट होते. सद्‌गुरू भेटला तर वैकुंठात आल्यासारखे वाटते, जगात राहातानाही विकारांकडून मन मरून जाते.[२६६]

सत्य, सत्य, सत्य गुरूदेव हेच सत्य आहे. अन्य कोणाचीही सेवा निरर्थक आहे. जर सद्‌गुरू प्रसन्न झाले तर जीवाचे मन नामात दृढ होते, स्थिर होते. ते मग दशदिशांना भटकत नाही. सद्‌गुरूकृपेने मग पंचविकारांपासून मन दूर जाते व मग जीवावर पश्चात्ताप करत मरण्याची वेळ येत नाही. चिंता काळजी इत्यादीमध्ये गुंतुन राहात नाही. सद्‌गुरूच्या कृपेने भक्ताची वाणी अमृतासारखी गोड होते व अशा जीवाची गोष्टच अलौकिक होऊन जाते. ज्याच्यावर सद्‌गुरूने कृपा केली त्याचा देहही अमृतासमान पवित्र होतो. असा जीव गुरूकृपेत सदैव नामजपात तल्लीन होतो. सद्‌गुरूकृपेने तिनही लोकांचे ज्ञान प्राप्त होते. सद्‌गुरूकृपेने परमपद प्राप्त होते. सतगुरूकृपेने त्याचे मस्तक आभाळास जाऊन टेकते. सद्‌गुरूकृपेने त्याची सर्वत्र वाहवा होते. सद्‌गुरूकृपा झाल्यावर जीव विरक्त होतो. तो परनिंदेचा त्याग करतो. गुरूकृपेने चांगले-वाईट त्याला समानच वाटू लागते व त्याचे भाग्यही पालटून जाते. [२६७]

सद्‌गुरूकृपा झाल्यास शरीररूपी कवचाचा नाश होत नाही. गुरूकृपा झाल्यावर तर देऊळही फिरते. संत नामदेव यांच्या किर्तनामुळे नामस्मरणामुळे औढ्यातील नागनाथ मंदीर फिरले आहे. परमात्म्याने सेवकांच्या डोक्यावर छप्पर उभे केले. त्याचे घर बांधून दिले. पाण्यात फेकून दिलेला पलंगही प्रत्यक्ष प्रभूने पाण्यातून कोरडा बाहेर काढला. सद्‌गुरू शरण आलेल्या गरीबांच्या मदतीस प्रभु स्वत: धावून येतो. सद्‌गुरूची कृपा झाली तर अडुसष्ट तीर्थात स्नान केल्याचे पुण्य लाभते. सद्‌गुरूकृपा झाली तर भाळी प्रभुकृपेचे चिन्ह उमटते. गुरूची कृपा झाली तर बाराही प्रकारच्या सेवांचे (२पाद, २कर सेवा, १वाणी सेवा, २कर्ण सेवा, २नेत्र सेवा, १मस्तक सेवा, व २नासिका सेवा) पुण्य लाभते व विष सुध्दा अमृत होते. जर सद्‌गुरूची कृपा झाली तर सर्व संशय दूर होतात. सद्‌गुरूकृपेने यमाच्या पाशातून सुटका होते. सद्‌गुरूकृपेने भवसागर तरून जातो व सद्‌गुरूकृपेने जन्ममरणाच्या फेऱ्यातून जीव मुक्त होतो. जर सद्‌गुरूंची भेट झाली तर मनातील सर्व संशय निघून जातात, यमापासून सुटका होते. मनुष्य संसार समुद्रातून पार होतो, जन्म-मरणाच्या फेऱ्यातून बचावतो. सद्‌गुरूच्या प्रसन्नतेतच अठरा पुराणांचे सार आहे. सद्‌गुरूच्या कृपेतच अठरा

वनस्पतींच्या पूजेचे फळ साठवले आहे. सद्‌गुरूशिवाय अन्य कोणताही आसरा नाही. म्हणून संत नामदेवच सदैव गुरूला शरण जातात.

संत नामदेव महाराज सांगतात की, हे जीव ! तू गुरूला शरण जा. गुरूकृपा झाल्याशिवाय जीवाची मनोकामना पूर्ण होत नाहीत. गुरूंच्या कृपेमुळेच जीव सर्व पूज्य प्राप्त करू शकतो. जर गुरूकृपा झाली तर जिवात्मा व परमात्मा यांचे मिलन होते. वरील पदांमध्ये सद्‌गुरूचे महत्व सांगीतले आहे. हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.४९**

**रागु भैरउ**

आउ कलंदर केसवा | करि अबदाली भेसवा || १ || रहाउ ||

जिनि आकास कुलह सिरि कीनी कउसै सपत पयाला |

चमर पोस का मंदरू तेरा | इह बिधि बने गुपाला || १ ||

छपन कोटि का पेहनु तेरा | सोलह सहस इजारा |

भार अठारह मुदगरू तेरा सहनक सभ संसारा || २ ||

देही महजिदि मनु मउलाना सहज निवाज गुजारै |

बीबी कउला सउ काइनु तेरा निरंकार आकारै || ३ ||

भगति करत मेरे ताल छिनाए | किह पहि करउ पुकारा |

नामे का सुआमी अंतरजामी फिरे सगल बेदेसवा || ४ || ४९||[२६८]

---

**पदाचा अर्थ :-** हे सुंदर केशधारी कलंदर प्रभु, हे केशवा ! तू अबदाली फकीराचा वेष धारण करून आला आहेस, सुस्वागतम ! ये माझ्या ह्रदय मशीदीत येऊन वास कर. हे कलंदर, हे केशवा, तू ये, तू ज्याने साती आकाशांना टोपी बनवून आपल्या डोक्यावर घातलेली आहे. तू आकाशाचा मुकूट डोक्यावर धारण केला आहेस. सात पाताळांना आपल्या खडावा तू पायात घातल्या आहेस. हे कलंदर प्रभु, सर्व जीवजंतू तूझ्या राहाण्यासाठी घर आहेत. हे धरतीरक्षक, तू असा सर्वव्यापी बला आहेस. हे कलंदर प्रभु, छप्पन कोटी मेघमाला तुझा पेहराव आहे. सोळा हजार आलम तुझी विजार आहे, सोळा हजार चुण्यांचा चुणीदार पायजमा तू नेसला आहेस. हे केशव, संपूर्ण वनस्पती तुझी काठी आहे. अठरा भार वजनाची गदा तू धारण केली आहेस. हा संपूर्ण संसार तुझा रकाबी मातीचे भांडे आहे. हे कलंदर प्रभु, सुस्वागतम, माझ्या मशीदीत ये, माझे शरीर तुझ्यासाठी मशिद आहे, माझे मन तुझ्या नामाची बांग देणारा मुल्ला आहे, आणि तुझ्या चरणी टिकून सहज अवस्थेत नमाज पठण करीत आहेत. हे संपूर्ण जगाचा मालक निरंकार, स्त्री लक्ष्मीशी तुझे निकाह लग्न झाले आहे म्हणजे ती सर्व माया तुझ्या चरणांचीच दासी आहे. तु निराकारातूनच सगुणरूपात येतोस. हे

कलंदर प्रभु, मी भक्ती करत असताना तूच मला मंदिरातून काढायला लावले होतेस, तुला सोडून मी दुसऱ्या कोणापुढे मनाच्या गोष्टी करू ? हे बंधु, नामदेवाचा मालक प्रभु प्रत्येक जीवाच्या अंतरीचा जाणकार आहे आणि सर्व देशात व्यापक आहे.[२६९] हे प्रभु, तुझी भक्ती करताना माझ्या हातातून टाळ, चिपळ्या हिसकावून घेतल्या आहेत. आता मी कोणाकडे तक्रार करू ? नामदेवाचा स्वामी अंतर्यामी आहे. त्याला ना घरदार ना देश आहे. तो तर सर्वांच्या अंतरात रममाण आहे.[२७०]

ईश्वर सर्व जीवांमध्ये विद्यमान आहे. संत नामदेव म्हणतात, जेव्हा मी भक्ती करत होतो तेव्हा तू सर्व हिरावून घेत होता. सर्व जागा सर्व ठिकाण जाणणारा ओळखणारा सर्व ठिकाणी तू विद्यमान आहे. विश्वाचा सारा पसारा माझ्या कलंदराचाच आहे, माझ्या प्रभुचाच आहे.[२७१] हे पद राग-भैरउ मध्ये आहे.

---

**पद क्र.५०**

**रागु बसंतु**

१ओ सतिगुर प्रसादि ॥

साहिब संकटवै सेवकु भजै ।

चिरंकाल न जीवै दोऊ कुल लजै ॥ १ ॥

तेरी भगति न छोडउ भावै लोगु हसै ।

चरन कमल मेरे हीअरे बसै ॥ १ ॥ रहाउ ॥

जैसे अपने धनहि प्रानी मरनु मांडै ।

तैसे संत जनां राम नामु न छाडै ॥ २ ॥

गंगा गइआ गोदावरी संसार के कामा ।

नाराइणु सुप्रसंन होइ त सेवकु नामा ॥ ३ ॥ ५०॥[२७२]

---

**पदाचा अर्थ :-**हे प्रभु, तुझे फुलांसारखे चरण माझ्या ह्रदयात वसतात आणि मला प्रिय वाटतात. आता जग भले टिंगल करो मी तुझी भक्ती सोडणार नाही. तुझे चरण मी घट्ट धरून ठेवीन. मालक जर आपल्या नोकरास कष्ट देईल आणि नौकर त्या कष्टाच्या भयाने पळून जाईल, तर तो नौकर कायम तर जिवंत राहात नाही, परंतु मालकास पाठ दाखवून आपल्या दोन्ही कुळांची बदनामी ओढवून घेतो. हे प्रभु, लोकांच्या टिंगल टवाळीच्या भयामुळे मी तुझ्या दारातून पळून जाणार नाही, जसे एखादा मनुष्य आपले धन वाचवण्यासाठी मरणास सज्ज होतो तसेच प्रभु भक्त नामधन सोडत नाहीत. त्यांच्या जवळ प्रभुनामाचेच न संपनारे धन आहे. तुझे कमळ रुपी पाय माझ्या ह्रदयात बसले आहेत. ज्याप्रमाणे प्राणी धनासाठी आपला जीव पण गमावण्यास राजी होतो त्याप्रमाणे संत लोकांना राम प्रिय आहे. ते राम-नाम सोडूच शकत नाहीत. त्या रामाला आपले सर्वस्व अर्पण करत असतात.

गंगा, गया, गोदावरी इत्यादी तीर्थांवर जाणे ही जगाला खूष करणारी कामे आहेत, परंतु हे नामदेव तोच खरा भक्त आहे ज्यावर प्रभु स्वत: प्रसन्न होतील आणि आपले नामदान करतील. गंगेला जा, गयेला जा, गोदावरीत स्नान करा हे केवळ संसारिक कर्मकांड आहे. गंगा गोदावरीला जाऊन स्नान करणे हे सांसारीक कार्य आहे.[२७३] तीर्थाला गेल्याने ईश्वर प्रसन्न होत नाही. असे केल्याने आम्ही त्याचे भक्त होऊ शकत नाहीत, सेवक त्याला म्हणतात जे त्या ईश्वराची सेवा करतात. सेवक सेवा करण्यापासून विन्मुख होत नाही. नारायणाला प्रसन्न करण्यासाठी नामस्मरण करणे गरजेचे आहे. जो ईश्वरावर श्रध्दा, विश्वास व आस्था ठेवतो तोच खरा त्याचा सेवक आहे. नामदेव सांगतात, ज्याच्यावर प्रत्यक्ष नारायण प्रसन्न होईल तोच खरा सेवक, त्यालाच प्रभू परमात्मा आपले नाम प्रदान करतो. हे पद राग-वसतु मध्ये आहे.

---

**पद क्र.५१**

**रागु बसंतु**

लोभ लहरि अति नीझर बाजै |

काइआ डूबै केसवा || १ ||

संसार समुंदे तारि गोबिंदे तारि लै बाप बीठला || १ || रहाउ ||

अनिल बेडा हउ खेवि न साकउ || तेरा पारू न पाइआ बीठुला || २ ||

होहु दहआलु सतिगुरू मेलि तू मो कउ पारि उतारे केसवा || ३ ||

नामा कहै हउ तरि भी न जानउ |

मोकउ बाह देहि बाह देहि बीठुला || ४ || ५१ ||[२७४]

---

**पदाचा अर्थ :-**या पदाच्या माध्यमातून नामदेव महाराज असे सांगतात की, हे केशवा ! लोभ रुपी लाटेने या शरीराला बुडविले आहे. लोभाच्या लहरी भयाण रौद्ररूप धारण करून माझ्या मनात जोरात खळाळत आहेत. मी त्यात गटांगळ्या खातोय. मी त्यातच बुडून मरणार.[२७५] हा संसार समुद्राप्रमाणे आहे. हे गोविंद, मला या संसारामधून मुक्त कर. ये माझ्या बापा! हे विठ्ठला ! तुम्हीच या संसाररूपी सागरातून माझी मुक्तता करू शकता. लोभरूपी हवेचे वारे वाहत आहेत. मी हा भवसागराचा बेडा पार करूच शकत नाही. हे ईश्वर! तूच या बेड्यामधून माझी मुक्तता करू शकतो. माझ्यावर दया कर व मला एक खरा गुरू सद्‌गुरू दे, ज्यामुळे मी हा संसाररूपी सागर तरुन जाईल. ह्या झंझावातात मी माझी नौका वल्हवूच शकत नाही. हे विठ्ठला, मी हा भवसागर पार करू शकत नाही. दयावतं होऊन मला सद्‌गुरू भेटव तोच मला ह्या भवसागरातून बाहेर काढेल. नामदेव महाराज म्हणतात मला पोहणे येत नाही. हे विठ्ठल! मला तुझ्या कुशीचा सहारा दे तुझ्या सहाऱ्याने मी हा भवसागर पार करून जाईल.[२७६]

संत नामदेव विठ्ठलाला विनंती करतात की, तुझा नामदेव विनंती करीत आहे, संसाररूपी समुद्रात जोरदार लाटा येत आहेत, माझी होडी तुफानात सापडली आहे आणि मला तर पोहता येत नाही मला तू आपला हात दे. विठ्ठला मला यातून पार कर. हे पद राग-सारंग मध्ये आहे.

---

**पद क्र.५२**

**रागु बसंतु**

सहज अवलि धुड़ि मणी गाडी चालती |

पीछै तिनका लै करि हांकती || १ ||

जैसे पनकत थ्रू टि टि हांकती सरि धोवन चाली लाडुली || १ || रहाउ ||

धोबी धोवै बिरह बिराता ||

हरि चरन मेरा मनु राता || २ ||

भणति नामदेउ रमि रहिआ ||

अपने भगत पर करि दइआ || ३ || ५२ ||[२७७]

---

**पदाचा अर्थ :-**सुरूवातीस धुळीने मलीन झालेली म्हणजे पापाने भरलेली शरीररूपी गाडी सतसंगरूपी सरोवराकडे अनिच्छेने व अत्यंत सावकाशपणे जात होती पण जेव्हा प्रभुप्राप्तीची प्रेरणारूपी दंडा पाठीवर पडला तेव्हा ही शरीररूपी गाडी वेगाने धावू लागली. ज्या प्रमाणे धोबीण मलीन वस्त्राने भरलेली गाडी कधी चुचकारून धोबी घाटावर घेऊन जाते त्याप्रमाणे आपले पापी मन धुण्यासाठी सतसंगरूपी सरोवराकडे घेऊन जाते. मळक्या कपड्यांची भरलेली गाडी जशी हळू हळू पुढे होत जाते आणि मागोमाग धोबीण दंडुका घेऊन तिला पुढे रेटत असते, तसेच प्रथम आळशी शरीर हळू हळू चालते. परंतु लाडुली त्यास प्रेमाने पुढे जाण्याची प्रेरणा देते. सतसंगरूपी सरोवरावर गुरूरूपी धोबी विचारही विरक्त होऊन सर्व जीवांचा पापरूपी मळ धुवून टाकतो. मनाचा मळ धुतला गेल्याने गुरूकृपेने आता माझेही मन हरिचरणी रंगून गेले आहे. प्रेमात रंगलेली धोबीण म्हणजे गुरू सरोवरावर आलेल्या जिज्ञासू स्त्रियांचे मन पवित्र बनते, त्यात गुरूरूपी धोबीच्या कृपेने माझे मनही प्रभूचरणी रंगले आहे. नामदेव सांगतात, तो प्रभू परमात्मा सर्वव्यापक असून तो आपल्या भक्तांवर सदैव कृपा करतो. तो अकाल पुरूष सर्वत्र चारी ठिकाणी व्यापक आहे, आणि आपल्या भक्तांवर कृपा करीत राहतो.

देहरक्षणाची पर्वा न करता भक्तीरसात रात्रदिवस रंगून जाण्याची नामदेवांची प्रवृत्ती पाहून कोणी त्यांना म्हटले, अशी देहाची उपेक्षा केली, तर तो कसा टिकेल ? त्याला ह्या वरील पदात उत्तर दिले आहे. पहिले धुळीने भरलेली गाडी म्हणजे पापरूपी शरीर सत्संगताच्या तळ्याकडे हळूहळू चालत असते, परंतु पाठीमागून उत्साह रूपी काठी म्हणजे जीव शरीराला पुढेपुढे ढकलत असतो. गुरूरूपी जो हरीप्रेमात मग्न असतो तो जीवात्म्याच्या पापांचा मळ धुऊन टाकतो. नंतर या जीवाचे मन हरि स्मरणामध्ये लागते.

ईश्वराच्या चरणी लिन होते. भक्त नामदेव म्हणतात, "हे प्रभू ! आपल्या भक्तांवर दया करा. माझ्या पापांचा मळ धुऊन मला तुझ्या रंगात रंगऊन घे. माझ्यावर दया कर."[२७८] हे पद राग-सारंग मध्ये आहे.

---

**पद क्र.५३**

**राग़ु सारंग**

१ ओं सतिगुर प्रसादि ||
काएं रे मन बिखिआ बन जाइ ||
भूलौ रे ठग मुरी खाइ || १ || रहाउ ||
जैसे मीनु पानी महि रहै |
काल जाल की सुधि नही लहै |
जिहबा सुआदी लीलित लोह |
ऐसे कनिक कामनी बाधिओ मोह || १ ||
जिउ मधु माखी संचै अपार ||
मधु लीनो मुखि दीनि छारु ||
गऊ बाछ कउ संचै खीरु |
गला बांधि दुहि लेइ अहिरू || २ ||
भाइला कारनि स्त्रमु अति करै |
सो माइआ लै गाडै धरै |
अति संचै समझै नाही मूढ |
धनु धरती तनु होइ गइओ धुडि || ३ ||
काम क्रोध त्रिसना अति जरै |
साध संगति कबहू नही करै |
कहत नामदेउ ताची आणि |
निरभै होइ भजीऐ भगवान || ४ || ५३ ||[२७९]

---

**पदाचा अर्थ :-** हे मना, तू माया जंजाळात का अडकतोय ? मोहरूपी ठगमुळी खाऊन भ्रमिष्ट होऊन का झिंगतोस ? मानवा तू विषय विकारांमध्ये एवढा फसत आहेस. विषयविकार ठगबुटी आहेत. ज्याप्रमाणे पर्यटक किंवा यात्रा करणाऱ्या लोकांना चोर धोका देण्यासाठी बुटी वल्ली खाऊ घालतो आणि बेहोश करतो त्याप्रमाणे तू या विषयविकारांच्या बुटीने बेहोश झाला आहेस. जसा मासा पाण्यात राहतो, त्याला मृत्यूची जराही जाणीव नसते. लोखंडी गळाला लावलेल्या आमिषास भुलून मासा आपल्याला मृत्यूस अलिंगन देतो, त्याप्रमाणेच

कामिनी-कोचनाच्या मोहाने माणूस स्वत:स काळाच्या जबड्यात ढकलतो. हे बंधु, तू सोने आणि स्त्री च्या मोहात गुंतला आहेस आणि आपला आत्मिक मृत्यू ओढवून घेत आहेस.[२८०] मधमाशी स्वत:साठी म्हणून खूप मध गोळा करते. पण परमेश्वरा ! माणूस तो मध पळवून नेतो आणि बिचाऱ्या मधमाशीच्या वाट्याला मात्र काहीच येत नाही. गाय आपल्या वासरासाठी कासेत दूध साठवते पण गवळीच ते सगळे काढून नेतो. वासराला मात्र घोटभरच मिळते. माणूस खूप श्रम करून धनसंपत्ती गोळा करतो. चोराच्या भयाने धन जमिनीत पुरून ठेवतो पण मेल्यावर काय होते ? साऱ्या पुरलेल्या धनाची माती माती होते. माणसाच्या मृत्यू नंतर त्याची देखील माती होते.[२८१] अरे माणवा, मुर्खा, अति संचय करू नये हे तुला का समजत नाही ? सदैव काम, क्रोध, विषय, तृष्णा ह्यात जळत राहिलास, कधीही संतसज्जनांची संगत धरली नाहीस. अरे वेड्या ! आता तरी शहाणा हो, त्या प्रभू परमात्म्यास शरण जा, त्या भगवंताला भज आणि निर्भय रहा.[२८२] त्या प्रभुचा आधार घे, तो नित्य तुला साथ देणारा आहे, निर्भय होऊन प्रभुचे स्मरण केले पाहिजे.

वरील पदांत संत नामदेव महाराज धन व माया मनुष्यासाठी सर्व काही नाही असे सांगतात. संत नामदेव महाराज सांगतात की, हे मानवा! तू प्रभुला शरण जा, त्या भगवंताचे भजन कर, तुझे यातच कल्याण आहे. माया मोहाने धोका खालेला मनुष्य माश्या, मोहळाच्या माश्या व गाईप्रमाणे आहे. मायेची साथ कच्ची तेथेच भगवंताची साथ पक्की आहे.[२८३] हे पद राग-सारंग मध्ये आहे.

---

**पद क्र.५४**

**रागु सारंग**

बदहु की न होड माधउ मो सिउ ॥
ठाकुर ते जनु जन ते ठाकुरू खेलु परिओ है तो सिउ ॥ १ ॥ रहाउ ॥
आपन देउ देहुरा आपन आप लगावै पुजा ।
जल ते तरंग तरंग ते है जलु कहन सुनन कउ दूजा ॥ १ ॥
आपहि गावै आपहि नाचै आप बजावै तूरा ।
कहत नामदेउ तूं मेरो ठाकुरू जनु ऊरा तू पूरा ॥ २ ॥ ५४ ॥[२८४]

---

**पदाचा अर्थ** :-या पदांत संत नामदेव महाराज सांगतात की, ईश्वर सर्वकाही आहे असे सांगून म्हणतात की, हे ईश्वरा ! माझ्या सोबत पैज लाव, शर्यत लाव. जर आम्ही सेवक नसतो तर तू ईश्वर कसा बनला असता. हे माधव, माझ्याशी विचार करून पहा, ही गोष्ट खरी आहे की हा जगरूपी खेळ तूझा आणि आमचा समानरूपी आहे कारण मालक आणि सेवक, सेवक आणि मालक ही पिढी चालतच आहे, म्हणजे जर कोणी मालक असेल तरच त्याचा कोणी सेवक असू शकतो आणि जर सेवक असेल तरच त्याचा कोणी मालक म्हणवू शकेल. तरी मालक प्रभु आणि सेवकाचे व्यक्तीत्व समान आहे. तुम्ही आणि मी वेगळे मुळीच नाहीत.

तुमच्यासोबत रोजच खेळत आहे. आपण दोघेसुध्दा दररोज एकच खेळ खेळत असतो. हे माधव, तू स्वत:च दैवत आहेस, तू स्वत:च मंदिर आहेस, तू स्वत:च जीवास आपली पूजा करावयास लावतोस. तू स्वत: देऊळ आहेस आणि तुझी पुजा सुध्दा करत असतो. ज्याप्रमाणे पाण्यापासून लाटा तयार होतात आणि लाटांपासून पाणी बनते.[२८५] पाण्यातून लाटा उठतात लाटांच्या एकरूपतेत पाण्याचे अस्तित्व आहे, हे फक्त सांगण्यासाठी व ऐकण्यासाठी वेगवेगळे आहे, परंतु मूळ रूपात दोन्ही एकच आहे. हे भगवंत, तुच गातो, तूच नाचतो, तूच मुरारी वाजवतो, तू प्रत्येक जीवांमध्ये आहेस तूच कर्ता व करविता आहेस. संत नामदेव महाराज म्हणतात की तू माझा ईश्वर आहेस, मी तुझ्यापुढे काहीच नाही. तुम्ही पूर्ण आहात आणि मी अपूर्ण आहे. नामदेव म्हणतात, हे माधव, तू माझा मालक आहेस, हे ठीक आहे की मी तुझा सेवक तुझ्यापेक्षा फार लहान आहे, अपूर्ण आहे आणि तू पूर्ण आहेस परंतु जर दास नसेल तर तू मालक कसा म्हणवशील ? तरीही, मला आपला सेवक म्हणून कायम ठेव. हे पद राग-सारंग मध्ये आहे.

---

**पद क्र.५५**

**रागु सारंग**

दास अनिंन मेरो निज रूप |
दरसन निमख ताप त्रई मोचन परसत मुकति करत ग्रिह कूप || १ || रहाउ ||
मेरी बांधी भगतु छडावै बांधै भगतु न छुटै मोहि |
एक सैम मो कउ गहि बांधे तउ फुनि मो पै जबाबु न होइ || १ ||
मै गुन बंध सगल की जीवनि मेरी जीवनि मेरे दास |
नामदेव जा के जीअ ऐसी तैसो ताकै प्रेम प्रगास || २ || ५५ ||[२८६]

---

**पदाचा अर्थ** :-या पदांद्वारे संत नामदेव महाराज ईश्वराच्या तोंडाने भक्तीची महिमा सांगतात व म्हणतात की ईश्वर हा भक्तांच्या प्रेमात बांधलेला असतो. जो कोणी माझा दास माझ्याविना कोणा दुसऱ्याशी प्रिती करत नाही तो दास माझा स्वयंस्वरूपीच आहे. एका क्षणासाठी त्याचे घडलेले दर्शन तीनही ताप निवारण करू शकतात, त्याची चरणधूळ गृहस्थाच्या जंजाळरूपी विहिरीतून त्याला वर घेते.[२८७] ईश्वर म्हणतो की भक्त हे माझेच रूप आहे. कारण भक्त हा दुसऱ्या तिसऱ्यावर प्रेम करत नसून फक्त माझ्यावरच प्रेम करतो. परमेश्वर सांगतात, माझे अनन्य भक्त हे माझेच रूप आहेत. त्याच्या क्षणभराच्या दर्शनाने जीव तापत्रायींपासून मुक्त होतो. संसारातून मुक्त होतो. भक्तांचे दर्शन केल्याने तीन ताप देहिक, दैविक व भौतिक नष्ट होतात. त्यांच्या स्पर्शाने गृहस्थीच्या आखाडामधून मनुष्य मुक्त होतो. ईश्वर म्हणतो की माझे संकट माझ ेभक्त दूर करतात. माझ्या एखाद्या भक्ताने मला जरी बांधून टाकले तरी सुध्दा मी काहीच करू शकत नाही. भक्तांनी बांधलेली बंधने मी तोडू शकत नाही. एकदा का मी भक्तांच्या बंधनात अडकलो की मग, मी

कोणत्याही उपायाने त्यातून सुटूच शकत नाही. मी गुणाने बांधलेला आहे. सर्वांचे जीवन मी आहे आणि माझे जीवन माझे भक्त आहेत. नामदेव महाराज सांगतात की, ही गोष्ट जेवढी आपल्या मनामध्ये बसेल तेवढीच त्याच्या हृदयामध्ये प्रकाश पडते. त्रिगुणांनी बांधल्या गेलेल्या सर्व जीवांचा मी आधार आहे. पण माझे भक्त माझा आधार आहेत. नामदेव सांगतात की, हे रहस्य ज्याला जितके समजेल तितका त्याच्या अंतर्यामी प्रभुप्रेमाचा प्रकाश पसरेल.[२८८] हे पद राग-सारंग मध्ये आहे.

---

**पद क्र.५६**

**रागु मलार**

१ ओं सतिगुर प्रसादि ||

सेबीले गोपाल राइ अकुल निरंजन |

भगति दानु दीजै जाचहि संत जन || १ || रहाउ ||

जांचै घरि दिग दिसै सराइचा बैकुंठ भवन

चित्रसाला सपत लोक सामानि पुरीअले |

जांचै घरि लछिमी कुआरी |

चंदु सुरजु दीवडे कंउतकु कालु बपुडा कोटवालु सुकरासि री |

सु ऐसा राजा स्त्री नरहरी || १ ||

जांकै घरि कुलालु ब्रहमा चतुर मुख डांवडा जिनि बिस्व संसारु राचीले |

जांकै घरि ईसरु बावला जगत गुरू तत सारखा गिआनु भाखीले |

पापु पुंनु जांचै डांगीआ दुआरै चित्र गुपतु लेखीआ |

धरमराइ परूली प्रतिहारू |

सो ऐसा राजा स्त्रीगोपालु || २ ||

जांचै घरि गण गंधरब रिखी बपुडे ढाढीआ गावंत आछै |

सरब सासत्र बहु रूपीआ अनकरुआ आखाडा मंडलीक बोल बोलहि काछे |

चउर ढुल जांचै है पवणु |

चेरी सकति जीतिले भवणु |

अंड टुक जांचै भसमती |

सो ऐसा राजा त्रिभवण पती || ३ ||

जाचै घरि कूरमा पालु सहस्त्र फनी बासकु सेज वालुआ ||

अठारह भार बनासपती मालणी छिनवै करोड़ी मेघमाला पाणीहारीआ |

नख प्रसेव जांचै सुरसरी सपत समुंद जांचै घडथल |

एते जीअ जांचै वरतणी |

सो ऐसा राजा त्रिभवण धंणी || ४ ||

जांचै घरि निकट वरती अरजनु ध्रू प्रहलादु अंबरीकु नारदु नेजै |

सिध बुध गण गंधरब बानवै हेला |

एते जीअ जांचै हहि घरी |

सरब बिआपिक अंतर हरी ||

प्रणवै नामदेउ तांची आणि |

सगल भगत जाचै नीसाणि || ५ || ५६ ||[२८९]

---

**पदाचा अर्थ :-** संत नामदेव वरील पदाचे वर्णन करतात की, हे जीवा ! तू त्याची सेवा कर, तू त्याची पूजा कर जो कुलरहित अथवा घरदाराविना आहे. मायेपासून खूप दूर आहे. संतमंडळी सर्वकाळ त्या ईश्वराला भक्तीचे दान मागत असतात. मी तर त्या प्रभूचे स्मरण करतो जो संपूर्ण सृष्टीचा रक्षक आहे, जो कुलरहित आहे, ज्यावर माया आपला प्रभाव पाडू शकत नाही आणि ज्याच्या दारात सर्व भक्त मागण्या मागत आहेत, आणि म्हणत आहेत हे दाता, आम्हास आपले भक्तीदान दे. ज्या ईश्वराचे घर चारही दिशांना बनलेला एक तंबू आहे. त्याचा महाल वैकुण्ठ आहे. तो प्रभु जणू एक मोठा महान राजा आहे ज्याकडे इतका मोठा मांडव आहे की चारही दिशा त्या मांडवाने व्यापलेल्या आहेत, राजवाड्यात चित्रशाळा असतात, प्रभु एक असा राजा आहे की संपूर्ण वैकुंठ त्याची चित्रशाळा बनली आहे, आणि संपूर्ण जगात त्याची आज्ञा एकसमान लागू आहे. तो महाल सुंदर अशा चित्रांनी सजवलेला आहे. तो सातही लोकांमध्ये समान आणि व्यापक आहे. ज्याच्या घरी लक्ष्मी कुमारी बसली आहे ज्याला पैशाची कमीच नाही. चंद्र व सूर्य ज्याच्या घराचे दिवे आहेत. विचार आणि काळ ज्याच्याकडे तमाशा करतो. राजाच्या राणीचे तारुण्य चार दिवसांचे असते, प्रभु एक असा राजा आहे की ज्याच्या महालात लक्ष्मी आहे. ती चिरतरुण राहाते, तिचे तारुण्य कधी नष्ट होणारे नाही, चंद्र-सुर्य हे त्याच्या महालाचे, जणू लहानसे दिवे आहेत. ज्या काळाची भिती प्रत्येक जिवाच्या डोक्यावर आहे, त्या काळापासून जगाचा प्रत्येक जीव थरथर कापतो आणि जो काळ ह्या शरीररूपी मगराचा कोतवाल आहे. तो बिचारा काळ त्या प्रभुच्या घरात जाऊन जणू एक खेळणे बनला आहे. शुक्राचार्य ज्याच्या घरचा कोतवाल आहे. तो असा नरहरि ईश्वर आहे ज्याच्या घरी चार तोंडाचा ब्रम्हा जो विश्वाची रचना करतो. ज्याच्या घरी मृत्यूचे ज्ञान देणारा शिव आहे जो मृत्यु आणि ईश्वराला ओळखणारा मोठा ज्ञानी आहे. ज्याच्या दारावर पहारेदार म्हणुन चित्रगुप्त नोकरी करतात. जे जीवांच्या कर्माचा लेखा-जोखा ठेवत असतात.[२९०] धर्मराज जो प्रलय करणारा आहे तो दरबारामध्ये वास्तव्य करतो. धर्मराज जे सद्‌विचारी माणसे नाहीत अशांना बाहेर सांगतो. अशाप्रकारचा हा खूप मोठा राजा आहे तो सर्व जीवांमध्ये असतो. ज्यांच्या घरी गण, गंधर्व व ऋषिमुनि प्रभु स्तुतीने गुणगान करतात. सर्व शास्त्रांनी नायकाचे रुप धारण करुन एक छोटासा आखाडा

बनविला आहे. संतंमडळी त्या नायकांची सुंदर वचने काटून छाटून मांडतात. माया शक्ती ज्या शक्तीने सर्व घरांना आहे ती ज्यांच्या घरी दासी म्हणून काम करते. त्या वारं घालण्याचं काम करते, टुकडे धरती व आकाश ज्याची गळती चूल आहे. हा असा माझा मालक स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तीन भवनाचा राजा आहे.[२९१] सृष्टीचा मालक प्रभु एक असा राजा आहे की काही लोकांच्या विचारांनुसार ज्या ब्रम्ह्याने संपुर्ण सृष्टीची उत्पत्ती केली, चार तोडें असणारा तो ब्रम्हाही त्या प्रभुच्या घरात भांडे घडविणारा एक कुंभारच आहे, म्हणजे त्या प्रभुच्या समोर लोकमान्यता पावलेल्या ब्रम्हाची तेवढीच किंमत आहे जेवढी एखाद्या गावात पाटलापुढे एखाद्या गरीब कुंभाराची असते. ह्या लोकांच्या दृष्टीत जर शिवजी जगाचा गुरू आहे, ज्याने जगातील जीवांसाठी खरा समजण्याजोगा उपदेश ऐकवला आहे, म्हणजे जो सर्व जीवास मृत्यूचा संदेश पोचवतो. जो सर्व जीवांचा नाश करणारा मानला जाते आहे. हा शिव सृष्टीचा मालक प्रभूच्या घरात जणू एक वेडा विनोदी आहे. राज महालासमोर चोपदार उभे असतात जे राजासमोर जाणाऱ्या लोकांना हटकवतात किंवा परवानगी देतात. सर्वव्यापी राजन प्रभूने असा नियम बनवला आहे की प्रत्येक जीवांनी केलेले चांगले किंवा वाईट कर्म त्या प्रभूच्या महालाचे चोपदार आहेत, म्हणजे प्रत्येक जीवाच्या अंतरी हृदय घरात प्रभु वसत आहे, परंतु जीवाचे केलेले चांगले-वाईट कर्म त्या प्रभूपासून अंतर निर्माण करतात. ज्या चित्रगुप्ताची भीती प्रत्येक जीवास लागून राहिली आहे तो चित्रगुप्त त्या प्रभूच्या घरचा लेखनिक मुनीम आहे. म्हणजे ज्यास लोक प्रलय आणणारा धर्मराज म्हणतात तो प्रभूच्या महालात एक साधारण दरबान आहे. [२९२] तीनही भवनांचा मालक प्रभु एक असा राजा आहे की त्याच्या दारात गण-गंधर्व, ऋषीमुनीहे सर्व गायक होऊन त्याची स्तुतिप्रशंसा गात आहेत, सर्व शास्त्रे जणू बहुरूपी आहेत, हे जग जणू त्याचा लहानसा आखाडा आहे. या जगातील राजे त्याच्या मागे मागे करतात. त्याच्या स्तुतीचे सुंदर बोल बोलतात. तो प्रभु एक असा राजा आहे की ज्याच्या दारात पवन वारा चवर घालणारा आहे. संपूर्ण जगास जिंकणारी माया त्याची दासी आहे. ही धरती त्याच्या लंगरात अन्नछत्रात जणू चूल झाली आहे. म्हणजे धरतीतील सर्व जीवांस तोच अन्न देणारा आहे.

ज्याच्या घरी कासव पलंगाचे काम करतो. हजार तोंडाचा साप म्हणजेच शेषनाग ज्याची शेज आहे, आठरा भार वनस्पतींना एका क्षणात पाणी देणाऱ्या ढगांच्या ज्याच्या घरी पंगती आहेत. नखाचा मळ अथवा घाम ज्याची गंगा आहे, सात समुद्र ज्याच्या घरी पंगती आहेत. सर्व जीव त्यांचे भांडे आहेत तो तीनही भवनांचा तो स्वामी आहे. ज्याच्या घराजवळ अर्जुन, ध्रुव, प्रल्हाद, अम्बरीष, नारद, नेत्रा ऋषी व बानवे गण गंधर्व हे आपापली कला दाखवितात. सर्वांमध्ये विद्यमान आहे. संत नामदेव महाराज म्हणतात की, त्याला शरण जा, त्याचे वर्णन सर्व संत व भक्त करीत आहेत. त्या ईश्वराला शरण जाऊन त्याच्या गुणांचे वर्णन करा. त्याच्या नामाचा जप व त्याचे नामस्मरण ही आपल्या जीवनाचे कल्याण करू शकते. जगातील हे सर्व जीवजंतू प्रभूच्या घरात आहेत. तो हरी प्रभु सर्वांत व्यापक आहे. सर्वांच्या अंतरी तो राहतो. संत नामदेव

विनंती करीत आहेत की, मला त्या प्रभूचा आधार आहे त्याच्या झेंड्याखाली छत्रछायेखाली सर्व भक्तगण आनंद अनुभवीत आहेत. [२९३] हे पद राग-मलिहार मध्ये आहे.

---

**पद क्र.५७**

**रागु मलार**

मो कउ तूं न बिसारि तून बिसारि ॥
तू न बिसारे रामईआ ॥ १ ॥ रहाउ ॥
आलावंती इहु भ्रमु जो है मुझ ऊपर सभ कोपिला ।
सूदु सूदु करि मारि उठाइओ कहा करउ बाप बीठुला ॥ १ ॥
मुए हुए जउ मुकति देहुगे मुकति न जानै कोइला ।
ए पंडीला मो कउ ढेढ कहत तेरी पैज पिछंउडी होइला ॥ २ ॥
तू जु दइआलु क्रिपालु कहीअतु है अति भुज भईओ अपारला ।
फेरि दीआ देहुरा नामे कउ पंडीअन कउ पिछवारला ॥ ३ ॥ ५७ ॥[२९४]

---

**पदाचा अर्थ :-** या पदांद्वारे संत नामदेव महाराज औंढा नागनाथ जिल्हा हिंगोली येथील मंदीराचे व मंदिरातध्ये आलेल्या अनुभवांचे कथन करतांना दिसतात.[२९५]

हे रामराया! तू मला विसरू नकोस. त्रिवार विनवतो की, तू मला विसरू नकोस. हे उच्च जातीचे लोक, त्यांचा असा भ्रम आहे की, तेच काय ते श्रेष्ठ आहेत. देवाची सेवा करण्याचा त्यांनाच काय तो अधिकार आहे. आम्ही नीच वर्णीयांनी देवळात पाऊलसुध्दा ठेवायचे नाही. मी मंदीरात आलो म्हणून ते माझ यावर क्रुध्द झाले आहेत. शुद्र शुद्र म्हणुन मला मंदीरातून हाकालुन लावले. बापा विठ्ठला ! मी मेल्यानंतर भले तू मला मुक्ती देशील, पण त्याचा काय उपयोग ? कोणाला कळणार आहे की, तू मला मुक्ती दिली आहेस ते ? हे पंडित मला शुद्र-शुद्र म्हणून हिणवत आहेत. पण त्याचे मला काय ? ह्यात तुझीच बदनामी होत आहे, बेअब्रू होत आहे. हे पंडीत लोक मला निच खालच्या जातीचा म्हणतात त्यामुळे तुझा गुण छोटा होत आहे, तू तर दयाळू आणि कृपाळू आहेस.[२९६] तुझ्या हातांचे बाहू खूप लांब आहेत. तू माझ्या डोक्यावर तुझा हात ठेव आणि प्रयत्न कर. मला तुझ्या चरणी ठेव. हे प्रभु ! तू तर परमदयाळू, परमकृपाळू, सर्वव्याप्त, बलशाली आहेस असे म्हणतात. मग ह्या पंड्यांना तुझी किमया दाखव ना. नामदेवाची ही आर्त विनवणी ऐकून प्रभूने लीला केली. भक्ताची विनवणी ऐकून भगवंताने ज्या ठिकाणी संत नामदेव महाराज बसले होते त्या ठिकाणाकडे आपल्या मंदिराचा दरवाजा फिरऊन स्वत: भगवान नामदेवांच्या समोर बसले व पंडित लोकांना पाठ दाखविली. संत नामदेव जिकडे जाईल तिकडे देऊळ फिरू लागले. अशा रितीने देवाने भक्तांचे रक्षण केले व आपल्या 'भक्त वत्सल' ह्या ब्रीदास राखले. हे पद राग-मलार मध्ये आहे.

**पद क्र.५८**

**रागु कानडा**

१ ओं सतिगुर प्रसादि ||

ऐसो रामराई अंतर जामी |

जैसे दरपन माहि बदन परवाणी || १ || रहाउ ||

बसै घटा घट लीप न छीपै |

बंधन मुकता जातु न दीसै || १ ||

पानी माहि देखु मुख जैसा |

नामे को सुआमी बीठलु ऐसा || २ || ५८ ||[२९७]

---

**पदाचा अर्थ** :-शुध्द स्वरूप प्रभु प्रत्येक जीवाच्या अंतरी वसलेला आहे परंतु प्रत्यक्ष निर्लेप राहातो, जसे आरशातील प्रतिबिंब होय. तो रामराया असा अंतर्यामी आहे की जणू आरशातील प्रतिबिंब होय.[२९८] तो प्रत्येक शरीरात वास करतो. तो शुध्द स्वरूप प्रत्येक घटकात वसत आहे. परंतु त्याच्यावर मायेचा प्रभाव पडत नाही. त्याच्यावर मायेचा यत्किंचितही डाग नाही इतका तो निर्मळ, निर्लेप आहे. तो नित्य मायाबंधनातून निराळा आहे. तो कधीही बंधनात अडकत नाही.[२९९] पाण्यात आपला चेहरा आपल्याला दिसतो पण पाण्यावर त्याचा काहीही परीणाम पडत नाही, तसा माझ्या नाम्याचा विठ्ठल आहे. तुम्ही पाण्यात जसे आपले तोंड पाहताना तोंड पाण्यात टिकलेले दिसते परंतु त्यावर पाण्याचा कोणताही प्रभाव पडत नाही. नाम्याचा स्वामी विठ्ठलही असाच आहे.[३००]

संत नामदेव महाराज भगवंतांचे वर्णन करतात की माझा राम सर्वांच्या ह्दयामध्ये निवास करतो. ज्याप्रमाणे शरीराचा प्रत्येक भाग आरशामध्ये प्रत्यक्ष दिसतो तसा माझा राम प्रत्येकाच्या ह्दयामध्ये आहे. त्याला माया स्पर्श सुध्दा करत नाही. तो बंधनातून मुक्त आहे. तसेच पाण्यात आपला चेहरा दिसतो. त्याप्रमाणे माझा विठ्ठल आहे. ईश्वर हा सर्वव्यापक असून निर्लेप आहे. हे पद राग-कानड़ा मध्ये आहे.

---

**पद क्र.५९**

**रागु प्रभाती**

१ ओं सतिगुर प्रसादि ||

मन की बिरथा मनु ही जानै कै बूझल आगै कहीऐ ||

अंतरजामी रामु रवांई मै डरू कैसे चहीऐ || १ ||

बेधीअले गोपाल गोसाई |

मेरा प्रभू रविआ सरबे ठाई ॥ १ ॥ रहाउ ॥

मानै हाटू मानै पाटु मानै है पासारी ।

मानै बासै नाना भेदी भरमतु है संसारी ॥ २ ॥

गुर कै सबदि एहु मनु राता दुबिधा सहजि समाणी ।

सभो हुकमु हुकमु है आपे निरभउ समतु बीचारी ॥ ३ ॥

जो मन जानि भजहि पुरखोतमु ता ची अबिगतु बाणी ॥

नामा कहै जगजीवनु पाइआ हिरदै अलख बिडाणी ॥ ४ ॥ ५९ ॥[३०१]

---

**पदाचा अर्थ :-**संत नामदेव या पदाद्वारे मनाचे दु:ख मनालाच सांगावे लागते असे सांगतात. मनाचे दु:ख त्याच व्यक्तीजवळ प्रकट करावे लागते ज्याला मन आहे. माझा ईश्वर मला आपल्या चरणी वेधिले आहे. आता मला तो प्रभु सर्व ठिकाणी वसताना दिसत आहे. ईश्वर तो सर्व ठिकाणी व्यापलेला आहे. त्याला सर्व काही समजते, मग मला भिती कशाला ? मी माझ्या मनाची व्यथा त्याच व्यक्तीजवळ कथन करेल ज्या व्यक्तीने माझ्या मनाला ओळखले आहे. तो सर्व ठिकाणी विद्यमान आहे. माझा ईश्वर सर्व ठिकाणी उभा आहे. माणसाचे मनच दुकान आहे. हे मनच नगर, शहर आहे. हा सर्व पसारा मनाचाच आहे. मनुष्याचे मन रंगामध्ये रंगत असते. मनुष्य मन या संसारामध्ये फिरत असते. गुरूच्या शब्दांमध्ये रंगून गेल्यानंतर मनुष्याची दुविधा वृत्ती संपून जाते. ज्या माणसाचे मन सद्गुरू शब्दांनी रंगून गेले आहे, त्याचे मी पण सहज अवस्थेत लीन झाले आहे तो समदर्शी होऊन जातो. तो निर्भय बनतो कारण त्यास सर्व ठिकाणी प्रभूचीच आज्ञा लागू असल्याचे दिसते. प्रभु स्वत:च आज्ञा देत आहे असे वाटते. जो व्यक्ती निर्भय बनतो तो ईश्वराला समसमान समजतो. जो मनुष्य ईश्वराला समसमान समजतो. जो मनुष्य ईश्वराला उत्तम पुरूष समजून त्याच्या गुणांचे वर्णन करतो त्याची भाषा व त्याचे शब्द सुध्दा अविनाशी व खरे ठरत असतात. जी माणसे उत्तम पुरूष प्रभुस सर्वव्यापी जाणून त्याचे स्मरण करतात, त्यांची वाणीही प्रभूचे नाम बनून जाते म्हणजे ते नित्य प्रभूची स्तुती प्रशंसाच करीत असतात. नामदेव म्हणतात की, त्या समदर्शी माणसांनी आश्चर्य, अलख्य आणि जगजीवन प्रभूस आपल्या ह्रदयातच कोरले आहे.[३०२] ईश्वराच्या रंगामध्ये रंगून गेल्यानंतर त्या व्यक्तीची भाषा व शब्द सत्य रूप बनत असतात. नामदेव महाराज असे म्हणतात की, गुरूकृपेमुळे मला जगजीवन भगवान प्राप्त झ ाला आहे. माझं ह्रदय आश्चर्यचकित झालं आहे. जो भक्त त्या पुरूषोत्तमाचे भजन करतो, त्याची वाणी अविनाशी, अटळ बनुन जाते. संत नामदेव महाराज सांगतात, मी माझ्या ह्रदयातच तो अदृश्य जादूगार प्राप्त केला आहे.[३०३] हे पद राग-प्रभाती मध्ये आहे.

---

**पद क्र.६०**

**रागु प्रभाती**

आदि जुगादि जुगादि जुगो जुगु ता का अंतु न जानिआ ।

सरब निरंतरि रामु रहिआ रवि ऐसा रुपु बखानिआ ॥ १ ॥

गोबिंदु गाजै सबदु बाजै आनंद रुपी मेरो रामईआ ॥ १ ॥ रहाउ ॥

बावन बीखू बानै बीखे बासु ते सुख लागिला ।

सरबे आदि परमलादि कासट चंदन भैइला ॥ २ ॥

तुम चे पारसु हम चे लोहा संगे कंचनु भैइला ।

तु दइआलु रतनु लालु नामा साची समाइला ॥ ३ ॥ ६० ॥[३०४]

---

**संत नामदेव यांच्या पदाचा अर्थ :-**संत नामदेव या पदाद्वारे असे वर्णन करतात की, ईश्वराचे अस्तित्व आदिकाळापासूनच आहे. युगायुगापासून त्या ईश्वराचा कोणीही अंत पाहू शकले नाही. त्याच्या रूपाबाबत असे म्हटले जाते की, तो ईश्वर सर्व ठिकाणी बसलेला आहे. सर्व जीवांमध्ये त्याचा अंश आहे. त्याचा हुकूम अधिकार सर्व ठिकाणी चालतो.[३०५] ज्या मानवाच्या ह्दयात गुरू शब्दाचे वाद्य वाजते तेथे माझा सुंदर राम, सुखस्वरूप राम, गोविंद प्रकट होतो. तो सुंदर राम संपूर्ण संसाराचे मूळ आहे, जिवांच्या आधीपासून आहे. प्रत्येक युगात त्याचे अस्तित्व आहे, त्या रामाच्या गुणांचा कोणीही अंत शोधु शकला नाही. तो राम सर्व जीवात एकसारखा व्यापक आहे. सर्व धर्मपुस्तकांनी त्या रामाचे काही अशाच प्रकारचे स्वरूप वर्णन केले आहे.[३०६]

जंगलात जसा चंदनाचा वृक्ष असतो, त्याच्या सुगंधाने सर्वांस सुख मिळते, त्याच्या संगतीत साधारण वृक्षसुध्दा चंदन बनुन जातात. तसाच तो राम, सर्व जीवांचा मूळ राम, सर्व गुणरूपी सुगंधीचा मूळ आहे, त्याच्या संगतीत साधारण जीवही गुणवान बनतात. त्याचप्रमाणे हा भगवंत परीस आहेस आणि जीव लोखंड आहे.[३०७]

हे माझ्या सुंदर रामा, तू परीस आहेस, मी लोखंड आहे. तुझ्या संगतीत मीही सोने बनलो आहे. तू दयेचे घर आहेस, तू रत्न आहेस, तू लाल आहेस. मी नामा तर नित्य स्थिर राहाणाऱ्या प्रभुतच लीन झालो आहे. नामस्मरण केल्यामुळे ईश्वराचे सर्व गुण भक्तामध्ये येत असतात. हे प्रभु, तु दयाळू आहेस, रत्न आहेस, लाल आहेस, मी तुझ्यातच सामावलेला आहे.[३०८] हे पद राग-प्रभाती मध्ये आहे.

---

**पद क्र.६१**

**रागु प्रभाती**

अकुल पुरख इकु चलितु उपाइआ ॥

घटि घटि अंतरि ब्रहमु लुकाइआ ।

जीअ की जोति न जानै कोई ।

तै मै कीआ सु मालूमु होई ॥ १ ॥ रहाउ ॥

जिउ प्रगासिआ माटी कुंभेउ ।

आप ही करता बीठुलु देउ ॥ २ ॥

जीअ का बंधनु करमु बिआपै ।

जो किछु कीआ सु आपै आपै ॥ ३ ॥

प्रणवति नामदेउ इहु जीउ चितवै सु लहै ।

अमरु होइ सद आकुल रहै ॥ ४ ॥ ६१ ॥[३०९]

---

**पदाचा अर्थ :-**ज्या प्रभूचे कोणतेही विशेष कुळ नाही, त्या सर्वव्यापक प्रभुने जगरूपी हा एक खेळ बनवला आहे, प्रत्येक शरीरात, प्रत्येकांत अंतरी त्यांनी आपला आत्मा गुप्त ठेऊन दिला आहे. परमेश्वराचा उगम कोणालाच माहित नसून तो कुलरहित आहे. ईश्वराने हा खेळ रचला आहे. सर्व ठिकाणी ब्रम्ह रूप लपऊन ठेवलेले आहे.[३१०] सर्व जीवात राहणाऱ्या ज्योतीला कोणी प्राणी जाणत नाही, परंतु आम्ही सर्व जीव जे काही करतो ते आमच्या अंतरी राहणाऱ्या ज्योतीस माहीत असते. तो प्रत्येक जीवांमध्ये आहे. जीव आपल्या शरीरामध्ये जी तळपती ज्योत आहे तीला ओळखत नाही. जे जीव करते त्याचीच त्याला माहिती असते. जे ईश्वराने केले आहे. याचा ठावठिकाना मात्र जीवाला लागत नाही.[३११]

ज्याप्रमाणे मातीतून घडा बनतो तसेच त्या परम ज्योतीतून सर्व जीव बनतात. परंतु तो विठ्ठल प्रभु सर्वास उत्पन्न करणारा आहे. जिवांनी केलेली कामे त्यासाठी जंजाळ होऊ शकतात, परंतु हे जंजाळ इत्यादीची जे काही बनविले आहे ते सर्व प्रभूने स्वत:च बनवले.[३१२] हे ईश्वरा सर्वकाही करणारा तूच आहेस, कर्म जीवाला बंधनामध्ये बांधते, परंतु हे ईश्वरा ते सर्व काही तूच करत असतो. जे सर्व काही होते ते तूच करत असतो. संत नामदेव महाराज ईश्वरासमोर प्रार्थना करतात की, ईश्वर जीवाला ते देतो जी जीवाची भावना असते, जे जीव त्या ईश्वराच्या मर्जीमध्ये राहतात ते अमर होतात. सर्व जीवांमध्ये ईश्वररूपी ज्योत आहे. संसाराच्या रचनेचा खेळ ईश्वरानेच रचलेला आहे. स्वयंभू परमात्म्याने हा विश्वाचा खेळ मांडला आहे. तो प्रत्येक शरीरात त्याचाच वास आहे. प्रत्येक जीवाच्या ठायी गुप्तरूपाने वास करणाऱ्या त्या परमात्म्यास मात्र ओळखत नाही.नामदेव विनंती करतात की, हा जीव ज्या वस्तूवर आपला जीव टिकवतो त्यास प्राप्त करून घेतो, मायाजाळाची इच्छा करतो आणि त्यात अडकून पडतो, परंतु जर हा जीव सर्वव्यापी प्रभूस आपल्या मनात टिकवेल तर त्या अमर प्रभूत टिकून अमर होऊन जाईल. हे पद राग-प्रभाती मध्ये आहे

# ५.२ संत त्रिलोचन व त्यांचे पदे :-

संत त्रिलोचन यांचा जन्म महाराष्ट्रातील सोलापूर जिल्ह्यातील बार्शी या गावात झाला. संत त्रिलोचन यांचा जन्म इ.स.१२५० मध्ये झाला असे बऱ्याच संशोधकाचे मत आहे.[३१३] संत त्रिलोचन यांची मराठी अभंग पदे आजवर मिळू शकलेली नाहीत. त्यांच्या जीवनचरित्राचीही नीटशी माहिती मिळत नाही, संत त्रिलोचन यांचा जीवन काळ इ.स.१२६७ ते इ.स.१३३५ आहे.[३१४] संत त्रिलोचन हे मध्ययुगीन काळातील संत असून यांची ४ पद शिखांचा धर्मग्रंथ गुरू ग्रंथ साहिब यामध्ये समाविष्ट आहे.[३१५] महान कोशानुसार संत त्रिलोचन यांचा जन्म इ.स. १२६९ मध्ये वैश्य जातीत झाला.[३१६] संत त्रिलोचन महाराज यांना मुल-बाळ नव्हते ते एक श्रीमंत व्यापारी होते. संत त्रिलोचन महाराष्ट्रातून नामदेवरायांबरोबर पंजाबात गेले असावेत. त्यांच्या पदांना श्रीगुरूग्रंथसाहिबमध्ये आवर्जुन स्थान दिले गेले यावरून त्याचा पंजाबातील प्रभाव स्पष्ट होतो.[३१७] श्री गुरूग्रंथसाहिबात मध्ये त्यांचे चार पदे समाविष्ट आहेत. संत त्रिलोचन यांचे श्री गुरूग्रंथसाहिबा तील पद खालील प्रमाणे आहे.

**सारणी क्र.५.२ संत त्रिलोचन यांचे ४ पदे व त्यातील संगीत राग.**

| अ.क्र. | राग | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | श्री राग | १ |
| २ | गुजरी | २ |
| ३ | धनासरी | १ |
| | **एकूण** | **४** |

**आलेख क्र.५.२ संत त्रिलोचन यांचे ४ पदे व त्यातील संगीत राग.**



**पद क्र. १**

**श्री राग त्रिलोचन**

माइआ मोहु मनि आगलड़ा प्राणी मरा मरणु भउ विसरि गइआ ||

कुटंबु देखि बिगसहि कमला जिउ पर घरि जोहहि कपट नरा ||

दुड़ा आइओहि जमहि तणा ||

तिन आगलड़ै मै रहणु न जाइ ||

कोई कोई साजणु आइ कहै ||

मिलु मेरे बीठुआ लै बाहड़ी वलाइ ||

मिलु मेरे रमईआ मै लेहि छडाइ || १ || रहाउ ||

अनिक अनिक भोग राज बिसरे प्राणी संसार सागर पै अमरू भइआ ||

माइआ मूठा चेतसि नाही जनमु गवाइओ आलसीआ || २ ||

बिखम घोर पंथि चालणा प्राणी रवि ससि तह न प्रवेसं ||

माइआ मोहु तब बिसरि गइआ जां तजीअले संसारं || ३ ||

आजु मैरे मनि प्रगटु भइआ है पेखीअले धरमराओ ||

तह करदल करनि महाबली तिन आगलड़ै मै रहणु न जाइ || ४ ||

जे को मूं उपदेसु करतु है ता वणि त्रिणि रतड़ा नाराइणा ||

ऐजी तूं आपे सभ किछु जाणदा बदति त्रिलोचनु रामईआ || ५ || १ ||[३१८]

---

**पदाचा अर्थ :-** हे प्राणी, तुझ्या मनात मायामोह फार जोर करून राहिला आहे, तुला हे भयही नाही की म्हातारपण येणार आहे. मृत्यू येणार आहे. हे कपटी मानवा, तू आपल्या परिवारास पाहून कमळपुष्प जसे सूर्यास पाहून प्रफुल्लित होते तसाच प्रफुल्लित होते तसाच प्रफूल्लित होऊन जातोस, तुझे लक्ष दुसऱ्यांच्या घराकडेच लागून राहतो. हे जीवा, तुला मायेचा मोह इतक्या मोठ्या प्रमाणावर आहे की त्यामुळे तुला वृध्दत्व व मृत्यूच्या भयाचाही विसर पडला आहे. सूर्याचे दर्शन होताच कमळ ज्याप्रमाणे प्रफुल्लित होते, त्याप्रमाणे परिवार पाहून तुझे मन प्रसन्न होते. पण अंतरात कपट असते व परस्त्रीकडे तुझे मन जाते. [३१९]

कोणी विरळ संतजन जगात येऊन अशी विनंती करतो की हे प्रभु, मला भेट, गळयात गळा घालून भेट. हे माझ्या रामा, मला भेट. मला माया मोहातून सोडव, यमदूत लागोपाठ येत आहेत, त्यांच्यासमोर मला क्षणभरही टिकाव धरता येणार नाही.[३२०] पण जेव्हा यमदूत मृत्यूचे पाश घेऊन येतात तेव्हा त्यांच्या पुढे त्याचा निभाव लागत नाही. तेव्हा कोणी विरळा भक्तच म्हणतो की, हे प्रभु! मला तुझ्या ह्रदयाशी धर. हे सर्वत्र रममाण होणाऱ्या प्रभू परमात्म्या ! मला ह्या कष्टातून वाचव माझी ह्या बंधनातून मुक्तता कर.

हे प्राणी, मायेच्या अनेक भोगापायी तू प्रभूस विसरून बसला आहेस, तू समजतोस की या संसारसमुद्रात तू नित्य कायम राहशील, मायेनी ठकवलेला तू प्रभूस स्मरण करत नाहीस. हे आळशी मानवा, तू आपले जीवन वाया घालवले आहेस. हे जीवा! तू नानाप्रकारचे भोग विलासात मग्न होऊन त्या प्रभू परमात्म्यास पार विसरून गेलास. ह्या संसारास मात्र तू स्वत:स अमर समजतोस. मायामोहात गुंतून गेल्याने तुझ्या मनात प्रभुनाम येतही नाही. प्रभुला विमुख होऊन तू तुझा जन्म आळसात वाया लावत आहेस.

हे प्राणी, तू मायामोहाच्या एका अशा अवघड अंधार मार्गावर चालत आहेस जेथे सूर्यासही प्रवेश नाही आणि चंद्रासही प्रवेश नाही, म्हणजे जेथे तुला दिवसाही काही सुचत नाही आणि रात्री काही सुचत नाही. मरण समयी, संसार सोडतांना मायेचा हा मोह संबंध अवश्य सोडावाच लागेल तर मग आताच का नाही सोडून देत ? हे जीवा, तू ध्यानात ठेव तुला अशा अंधकारमय कठीण मार्गाने जायचे आहे की जेथे ज्ञानरूप चंद्र-सूर्यास प्रवेशही प्राप्त होत नाही. जेव्हा तू ह्या जगातून निघून जाशील तेव्हाच तुला ह्या मोहमायेचा विसर पडेल.

कोणी विरळ संतजन म्हणतो - माझ्या मनात ही गोष्ट प्रत्यक्ष घडली आहे की मायेत गुंतून राहता धर्मराजाचे तोंड पहावे लागेल, तेथे मोठमोठ्या बलवानानांही यमदूत हाताने दळून टाकतात, त्यांच्या समोर मला काही करता येणार नाही. आज आता माझ्या मनात प्रकाश पडतोय, की एक ना एक दिवस आपल्याला धर्मराजापुढे उभे राहावे लागणारच आहे. तो मला हाताने चुरडून टाकील. त्याच्या महान बाहुबली दूतापूढे कोणाचे काही चालत नाही. त्यांच्या पुढे माझा काय पाड लागणार. हे नारायण, एरव्ही तर तूझे कधी स्मरण होत नाही, परंतु जेव्हा कोणी गुरूमुख मला उपदेश करतो तेव्हा तू सर्व ठिकाणी व्यापक दिसू लागतोस. जेव्हा मला कोणी हरीचा उपदेश करतो, तेव्हा मला कळते की प्रभू परमात्मा वनात, तृणात सर्वत्र आहे. सर्वत्र तो प्रभू परमात्माच वास करतो. संत त्रिलोचनजी सांगतात, की माझा रामराया सर्व काही जाणतो, माझी रक्षा करतो.

संत त्रिलोचन यांचा श्री गुरूग्रंथसाहिबातील दुसरे पद या पदाला रागु गुजरी असे म्हणतात. रागु गुजरी खालील प्रमाणे आहे.

---

**पद क्र. २**

**रागु गुजरी**

अंतर मलि निरमलु नही कीना बाहरी भेख उदासा |

हिरदै कमलु घटि ब्रहमु न चिन्हा काहे भइआ संनिआसी || १ ||

भरमे भूली रे जै चंदा |

नही नही चीन्हिआ परमानंदा || १ ||

घरि घरि खाइआ पिंडु बधाइआ खिंधा मुंदा माइआ ||

भूमि मसाण की भसम लगाई गुर बिनु ततु न पाइआ || २ ||

काइ जपहु रे काइ तपहु रे काइ बिलोवहु पाणी ।

लख चउरासीह जिन्हि उपाई सो सिमरहु निरबाणी ॥ ३ ॥

काइ कमंडलु कापड़ीआ रे अठसठि काइ फिराही ।

बदति त्रिलोचनु सुनु रे प्राणी कण बिनु गाहु की पाही ॥ ५ ॥ २ ॥[३२१]

---

**पदाचा अर्थ :-**जर कोण माणसाने अंतरील आतील मलीन मन स्वच्छ केले नाही परंतु बाहेर शरीरावर साधूचा वेष धारण केलेला आहे. तर त्यांनी आपल्या हृदयरूपी कमळ पुष्पास प्रभुस ओळखले नाही, तर त्यानी आपल्या अंतरातील प्रभूस पाहिले नाही, तर संन्यास धारण करण्याचा काहीही लाभ होणार नाही . संपुर्ण जग त्या चुकीच्या समजूतीत गुंतून गेले आहे की निव्वळ साधुचा वेष धारण करता प्रभूची भेट शक्य आहे, परंतु ही समजूत चुकीची आहे, असे करुन परमानंद प्रभूची जाणीव कधीच होत नाही.[३२२] हे योगी, जर तुझे अंत:करण मलिन असेल, मन निर्मल नसेल तर बाहेर भगवी वस्त्रे घालून वैराग्याचा देखावा निर्माण करून काय प्राप्त होणार ? आपल्या हृदयकमलात विराजमान असलेल्या प्रभू परमात्म्यास, त्या परब्रम्हास जर तू ओळखले नाहीस तर संन्यास घेण्याचा लाभ काय ? हे जयचंद ! सारी सृष्टी मायेच्या भ्रमात भुलली आहे. बाह्यपेहरावाने त्या परमानंद परमात्म्यास ओळखला येत नाही, प्राप्त करता येत नाही. हे योगी ! तू घरोघर भिक्षा मागून त्या अन्नावर तुझा पिंड पोसलास. तुझे शरीर पोसलेस. अंगावर कांबळे, कानात मुद्रा धारण केल्यास, स्मशनातील चिताभस्म अंगाला फासलेस. ह्या साऱ्या बाह्य गोष्टी झाल्या. पण सद्‌गुरूशिवाय तुला मूलतत्व, प्रभू परमात्मा प्राप्त होणार नाही.

ज्या माणसाने घरोघरी जाऊन तुकडे मागून खाल्ले, आपल्या शरीराचे चांगले पालन केले, शरीरावर गोधडी घालून घेतली, मुद्राही वापरू लागला, परंतु सर्व काही मायेसाठीच केले, संसारभूमीतील भस्मे शरीरावर लावली परंतु जर तो गुरूमार्गावर चालला नाही तर त्यास हे सर्व करुनही सत्याची प्राप्ती होत नाही.

हे बंधु, का मोजके जप करता ? त्या वासनारहित प्रभूचे सदासर्वदा स्मरण करा. ज्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनी असणारी सृष्टी उत्पन्न केली आहे. तू हे जे जप-तपाने प्रभु परमात्मा प्राप्त होणार नाही. ज्या प्रभू परमात्म्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनी निर्माण केल्या, त्या मुक्तीदाता प्रभू परमात्म्याचे स्मरण कर. हे भगवी वस्त्रे धारण करणाऱ्या योगी, तू हातात कटोरा घेऊन विनाकारण अडूसष्ट तीर्थयात्रा कशाला करतोस.[३२३]

हे कापडी, हातात कमंडलु घेण्याचा काही लाभ नाही. अडुसष्ट तीर्थांवर भ्रमंती करण्याचाही लाभ नाही. संत त्रिलोचन म्हणतो, हे मानवा, जर शेतात बीज पेरले नाही, तर गव्हाची उत्पत्ती कशी होईल ? गहू कसा उगवेल. त्रिलोचन सांगतात, असे करणे म्हणजे धान्याच्या कणही नसलेल्या पोचट कणसातून धान्य काढण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे.

संत त्रिलोचन यांचे श्री गुरूग्रंथसाहिबातील तिसरे पद खालील प्रमाणे आहे.

**पद क्र. ३**

**रागु गुजरी**

अंति कालि जो लछमी सिमरै ऐसी चिंता महि जे मेरे ॥

सरप जोनि वलि वलि अउतरै ॥ १ ॥

अरी बाई गोबिंद नामु मति बिसरै ॥ रहाउ ॥

अंति कालि जो इसत्री सिमरै ऐसी चिंता महि जे मरै ॥

बेसवा जोनि वलि वलि अउतरै ॥ २ ॥

अंति कालि जो लड़िके सिमरै ऐसी चिंता महिजे मरै ॥

सूकर जोनि वलि वलि अउतरै ॥ ३ ॥

अंति कालि जो मंदर सिमरै ऐसी चिंता महि जे मेरे ॥

प्रेत जोनि वलि वलि अउतरै ॥ ४ ॥

अंति कालि नाराइणु सिमरै ऐसी चिंता महि जे मरै ॥

बदति त्रिलोचनु ते नर मुक्ता पीतंबरू वा के रिदै बसै ॥ ५॥ ३ ॥[३२४]

**पदाचा अर्थ :-**हे भगिनी, माझ्यासाठी प्रार्थना कर, मला कधीही प्रभू नामचे विस्मरण होऊ नये जेणे करून अंतसमयी प्रभूच लक्षात रहावे त्याचे स्मरण रहावे. जो मनुष्य मृत्यूसमयी धन, पदार्थ लक्षात ठेवतो, स्मरण करतो आणि त्या विचारातच मरून जातो, तो परत परत सर्प योनीत जन्म घेतो.[३२५] ह्या पदात मृत्यूनंतरच्या पुनर्जन्माबद्दल भक्त त्रिलोचनची वर्णन करतात. ह्या जन्मातील कर्मावर पुढचा जन्म अवलंबून असतो. असे सांगून ह्या जन्मात सदविचार, सदाचरण व ईश्वर भक्ती करावी असा उपदेश ते करतात. भक्त त्रिलोचन सांगतात. जो जीव मृत्यूसमयी लक्ष्मीचा, धनाचा विचार करतो, त्याचीच चिंता करतो तो पुढील जन्म सर्पयोनीत प्राप्त करतो.[३२६]

जो मनुष्य मृत्यूसमयी आपल्या स्त्रीचेच स्मरण करतो, आणि त्या स्मरणातच प्राणत्याग करतो तो परत वैश्येचा जन्म घेतो. जो मनुष्य अंतसमयी आपल्या पुत्राचेच स्मरण करतो आणि पुत्रांचे स्मरण करता करताच मरून जातो तो परत परत डुकराच्या योनीत जन्म घेतो. हे माते, मला प्रभुनामाचा कधीही विसर पडू नये. अंतसमयी जो स्त्रीचा विचार करतो व त्या चिंतेतच मृत्यू पावतो, त्याला पुढील जन्म वेश्येचा येतो. अंतकाळी जो जीव मुलाबाळांचा विचार करतो व त्यांच्याच चिंतेत मृत्यू पावतो, त्यास वारंवार डुकराचा जन्म प्राप्त होतो.[३२७]

जो मनुष्य अंतसमयी आपल्या घर, माड्यासंबंधी चिंतातुर होतो आणि या चिंतेतच शरीर सोडून जातो तो परत परत प्रेत बनतो. संत त्रिलोचन म्हणतात, जो मनुष्य अंतसमयी प्रभूचे स्मरण करतो आणि या स्मरणात टिकून राहताच परलोक गमन करतो तो मनुष्य धन, स्त्री, पुत्र, आणि घर इत्यांदीच्या मोहातून मुक्त

होऊन जातो, त्याच्या हदयात प्रभु स्वत: येऊन निवास करतो. अंतसमयी जो घरादाराचा, स्थावर मालमत्तेचा विचार करतो, त्याच चिंतेत मृत्यू पावतो. तो पुढील जन्म भूतयोनीत प्राप्त करतो. भक्त त्रिलोचन सांगतात, अंतसमयी जो प्रभू परमात्म्याचाच विचार करतो व प्रभूचे नामस्मरण करत मृत्यू पावतो. तो जीव जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होतो. त्याच्या ह्दयात प्रभू परमात्मा वास करतो. हे रामजी, तुझे तूच जाणतोस --माझी, त्रिलोचनची हीच विनंती आहे.

संत त्रिलोचन यांचे श्री गुरूग्रंथसाहिबातील चवथे पद खालील प्रमाणे आहे.

---

**पद क्र. ४**

**रागु धनासरी**

**१.ओ सतिगुर प्रसादि ||**

नाराइण निंदासे काइ भूली गवारी ||
दुक्रितु सुक्रितु थारो करमु री || १ || रहाउ ||
संकरा मसतकि बसता सुरसरी इसनान रे ||
कुल जन मधे मिल्यियो सारगपान रे ||
करम करि कलंकु मफीटसि री || १ ||
बिस्व का दीपकु स्वामी ता चे रे सुआरथी पंखी राई गरुड़ ता चे बाधवा ||
करम करि अरुण पिंगुला री || २ ||
अनिक पातिक हरता त्रिभवण नाथु री तीरथि तीरथि भ्रमता लहै न पारुरी ||
लहै न पारू री ||
करम करि कपालु मफीटसि री || ३ ||
अंम्रित ससीअ धेन लछिमी कलप तर, सिखरि, सुनागर नदीचे नाथं ||
करम करि खारु मफिटसि री || ४ ||
दाधिले लंका गडु उपाड़ीले रावण बणु सलि बिसलि आणि तोखीले हरी ||
करम करि कछउटी मफीटसि री || ५ ||
पूरबलो क्रित करमु न मिटै री घर गेहणि ता चे मोहि जापिअले राम च नामं ||
बदति त्रिलोचन राम जी || ५ || ४ ||[३२८]

---

**पदाचा अर्थ** :-हे विसरभोळे मूर्ख जीव स्त्री, तू प्रभेस का दोष देतेस ? पाप-पुण्य तुझी स्वत:ची केलेली कामे आहेत. स्वत: केलेल्या कर्मानुसार चंद्रावर पडलेला डाग हटू शकला नाही, जरी तो शिवजीच्या मस्तकी वास करतो, नित्य गंगेत स्नान करतो, आणि त्याच्या कुळात विष्णूंनी कृष्णरूप धारण केले. हे मुर्ख जीवा! तू प्रभू

परमात्म्याला का दोष देतोस. जे काही सुख-दु:ख तू भोगतो आहेस ती तुझ्याच कर्माची फळे आहेत. तो चंद्र पहा, श्रीशंकराच्या मस्तकावर विराजमान झाला आहे.[३२९]

स्वत:च्या कर्मामुळेच अरूण पिंगळराच राहिला, संपूर्ण जगास सूर्य जरी त्याचा स्वामी असला आणि सूर्याचा तो सारथी असला तरी पक्षांचा राजा गरूड त्याचा नातेवाईक आहे. इतके असूनही अरूण पिंगळाच राहिला. श्रीकृष्णाचा जन्म झाला, असा हा चंद्र आहे. पण त्याच्यावरचा कृतकर्माचा कलंक आहे तो पुसला जात नाही. तो अरूण, सर्व जगाला प्रकाश देणाऱ्या सूर्याचा तो सारथी पक्षिराज गरूड त्याचा भाऊ आहे. असा हा अरून पांगळा आहे. आपल्या कृत कर्माची फळे भोगत आहे. त्याचे पांगळेपणा कोणीही नष्ट करू शकले नाही.

ब्रम्हहत्त्या केल्यामुळे शिवजींच्या हातातून कपाळ उतरू शकले नाही. शिवजी जरी संपूर्ण विश्वाचे नाथ समजले जातात, इतर जीवांचे असंख्य पापांचे नाश करणारे आहेत तरीही प्रत्येक तीर्थावर भटकून फिरूनही त्या कपाळापासून त्यांची सुटका होत नव्हती.[३३०] शिवाच्या जटातून निघालेल्या पापनाशिनी गंगेत तो सतत स्नान करतो. त्याच्याच चंद्रवंशात शारंगपाणी श्रीकृष्णाचा जन्म झाला, असा हा चंद्र आहे. पण त्याच्यावरचा कृतकर्माचा कलंक कायम आहे तो पुसला जात नाही. स्वत: केलेल्या मंद कर्मानुसार समुद्राचा खारटपणा जाउ शकला नाही, जरी तो सर्व नद्यांचा नाथ आहे आणि त्यातून अमृत, चंद्र, कामधेनु, लक्ष्मी, कल्पतरू, सात तोंडे असणारा घोडा, धन्वंतरी इत्यादी चौदा रत्ने निघाली होती. स्वत: केलेल्या कर्माधीनतेने हनुमानाच्या भाग्यात त्याची लहानशी कच चड्डी काही केल्या गेली नाही जरी त्यांनी श्री रामचंद्राकरिता लंकेचा किल्ला जाळला व लंकापति रावणाच्या बागेचा नाश केला, जडीबुटी आणून श्री रामचंद्रास प्रसन्नही केले.

मागे केलेले कोणतेही कर्म अवतार पूजा, तीर्थस्नान इत्यादी व्दारे मिटवता येत नाही, तरी मी तर प्रभू नामाचे स्मरण करतो. संत त्रिलोचन म्हणतो, मी तर रामनामाचा तप करतो. म्हणजे प्रभूचाच आधार घेतो आणि आपण केलेल्या कर्मामुळे आपल्या दु:खबद्दल प्रभूस दोष देत नाही.

## ५.३ संत परमानंद व त्यांचे पदे :-

हिंदी साहित्याच्या इतिहासात ब्रिज भाषेत जे आठ कवी घेतले जाते तेच हे परमानंद आहेत.[३३१] परमानंदजींचा जन्म कन्नोज येथे कान्यकुब्ज ब्राम्हण वंशात इ.स.१४९३ मध्ये झाला आणि ते शतायुषी होऊन इ.स.१५९३ मध्ये इहलोकाची यात्रा संपवून निघून गेले. महाराष्ट्र सोलापूर जिल्ह्यातील बार्शी गावात ब्राम्हण कुळात ह्यांचा जन्म झाला.[३३२] मैकालिफ या ब्रिटीश लेखकाच्या मतानुसार परमानंददास अष्टछाप मधील परमानंदच आहेत आणि ते महाराष्ट्रातील सोलापूर जिल्ह्यातील बार्शी या गावातील राहणारे होते.[३३३] श्री 'गुरूग्रंथसाहिब' या शीख धर्मग्रंथामध्ये परमानंदजींचा एकच शब्द पद सारंग राग मध्ये आहे.[३३४] जोगा परमानंद बार्शीचे होते. आणि ते संत नामदेवसमकालीन आहेत. दोहोंच्या अनुबंधाची महिपतींनी दिलेल्या आख्यायिकांतून माहिती मिळते. बार्शी येथील प्राचार्य डॉ. सुधाकर देशपांडे यांनी यासंदर्भात केलेल्या लेखनातील महत्त्वाचा अंश असा, "हे ज्ञातीचे शूद्र होते असे महपितीबुवांनी म्हटले आहे. पण ते तेली समाजाचे होते अशी अनेकांची भावना आहे. त्यांचे गुरू परमानंद म्हणून ते जोगा परमानंद म्हणवीत. बार्शीच्या भगवंताचे आणि पंढरीच्या पांडुरंगाचे ते परम भक्त होते. त्यांचे कडक वैराग्य आणि साधुत्व प्रसिध्द आहे. बार्शीत त्यांची समाधी असून मार्गशीर्ष वद्य चतुर्थी दिवशी त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव साजरा केला जातो."

काहींच्या मते महाकवी सूरदास यांच्या अष्टछाप कविमंडळातील परमानंद आणि जोगा परमानंद भिन्न नव्हते. कृष्णभक्त परमानंद हे कान्यकुब्ज ब्राम्हण होते. त्यांच्या काळ इ.स.१४९३ ते इ.स.१५९३ मानला गेला असून ते वल्लभाचार्याचे ज्येष्ठ वैष्णव शिष्य होते. त्यांची वाणी परमानंदसागर मध्ये संकलित केली गेली ती अर्थातच श्रीकृष्णभक्तीवर आहे.[३३५]

मेकॉलिफने हे 'अष्टछाप' कवींपैकी परमानंद बार्शीचे असल्याचे सांगून ठेवल्यामूळे पुढीलांनी तेच ग्राह्य धरले असे दिसते.

संत परमानंदाचे श्री गुरूग्रंथसाहिबातील पद पुढील प्रमाणे आहे.

---

**पद क्र. १**

**रागु सारंग**

तै नर | किआ पुरानु सुनि कीना |

अनपावनी भगति नही उपजी |

भूखे दानु न दीना || १ || रहाउ ||

कामु न बिसारिओ क्रोधु न बिसरिओ

लोभु न छूटिओ देवा |

पर निंदा मुख ते नहीं छूटी

निफल भई सभ सेवा ॥ १ ॥

बाट पारि घरू मूसि बिरानो

पेटु भरै अपराधी ॥

जिही परलोक जाइ अपकीरति

सोई अबिदिआ साधी ॥ २ ॥

हिंसा तउ मन ते नही छूटी

जीअ दैइआ नहीं पाली ॥

परमानंद साध संगति मिली

कथा पुनीत न चाली ॥ ३ ॥ १ ॥ ६ ॥[३३६]

---

**पदाचा अर्थ :-**हे बंधू, पुराण इ. धर्म पुस्तके ऐकून तू कमाई तर काहीच केली नाहीस, तुझ्या अंतरी प्रभूची अटळ भक्तीही उत्पन्न झाली नाही आणि तू कुणा गरजूची सेवाही केली नाहीस.[३३७] हे बंधू, धर्मपुस्तके ऐकूनही तुझ्यातील कामही गेला नाही, क्रोधही गेला नाही आणि लोभही संपले नाहीत. ह्रदयातून परनिंदा करण्याची सवयही गेली नाही, पुराण इ. वाचण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. पुराण इ. ऐकूनही पापी माणूस दुसऱ्यांची घरे करीत राहिला. त्यामुळे त्यास पुढच्या जीवनातही बदनामीचा टिळाच लागला.[३३८] हे नरा ! तू पुराणातील कथा ऐकून काय केलेस ? अक्षयभक्तीही केली नाहीस, भुकेलेल्याला अन्नदानही केले नाहीस. तुझ्या मनातील कामभावना नष्ट करू शकला नाहीस. क्रोध नष्ट झाला नाही. लोभ मनातून गेला नाही, मुखाने परनिंदा करणे थांबवले नाहीस. तू केलेली सर्व सेवा निष्फळ झाली आहे. वाटमारी करून, दुसऱ्याची घरे लुटून स्वत:चे पोट भरलेस. तू अनेक अपराध केले आहेस. ज्या ज्या कर्माने परलोकात अपकीर्ती होते तीच सर्व कामे तू अविद्येने केलीस.[३३९]

हे परमानंद, धर्मपुस्तक ऐकूनही तुझ्या मनातून निर्दयीपणा गेला नाही, लोकांशी तू प्रेमपूर्वक व्यवहार केला नाहीस, आणि सतसंगतीत बसून तू कधीही प्रभूच्या पवित्र करणाऱ्या गोष्टी वर्णन केल्या नाहीस, म्हणजे तुझ्यात सतसंगत करण्याची आवड निर्माण झाली नाही. धर्मग्रंथ वाचून तूझ्या मनातून हिंसा नष्ट झाली नाही. भूतदया केली नाहीस. परमानंद सांगतात, हे जीवा ! तू संतसंगती केली नाहीस किंवा कोणतीही पवित्र कथा ऐकली नाहीस.[३४०]

"छाडि मन हरि बिमुखन को संगु ॥"

हे मना ! हरि विमुख झालेल्या लोकांची तू संगत सोड .(सदर ओळ मूळ सुरदासांच्या पदातील आहे. पण पुढील पद ओळी गुरूमतानुकूल न वाटल्याने त्या गाळून त्याच्या ऐवजी श्रीगुरू अर्जुन देवांनी पुढील आळी घालून पद पूर्ण केले म्हणून त्यास, 'महला ५ सूरदास' असे म्हटले आहे.)

शिख धर्मांचे संस्थापक व पहिले गुरू नानक देवजी हे भक्ती संत प्रणालीच्या हिंदू कुटूंबात संगोपण झ ााले. सुरूवातीला गुरू नानक व शिख धर्मांवर मध्ययुगीन भारतातील भक्ती चळवळ शाखेच्या निरगूणी निराकार देव कल्पनेचा प्रभाव होता.[३४१] मराठी संताच्या मौलीक कार्यामूळे मराठी संत नामदेव, परमानंद, त्रिलोचन या तीन संतांची पदे गुरूग्रंथसाहिबा या शीख धर्मग्रंथामध्ये घेण्यात आली आहेत. शीखांचा धर्म हा सर्वधर्मसमभाव या तत्त्वानूसार सर्व धर्मांतील लोकांना त्यात स्थान देण्यात आले. वेगवेगळ्या जातीधर्मांच्या महान व्यक्तींची पदे या धर्मग्रंथात घेण्यात आली आहेत. त्याचप्रमाणे गुरू परंपरा टिकवीत असतांना अनेक संकटांना गुरूंना सामोरे जावे लागत होते. त्यामूळे शिखांचे दहावे गुरू गोविंदसिंग यांनी गुरू परंपरा खंडीत करून ४ ऑक्टोंबर १७०४ रोजी "गुरू मानीयो ग्रंथ" हा आदेश देऊन देहरूपी गुरू परंपरा समाप्त केली. "गुरू मानीयो ग्रंथ" म्हणजे शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबाला गुरू मानण्यास सांगीतले त्याप्रमाणे आजही शीख धर्मामध्ये ही परंपरा चालू आहे.

**सारणी क्र.५.३ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत व त्यांची पदे.**

| अ.क्र. | मराठी संताचे नाव | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | संत नामदेव | ६१ |
| २ | संत त्रिलोचन | ४ |
| ३ | संत परमानंद | १ |
| | **एकूण** | **६६** |

**आलेख क्र.५.३ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत व त्यांची पदे.**



**संदर्भ ग्रंथ:-**


१. लोखंडे शशिकान्त, (२००८). संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास, प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली, पृ.क्र.५.

२. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, ेरी पृ.क्र.८.

३. पठाण यू.म., (२०१२). महाराष्ट्राची संतपरंपरा, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे, प्रथमावृत्ती १५ ऑगस्ट २०१२, पृ.क्र.३४.

४. कित्ता, पृ.क्र.३४.

५. गोसावी र.रा., (१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, ISBN ८१-७१६१-६६८-२, पृ.क्र.२०७.

६. भारत इतिहास संशोधन मंडळ, इ.स. १९२६, संशोधन पत्रिकेत संशोधन लेख.

७. नाना महाराज साखरे, श्री नामदेव महाराज चरित्र-सकल संत गाथा, संपादित काशिनाथ अनंत जोशी, खंड १, पृ.क्र.४.

८. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०८.

९. लोखंडे शशिकान्त, (२००८). संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास, प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली, पृ.क्र.७.

१०. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८०). मराठी विश्वकोश, खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.१८०.

११. ज्ञानी नरैण सिंघ जी, (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी., प्रकाशक-भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, जीवन प्रिंटर्स,अमृतसर, प्रथम संस्करण, पृ.क्र.१०.

१२. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९३.

१३. ज्ञानी नरैण सिंघ जी (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी. प्रकाशक-भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, जीवन प्रिंटर्स,अमृतसर, प्रथम संस्करण, पृ.क्र.१२.

१४. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९३.

१५. ज्ञानी नरैण सिंघ जी (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी. प्रकाशक-भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, जीवन प्रिंटर्स,अमृतसर, प्रथम संस्करण, पृ.क्र.१२.

१६. कर्वे इरावती,(१९५१). मराठी लोकांची संस्कृति, मा.ह.पटवर्धन संगम प्रेस प्रा.लि., पुणे. दुसरी आवृत्ति १९६२, पृ.क्र.१२४.

१७. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८६.

१८. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. २.

१९. गोसावी र.रा.,(१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, ISBN ८१-७१६१-६६८-२, पृ.क्र.१८३.

२०. कित्ता, पृ.क्र.१८४.

२१. कित्ता, पृ.क्र.१८४.

२२. ज्ञानी नरैण सिंघ जी (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी. प्रकाशक-भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, जीवन प्रिंटर्स,अमृतसर, प्रथम संस्करण, पृ.क्र.१६.
२३. निश्तर नानक सिंघ, (२००८). श्री गुरु ग्रंथसाहिब - निवडक अभंग मौक्तिके, प्रकाशक:-सेवा सिंह (सत्),गुरुव्दारा रामपु खेडा, होशियारपुर, पृ.क्र.१२३.
२४. नाना महाराज साखरे, श्री नामदेव महाराज चरित्र-सकल संत गाथा, संपादित काशिनाथ अनंत जोशी, खंड १, पृ.क्र.४.
२५. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९३.
२६. कित्ता, पृ.क्र.४९३.
२७. कित्ता, पृ.क्र.४९३.
२८. गोसावी र.रा.,(१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, ISBN ८१-७१६१-६६८-२, पृ.क्र.१८४.
२९. पठाण यू.म., (२०१२). महाराष्ट्राची संतपरंपरा, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे, प्रथमावृत्ती १५ ऑगस्ट २०१२, पृ.क्र.३४.
३०. सबनीस श्रीपाल, (२०१३). ज्ञानेश्वर ते आंबेडकर, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे, प्रथमावृत्ती ४ नोव्हेंबर २०१३. पृ.क्र.६५.
३१. गोसावी र.रा., (१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, ISBN ८१-७१६१-६६८-२, पृ.क्र.१६५.
३२. कित्ता, पृ.क्र.१६८.
३३. कित्ता, पृ.क्र.१७५.
३४. जोशी लक्ष्मणशास्त्री(१९७९)-मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९३.
३५. लोखंडे शशिकान्त, (२००८). संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास, प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली, पृ.क्र.७.
३६. बेडेकर उमा, महाराष्ट्रातील निवडक संतांची चरित्रे(मराठी), गीताप्रेस गोरखपुर, बारहवाँ पुनर्मुद्रण,पृ.क्र.२४.
३७. सबनीस श्रीपाल, (२०१३). ज्ञानेश्वर ते आंबेडकर, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे, प्रथमावृत्ती ४ नोव्हेंबर २०१३. पृ.क्र.६४.
३८. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९३.
३९. बेडेकर उमा, महाराष्ट्रातील निवडक संतांची चरित्रे(मराठी), गीताप्रेस गोरखपुर, बारहवाँ पुनर्मुद्रण,पृ.क्र.२४.
४०. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०८.
४१. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९४.
४२. कित्ता, पृ.क्र.४९४.
४३. गोसावी र.रा., (१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, पृ.क्र.१८६.

४४. कित्ता, पृ.क्र.१८६.
४५. ज्ञानी नरैण सिंघ जी (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी. प्रकाशक-भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, जीवन प्रिंटर्स,अमृतसर, प्रथम संस्करण, पृ.क्र.९२.
४६. कित्ता, पृ.क्र.९२.
४७. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९४.
४८. कित्ता, पृ.क्र.४९४.
४९. कित्ता, पृ.क्र.४९४.
५०. गोसावी र.रा., (१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी १९९८, ISBN ८१-७१६१-६६८-२, पृ.क्र.१६४.
५१. कित्ता, पृ.क्र.१८४.
५२. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९४.
५३. कित्ता, पृ.क्र.४९४.
५४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८५.
५५. कित्ता, पृ.क्र.४८५.
५६. जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश खंड ८,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई,प्रथम प्रकाशन : १९७९, पृ.क्र.४९५.
५७. भगत रा.तु. (२००५). संतसाहित्य आणि समाजप्रबोधन, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि., पुणे, पृ.क्र.५४.
५८.कित्ता, पृ.क्र.५४.
५९. श्री नामदेव गाथा, अ.क्र.६५२.
६०. श्री एकनाथ महाराज हरिपाठ, अ.क्र.२१.
६१. श्री नामदेव गाथा, अ.क्र.६५६.
६२. कित्ता, अ.क्र.६४४.
६३. श्री ज्ञानेश्वर महाराज हरिपाठ, अ.क्र.२५.
६४. श्री नामदेव गाथा, अ.क्र.७०६.
६५. कित्ता, अ.क्र.७४१.
६६. श्री ज्ञानेश्वर महाराज हरिपाठ, अ.क्र.१.
६७. श्री नामदेव गाथा, अ.क्र.८२६.
६८. कित्ता, अ.क्र.६८०.
६९. कित्ता, अ.क्र.७१९.
७०. श्री नामदेव गाथा, अ.क्र.७२७.
७१. कित्ता, अ.क्र.७०३.
७२. कित्ता, अ.क्र.७७३.
७३. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. ५.
७४. कित्ता, पृ.क्र. ६.
७५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.

७६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५५.
७७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड २, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५०७.
७८. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.८.
७९. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.७९.
८०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८५.
८१. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३६३.
८२. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५५.
८३. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९.
८४. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.८१.
८५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८५.
८६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५६.
८७. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.८१.
८८. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १४-१५.
८९. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३६४.
९०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८५.
९१. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५६.
९२. कर्वे इरावती.(१९५१) मराठी लोकांची संस्कृति, मुद्रक मा.ह.पटवर्धन, संगम प्रेस प्रा.लि. पुणे-२, दुसरी आवृत्ती १९६२, पृ.क्र.१२४.
९३. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.८२.
९४. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.१२.
९५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४८५.
९६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५६.

९७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३६५.
९८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ. क्र. ४८६.
९९. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.८३.
१००. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५७.
१०१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र ५२५.
१०२. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४६१.
१०३. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५७.
१०४. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरुग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०९.
१०५. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.१५.
१०६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.५२५.
१०७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४६२.
१०८. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.८४.
१०९. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५८.
११०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र ६५६.
१११. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.१७.
११२. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५८.
११३. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६५६
११४. कित्ता, पृ.क्र.५९९.
११५. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. ६-७.
११६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६५७.
११७. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. २०.
११८. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५८.
११९. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.८६.

१२०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६५७.
१२१. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२५३.
१२२. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.२०.
१२३. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. २३.
१२४. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५९.
१२५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६९२.
१२६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३४१.
१२७.तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३५९.
१२८. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १३.
१२९. श्री गुरूग्रंथसाहिब पृ.क्र.६९३.
१३०. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.२४.
१३१. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६०.
१३२. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.८९.
१३३. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६९३.
१३४. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३४३.
१३५. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र.२२.
१३६. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.२४.
१३७. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६०.
१३८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६९३.
१३९. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६०.
१४०. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.९०.
१४१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६९४.

१४२. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६१.
१४३. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३४४.
१४४. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.९१.
१४५. श्री गुरूग्रंथ्रसाहिब, पृ.क्र.७१८.
१४६. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.२८.
१४७. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६१.
१४८. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०९.
१४९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.७१८.
१५०. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४०८.
१५१. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६१.
१५२. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र.११.
१५३. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.७१८.
१५४. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६२.
१५५. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५,पृ.क्र.९२.
१५६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.७२७.
१५७. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०९.
१५८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४३०.
१५९. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३१.
१६०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान्बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६२.
१६१. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १३.
१६२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.७२७.
१६३. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.९४.

१६४. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६२.
१६५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.८५७.
१६६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.१६४.
१६७. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६२.
१६८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ८७३.
१६९. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०९.
१७०. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. ११.
१७१. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२०१.
१७२. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६३.
१७३. श्री गुरूग्रंथसाहिब पृ.क्र. ८७३.
१७४. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३६.
१७५. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६३.
१७६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२०१.
१७७. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ८७३.
१७८. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६३.
१७९. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३७.
१८०. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र ८७४.
१८१. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६४.
१८२. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२०२.
१८३. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ८७४.
१८४. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३९.
१८५. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६४.

१८६. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.९७.
१८७. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ८७४.
१८८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२०४.
१८९. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र.१३.
१९०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६४.
१९१. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.९८.
१९२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ८७४-८७५.
१९३. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०९.
१९४. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १३.
१९५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९७२.
१९६. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.४४.
१९७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४८२.
१९८. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १८.
१९९. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६५.
२००. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१००.
२०१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ९७२-९७३.
२०२. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६६.
२०३. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.४६.
२०४. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४८३.
२०५. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १०.
२०६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९७३.
२०७. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६६.

२०८. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०१.

२०९. श्री गुरूग्रंथसाहिब पृ.क्र. ९७३.

२१०. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १०.

२११. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६६.

२१२. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र.१०.

२१३. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०२.

२१४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र ९८८.

२१५. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.५०.

२१६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६७.

२१७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५२०.

२१८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९८८.

२१९. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०३.

२२०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६७.

२२१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९८८.

२२२. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ५, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.५२१.

२२३. भालेराव गोविंद आणि पजई शंकर (२०१५), संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरु ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन, औरंगाबाद, पृ.क्र.१०३.

२२४. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.५१.

२२५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११०५.

२२६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६८.

२२७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२८२.

२२८. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०४.

२२९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६३.

२३०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६८.)
२३१. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०४.
२३२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६३.
२३३. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.५५.
२३४. श्री गुरूग्रंथसाहिब पृ.क्र.११६३-११६४.
२३५. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६९.
२३६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४२६.
२३७. श्री गुरूग्रंथसाहिब पृ.क्र.११६४.
२३८. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०५.
२३९. श्री गुरू ग्रंथसाहिब, पृ.क्र.११६४.
२४०. कित्ता, पृ.क्र.११२८.
२४१. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. ६.
२४२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६४.
२४३. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.४२७.
२४४. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३६९.
२४५. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १६.
२४६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६४.
२४७. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.६०.
२४८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४२८.
२४९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. ११६४.
२५०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७०.
२५१. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०७.
२५२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.४५.
२५३. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.६३.

२५४. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४२९.
२५५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६५.
२५६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशकः-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७१.
२५७. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१०९.
२५८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४३०.
२६०. श्री गुरूग्रंथसाहिबा, पृ.क्र.११६५.
२६१. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. ३.
२६२. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.६८.
२६३. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१११.
२६४. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशकः-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७२.
२६५. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६६.
२६६. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशकः-किशनलाल सारडा, विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७३.
२६७. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४३४.
२६८.श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११६७.
२६९. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.७४.
२७०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशकः-किशनलाल सारडा, विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७३-३७४.
२७१. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.११४.
२७२. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११९५.
२७३. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशकः-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्‌गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७४.
२७४.श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११९६.
२७५. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ६, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.५०७.
२७६. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.७६.
२७७. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.११९६.

२७८. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.११५.
२७९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१२५२.
२८०. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.७९.
२८१. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १४.
२८२. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.१४१.
२८३. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७५.
२८४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. १२५२.
२८५. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.११६.
२८६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र. १२५२-१२५३.
२८७. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.८१.
२८८. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १९.
२८९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१२९२.
२९०. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७६.
२९१. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.११९.
२९२. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.८४.
२९३. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२३७.
२९४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१२९२.
२९५. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७७.
२९६. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१२०.
२९७. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१३१८.
२९८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.२९७.
२९९. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७७.

३००. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.८७.
३०१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१३५०.
३०२. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३७२.
३०३. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा, विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७७.
३०४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१३५१.
३०५. कौर जसविन्द्र, (२०१७). सक्तर धर्म प्रचार कमेटी, गोलडन ऑफसेट प्रैस, (शिख गुरूव्दारा प्रबंधन कमेटी), गुरूव्दारा श्री रामसर साहिब, श्री अमृतसर. पृ.क्र. १९.
३०६. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.८९.
३०७. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७१.
३०८. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.३७२.
३०९. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१३५२.
३१०. भालेराव गोविंद, पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती : एप्रिल २०१५, पृ.क्र.१२२.
३११. तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा, प्रकाशक:-किशनलाल सारडा,विश्वस्त, श्रीमान् बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्रीगंगेश्वरानदजी प्रतिष्ठान, नाशिक, पृ.क्र.३७१.
३१२. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९१.
३१३. Winnand Callewaert, (२०१३). The Hagiographies of Anantadas : The Bhakti Poets Of North India, Routledge, Chapter ४, p.no.१२८.
३१४. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१५६.
३१५. Bhai Kahn Singh Nabha,Mahankosh, The First Sikh encyclopedia.
३१६. निश्तर नानक सिंघ, अनुवाद : विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०८.
३१७. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१५६.
३१८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.९२.
३१९. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड १, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.२७७.
३२०. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९४.
३२१. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.५२५.

३२२. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९५.
३२३. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती,पृ.क्र.४६४.
३२४. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.५२६.
३२५. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९५.
३२६. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ३, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.४६४.
३२७. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१०८.
३२८. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.६९५.
३२९. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ४, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.३४८.
३३०. जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, प्रकाशक : जनवाणी मुद्रणालय लिमिटेड, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.९९.
३३१. जुनेजाप्रीतमसिंग,(१९९७). नामा म्हणे त्रिलोचना भक्त नामदेव, जनवाणी मुद्रणालय लि.,पुणे, पृ.क्र.१००..
३३२. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१२३.
३३३. जुनेजाप्रीतमसिंग,(१९९७). नामा म्हणे त्रिलोचना भक्त नामदेव, जनवाणी मुद्रणालय लि.,पुणे, पृ.क्र.१००.
३३४. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१२३.
३३५. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१५६.
३३६. श्री गुरूग्रंथसाहिब, पृ.क्र.१२५३.
३३७. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१२३.
३३८. कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, गुरूकूल प्रतिष्ठान, स्मिता प्रिंटर्स, पुणे, पृ.क्र.१५६.
३३९. गोरोवाडा तारासिंह आणि विनायक लिमये, (२००९). श्री गुरु ग्रंथ साहिब, खंड ७, प्रकाशक : सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, प्रथमावृत्ती, पृ.क्र.१४३.
३४०. निश्तर नानक सिंघ, अनुवाद:विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तीके), इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, पृ.क्र.१२३.
३४१. David Lorenzen, (१९९५). Bhakti Religion in North India: Community Identity and Political Action, State University of New York Press, p.no.१-२.

## प्रकरण ६

# उपसंहार, निष्कर्ष, गृहितकृत्याची सिध्दता आणि शिफारसी

**६.१ उपसंहार :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधाचे प्रकरण सहावे हे प्रबंधातील शेवटचे प्रकरण आहे. यामध्ये संपूर्ण शोधप्रबंधाच्या लिखानातून काही निष्कर्ष उत्पन्न झाले आहेत याचा समावेश या प्रकरणात केला गेला आहे. गुरूग्रंथसाहिबातील मराठी संत समोर ठेवून त्यांचे अवलोकन करण्यात आले आहे. गुरूग्रंथसाहिबात मराठी संतांची पदे घेण्यात आली आहेत. संत नामदेव महाराज यांची ६१ पदे घेण्यात आली आहे त्या पदांचा अर्थ घेण्यात आला आहे ती पदे या महान धर्मांच्या धर्मग्रंथात का घेण्यात आली आहे याचे सविस्तर विवेचन घेण्यात आले आहे. संत त्रिलोचन महाराज यांची ४ पदे गुरूग्रंथसाहिबात घेण्यात आली आहेत त्या चार पदांचा अर्थ सविस्तर घेण्यात आला आहे. त्याचप्रमाणे संत परमानंद महाराज यांची १ पद घेण्यात आले आहे, ह्या पदाचा अर्थ घेण्यात आला आहे. शीख धर्मांच्या धर्मग्रंथात गुरूग्रंथसाहिबात मराठी संतांचे स्थान का मिळाले ? याचे सविस्तर विवेचन या प्रकरणात घेण्यात आले आहे. गुरूग्रंथसाहिबात मराठी संताचे स्थान व योगदान यांचे महत्त्व अधोरेखित करण्यात आले आहे.

❖ संत नामदेव महाराज सांगतात की, आपले सर्वस्व अर्पण करून जो रामननामाचा जप करतो तो प्रत्येक मनुष्य या भवसागरांमधून मुक्तता प्राप्त करतो. रामनामाचे नामस्मरणाला संत नामदेव महत्व देतात, हे स्पष्ट करतांना संत नामदेव महाराज सांगतात की, संतूबंधनाच्या वेळी दगडावर राम-राम लिहल्यामूळे तो दगड पाण्यावर तरंगला, कृष्णाच्या पायावर बाण मारणारा प्रभू नामस्मरणामूळे मुक्त झाला, श्रीकृष्णाने शिकाऱ्याच्या पश्चातापामूळे त्याला मोक्ष प्राप्त करून दिले. दासीपूत्र विदूर, गरीब सुदामा यांच्या रामनाम, प्रभूनामाच्या नामस्मरणामूळे यांचा उध्दार झाला.

❖ संत नामदेव महाराज सांगतात की, ह्रदयात विचार करून प्रभूची रचना पाहून तुम्हाला कळेल की, सर्वत्र केवळ प्रभूच व्यापून भरून उरला आहे. मनात त्या हरीच्या रचनेचा विचार दृढ झाला की, मन प्रत्येक वस्तूत तो एकमेव परमात्मा भरून राहिला आहे, ह्याचे ज्ञान प्राप्त होते. ईश्वर सर्वत्र व्याप्त असून त्याला बघण्यासाठी गुरूकृपा लागते जेव्हा गुरूकृपा होते तेव्हा त्या व्यक्तीला सर्व ठिकाणी ईश्वर परमात्म्याचे दर्शन होते. परमेश्वर एकच आहे. तो परमेश्वर सर्व सृष्टीला व्यापून राहिला आहे. मनुष्याला गुरूउपदेश झाला की सत्य उपदेश होतो आणि ईश्वर सर्वांच्या हदयात आहे. प्रत्येक जागी परमात्मा आहे. तुम्ही जेथे जेथे आस्थेने पाहता, तेथे-तेथे तुम्हाला परमात्मा दिसेल. जो भगवंताच्या भक्तीमध्ये तल्लीन होतो. त्याला सर्व ठिकाणी ईश्वर दिसतो. ज्याप्रमाणे माळेमध्ये एका धाग्यात अनेक मणी ओवून गोळा केलेले असतात. सारे मणी एकाच सुत्राने एकत्र बांधले गेलेले असतात. त्याप्रमाणे या सृष्टीतील सर्व जीव वेगवेगळे दिसत असले,

तरी त्या सर्वांमध्ये तो परमात्मा एकच ईश्वर आहे. पाण्याची लाट पाण्याचा फेस, पाण्याचा बुडबुडा हे सारे पाणीच आहे. ती पाण्याची वेगवेगळी रुपे आहेत. तसेच ह्या सृष्टीत बाह्यत: विविधता दिसत असली तरी सर्व त्या एका परमात्म्याचीच विविध रूपे आहेत.

❖ संत नामदेव सांगतात की, परमेश्वर हा सर्वव्यापी, सर्वत्र आहे. सृष्टीतील चराचरात परमेश्वर आहे. जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी, जड, चेतन इत्यादी सर्वत्र परमेश्वर आहे आणि परमेश्वर नाही असे या विश्वात एकही स्थान नाही. परमेश्वर हा सर्व स्थानस्थानांतरात त्या एकमात्र परमेश्वराचेच वास्तव्य आहे. ईश्वरांचे अस्तित्व सर्वव्यापी असून ईश्वरांची आराधना उपासना करण्यासाठी वेगवेगळ्या विधींचा अंगीकार केला जातो त्यातून ईश्वराला प्रसन्न केले जाते. ईश्वर सर्वत्र आहे हे समजावून देतांना संत नामदेव म्हणतात की, मी घडा घेऊन प्रभूंच्या स्नानासाठी निर्मळ पाणी आणले, पण त्यात आधी असंख्य जीवांनी माशांनी स्नान केले होते. ते मासे हे विठ्ठलाचे रूप होते. पाण्यामध्ये बेचाळीस लाख जीव विद्यमान आहेत तर पाणी कसे पवित्र राहिल ? फुले आणुन माळा केल्या, प्रभूच्या पूजेसाठी माळ केली, परंतु त्या फुलांचा वास भ्रमरांना आधीच घेतला होता. त्या भ्रमरांमध्ये विठ्ठल आहे. नैवेद्य करण्यासाठी खीर बनवण्यासाठी दुध आणले परंतु वासरांनी आधीच दुध विटाळून टाकले. वासरूच 'विठ्ठल' बनले. ईश्वर हा सर्वत्र आहे. उपासना औपचारिक होऊच शकत नाही. सृष्टीच्या सर्व कणाकणांमध्ये परमेश्वराचे वास्तव्य आहे.

❖ मराठी संतमालिकेत सर्व जातीच्या संतांचा अंतर्भाव होतो. बहुतेक संतांनी आपल्या व्यवसायात प्रभुचे रुप पाहिले व त्याच रुपकात ईश्वरभक्तीचा दृष्टांत दिला आहे. संत नामदेव यांनी शिंपी व्यवसायाचे रुपक देऊन आध्यात्मिक संदेश दिला आहे. नामदेव आपल्या भक्तीचा संबंध दर्शविण्यासाठी मीटर, गज, कात्री इ. चा वापर केला आहे. आपल्या कामातच आपण ईश्वराचे नामस्मरण सहजतेने करू शकतो. त्यासाठी फावल्या वेळेची गरज नसून प्रापंचिक जबाबदाऱ्या पूर्ण करतही नामस्मरण करता येते. परमेश्वर भक्तीत कुठेही जातीपातीचा संबंध येत नाही. ईश्वरभक्तीत जातीपातीला मुळीच स्थान नाही. देव भावाचा भूकेला आहे. संत नामदेव महाराज म्हणतात, प्रभू ध्यानरुपी सोन्याच्या सुईत प्रभूनामाचा रुप्याचा धागा ओवून मी माझे चित्त प्रभूशी घट्ट शिवून प्रभूशी एकरुप झालो आहे. संत नामदेव महाराज म्हणतात, प्रभूच्या भक्तीसाठी उच्च-नीच, जाती-पातीचा भेदभाव नाही. प्रापंचिक कर्तव्य करून प्रभूची भक्ती अथवा नामस्मरण करता येते. त्यासाठी वेगळ्या क्रिया-कर्मांची आवश्यकता नाही.

❖ संत नामदेव सांगतात की, प्रभुप्राप्तीसाठी मनाच्या शुध्दतेची फार आवश्यकता आहे. मन शुध्द नसेल तर वरवरच्या देखाव्याचा काहीही उपयोग नाही. साप कात टाकतो. विष किंवा विषाचे दात सोडत नाही. बगळा पाण्यात ध्यानमग्न असतो पण त्याचे ध्यान खरे नसते ? एखादे मासे त्याच्याजवळ येऊ लागले की, तो लगेच ध्यान सोडून देतो. संत नामदेव शुध्द अंत:करणाला महत्व देत ईश्वरांची आराधना करतांना शुध्दतेची आवश्यकता आहे. कपटाने केलेल्या ईश्वराच्या स्मरणाला काहीच अर्थ नाही. शुध्द अंत:करणाने

रामनामाचे स्मरण करावे. मन विषय विकारापासून मुक्त होत नाही. मन शुध्द होत नाही तोवर जपजाप्य, पुजाअर्चा, व्रतवैकल्ये ह्या बाह्य दिखाऊ उपचारांचा काहीच उपयोग नाही. संत नामदेव सांगतात की, तुम्ही रामनामरुपी अमृत प्राशन करा व संसारातील सर्व पापातून मूक्त व्हा. संसारातील सर्व रोगातून मूक्त होण्याचा हा एकमेव उपाय आहे. नामस्मरण आणि ते सुध्दा प्रामाणिक असावे असे संत नामदेव महाराज पदातून सांगतात.

❖ संत नामदेव म्हणतात की, जीवनात गुरु उपदेश फार महत्वाचा असतो. संतमंडळीच्या कृपा आशिर्वादाने ईश्वरासोबत भेट होते. शुध्द मनाने नामस्मरण केल्यामुळेच ईश्वर प्राप्ती शक्य आहे. नामदेव सांगतात, मी शिंपी जातीत जन्मलो. मला सद्गुरु भेटले. गुरु उपदेश मिळाला. संतसंगती लाभली. त्यांच्याच आशिर्वादाने मला परमेश्वर भेटला. माणसाची जात, उच्च-नीच, गरीब-श्रीमंत ह्याला काहीच महत्व नसते. सत्गुरूकृपेने व सत् संगाने माणूस हा भवसागर पार करु शकतो. ज्याने परब्रम्ह जाणले, परब्रम्हाची अनुभूती प्राप्त करून परब्रम्ह जाणले, परब्रम्हाची अनुभूती ज्याने प्राप्त केली अशा माणसाला संसारातील आशा आकांक्षा आवडत नाहीत. ज्याच्या मनात रामभक्ती जागृत झाली. तो मनुष्य संसाराच्या चिंतेतून मुक्त होतो. संसाररूपीसागर अनेक विकारांनी भरलेला आहे. ह्या भवसागरातून बाहेर पडण्यासाठी माणवाला जीवनात गुरू उपदेश फार महत्वाचा असतो. संतसंगत महत्वाची असते.

❖ एका दगडावर आस्था ठेवून प्रेम केले जाते म्हणजेच त्याची पूजा केली जाते. त्याचवेळी दगडाने बनवलेल्या पायरीवर पाय ठेवला जातो. पहिला दगड जर देवच असेल तर दुसरा दगड सुध्दा देवच असायला हवा. सारीच परमेश्वराची रुपे आहेत. म्हणजेच सदैव त्या निरंकार परमेश्वराचीच पूजा करावी. ईश्वर एखाद्या व्यक्तीला राजा तर एखाद्याला रंक बनवितो. ईश्वराने दिलेल्या कोणत्याही भूमिकेचा स्वीकार करावयास हवा, त्यात खंत करू नये. त्यामूळे मनुष्य हा जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मूक्त होतो. परमेश्वराच्या इच्छेप्रमाणे आपण हे जीवन जगले पाहीजे. परमेश्वर हाच सृष्टी निर्माता आहे. सारे जीव त्या मोहमायेच्या विळख्यात अडकून पडले आहेत. ज्याच्यावर परमेश्वराची कृपा होते तोच फक्त सत्य जाणतात. ज्यांना सत्गुरू भेटतात. त्या सत्गुरूंच्या उपदेशाने सर्व शंकाचे निरसन होते. संत नामदेव सांगतात की, सर्व कर्ता परमेश्वर आहे. आपण आपले जीवन त्यांच्या चरणी सर्मपित केले पाहिजे. प्रभूच्या इच्छेप्रमाणेच आपण आपले जीवन जगावे.

❖ संत नामदेव महाराज सांगतात की, परमेश्वर स्वयंभू आहे, परमेश्वर सर्वत्र आहे. परमेश्वराचे अस्तित्वही निरनिराळ्या रुपात आढळते. पण प्रत्यक्ष तो दिसत नाही. परमेश्वर अत्यंत शुध्द, निर्मळ, कलंकाचा लवलेशही नसलेला अत्यंत सात्विक असा आहे. त्यांच्या सात्विकतेचा सुगंध सर्वत्र दरवळून राहिला आहे. पण हा सुगंध येतो कुठून हे मात्र कोणालाही सांगता येत नाही, हे सागतांना संत नामदेवांनी पक्षी, मासे, मोकळी जागा इ. चे उदाहरण दिले आहे. ज्याप्रमाणे आकाशात पक्षी फिरत असतात. त्यांच्या आकाशातला मार्ग कोणालाही दिसत नाही. पाण्यात मासे इकडून तिकडे पोहत असतात पण त्यांचा

पाण्यातला रस्ता कोणालाच दिसत नाही. मोकळया जागेवरून, डोंगरावरून, माळावरून, मृगजळ क्षितीज दिसते. पण त्याचे निश्चित स्थान मात्र कोणीही सांगू शकत नाही. त्याप्रमाणे परमेश्वर कोणाला दिसत नाही. पण त्याचे अस्तित्व मान्यच करावे लागते. ईश्वराला पाहणे अशक्य जरी नसले तरी देखील ईश्वराचे अस्तित्व हे सर्वत्र आहे.

❖ गुरू कृपेनेच ईश्वराची प्राप्ती होते. प्रभूचे गुणगान केल्यामूळे प्रभूचा साक्षात्कार होतो. प्रभू नामस्मरणामूळे परमशांती मिळते. ईश्वराच्या गुणांचे वर्णन केल्याने मनाला धैर्य मिळते, सहारा मिळतो. संत नामदेव म्हणतात की, मला सद्‌गूरू भेटले तेव्हा मी शब्द ब्रम्हात विलीन होतो. मी नामस्मरणाद्‌वारे ईश्वरामध्ये मिसळून गेलो. सद्‌गुरूच्या मार्गदर्शनानेच मी प्रभूनामाशी एकरुप झालो आहे. माझे अस्तित्व परमात्म्याच्या स्वरुपात विलीन झाले आहे. सद्‌गुरुकृपेने आत्मज्योत त्या परमात्म्याच्या परमज्योतीत विलीन होते. सद्‌गुरु कृपेने हदयामध्ये ईश्वर बसलेला असतो. त्या ठिकाणी हजारो सुर्याचा प्रकाश आहे. हा प्रकाश कधी मिटणारा नसतो. गुरूंच्या कृपेमूळेच मनूष्य ईश्वराला आपल्या हदयात सामावून ठेवू शकतो.

❖ संत नामदेवाला घराशेजारची स्त्री विचारते, तूमची झोपडी सुंदर आहे ती कोणत्या कारागीराने बांधली ? त्या कारागीराचा मला पत्ता द्या. मी दुप्पट मजूरी देऊन तूमच्यासारखे सुंदर घर बांधेल. तेव्हा संत नामदेव म्हणतात, तो कारागीर म्हणजे ईश्वरच आहे. तो साऱ्या चराचराला व्यापून राहिला आहे. जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र तो प्रभू परमेश्वर आहे. तो कारागीर प्रीतीरूपी मजूरी मागतो. त्याची मजूरी पैशात, सोन्यारुप्यात करताच येत नाही. तो कारागीर म्हणजे प्रभू भावाचा भूकेला आहे. एखाद्या मुक्या माणसाला तुम्ही अमृत प्यायला द्या आणि विचारा की अमृताची चव कशी आहे ? तो ती सांगूच शकत नाही. त्याप्रमाणे त्या कारागीराचे प्रभूचे वर्णन, स्थान, पत्ता सांगता येत नाही. त्या कारागीराने अथवा प्रभूने समुद्रावर सेतू बांधला. त्याने त्याच्या प्रिय भक्ताला ध्रुवाला अढळ पद प्रदान करून दिले. सीतेची रावणाच्या पाशातून सूटका केली, परमभक्त विभीषणास लंकेचे राज्य दिले. त्या परमेश्वराचे जो अंत:करणातून श्रध्दायुक्त भक्ती करतो, त्याला तो सदैव आधार देतो. प्रभू सर्व व्यापक आहे. तो कारागीर म्हणजेच प्रभू परमेश्वर आहे. तो सृष्टीच्या कणाकणांमध्ये बसलेला आहे. तो सर्व सृष्टीतील सजीवांचा सहारा आहे. जो व्यक्ती ईश्वराच्या रंगामध्ये रंगून जातो. तो ईश्वराचा बनतो. ईश्वर त्या व्यक्तीचे सर्व कार्य करतो. मात्र मनुष्याला त्याच्या भक्तीभावामध्ये एवढे लीन व्हावे लागते की, त्याच्या शरीराची व मनाची सुध्दा काळजी करायला नको. त्या कारागिराने सर्व विश्व बनविले असून या सृष्टीचा तो कर्ता-करविता आहे. त्या ईश्वराचे वर्णन करता येत नाही.

❖ भगवंत भेटीमूळे मनुष्याच्या मनामध्ये आत्मिक आनंद मिळतो. ज्या भक्ताने प्रभू परमात्म्याचे मूळ स्वरूप जाणले आहे. त्याच्याशी एकरूप झाला आहे, ज्याने त्या प्रभू परमात्म्याचे सत्यस्वरूप जाणले आहे. त्याच्या हदयात नेहमी आनंद असतो. संत नामदेव म्हणतात, मनुष्याने मुखात व मनात रामनामरुपी रत्न ओवले पाहीजे. आत्मानुभूतीची प्राप्ती झाल्याने मनातील शंका, भिती, भ्रांती दूर होते. गुरुला शंका विचारून

मन नि:शंक होते. ज्याला प्रभू परमात्मा प्राप्त होतात. त्याच्या जीवनाचे सार्थक होते. ज्याप्रमाणे परीसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते तसेच गुरूच्या उपदेशाने मन शांत होते व सर्व ठिकाणी त्याला ईश्वर दिसतो. समुद्राच्या पाण्यात घट बुडावा तसा जीव आत्मा परमात्म्यात विलीन होतो. तसे गुरू-शिष्याची मने एकरुप होतात. सर्वत्र एकच प्रभूची जाणीव होते. गुरूकृपेमुळे मनुष्याला जीवनाचे सत्य समजते. मनुष्याच्या जीवनात गुरूला अनन्य साधारण महत्व आहे.

❖ संत नामदेव सांगतात की, मानवी शरीर नाशवंत आहे. कोणीही आपल्या संपत्तीचा, शक्तीचा, साम्राज्याचा, वैभवाचा अभिमान करु नये. परमात्मा आपल्या सेवकांवर व भक्तांवर कृपा करत असतो व जे अहंकारी, घमंडी असतात, त्यांचा तो नाश करतो. मनुष्यामध्ये अहंकार नसावा कारण अहंकार हा विनाशाचे कारण आहे. दुर्योधन आणि त्याचे भाऊ यांना किती गर्व होता. त्यांचे सैन्यतळ अठ्ठेचाळीस कोस पसरलेले होते. कुरूक्षेत्रावर मरण पावल्यानंतर त्यांचा देह गिधाडांनी खाल्ला. सुवर्णमयी लंकेचा राजा रावण त्याचे वैभव क्षणार्धात नष्ट झाले. दुर्वास ऋषींचे कुचेष्टा करण्यासाठी यादवांनी जे कपट आचरण केले, त्याचे फळ त्यांना मिळाले. त्यांचा निर्वंश झाला. वृथा गर्व करण्याचा परीणाम हा असाच होतो. थंडी, वारा, ऊन, पाऊस ह्यापासून रक्षण व्हावे व दीर्घायुष्य प्राप्त व्हावे, म्हणून मानव पक्की इमारत बांधतो. परंतु त्याचे आयुष्य वाढत नाही. परंतु दीर्घायुष्य असलेल्या मार्कंडेय ऋषींनी कधीही घर बांधले नाही. पृथ्वीवरील सर्व सजीवांचा तारणहार प्रभू परमेश्वर आहे. सर्व घटना ह्या प्रभूच्या इच्छेप्रमाणे होतात. म्हणून मानवाने नश्वर देहाचा गर्व करू नये. प्रभूचे नामस्मरण करावे. अहंकार करू नये कारण अहंकार हा विनाशाचे कारण आहे.

❖ संत नामदेव म्हणतात की, हे मानवा तू बाहेर का भटकतोस संयम ठेव तुला भगवान परमात्म्यांचे दर्शन होईल. दहा इंद्रियांना वशीभूत करा. काम, क्रोध, मोह, लोभ व अहंकार या पाच विकारांना नष्ट करा. आपल्या शरीरात ईश्वराच्या अमृत नामस्मरण करा. मानव मायेपासून अलिप्त झाल्यांनतर मानव जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मूक्त होतो. व आत्मा परमात्म्यामध्ये वास करतो. मानवाच्या जीवाला ब्रम्हाचे दर्शन होते. मानवाने रोमारोमांत, अंग-प्रत्यंगात प्रभूनामरुपी अमृत भरुन मायारुपी विष शरीरातून काढून टाकले पाहिजे. प्रभूनामाचे स्मरण व उच्चारण केल्यामूळे मानव जन्ममरणाच्या चक्रातून मुक्तता होते. जो प्रभूनामात तल्लीन होईल त्याचे जीवीताचे सार्थक होईल त्यास परमेश्वराची प्राप्ती होईल.

❖ संत नामदेव सांगतात की, ज्याप्रमाणे राजस्थान प्रदेशातील मारवाडात भागात जसे पाणी प्रिय, उंटाला जसे वेल प्रिय, हरणाला पारध्याच्या वाद्यांचा मोहक नाद प्रिय, भ्रमराला फूलांचा वास प्रिय, कोकिळेला आम्रवृक्ष प्रिय, धरतीला पाऊस प्रिय, चकवी पक्ष्याला सूर्य प्रिय, हंसाला मानस सरोवर प्रिय तरुणीला पती प्रिय, बालकाला दूध प्रिय, माशाला पाणी प्रिय, चातकाला मेघाची जलधर प्रिय, त्याप्रमाणे हे प्रभू सगळ्या जगाला तुझे नाम प्रिय आहे. तसेच ह्या नामदेवाला 'विठ्ठल' नाम प्रिय आहे. परमेश्वरा, साधक सिध्द ऋषी-

मूनी तूला हुडकत असतात. त्यासाठी ते वेगवेगळे प्रयत्न करतात. साधना करीत असतात. परंतु तुमची कृपादृष्टी एखाद्यावरच होते. हे परमेश्वर तुझे नाम, रुप, मन सर्वच सुंदर आहे. रामराया तुझे नामगोड आहे, तुझे रुप गोड आहे, तुझे अंतरंगही गोड आहे, तू सर्वांग सुंदर आहेस.

❖ प्रथम पुरुष व नंतर प्रकृती प्रकट झाली. जे प्रकृतीचे ते सगळे परमेश्वराचे आहे. हा सगळा पसारा प्रभूच्या विहाराचे उद्यान आहे. सर्वप्रथम फक्त परमात्मा एकमात्र पुरूष होता. त्यानंतर त्या अकाल पुरूषापासून माया उत्पन्न झाली व त्यांच्या संयोगातून ही सारी सृष्टी निर्माण झाली त्यामूळे जे काही आहे ते सारे प्रभू परमात्म्याचेच आहे. सारे जीव मोहमायेच्या भोवती असे काही नाचत आहेत की, जणू विहीरीतील रहाट गाडगेच आहे. सर्व जीव रहाट-गाडग्यासारखे फिरत आहेत. ते कर्मबंधनात जखडलेले आहेत. मोह माया हे मृत्यूचे मूळ आहेत त्यापासून वाचण्यासाठी प्रभू परमात्म्याच्या शरण जाणे आवश्यक आहे. सर्व सृष्टी ईश्वराच्या इशाऱ्यावर चालते. हा सारा संसार ईश्वराचाच अंश आहे. संसाराच्या जंजाळातून मूक्त होण्यासाठी, यमाच्या तावडीतून सूटण्यासाठी ईश्वराच्या शरण जाणे, नामस्मरण करणे आवश्यक आहे.

❖ 'परमेश्वर हा पतितांना पावन करणारा' असे परमेश्वराचे ब्रीद आहे. बलाढ्यांचा गर्व हरण करणारा व दीन-दुबळ्यांवर दया करणारा असा प्रभू परमेश्वर आहे. परमेश्वर पापी लोकांना पवित्र करतो. गरीबांवर दया करणारे गरिबांचे पालनहार, रक्षणकर्ते व उध्दारक असे प्रभू परमेश्वर आहेत. अभिमान गर्व असलेल्यांना तूम्ही नष्ट केले आहे. संत नामदेव म्हणतात, मी नामदेव तूमच्या चरणी शरण आलेलो आहे. मी माझे सर्वस्व तुम्हाला अर्पण केलेले आहे.

❖ पंडीत, विद्वान, ऋषीमूनी वेदांसंबधी व्याख्याने देऊन काही उपयोग होत नाही, ईश्वर प्राप्ती होत नाही. ईश्वरप्राप्तीसाठी ईश्वर नामाशी एकरुप झाले पाहीजे. ईश्वर जवळ-दूर आहे हा तर्क म्हणजे पाण्यात राहणाऱ्या माशाला झाडावर चढण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे. ज्याला प्रभूची प्राप्ती होते, तो ती कोनाला सांगत नाही. आपली अनुभूती आपल्यापाशीच ठेवतात व जगात सामान्याप्रमाणे व्यवहार करतात. संत नामदेव ईश्वर नामाशी एकरुप झाले आहेत.

❖ संत नामदेव महाराज सांगतात की, रामनाम जपाचे अनन्यसाधारण महत्व आहे. रामनामाच्या जपाने मनुष्यातील सर्व दोष नाहीसे होतात. पापी व्यक्ती देखील रामनामाच्या जपाने शुध्द पवित्र बनतो. नामस्मरणाने मनुष्यास उत्तम पदवी प्राप्त होते वैकुंठी प्रयाण करण्यास यशस्वी ठरते. तीर्थयात्रा, व्रत्त, उपवास, पूजा-अर्चा इ. ची काहीच गरज नाही. प्रभूचे 'नामस्मरण' हा उत्तम मार्ग आहे. सदाचरणी भक्तांची बुध्दी शुध्द होते. प्रभू नाम उच्चाराने कित्येक भक्त तरूण जातात. मनुष्य चांगल्या कर्मामूळे बुध्दीही चांगली होते. गुरूच्या उपदेशाने राम नामस्मरण करावे.

❖ कुंभाराच्या घरी हांडी (मातीचे मडके), राजाच्या घरी सांडी (ऊटीण), ब्राम्हणाच्या घरी रांडी पोथ्या असतात. वाणी लोकांच्या घरी हिंग, म्हशीच्या डोक्यावर शिंग, देवळात लिंग असते. तसे संतात गोविंद,

गोकूळात श्रीकृष्ण, नामदेवांच्या हदयात राम आहे. संत नामदेव सांगतात की, रामनामशिवाय हा नामदेव जगूच शकत नाही.

❖ नामदेव सांगतात की, परमेश्वर सर्वांचा आधार, कर्ताधर्ता आहे. परमेश्वर ज्ञानी असून तो सर्व गोष्टी चांगल्या प्रकारे जाणून घेतो. परमेश्वराचे वर्णन करता येत नाही. परमेश्वर सर्व शक्तीमान व पालनकर्ता आहे. सर्वांच्या जीवनाचा आधार परमेश्वर आहे. परमेश्वर दयाळू, कृपाळू, सर्वांचा स्वामी व दाता आहे. परमेश्वर सर्वज्ञानी, सर्वव्यापी आहे, सर्व ऐश्वर्याचा स्वामी, सर्वांना देणारा, परत घेणारा, दाता, धनवान असा परमेश्वर आहे.

❖ संत नामदेव म्हणतात की, व्दारका नगरीतच नव्हे तर ईस्लामधर्माच्या मक्का-मदिना मध्ये प्रभू परमेश्वरा तूच आहेस. सर्व वेगवेगळ्या धर्मात तूझी वेगवेगळी रूपे आहेत. या पृथ्वीतलावरील हजारो भुवनांचा तू एकमात्र स्वामी आहेस. परमेश्वरा तूच श्रीकृष्ण, अश्वपती, गजपती, नराचा नरेंद्र, नाम्याचा स्वामी मुकूंद आहेस. संत नामदेव परमेश्वराला म्हणतात, मी माझा जीव तूझ्यावर समर्पित करतो. तुझी चाकरी करतो. तूझे नामे श्रेष्ठ आहे. व्दारका व मक्का-मदिना या ठिकाणी परमेश्वरच आहे ती परमेश्वराची वेगवेगळी रूपे आहेत. यावरून संत नामदेव महाराजांची सर्वधर्मसमभवाची भावना दिसून येते.

❖ संत नामदेव सांगतात की, सद्‌गुरूच्या ज्ञानामुळेच मी पूर्णपणे बदललो आहे. सद्‌गुरूमुळे माझे दु:ख पूर्णपणे विसरलो आहे. आणि त्यांनीच मला जीवन जगण्याचा अर्थ समजला आहे. आतापर्यंत माझे जीवन व्यर्थ होते. सद्‌गुरूच्या नामस्मरणामूळे मला जीवनाचा अर्थ मिळाला आहे. सद्‌गुरूंनी माझे जीवन सफल केले. दु:ख नष्ट करून माझे जीवन सुखी कले आहे. सद्‌गुरूंनी माझ्या डोळयांत ज्ञानांजन घालून रामनामा शिवाय जीवन म्हणजे निव्वळ व्यर्थ, प्राणहीन, नीरस आहे, ह्याचे ज्ञान दिले. संत नामदेव ईश्वराचे स्मरण करून त्या प्रभू परमात्म्यास जाणले आहे व त्याचे नामदेवाचे मन त्या परमात्म्यात लीन होऊन गेले आहे. संत नामदेव हा परमात्म्याशी एकरुप झाला आहेत.

❖ प्रभू नामस्मरण व सद्‌गुरू यांचे महत्व अनन्यसाधारण असून आत्मिक सुखाची, आनंदाची बरोबरी कोणत्याच कर्मकांडातून मिळणार नाही. प्रयाग याठिकाणी जाऊन स्नान केले, गयेला जावून पिंडदान केले, चारी वेदांचे पठन केले, ब्राम्हणाची षटकर्मे केली इ. सर्व सोडून देऊन मानवा गोविंदाचे स्मरण करा, भजन करा, नामस्मरण करा त्यानेच मानवाचे ह्या भवसागर पार करता येईल, या संसारातून मूक्त होईल, मनाला प्रभूनामाचे नामस्मरण करण्याचा सल्ला देतात.

❖ संत नामदेव सांगतात की, मानवाने आपल्या चित्तास प्रिय प्रभूचे स्मरणाशिवाय इतर कोणत्याही बाजूस जावू नये. जसे हरीण स्वत:स विसरून प्राण जाईपर्यत आवाजामागे धावतो, जसा मासेमार माश्यांकडे पाहतो, जसे सोनार सोन्याकडे पाहतो, विकारी पुरूष परनारीकडे लक्षपुर्वक पाहतो, जसे जुगारी जुगारातील

कवड्या टाकून त्यावर लक्षपूर्वक पाहतो. त्याप्रमाणे मी नामदेव जिकडे पाहावे तिकडे मला प्रभुरामच दिसतो आहे. मी सदैव हरीच्या चरणाचे ध्यान करतो. हरीच्या चरणी माझे चित्त असते.

❖ संत नामदेव म्हणतात, हे ईश्वरा ! माझा उध्दार कर. मला समजत नाही. मी अज्ञानी आहे. संसाररुपी भवसागरात तरने मला कदापीही शक्य नाही. मी तुझ्या कृपेने वाचू शकेल. मला जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त कर. ज्या अवस्थेमध्ये आज ध्रुव व नारदाचे स्थान आहे. तसेच मलाही तुझ्या चरणी स्थिर व अढळ स्थान दे. तुझ्या नामामुळे अनेक लोकांचा उध्दार झाला आहे. माझी अंत:करणातून हीच इच्छा आहे. संत नामदेव सांगतात की, या भवसागरातून तरून जाण्यासाठी, जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त होण्यासाठी प्रभू चरणी जाणे आवश्यक आहे. त्यामूळे मनुष्याचा उध्दार होतो.

❖ संत नामदेव म्हणतात की, मी भगवंतापासून दूर राहूच शकत नाही. रामनामाशिवाय मला समाधान मिळत नाही. मी एक क्षणभर सुध्दा रामनामाशिवाय राहू शकत नाही. सद्‌गुरूच्या कृपेने त्या अव्यक्त प्रभू परमात्म्याला मी पाहिले आहे हे सांगतांना संत नामदेव काही उदाहरणे देतात. ज्याप्रमाणे पाण्याविना मासा तडफडतो विकारी माणसास परनारी प्रिय वाटते, गायीचे वासरु जसे बांधलेल्या ठिकाणाहून सुटून गायीचे स्तन चोखते आणि गटागटा दूध पिते, वासरापासून विरहित होऊन गाय जशी हांबरते, धावते त्याप्रमाणे मी नामदेव रामनामाशिवाय राहूच शकत नाही. मानवाच्या आयुष्यात सद्‌गुरू कृपा आवश्यक आहे. सद्‌गुरू कृपेकूळे मानवाला प्रभूप्राप्ती होते. त्याचप्रमाणे प्रभू 'नामस्मरण' देखील महत्वाचे आहे.

❖ संत नामदेव सांगतात की, प्रभू असा कृपाळू आहे की, त्याचे नामस्मरण करतो सर्व भय आणि अडचणी दूर होतात. नामदेव म्हणतात, मी त्या हरीचे सदैव प्रणाम करतो, याचेच नामस्मरण करतो. ज्या श्रीकृष्णाच्या नामस्मरणाने यमाची भीती व संकटे दूर होतात. यमाची भीती पळून जाते. संत नामदेव पूरान कथेचे वर्णन कथेचे वर्णन करतात हरीचे नामस्मरणाचे महत्व सांगून दृष्ट लोकांना भगवंतासोबत सहवास आल्याने कसा उध्दार होते याचे दाखले दिले आहे. प्रभूने हिरण्यकश्यपू राक्षसास मारले, पापीस वैकूंठात पाठविले. हरीनाम पढवणारी कान्होपात्राही विकारापासून दूर झाली, हिरण्यकश्यपूचा वध केला, त्याला वैकूंठात स्थान दिले, पोपटाला हरीनाम शिकवणारी गणिकेचा उध्दार केला, बालहत्या करणारी कपटी पुतना दायीही तरली, जेव्हा तिने हरीनाम स्मरण केले. स्मरणकृपेने द्रौपदीची अब्रू वाचली आणि सती अहिल्येचाही उध्दार झाला. पूतना राक्षसीणीच्या तोंडून संत:काळी हरीचे नाम आल्यामूळे तिचीही संसारसागरातून सुटका केली. कृष्णाने त्या पूतनेचे दुध प्राशन करताच ती मरण पावली. कृष्णाने तिचा आई समजून उध्दार केला तिला स्वर्गात पाठविले. हरीच्या स्मरणाने द्रोपदीच्या अब्रूचे रक्षण झाले. गौतम ऋषीची पत्नी अहिल्या गौतमांच्या पदस्पर्शाने तिचा उध्दार झाला. हरीनामासारखा उत्तम धर्म दुसरा कोणताही नाही. हरीनाम हाच श्रेष्ठ धर्म होय. हरीनाम जपाने जात, कुल आदी उच्च-नीच भाव नष्ट होतात. सर्वत्र हरीच आहे, सारे समान आहेत. हरीनामजपाने मृत्यू भय नष्ट होते.

❖ संत नामदेव महाराज 'एकेश्वरवाद' संकल्पनेचे समर्थक करतात व ते सांगतात की, मनुष्याला रामनाम जपण्याचा सल्ला देतात. अकाल पुरूषाने नामस्मरण केल्याने जीवात्म्याला मुक्ती मिळते. नामदेव महाराज सर्वांना अशी विनंती करतात की, गीतेमध्ये जो नामस्मरणाचा मार्ग सांगितला आहे, मनुष्याने त्याच मार्गाने चालले पाहिजे. सर्व दैवदेवतांच्या बदल्यात एकमेव रामाचा स्वीकार करावा. जो मनुष्य शिवनाम जप करतो तो जास्तीत जास्त शिवरुप होऊन शिव वाहन बैलावर बसून धूळ उडवीत स्वारी करतो, डमरू वाजवतो. जो माणूस महामायेची पूजा करतो तो पूढील जन्मी स्त्रीदेह धारण करतो. मानवा अन्य सारी देवदैवते सोडून दे, गुरूपासून ज्ञान घेऊन त्याला शरण जाऊन रामनामाच्या स्वीकार कर, असा गीतेचाही उपदेश आहे.

❖ संत नामदेव सांगतात, मूर्तिपूजक हिंदू आंधळे आहेत. तर मूसलमान काणे आहेत. कारण हिंदू देवळात जाऊन मूर्तीची उपासना करतात तर मुसलमान मशिदीत जाऊन अल्लाची प्रार्थना करतात. देव देवळात आहे, अल्ला मशिदीतच आहे. त्या दोहोंपेक्षा ज्ञानी माणूस चांगला कारण तो परमात्म्याचे सत्य स्वरूप जाणतो. संत नामदेव म्हणतात की, जो मंदीर किंवा मजिदीमध्ये नसतो. तर त्याचा वास प्रत्येक ठिकाणी असतो. तो सर्व ठिकाणी व्यापलेला आहे. परमेश्वर हा सर्व ठिकाणी व्यापलेला आहे, त्याचे नामस्मरण करावे.

❖ संत नामदेव सांगतात की, मनुष्याने आपल्या हाता-पायाने जरी कार्य केले तरी मुखामध्ये त्याच्या नेहमी राम-राम असणे गरजेचे आहे. ज्याप्रमाणे लहान मुलगा पंतग उडवतांना संवगड्याशी गप्पा-गोष्टी करतो परंतु त्याचे मन चित्त मात्र पतंगाकडे असते. सोनार सोन्याचा अलंकार घडवतांना गिऱ्हाइकाशी बोलतो परंतु त्याचे चित्त मात्र त्या दागिण्यात असते. विहीरीवरुन घड्यात पाणी नेत असलेली मूलगी आपल्या मैत्रीणीशी बोलते परंतु तिचे सारे चित्त त्या घड्यातील पाण्यात असते. गाईला चरण्यासाठी गोठ्यातून सोडले जाते परंतु त्या गाईचे चित्त मात्र गोठ्यातील वासरात असते. देह हे एक मंदीर आहे, त्यात प्रभू परमात्मा वास करत असतो. मानसाची दहाही इंद्रिये दैनंदिन व्यवहारासाठी दहाही दिशांना भटकत असतात पण जो खरा भक्त असतो तो सारे व्यवहार करीत असतांनाही त्याचे सारे चित्त त्या ह्दयमंदीरात असलेल्या प्रभू परमात्म्याकडेच सदैव लागलेले असते. घरातली माता सदैव कामासाठी आतबाहेर करीत असते पण तरीही तिचे चित्त मात्र सदैव पाळण्यात झोपलेल्या आपल्या बाळाकडे असते. तसे नामदेवाचे मन चित्त सदैव रामनामात गुंग झालेले आहे.

❖ नामदेव महाराज सांगतात की, सद्‌गुरूच्या कृपेने मी वैराग्यमय विरक्त होऊन प्रभू गुण गात आहे. मी अविनाशी प्रभूच्या प्रेमरंगात रंगलो आहे, आणि सर्व कूळव्यापी प्रभूचरणी पोहोचलो आहे. वेद, पुराणे, शास्त्रे, देवादिकांची स्तवन गीते, कर्मकांड, तीर्थस्थानाचे दर्शन, गंगास्नान, मित्र-परीवारात मान-सन्मान इ. या गोष्टींची मला गरज नाही. मला माझ्या गुरूंनी माझ्या अंतरातच अडुसष्ट तीर्थे दाखविली आहेत. मी माझे

चित्त हरिनामात लीन करून निर्विकल्प समाधीमध्ये स्थित होतो. माझे मन रामनामात रमले आहे. माझ्या समोर चंद्र आणि सूर्य सारखेच आहेत. मी तर ब्रम्हाच्या ज्योतीमध्ये मिसळून जाईल आणि हरीभक्त होईन. मी तीर्थावर जाऊन स्नान करणार नाही. माझ्या गुरूंनी माझ्या शरीरामध्येच तीर्थ दाखविले आहेत.

❖ प्रभू ही सृष्टी कशी निर्माण झाली ? जशी फुलपाखरे विश्रांती घेण्यासाठी थोडावेळ झाडावर बसतात आणि मग आकाशात उडून जातात. त्याप्रमाणे हा सृष्टीचा पसारा आहे. जेव्हा चंद्र, सुर्य, पाणी, पवन इ. तत्वही नव्हते, कोणतेही वेद शास्त्र नव्हते तर सर्व कर्मकांड कसे आले ? खेचरी, भूचरी इ. योग प्रकाराने होणारे ज्ञान, तुळशीमाळा घेऊन जप-तप केल्याने होणारे ज्ञान, सारे काही नामदेवाला गुरूकृपेने प्राप्त झाले आहे. नामदेव म्हणतात, ते परमतत्व, साऱ्या सृष्टीचे मूळतत्व तो प्रणव ओंकार आहे. त्याच्या नामस्मरणानेच मुक्ती प्राप्त होते. हे ज्ञान सद्‌गुरूकडून प्राप्त होते. माझ्यावर गुरूकृपा झाली, ईश्वर परमतत्व आहे आणि या परमतत्वाची प्राप्ती मला फक्त गुरूमूळेच झाली.

❖ संत नामदेव सांगतात की, कोणतीही वस्तू रामनामाची बरोबरी करू शकत नाही, हे मानवा तू मनामध्ये राग येऊ देऊ नकोस. आपल्या मनाला पवित्र कर, यमाला दोष देऊ नकोस. राजा दशरथाचा पुत्र श्रीरामचंद्र माझा ईश्वर आहे त्याचे नामस्मरण करून अमृत प्राषण कर तु त्या रामाचाच होशील आणि राम तुझाच होईल. कुंभमेळ्यात तीर्थावर जाणे. केदार तीर्थावर जाणे, तीर्थयात्रा करणे, आपले शरीर हिमालय पर्वतात गाडून घेणे, अश्वमेध यज्ञ करणे, सोने दान, गुप्त दान, तपश्चर्या, स्वत:चा देह अग्नीत टाकणे, गाय दान, अश्व दान, गज दान, नारी दान, शय्या दान इ. वेगवेगळी धार्मिक कार्य करून काहीच उपयोग नाही. ह्या कशाचीही रामनामाची बरोबरी होऊच शकत नाही. सर्व रसांचा मूळरस नामामृतच प्राशन केले पाहिजे.

❖ संत नामदेव भक्ताचे प्रतिपालन राम आणि कृष्ण यांच्या माध्यमातून प्रकट झालेल्या चमत्काराचे वर्णन करतात आणि मानवाला ईश्वर भक्तीसाठी प्रवृत्त करतात. प्रभू परमात्म्याचे बासरीवादन मधून वाटते, श्रीकृष्णाने पांघरलेले कांबळ खांद्यावर ओढलेले आहे. ती लोकर धन्य आहे. श्रीकृष्ण ज्या वृंदावनात खेळतात ते स्थळ धन्य आहे. माता देवकी महान आहे कारण माता देवकीच्या घरी विष्णूचा अवतार जन्म झ ाला. संत नामदेव राम व श्रीकृष्ण यांच्या चमत्काराचे वर्णन करतात व धन्यता मानतात.

❖ संत नामदेव सांगतात की, परमेश्वराने घेतलेले सर्व अवतार हे भक्तांच्या रक्षणासाठी घेतलेले आहेत. प्रभू भक्ताचे रक्षण वेगवेगळ्या प्रकारे करतो. परमेश्वर अनेक नावाने ओळखला जातो. कौरवाच्या सभेमध्ये द्रौपदीचे वस्त्रहरण करतांना द्रौपदी नामस्मरण करून प्रभूला स्मरले आणि क्षणातच द्रौपदीला वस्त्र पूरविले. गौतम ऋषीच्या पत्नीला पावन, मूक्त व पवित्र केले. शिळा झालेल्या तुझ्या पदस्पर्शाने ती मुक्त झाली. अशाप्रकारे मी तुझा भक्त तुला शरण आलो आहे माझा उध्दार कर अशी विनंती करतात.

❖ संत नामदेव सांगतात की, ईश्वर हा चराचरात आहे, त्याची उपासना करण्यासाठी एकरुप होणे गरजेचे आहे. प्रभू परमेश्वराचे अस्तित्व सर्वव्यापी असून तो सर्वत्र वसलेला आहे. कूंभार जसे मातीपासून

वेगवेगळे भांडे तयार करतो तसे हा प्रभू वेगवेगळे जीव बनवतो. त्या सर्व जीवांमध्ये राम वसलेला आहे. संत नामदेव सांगतात, तू फक्त रामावर विश्वास ठेव. दुसरी सर्व आशा वासना मनातून काढून टाक. नि:स्वार्थी ईश्वरात विलीन झाल्यावर सर्व भेद दूर होतात.

❖ 'नामस्मरण' हे अप्रतिम भक्ती साधन आहे की त्यातून खऱ्या अर्थाने मुक्ती मिळते. रामाचे नाव घेणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा उध्दार झालेला आहे. गुरूचा उपदेश व सहवास मनुष्य मायेच्या भवसागरातून तरण्यास मदत होते. नामस्मरणामुळे मनुष्य जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मूक्त होतो. संत नामदेव महाराज म्हणतात, नामस्मरणामुळे राजा अंबरीकला जीवदान मिळाले, बिभिषनाला राज्य, सुदाम्याला धन, ध्रुवाला अढळपद मिळाले. भक्त प्रल्हादांचे रक्षण करण्यासाठी नरसिंहाचा अवतार धारण करून हिरण्यकश्यपूला ठार मारले. भक्तांच्या रक्षणासाठी प्रभू केशव हा बळीच्या दारात अजूनही उभा आहे.

❖ संत नामदेव सांगतात की, सर्व कर्मकांड फोल आहेत. हरीचे नामच अखेर निर्वाणपद प्राप्त करुन देते. प्रभू तूझे अनंत रूपे आहेत. प्रभूचे नामोच्चरण करीत राहले पाहिजे. प्रभू नामस्मरणाला महत्व देतात. नामस्मरण करण्यासाठी जिभेवर ताबा मिळविला पाहिजे. नामस्मरण जर तू केले नाही तर संत नामदेव म्हणतात, तुझ्या जिभेचे तुकडे तुकडे करेल असा दम देतात. हरीच्या रंगात रंगून जा, हरिचा रंग खूप सुंदर असल्याने मानवा, तू हरीचा जप करत रहा. हरी जपाने मोक्षाची प्राप्ती होते. संत नामदेव सांगतात की, माझ्‍ या जिभेवर तूझे एकच नामस्मरण करण्याचे काम आहे.

❖ संत नामदेव म्हणतात की, जी माणसे प्रभूचे भजन करीत नाहीत. मी त्यांचे दर्शन करीत नाही. सर्व विषयवासनांचा त्याग करून फक्त नामस्मरनच खरे ठरू शकते असा विश्वास भक्तांना देतात. मानसाने परधनापासून अलिप्त राहावयास हवे. परस्त्री वासनेपासून दूर होत वाईट गोष्टीचा त्याग करतो तोच खरा पुरूष होय. ज्या माणसांच्या अंतरी प्रभुपासून अंतर आहे ती मानसे पशू समानच आहेत. इतर सर्व गुण, धन इ. असूनही जर मनुष्य नामस्मरण करत नसेल तर तो कोणत्याही कामाचा नाही. नामस्मरण केले नाही तर मनुष्य जीवन व्यर्थ ठरते. मुक्तीचा एकच मार्ग ठरु शकतो तो म्हणजे फक्त 'नामस्मरण' होय.

❖ संत नामदेव आपल्या बालपणीचा प्रसंग सांगतात, संत नामदेवाचे वडील दामाशेठी कापड विकण्यासाठी बाहेरगावी गेले होते. नियमितपणे नैवेद्य दाखविण्यासाठी आईने नामदेवाला सोन्याच्या वाटीत दुध देवून पाठविले. नामदेवाने प्रभूस दुध प्राशन करण्याचा आग्रह व नामदेवाचा बालहट्ट, भोळा भाव पाहून परमेश्वराला हसू आले. नामदेवाचे नैवेद्य प्राशन केले. हरीचे दर्शन देत ईश्वरालाही एकनिष्ठ नि:स्वार्थी भक्त आवडतात. त्यांना परमेश्वर दर्शन देतो.

❖ संत नामदेव सांगतात की, आपले ईश्वराशी नाते पती पत्नीचे आहे. माझे तन आणि मन माझ्या प्रभूकरीता उरले आहे. आता जगाने मला वाईट म्हणावे मला आता त्याची काळजी नाही, निंदा ऐकून मी दु:खी होत नाही. जिभेने प्रभूनामाचचे श्रेष्ठ अमृतपान केले पाहिजे. माझे मन परमेश्वराशी एकरूप झाले

आहे. मला नामदेवाला तो श्रीरंग प्रत्यक्ष भेटता आहे. माझ्या जीवनाचे सार्थक झाले आहे. प्रभू, लक्ष्मीपती, परमेश्वर भेटला आहे. हे जगाला मी ओरडून सांगण्यासाठी तयार आहे, असे भावरूपी विचार सांगायला मी तयारच आहे.

❖ जगातील गरीब-श्रीमंती यातील भेद सांगून ह्या परिस्थितीतून प्रभूनामच तारून नेऊ शकतो. जो प्रभूस शरण जातो त्यास तो प्रभू परमात्मा भवसागर पार करून नेतो. परमेश्वराने ज्या स्थितीत ठेवले तसेच जगावे. नामस्मरणाच्या शक्तीने मनुष्य निरपेक्ष बनतो. ईश्वराला प्रसन्न करण्यासाठी नामस्मरणाशिवाय दुसरी उपासना पध्दत होऊच शकत नाही. श्रीमंतीचा गर्व आणि गरीबीने घाबरणे यापासून दूर राहिले पाहिजे. आपल्या सुख-दुखाचे रहस्य प्रभू परमेश्वरच जाणतो. जो प्रभूस शरण जातो. त्यास तो प्रभू परमात्मा भवसागर पार करून नेतो.

❖ महाशिवरात्रीच्या दिवशी नामदेव महाराज औंढा नागनाथ येथील मंदीरात किर्तन करण्यासाठी गेले असता मंदीरातील पंडीतांनी नामदेव महाराजाला किर्तन करण्यासाठी नकार दिला. नामदेव प्रभू, परमेश्वराला विचारतात, मी शिंपी या खालच्या जातीत जन्मला म्हणून मला मंदीरात प्रवेश नाकारला का ? संत नामदेव मंदीराच्या मागच्या बाजूस किर्तन करू लागले. ईश्वराने नामदेवाची श्रध्दा, भाव, भक्ती पाहून आपल्या मंदीराचे तोंडच किर्तनाच्या दिशेने फिरवले. पंडीत पूजा करून बाहेर आल्यानंतर सतं नामदेवाचे पाय धरु लागले. ईश्वर हा भक्ताची श्रध्दा, भाव, भक्ती नामस्मरण पाहून भक्ताची इच्छा पूर्ण करतो.

❖ संत नामदेव म्हणतात, संसाराच्या सर्व प्रिय गोष्टीच्या माध्यमातून ईश्वर प्रिय गोष्टींच्या माध्यमातून ईश्वर प्रियतेचे महत्व सांगतात. ज्याप्रमाणे भूक लागलेल्या मनुष्याचे अन्नाकडे लक्ष असते. तहानलेल्या माणसाचे लक्ष पाण्याकडे, स्त्रीचे लक्ष संसाराकडे या बाबी सर्वमान्य आहेत. माझे मन प्रभूचरणी रंगून गेले आहे. नामदेव म्हणतात, प्रभूशी माझी प्रिती जुळली आहे, प्रभु आता नित्य माझ्या ह्दयात निवास करतो. प्रभू परमात्म्यात आणि माझ्यात अतूट प्रेम निर्माण झाले आहे.

❖ पापी माणसाचे ठिकाण कधीही न विझणाऱ्या अग्नीतच असते. आंधळा, पापी आपली बायको सोडून परनारीला मिठी मारतो. सिबल वृक्षाच्या फळांनी मोहित झालेला पोपट त्या सिबल वृक्षाच्या फळांनी मोहित झालेला पोपट त्या सिबल वृक्षाच्या जंजाळात अडकून त्यातच मरतो. मनुष्य उलट्या कामामध्ये अधिक व्यस्त असतो. जेथे प्रभू भक्ती होते त्याठिकाणी जाऊन विकारी मनुष्य कधीही पाहात नाही. जीवनाचा सरळ मार्ग सोडून विकारांच्या कुमार्गावर तो चालू लागतो. जगाचे मूळ प्रभूशी तुटून जन्म-मरणाच्या फेऱ्यात तो पडतो. नाम अमृत टाकून तो विकारांचे विष घेतो. माणसे प्रभु भक्तीच्या मार्गाकडे कधी वळतच नाहीत. सन्मार्ग सोडून नेहमी कुमार्गाकडे धाव घेतात. आसक्त, विकारी माणुस वेश्याच्या मोहक वेशभूषेला बळी पडतो. तिच्या ह्या नखऱ्याने हावभावाने बेभान होऊन तिच्या अगदी मिसळून जातो. अमृताची घागर सोडून विषाचा प्याला प्यायला लागतो. संत नामदेव महाराज सांगतात की, ज्याच्या ललाटी

त्या प्रभू परमात्म्याने नामाचा कर्मलेख लिहिला असेल तो सद्‌गुरूला शरण जातो. गुरूकृपेने संतसंगती प्राप्त होते. मनुष्याने चांगल्या विधी केल्यामूळे तो भवसागर पार करून मुक्त होतो.

❖ भक्त प्रल्हाद नित्य प्रभु 'नामस्मरण' करतो. प्रभुचे स्मरण आपल्या हदयात धारण करून ठेवतो. संड आणि मरका प्रल्हादाचे शिक्षक हिरण्यकश्यपूकडे तक्रार करतात की, हा रामनामात तल्लीन होतो. सर्व संवगडी ह्याच्याप्रमाणे बिघडले आहेत. त्यांच्या ह्रदयामध्ये रामनामाचा जप चालला आहे. प्रल्हादाची आई कयाधु प्रल्हादाला सांगते, अरे सर्व पृथ्वीतलावर तुझ्या वडिलाचे राज्य आहे. त्यांच्या आज्ञेशिवाय काहीच होत नाही आणि तू त्यांचा मूलगा त्याचं ऐकत नाही. सर्व दुष्ट लोकांची सभा भरली. भक्त प्रल्हादाला डोंगरावरून ढकलण्यात आलं, पाण्यात बुडविण्यात आल, आगीत जाळण्यात आल, परंतु भक्त प्रल्हादावर काहीच परीणाम झाला नाही. कारण भक्त प्रल्हादावर ईश्वराची माया आहे. स्वत: प्रभू त्याचे रक्षण करतो. शेवटी हिरण्यकश्यपू तलवार घेऊन विचारतो, सांग तूझा प्रभू कूठे आहे ? या खांबामध्ये आहे असे उत्तर मिळताच ईश्वराने नरसिंहाचा अवतार घेऊन आपल्या नखाने हिरण्यकश्यपूचे पोट फाडले आणि आपल्या भक्तांचे रक्षण केले. प्रभूचे स्मरण करणाऱ्याला प्रभूच रक्षण करतो. संत नामदेव म्हणतात की, आम्ही तर सर्वकाळ नरहरि नावाचा जप करतो. तो राम आम्हाला अभय देणारच.

❖ बादशहा मुहंमद बिन तुघलक यांना असे समजले की, संत नामदेवांच्या आशिर्वादाने एक मेलेला मनुष्य जिवंत झाला तेव्हा बादशहाने संत नामदेव महाराजांना मेलेली गाय जिवंत करण्याचे सांगीतले. आणि जेव्हा ती गाय जिवंत झाली तेव्हा मात्र बादशहा संत नामदेवाच्या शरण आला आणि नामदेवाची माफी मागीतली. संत नामदेवाने बादशहाला सांगीतले की, तुम्ही यापुढे सत्य व शिलाने वागावे. या प्रसंगामूळे भगवंताने भक्ताची लाज राखली नामदेवाचे नाव संपुर्ण विश्वामध्ये झाले. नामदेवाच्या भक्तीमूळे प्रभूने मृत गायीला जीवंत केले. ईश्वराने नामदेवावर एवढी कृपा केली की, नामदेव नारायणाशी एकरूप झाले. या प्रसंगामुळे हिंदू व मुस्लीम दोघेही संत नामदेवाना ईश्वराचे दुत मानू लागले.

❖ गुरूकृपेने परमेश्वर प्राप्त होतो. जर सद्‌गुरू प्रसन्न झाले तर भवसागर पार करून जातो व त्यास वैकुंठाची प्राप्ती होते. इतर सर्व दैवतांची पूजा व्यर्थ आहे. सद्‌गुरूची सेवाच नित्य स्थिर राहणारी आहे जर सद्‌गुरू प्रसन्न झाले तर जीवाचे मन नामात दृढ होते. सद्‌गुरूकृपेने मन पंचविकारांपासून दूर जाते. सद्‌गुरूच्या कृपेने भक्ताची वाणी अमृता समान पवित्र होते. असा जीव गुरूकृपेत सदैव नामजपात तल्लीन होतो. सद्‌गुरू कृपा झाल्यावर जीव विरक्त होतो. तो परनिंदेचा त्याग करतो. गुरूकृपेने चांगले वाईट त्याला समानच वाटू लागते व त्याचे भाग्यही पालटून जाते. गुरूकृपा झाल्यावर संत नामदेवाच्या किर्तनामूळे औंढ्याचे देऊळ फिरले. सद्‌गुरू कृपा झाल्यावर अडूसष्ट तीर्थात स्नान केल्याचे पुण्य लाभते. गुरूची कृपा झाली तर बाराही प्रकारच्या सेवांचे पुण्य लाभते व विषही अमृत होते. मनुष्याचा जन्म-मरणाच्या फेऱ्यातून

जीव मूक्त होतो. सद्‌गुरूच्या प्रसन्नतेतच अठरा पुराणाचे सार आहे. तर गुरूकृपा झाली तर जिवात्मा व परमात्मा यांचे मिलन होते. गुरूकृपेशिवाय जीवाची मनोकामना पूर्ण होत नाहीत.

❖ ईश्वर सर्व जीवांमध्ये विद्यमान आहे. संत नामदेव म्हणतात, जेव्हा मी भक्ती करत होतो तेव्हा तू सर्व हिरावून घेत होता. सर्व जागा सर्व ठिकाण जाणणारा ओळखणारा सर्व ठिकाणी परमेश्वर विद्यमान आहे. विश्वाचा सारा पसारा माझ्या परमेश्वराचाच आहे.

❖ नारायणाला प्रसन्न करण्यासाठी नामस्मरण करणे गरजेचे आहे. जो ईश्वरावर श्रध्दा, विश्वास व आस्था ठेवतो तोच खरा त्याचा सेवक आहे. नामदेव सांगतात, ज्याच्यावर प्रत्यक्ष नारायण प्रसन्न होईल तोच खरा सेवक, त्यालाच प्रभू परमात्मा आपले नाम प्रदान करतो.

❖ संत नामदेव विठ्ठलाला विनंती करतात की, या संसाररुपी सागर पार करण्यासाठी मला सद्‌गुरूची आवश्यकता आहे.

❖ देहरक्षणाची पर्वा न करता भक्तीरसात रात्रदिवस रंगून जाण्याची नामदेवांची प्रवृत्ती पाहून कोणी त्यांना म्हटले, अशी देहाची उपेक्षा केले, तर तो कसा टिकेल ? तेव्हा संत नामदेव म्हणतात, पहिले धुळीने भरलेली गाडी म्हणजे पापरूपी शरीर सत्संगाच्या तळ्याकडे हळूहळू चालत असते, परंतु पाठीमागून उत्साह रूपी काठी म्हणजे जीव शरीराला पुढेपुढे ढकलत असतो. गुरूरूपी जो हरीप्रेमात मग्न असतो तो जीवात्म्याच्या पापांचा मळ धुऊन टाकतो. नंतर या जीवाचे मन हरि स्मरणामध्ये लागते. ईश्वराच्या चरणी लिन होते.

❖ संत नामदेव महाराज धन व माया मनुष्यासाठी सर्व काही नाही असे सांगतात, मानवाला प्रभूच्या शरण जाण्यास सांगतात. त्या भगवंताचे भजन करण्यास सांगतात. त्या प्रभूचा आधार घेऊन प्रभूचे सदैव स्मरण करावे असे नामदेव महाराज सांगतात. माया मोहाने धोका खालेल्या मनुष्य मधाच्या माश्या व गाईप्रमाणे आहे. मायेची साथ कच्ची व भगवंताची साथ पक्की आहे. माणूस खूप श्रम करून धनसंपत्ती गोळा करतो. चोराच्या भयाने धन जमिनीत पूरून ठेवतो पण मेल्यावर त्या धनाची मातीच होते. माणसाच्या मृत्यूनंतर देखील मानवाची मातीच होते. म्हणून मानवाने भगवंताच्या शरण जावे.

❖ संत नामदेव म्हणतात की, ईश्वर सर्वकाही आहे. ज्याप्रमाणे पाण्यापासून लाटा तयार होतात आणि लाटांपासून पाणी बनते. पाण्यातून लाटा उठतात. लाटांच्या एकरुपतेत पाण्याचे अस्तित्व आहे, म्हणजेच मूळ रूपात दोन्ही एकच आहे. हे भगवंता तूच नाचतो, तूच मुरारी वाजवतो, तू प्रत्येक जीवांमध्ये आहेत. तूच कर्ता व करविता आहेस. भक्त हा नेहमी अपूर्ण असतो तर परमेश्वर हा पूर्ण असतो. नामदेव म्हणतात, हे माधव, तू माझा मालक आहेस, हे ठीक आहे की मी तुझा सेवक तुझ्यापेक्षा फार लहान आहे. अपूर्ण आहे आणि तू पूर्ण आहेस परंतु जर दास नसेल तर तू मालक कसा म्हणवशील ? तरीही मला आपला सेवक म्हणून कायम ठेव.

❖ ईश्वर हा भक्तांच्या प्रेमात बांधलेला असतो. भक्त हा ईश्वराचाच रूप आहे. भक्त हा ईश्वरावर प्रेम करतो. भक्त हे ईश्वराचेच रूप आहे. ईश्वर भक्तांचे दर्शन केल्याने तीन ताप देहिक, दैविक व भौतिक हे नष्ट होतात. ईश्वराचे जीवन म्हणजे भक्त होय. त्रिगुणांनी बांधल्या गेलेल्या सर्व जीवांचा ईश्वर आधार आहे. आणि भक्त हा ईश्वराचा आधार आहे.

❖ तीनही भवनांचा मालक तो प्रभु एक असा राजा आहे की विष्णूचा कासव अवतार ज्याच्या घरात जणू एक पलंग आहे. हजार फणी असणारा शेषनाग त्याची शय्या तयार करणारा आहे. जगातील संपूर्ण वनस्पती त्यास पुष्प अर्पण करणारी माळीण आहे. शहाण्णव कोटी वादळ त्याचे पाणी भरणारे चाकर आहेत, गंगा त्याच्या दारात नखाचा घाम आहे आणि सात समुद्र त्याचे साठवण आहेत. जगातील हे सर्व जीवजंतु त्याची भांडी आहेत. तो प्रभु एक असा राजा आहे ज्याच्या घरात त्याचे निकटवर्ती अर्जुन, प्रल्हाद, अंबरीश, नारद, नेजे इत्यादी गण-गंधर्व त्याचे साधारण खेळ आहेत. जगातील हे सर्व जीवजंतू प्रभूच्या घरात आहेत. तो हरी प्रभु सर्वांत व्यापक आहे. सर्वांच्या अंतरी तो राहतो. संत नामदेव परमेश्वराला विनंती करीत आहेत की, मला त्या प्रभूचा आधार आहे, त्याच्या झेंड्याखाली छत्रछायेखाली सर्व भक्तगण आनंद अनुभवीत आहेत.

❖ संत नामदेव परमेश्वराला म्हणतात, तू तर परम दयाळू, परमकृपाळू, सर्वव्याप्त, बलशाली आहेस. मग ह्या पंड्यांना तूझी किमया दाखव ना. नामदेवाची ही आर्त विनवणी ऐकून प्रभूने लीला केली. संत नामदेव महाराज बसले होते त्या ठिकाणाकडे आपल्या मंदिराचा दरवाजा फिरऊन स्वत: भगवान नामदेवांच्या समोर बसले व पंडित लोकांना पाठ दाखविली. संत नामदेव जिकडे जाईल तिकडे देऊळ फिरू लागले. अशा रीतीनेदेवाने भक्तांचे रक्षण केले व आपल्या 'भक्त वत्सल' ह्या ब्रीदास राखले.

❖ संत नामदेव महाराज भगवंतांचे वर्णन करतात की, माझा राम सर्वांच्या ह्रदयात निवास करतो. ज्याप्रमाणे शरीराचा प्रत्येक भाग आरशामध्ये प्रत्यक्ष दिसतो, तसा माझा राम प्रत्येकाच्या ह्रदयामध्ये आहे. त्याला माया स्पर्श सुध्दा करत नाही. त्याप्रमाणे माझा विठ्ठल आहे. ईश्वर हा सर्वव्यापक असून निर्लेप आहे.

❖ संत नामदेव महाराज सांगतात की, मनाचे दु:ख मनालाच सांगावे लागते. मनाचे दु:ख त्याच व्यक्तीजवळ प्रकट करावे लागते ज्याला मन आहे. ईश्वराच्या रंगामध्ये रंगून गेल्यानंतर त्या व्यक्तीची भाषा व शब्द सत्य रूप बनत असतात. नामदेव महाराज असे म्हणतात की, गुरूकृपेमुळे मला जगजीवन भगवान प्राप्त झाले आहेत. माझे ह्रदय आश्चर्यचकित झाले आहे. जो भक्त त्या पुरूषोत्तमाचे भजन करतो, त्याची वाणी अविनाशी, अटळ बनून जाते. संत नामदेव सांगतात, मी माझ्या ह्रदयातच तो अदृश्य जादूगार प्राप्त केला आहे.

❖ जंगलात जसा चंदनाचा वृक्ष असतो, त्याच्या सुगंधाने सर्वांस सुख मिळते, त्याच्या संगतीत साधारण वृक्षसुध्दा चंदन बनुन जातात. तसाच तो राम, सर्व जीवांचा मूळ राम, सर्व गुणरूपी सुगंधीचा मूळ आहे,

त्याच्या संगतीत साधारण जीवही गुणवान बनतात.  त्याचप्रमाणे हा भगवंत परीस आहे आणि जीव लोखंड आहे.

❖ संत नामदेव महाराज ईश्वरासमोर प्रार्थना करतात की, ईश्वर जीवाला ते देतो जी जीवाची भावना असते.  जे जीव त्या ईश्वराच्या मर्जीमध्ये राहतात ते अमर होतात.  सर्व जीवांमध्ये ईश्वररूपी ज्योत आहे. संसाराच्या रचनेचा खेळ ईश्वरानेच रचलेला आहे.  स्वयंभू परमात्म्याने हा विश्वाचा खेळ मांडला आहे.  तो प्रत्येक शरीरात त्याचाच वास आहे.  प्रत्येक जीवाच्या ठायी गुप्तरूपाने वास करणाऱ्या त्या परमात्म्यास मात्र ओळखत नाही.  संत नामदेव विनंती करतात की, हा जीव ज्या वस्तूवर आपला जीव टिकवतो त्यास प्राप्त करून घेतो, मायाजाळाची इच्छा करतो आणि त्यात अडकून पडतो, परंतु जर हा जीव सर्वव्यापी प्रभूस आपल्या मनात टिकवेल तर त्या अमर प्रभूत टिकून अमर होऊन जाईल.

❖ संत त्रिलोचन महाराज सांगतात की, कोणी विरळ संतजन म्हणतो, माझ्या मनात ही गोष्ट प्रत्यक्ष घडली आहे की, मायेत गुंतून धर्मराजाचे तोंड पहावे लागेल, तेथे मोठमोठ्या बलवानानांही यमदूत हाताने दळून टाकतात, त्यांच्या समोर मला काही करता येत नाही.  आज आता माझ्या मनात प्रकाश पडतोय, की एक ना एक दिवस आपल्याला धर्मराजा पुढे उभे राहावे लागणार आहे.  तो मला हाताने चुरडून टाकील. त्याच्या महान बाहुबली दूतापुढे कोणाचे काही चालत नाही.  त्यांच्या पुढे माझा काय पाड लागणार.  हे नारायण, एरव्ही तर तूझे कधी स्मरण होत नाही, परंतु जेव्हा कोणी गुरूमुख मला उपदेश करतो तेव्हा तू सर्व ठिकाणी व्यापक दिसू लागतोस.  जेव्हा मला कोणी हरीचा उपदेश करतो, तेव्हा मला कळते की प्रभू परमात्मा वनात, तृणात सर्वत्र आहे.  सर्वत्र तो प्रभू परमात्माच वास करतो.  त्रिलोचनजी सांगतात की, माझा रामराया सर्व काही जाणतो.  माझी रक्षा करतो.

❖ संत त्रिलोचन महाराज सांगतात की, हे मानवा तू असे मोजके जप का करतो ?  त्या वासनारहित प्रभूचे सदासर्वदा स्मरण करा.  ज्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनी असणारी सृष्टी निर्माण केली.  जप-तप केल्याने प्रभु परमात्मा प्राप्त होणार नाही.  ज्या प्रभू परमात्म्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनी निर्माण केल्या, त्या मुक्तीदाता प्रभू परमात्म्याचे स्मरण करा.  विनाकारण तीर्थयात्रा करू नका.  संत त्रिलोचन सांगतात की, जर शेतात बीज पेरले नाही, तर गव्हाची उत्पत्ती कशी होईल ?  गहू कसा उगवेल.  जर मानवाने गुरूमार्गावर चालला नाही तर त्यास हे सर्व करूनही सत्याची प्राप्ती होत नाही.

❖ संत त्रिलोचन पुनर्जन्माबद्दल यात वर्णन करतांना सांगतात की, जो जीव मृत्यूसमयी लक्ष्मीचा, धनाचा विचार करतो, त्याचीच चिंता करतो तो पुढील जन्म सर्प योनीत जन्म घेतो.  जो मनुष्य मृत्यूसमयी आपल्या स्त्रीचेच स्मरण करतो, आणि त्या स्मरणातच प्राणत्याग करतो तो परत वेश्येचा जन्म घेतो.  जो मनुष्य अंतसमयी आपल्या पुत्राचेच स्मरण करतो आणि पुत्रांचे स्मरण करता करताच मरून जातो तो परत परत

डुकराच्या योनीत जन्म घेतो. आणि जर मानवाने अंत समयी प्रभूनाम स्मरण केले तर त्याला जीवनातून मूक्ती मिळते.

❖ संत त्रिलोचन सांगतात की, स्वत: केलेल्या मंद कर्मानुसार समुद्राचा खारटपणा जाउ शकलो नाही, जरी तो सर्व नद्यांचा नाथ आहे आणि त्यातून अमृत, चंद्र, कामधेनु, लक्ष्मी, कल्पतरू, सात तोंडे असणारा घोडा, धन्वंतरी इत्यादी चौदा रत्ने निघाली होती. स्वत: केलेल्या कर्माधीनतेने हनुमानाच्या भाग्यात त्याची लहानशी 'कच' चड्डी काही केल्या गेली नाही जरी त्यांनी श्री रामचंद्राकरिता लंकेचा किल्ला जाळला व लंकापति रावणाच्या बागेचा नाश केला, जडीबुटी आणून श्री रामचंद्रास प्रसन्नही केले. मागे केलेले कोणतेही कर्म अवतार पूजा, तीर्थस्नान इत्यादी द्वारे मिटवता येत नाही, तरी मी तर प्रभू नामाचे स्मरण करतो. संत त्रिलोचन म्हणतो, मी तर रामनामाचा तप करतो. म्हणजे प्रभूचाच आधार घेतो आणि आपण केलेल्या कर्मामुळे आपल्या दु:खाबद्दल प्रभूस दोष देत नाही.

❖ संत परमानंद सांगतात की, धर्मपुस्तक ऐकूनही तुझ्या मनातून निर्दयीपणा गेला नाही, लोकांशी तू प्रेमपूर्वक व्यवहार केला नाहीस, आणि सत्संगतीत बसून तू कधीही प्रभूच्या पवित्र करणाऱ्या गोष्टी वर्णन केल्या नाहीस, म्हणजे तुझ्यात सतसंगत करण्याची आवड निर्माण झाली नाही. धर्मग्रंथ वाचून तूझ्या मनातून हिंसा नष्ट झाली नाही. भूतदया केली नाहीस. परमानंद सांगतात, हे जीवा ! तू संतसंगती केली नाहीस किंवा कोणतीही पवित्र कथा ऐकली नाहीस. संतसंगती चे महत्व यात परमानंद विशद करतात.

## ६.२ निष्कर्ष :-

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या प्रबंधाच्या अभ्यासाच्या माध्यमातून ऐतिहासिक संशोधन करणे हा मुख्य हेतू असून त्याद्वारे मराठी संतांच्या महाराष्ट्राबाहेरील भूप्रदेश व विविध धर्मग्रंथाच्या माध्यमातून त्यांच्या अभंगांचे, पदांचे महत्त्व व समावेशाबाबतचा निष्कर्ष पुढीलप्रमाणे काढले आहेत.

१. मराठी संतांच्या अंभंगाचा पदांचा गुरुग्रंथसाहिबातील समावेशास महत्त्व आहे.

२. संत नामदेवांच्या गुरूग्रंथसाहिबातील समाविष्ट पदांद्वारे सामाजिक बांधिलकी आहे.

३. मराठी संत त्रिलोचन व संत परमानंदांच्या अभंगातील सामाजिक बांधिलकी आहे.

४. मराठी संतांच्या गुरूग्रंथसाहिबातील पदांच्या अंतर्भावाने मराठी संस्कृती भारतात व जगात प्रसारीत झाली आहे.

५. मराठी संतांच्या अभंगाचे महत्व मराठी भाषा व प्रदेशाव्यतिरिक्त इतर भाषा व प्रदेशात देखील महत्वाचे आहे.

६. मराठी संतांच्या पदांमध्ये भारतीय समाजप्रबोधन दिसून येते.

७. गुरुग्रंथसाहिबात मराठी संतांच्या पदामुळे शीख धर्म व हिंदू धर्म यांमध्ये वैचारीक तत्त्वामध्ये एकरूपता आहे.

८. मध्ययुगीन भारतात होवून गेलेल्या महान व्यक्तींची पदे शीख धर्मात आहेत यावरून शीख धर्मांमध्ये सर्वधर्मसमभावाची भावना आहे.

९. शीख धर्मग्रंथात शिख गुरू अर्जुनदेवाने पुर्ण करतांना जगातील सर्व चांगल्या गोष्टीचा समावेश करण्यासाठी इतर जाती-धर्मांतील साधू संत व महान व्यक्तींची पदे घेतली आहेत.

१०. शीख धर्म हा मध्ययुगातील एक महान धर्म असून या धर्मातील चालीरीती परंपरा ह्या सामान्य जनतेला अंगीकारता याव्यात म्हणून शिखांचे पाचवे गुरु अर्जुन देव यांनी वेगवेगळ्या जाती-धर्मांतील व्यक्तींची पदे घेऊन शीख धर्म ग्रंथ गुरुग्रंथसाहिबाची निर्मीती केली आहे.

११. शीखांचे १०वे गुरू गोविंद सिंग यांनी गुरू परंपरा टिकवीत असतांना अनेक संकटांना गुरूंना सामोरे जावे लागत होते. त्यामूळे गुरू गोविंदसिंघ यांनी गुरू परंपरा खंडीत करून ४ ऑक्टोंबर १७०४ रोजी 'गुरू मानीयो ग्रंथ' हा आदेश देऊन देहरूपी गुरू परंपरा समाप्त केली. 'गुरू मानीयो ग्रंथ' म्हणजे शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबाला गुरू मानण्यास सांगीतले त्याप्रमाणे आजही शीख धर्मांमध्ये ही परंपरा चालू आहे.

१२. शीख धर्मांतील 'गुरूद्वारा' हे प्रार्थना मंदीर कोणत्या ना कोणत्या गुरूंच्या स्मरणार्थ किंवा त्यांच्या कार्याचा गौरवार्थ बांधण्यात आली असून ती जगात वेगवेगळ्या ठिकाणी सर्वधर्मसमभावाची शिकवण देत उभी आहेत.

१३. शीख धर्म हा त्यागाचा प्रतिक मानला जातो बऱ्याच गुरूंनी स्वत:च्या त्यागातून व बलीदानातून हा धर्म मध्ययुगीन काळात मोगल बादशहाच्या अत्याचारातून वाचविला व तो पूढे नेण्यास मदत केली.

१४. संत नामदेव महाराज यांच्या कार्यामुळे शीख बांधवांनी त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून घुमान या ठिकाणी जो गुरुव्दारा बांधला त्यांचे नाव 'संत नामदेव महाराज गुरूव्दारा' असे देण्यात आले आहे.

१५. संत नामदेव महाराजांनी लिहलेल्या ६१ हिंदी पदांचा समावेश गुरू अर्जुन यांनी 'गुरूग्रंथसाहिब' मध्ये घेऊन त्यांच्या कार्याचा गौरव केला.

१६. संत नामदेव यांनी लिहलेली पदे ही आजही शीख धर्मांतील जनतेला त्याचप्रमाणे जगातील सर्व लोकांना आदर्श जीवन जगण्यासाठी मार्गदर्शन करतात.

१७. संत त्रिलोचन महाराज यांची ४ पदे शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबामध्ये घेण्यात आली असून या पदाद्वारे गुरू अर्जुन देवांनी जगाला सर्वधर्मसमभावाची शिकवण दिली आहे.

१८. संत परमानंद महाराज यांची हिंदीतील १ पद गुरू ग्रंथसाहिबामध्ये आहे यावरून शीख धर्मांचा धर्मग्रंथात जगाला सर्वधर्मसमभावाची शिकवण दिली आहे.

१९. शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबा मध्ये ३६ वाणीकारांच्या साहाय्याने हा धर्मग्रंथ पूर्ण केला आहे.

२०. शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबा मध्ये वेगवेगळ्या महान व्यक्तींची पदे घेऊन हा धर्मग्रंथ सर्वच जाती धर्मांच्या लोंकासाठी एकात्मतेची शिकवण देत आहे.

२१. गुरू नानक यांनी ज्या उद्देशाने हा धर्म निर्माण केला त्या उद्देशाची पुर्ती शीख धर्मात त्याचप्रमाणे त्यांच्या धर्मग्रथात झाल्याची दिसून येते.

२२. गुरू गोविंदसिघांनी अन्याय व अत्याचारापासून शीख धर्माचे व त्याचप्रमाणे इतर समाजाचे रक्षण करण्यासाठी 'खालसा पंथाची' स्थापना करतांना दिसून येते. 'मीरी' व 'पीरी' ह्या दोन तलवारी धारण करण्याचा मुख्य हेतू म्हणजे धर्मांचे व मानव जातीचे रक्षण करणे हा होता.

२३. शीख धर्मांतील तत्त्वे ही जगासाठी आदर्श तत्त्वे मानली जातात.

२४. मध्ययुगीन काळात निर्माण झालेला हा धर्म फार कमी काळात जगाच्या सर्व भागात पोहोचला कारण या शीख धर्माची तत्त्वे आचरणासाठी फार सोपी होती. त्यामुळे या धर्मांला कमी काळात लोकप्रियता मिळाली.

२५. शीख धर्म संस्थापक गुरू नानक यांनी जगातील सर्व धर्मांचा अभ्यास करून एक प्रकारे हा सर्वसमावेश धर्म निर्माण केला.

२६. शीख धर्मांच्या धर्मग्रंथात गुरूग्रंथसाहिबात मराठी संताच्या स्थान मिळाले किंवा मराठी संतांच्या पदांना या धर्मग्रंथात स्थान मिळाले यावरून मराठी संताची विचारसरणी किंवा त्यांचे विचार हे आदर्श मानले जातात.

२७. शीख धर्मांच्या धर्मग्रंथात गुरूग्रंथसाहिबात जगातील महान व्यक्तींची विचार, पदे, शबद्, इ. चा समावेश म्हणजे एक प्रकारे त्या महान व्यक्तींचा गौरवच मानला जातो.

२८. संत नामदेव यांनी धर्मांच्या प्रचार प्रसार करण्यासाठी वेगवेगळ्या भागात जाऊन जनजागृती केली वेगवेगळ्या अंभगातून त्यांनी जनमानसातील जातीभेद, धार्मिक भेदभाव, वर्ण भेद इ, दूर केला व लोकांना मानवतेची शिकवण दिली.

२९. संत त्रिलोचन व संत परमानंद यांची अनुक्रमे ४ व १ पदे गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट आहेत यावरून त्यांची विचारसरणी ही मानवतेला अनुसरूनच होती.

३०. मराठी संतांची पदे गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट असल्यामुळे मराठी संताची शिकवण, ज्ञान, तत्त्वज्ञान, विचारसरणी ही नक्कीच महान आहे हे यावरून लक्षात येते.

३१. गुरू नानक यांचे बालपणीचे संगोपण हे हिंदु कुटूंबात झाल्यामूळे गुरू नानक व शिख धर्मांवर मध्ययुगीन भारतातील भक्ती चळवळ शाखेच्या 'निरगुणी' निराकार देव कल्पनेचा प्रभाव पडलेला दिसतो.

३२. शिख परंपरेचे मुळ भारतीय संत परंपरेची विचारधारा विस्तृत होऊन भक्ती पंथात सापडतात.

३३. शिखांच्या पवित्र गुरूग्रंथसाहिबातील मापदंडाला प्राथमिक व दसम ग्रंथाला गौण दर्जा भारतीय पौराणिक कथेप्रमाणे मान्य आहे. ज्यामुळे शिखांच्या पवित्र प्रतिकात्मक आजच्या जगताला व मागील पुर्वजांना महत्वाचा मानला जातो.

३४. शिख धर्मांचे संस्थापक गुरू नानक यांनी समानता, बंधुत्व, पवित्रता, सद्‌गुणावर आधारीत, अव्दितीय आध्यात्मिक, राजनितीक संप्रदायाची स्थापना केली, या गुणांमुळेच या धर्मांच्या धर्मग्रंथात मराठी संतांच्या पदांना स्थान मिळाले आहे.

३५. गुरूग्रंथसाहिबात मराठी संतांच्या पदांना स्थान मिळाल्यामुळे मराठी संतांनी एक प्रकारे राष्ट्रीय एकात्मता निर्माण करण्यास त्यांची पदे कारणीभूत ठरली.

३६. शिख धर्म हा जागतिक स्थरावरील धर्म बनल्यामुळे या मराठी संतांच्या कार्याची माहीती देखील जागतिक स्तरावरील अभ्यासकांनी अभ्यासली व त्यांचे महत्व मान्य केले.

३७. मराठी संतांच्या गुरूग्रंथसाहिबातील पदामूळे सर्वधर्मसमानता, राष्ट्रीय एकात्मता, जागतिक शांतता, धार्मिक एकात्मता, या गोष्टी साध्य करण्यास मदत मिळाली.

३८. जगातील सर्व धर्म अभ्यासकांनी मराठी संतांचे अव्दितीय स्थान लक्षात आले.

३९. ज्याप्रमाणे भारतीय संविधानात जगातील सर्व  देशाच्या संविधानाच्या चांगल्या गोष्टींचा अभ्यास करून भारतीय संविधान बनवले आहे त्याचप्रमाणे शिख धर्मग्रंथ हा देखील जगातील महान संत, व्यक्ती, यांच्या चांगल्या पदांचा अंगीकार गुरूग्रंथसाहिब मध्ये झाला आहे.

४०. गुरू गोविंद सिंघानी देहरूपी गुरू परंपरा बंद करून गुरूग्रंथसाहिब ला गुरू मानल्यामूळे त्या धर्मग्रंथातील आदर्श तत्त्वानुसार हा धर्म चालवला जातो.  त्यामुळे ह्या धर्मांमध्ये कोणत्याही प्रकारचे मतभेद उत्पन्न होत नाहीत.

४१. शिख धर्मांमध्ये निरगुण निराकार भक्ती ला महत्व दिले असल्यामुळे भक्ती चळवळीतील संतांच्या विचाराशी जणू हा धर्म एकरूप झाल्याचे दिसते.

४२. शिख धर्मांच्या तत्त्वज्ञानामुळे विचारसरणीमूळे हा धर्म इतर धर्मांपेक्षा वेगळा असल्याचा दिसून येतो.

४३. शिख धर्मांचा धर्मग्रंथात इतर जाती धर्मांतील महान व्यक्ती, संत असल्यामूळेच शिख धर्मांतील व्यक्ती हिंदू धर्मांच्या तिर्थक्षेत्राला नेहमी भेटी देतात.

४४. संत नामदेव महाराज नामस्मरणाला महत्त्व देतात.  आपल्या दैनंदिन कामात ईश्वराचे नामस्मरण सहजतेने करू शकतो.  परमेश्वर भक्तीत कुठेही जातीपातीचा संबंध येत नाही.  नामस्मरण तेही शुध्द अतंकरणाने प्रामाणिकपणे करावे.  वेदांची व्याख्याने देऊन काही उपयोग नाही तर नामस्मरणामुळे प्रभू ची प्राप्ती होते.  नामस्मरणामुळे आत्मिक सुख, आनंद, समाधान मिळते त्याची बरोबरी कशाने होत नाही. नामस्मरण करणाऱ्या भक्तांचे ईश्वर नेहमी रक्षण करतो.  परमेश्वर हा 'भक्त वत्सल' ह्या ब्रीदाने भक्तांचे रक्षण करतो.

४५. संत नामदेव महाराज सांगतात की, ईश्वर हा सर्व ठिकाणी, सृष्टीच्या चराचरात असून त्याला प्राप्त करण्यासाठी गुरूकृपा महत्त्वाची आहे.  गुरूकृपा झाल्यावर व्यक्तीला सर्व ठिकाणी ईश्वर परमात्म्याचे दर्शन होते.  गुरूउपदेशाने ईश्वर प्राप्ती होते.  गुरूकृपेमुळे मनुष्याला जीवनाचे सत्य समजते.  संत नामदेव म्हणतात की, गुरूकृपेनेच ईश्वराची प्राप्ती होते तर गुरू नानक म्हणतात, प्रभु परमेश्वराच्या कृपेमुळे मला गुरू पद मिळाले.  गुरूकृपेमुळे मनुष्य जीवनमरणाच्या फेऱ्यातुन मुक्त होतो.

४६. ईश्वराला पाहाणे शक्य नसले तरी ईश्वराचे अस्तित्व मान्यच करावे लागते.  परमेश्वर हा सर्वव्यापक आहे.  साऱ्या जीवांना परमेश्वराचे नाम प्रिय आहे.  परमेश्वर हा एकच आहे.

४७. मनुष्याला अहंकार नसावा.  अहंकारामुळे मनुष्याचा विनाश होतो.  रामनामाच्या जपामुळे मनुष्यातील सर्व दोष नाहीसे होतात.

४८. गीतेमध्ये नामस्मरणाचा मार्ग सांगीतला आहे.  मानवाने स्वत:चे मन प्रभु प्रेमात लिन ठेवावे. नामस्मरण करण्यासाठी कोणत्याही प्रकारचे बंधने नाहीत.  सर्व रसांचा मूळ रस नामामृतच प्राशन करणे हा आहे.  परमेश्वर हा सर्वांचा उध्दार करतो.  'नामस्मरण' हे अप्रतिम भक्ती साधन आहे.

४९. संत त्रिलोचन महाराज मृत्यूनंतर पुर्नजन्मावर विश्वास ठेवतात व नामस्मरण केल्यामुळे जन्ममरणाच्या चक्रातून मुक्ती मिळते असे सांगतात.

५०. संसाराच्या सर्व रचनेचा खेळ ईश्वरानेच रचलेला आहे. परमेश्वर सर्व काही जाणतो. सर्वत्र प्रभू परमात्माच वास करतो.

५१. शिख साहित्याचे अभ्यासक प्रोफेसर अरविंद पाल सिंग मानडायर ह्यांच्या मते ज्या वेळी गुरू नानकांनी शिख धर्माची स्थापणा केली. पंजाबमध्ये सामाजिक स्वयंपाक पध्दती अगोदरच चालु होती. आणि ते मुस्लिम सुफी पंथ आणि हिंदु गोरखनाथ पंथ चालवत होते. म्हणजेच शीख धर्मातील लंगर पध्दती ही समकालीन हिंदु व मुस्लीम धर्मातील परंपरेचा प्रभाव दिसून येतो.

**६.३ गृहितकृत्यांची सिध्दता :-**

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधात गृहितकृत्यांची सिध्दता खालील प्रमाणे आहे.

१. संत नामदेवांची ६१ पदे, संत त्रिलोचनाची ४ पदे, संत परमानंदाची १ पद श्री गुरूग्रंथसाहिब या शीखांच्या पवित्र ग्रंथात आहेत. यावरून शीख धर्मांच्या दृष्टीने मराठी संत (संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद) हे ईश्वराचे दूत ठरतात.- गुरूग्रंथसाहिबातील रचना शिख गुरूंनी केली. गुरू नानकदेव, गुरू अंगददेवजी, गुरू अमरदासजी, गुरू रामदास, गुरू अर्जुन देव यांनी २२ राग आणि गुरू तेगबहाद्दुरांनी ९ राग जोडले. गुरू गोविंद सिंगानी महाला ९ मध्ये एक श्लोक जोडला. ह्या श्लोकामध्ये भारतीय संताच्या पध्दती व उपदेश समाविष्ट आहे. उदा. संत रविदास, संत रामानंद, संत कबीर, संत नामदेव व इतर आणि दोन मुस्लिम सुफी संत भगत भिकन आणि शेख फरीद इ. शिख धर्मांचा उदय संत नामदेव, संत त्रिलोचन व संत परमानंद या मराठी संताच्या जीवनकार्यानंतर झाला तरी देखील या मराठी संतांच्या विचार व कार्यामुळे संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद यांची पदे गुरूग्रंथसाहिबात समाविष्ट करण्यात आली आहेत. यावरुन हे मराठी संत ईश्वराचे दूतच ठरतात.

२. शीख संप्रदाय मराठी संताचे अध्यात्मिक श्रेष्ठत्व मान्य करतो. - श्री गुरूग्रंथसाहिबाची शिकवण ही अनेक अंगांनी वेगळी आहे. 'सिखिझम' च्या संस्थापक गुरूंनी अतिशय दक्षतेने व शास्त्रोक्त पध्दतीने ग्रंथाचे संपादन कले आहे. शिख संप्रदायाच धार्मिक धर्मग्रंथ आहे. शिख धर्मातील व्यक्ती त्याला अंतिम, सर्वोच्चत्तम आणि चिरस्थायी जीवीत गुरू मानतात. आदीग्रंथ पहिल्या अनुवादाची रचना शिखांचे पाचवे गुरू गुरू अर्जुनांनी केली. मुळग्रंथात १४३० अंग पेजेस आणि ६००० सबद ओळी रचना चा समावेश आहे. पुरातन उत्तर भारतीय तालबध्द संगीत प्रणालीत काव्यात्मक रीतीने गायला जाते. मुळग्रंथाचा संपुर्ण भागाची ३१ रागात विभागणी केल्या गेली. ग्रंथातील प्रत्येक राग त्याच्या लांबी वर ग्रंथकाराप्रमाणे उपविभागीला आहे. धर्मग्रंथातील भजनांची मुख्यत: ज्या रागात ते गाइल्या जावे त्या प्रमाणे क्रमबध्द केल्या गेले आहे. 'गुरूग्रंथसाहिबा' हे गुरूमुखी लिपीत लिहील्या गेली आहे. लाहंडा, ब्रजभाषा, खरीबोली, संस्कृत, सिंधी आणि पर्शियन भाषेत उपलब्ध आहे. ह्या सगळ्या भाषेतील प्रतींना 'संत भाषा' अस वर्ग विशेष शिर्षक दिले. "The Compostions in the Sikh holi book, Adi Granth, are a melange of various dialects, often coalesced under the generic title of **Sant Bhasha**"., Deol Harnik, (२०००). Religion and Nationalism in India, Routledge, p.no.२२.

"The Language of the hymns recorded in the Adi Granth has been called **Sant Bhasha**, a kind of lingua franca unsed by the medieval saint-poets of northern India. But the broad range of contributorss to the text produced a complex mix of regional

dialects".,Singh Mann, (२००१). The Making of Sikh Scripture, Published by Oxford University Press, Oxford, p.no.५.

"When we go through the hymns and compostions of the Guru written in Sait Bhasha-**saint language**, it appears that some Indian saint of १६th century". Singh Kohli Surindar Singh Kohli, (१९९३). History of Punjabi Literature, National Book, p.no.४८.

"Guru Granth Sahib Ji is written in Gurmukhi Script. The langurge, which is most often **Sant Bhasha**, is very close to Punjabi, it is well understood all over northern and northwest India and is popular among the wandering holy men. Persian and some local dialects have also been used. Many hymns contain words of different languages and dialects, depending upon the mother tongue of the writer or the language of the region where they were composed". Introduction: Guru Granth Sahib.

"Any attempt at translating songs from the Adi Granth certainly involves working not with one language, but several, along with dialectical differences. The languages used by the **saints range** from Sanskrit: regional Prakrits, western, eastern and southern Apabhramsa; and Sahiskriti. More particularly, we find sant bhasha, Marathi, Old Hindi, cenrtral and Lehndi Punjabi, Sgettland Persian. There are also many dialects deployed, such as Purbi Marwari, Bangru, Dkhni, Malwai, and Awadhi". Dass Nirmal, (२०००). Songs of the Saints from the Adi Granth, Suny Press, p.no.१३.

"Guru Granth Sahib Ji also contains hymns which are written in a language known as Sahiskriti, as well as **Sant Bhasha**; it also contains many Persian and Sanskrit words throughout". Singh Harjinder, Sikhism, Guru Granth Sahib.

श्री गुरूग्रथंसाहिबामध्ये शिख सोडुन इतर जाती-धर्माच्या संतांना स्थान देण्यात आले आहे. गुरूग्रथंसाहिबामध्ये मराठी संत मंडळींचे आध्यात्मिक श्रेष्ठत्व मान्य केले आहे म्हणुनच या संत मंडळींच्या पदांना त्यांच्या पवित्र धर्मग्रंथात स्थान देण्यात आले आहे. ही संत मंडळी देशातील वेगवेगळ्या भागातील असल्यामुळे यांच्या वेगवेगळ्या भाषा होत्या, या भाषांना संत भाषा असे नाव देण्यात आले आहे. यावरून शीख संप्रदाय मराठी संताचे अध्यात्मिक श्रेष्ठत्व मान्य करतो.

३. संत नामदेवांचे, संत त्रिलोचन, संत परमानंदाचे जीवनकार्य शीख संप्रदायाच्या जीवनमूल्यांशी सुसंगत आहे.- संत नामदेवांचे, संत त्रिलोचनाचे व संत परमानंदाचे जीवनकार्य शीख संप्रदायाच्या जीवनमूल्यांशी

सुसंगत आहे. 'नामस्मरण' म्हणजेच प्रभुचे नामस्मरण करणे, 'सिमरण' म्हणजेच प्रभू नामस्मरण होय व प्रभुची अथवा गुरूची आठवण होय, 'किरात करा' म्हणजेच इमानदारीने, परीश्रम करून पैसा कमवणे, 'किरतन' म्हणजेच किर्तन व भजन होय, 'अरदास' म्हणजेच प्रार्थना होय, 'नाम जपो' म्हणजेच नामस्मरण प्रभु नाम घेणे होय, 'अम्रीत संचार' म्हणजेच धर्माची दिक्षा घेणे अथवा गुरू करणे, 'दसंवत' म्हणजेच कमाईचा दहावा भाग दान धर्म करणे, 'लंगर' म्हणजेच सामुहीक जेवण, महाप्रसादासारखे जेवण देणे, 'वा-चाक्को' म्हणजेच वाटा आणि खा, अम्रीत वेला म्हणजेच सकाळी ३ ते ६ या वेळात ध्यान, गुरबाणी, प्रार्थना, अरदास, नामस्मरण करणे, इ. वरील सर्व शिख धर्मातील संकल्पना या संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद याच्या धर्माशी म्हणजेच हिंदु धर्मातील संकल्पनेशी निगडीत आहेत, फक्त त्या संकल्पनेला वेगवेगळ्या नावाने ओळखले जाते. यावरून संत नामदेवाचे, संत त्रिलोचनाचे व संत परमानंदाचे जीवनकार्य शीख संप्रदायाच्या जीवनमुल्यांशी सुसंगत आहे. कारण शिख धर्मातील धर्मग्रंथ तयार करतांना शिख गुरूंनी जगातील सर्व देशाचे भ्रमण करून चांगल्या गोष्टीचा समावेश त्यात करण्याचा प्रयत्न केला आहे. हिंदु आणि शिख धर्मात बऱ्याच बाबतीत समानता आहे. दोघेही शिख आणि हिंदु मृत्युनंतर शवाचे दहन करतात, दोघेही कर्म आणि पुर्नजन्मावर विश्वास ठेवतात, दोघेही शिख आणि हिंदु 'स्व आणि आत्मा' च वर्णन करण्यासाठी आत्मा ह्या शब्दाचा 'आत्मन' वापर करतात, अशाप्रकारे शिख धर्म आणि हिंदु धर्म हे एकमेकांच्या जीवनमुल्याशी सुसंगत असल्याचे दिसुन येते. दोघेही कर्म आणि पुर्नजन्मावर विश्वास ठेवतात. हिंदु धर्म आणि शीख धर्म 'स्व आणि आत्मा' यावर विश्वास ठेवतात. धर्म, कर्म, मोक्ष आणि पुर्नजन्मावर विश्वास ह्या संकल्पना हिंदु आणि शीख दोघांनाही फार महत्वपुर्ण स्थान आहे. शीख धर्मांवर मध्यकालीन भारतातील भक्ती संप्रदायाच्या निरगुणी (निराकार देवता) परंपरेचा प्रभाव पडला. गुरू नानक देव हे एका हिंदु परीवारात वाढले आणि ते भक्ती संप्रदाय परंपरेचा त्यांच्यावर प्रभाव पडला. शीख धर्मातील 'एक ओंकार' हे हिंदु धर्मातील 'ओम' याशी संबंधीत आहे. लुइस फेनेच यांच्या मताप्रमाणे, "शिख परंपरेचे मुळ भारतीय संत परंपरेची विचारधारा विस्तृत होऊन भक्ती पंथात सापडतात."

संत नामदेव, संत त्रिलोचन, संत परमानंद हे हिंदु धर्मातील मराठी संत होते. गुरू नानकांनी शिख धर्माची स्थापणा केली. हिंदु आणि शीख धर्मातील बऱ्याच परंपरा सारख्या आहेत. हिंदु धर्मात प्रसाद अथवा महाप्रसाद तर शीख धर्मामध्ये त्याला लंगर असे नाव देण्यात आले. शीख धर्माअगोदर पंजाबमध्ये सामाजिक स्वयंपाक पध्दती अगोदरच चालु होती. आणि ते मुस्लिम सुफी पंथ आणि हिंदु गोरखनाथ पंथ चालवत होते. म्हणजेच शीख धर्मातील लंगर पध्दती ही समकालीन हिंदु व मुस्लीम धर्मातील परंपरेचा प्रभाव दिसून येतो.

## ६.४ शिफारशी :-

"शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे योगदान - एक अभ्यास" या शोधप्रबंधातील शिफारशी खालील प्रमाणे आहेत.

१) शीख धर्मांचा इतिहास हा पदवी व पदव्यूत्तर अभ्यासक्रमासाठी अनिवार्य करण्यात यावा.

२) शीख धर्मांतील मराठी संतांचा पदवी व पदव्यूत्तर अभ्यासक्रमात इतिहास, मराठी, हिंदी या विषयात समावेश करण्यात यावा.

३) शीख धर्मांतील मराठी संतांचे अध्ययन केंद्र विद्यापीठ स्तरावर सूरू करण्यात यावे.

४) शालेय स्तरावर इतिहासात शिखांचा इतिहासाचे एखादे प्रकरण देण्यात यावे. शीख धर्मग्रंथ गुरूग्रंथसाहिबातील मराठी संतांचे महत्व देऊन हा धर्म कशा प्रकारे सर्वधर्मसमभावाचे तत्त्व मान्य करतो हे विद्यार्थ्यांना लक्षात येईल व यातून राष्ट्रीय एकात्मता साधण्यात मदत होईल.

५) नांदेड या शहरात शीखांचा पवित्र गुरूव्दारा असल्यामुळे नांदेड विद्यापीठाअंर्तगत विद्यापीठ स्तरावर शीखांचे दहावे गुरू गोविंद सिंग यांच्या नावाने शीख अध्ययन केंद्र स्थापन करण्यात यावे.

६) विद्यापीठ स्तरावर संत वाङ:मय हा वेगळा विषय सुरू करण्यात यावा, त्यामुळे संताच्या विचाराचा प्रचार व प्रसार केला जाईल. आणि त्यातुन सर्वधर्मसमभाव रूजवला जाईल.

७) गुरूग्रंथासाहिबाची निर्मीती ह्या विषयाबद्दलची थोडी पाठ रूपात माहिती शालेय अथवा महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना दिली तर विद्यार्थ्यांना कळेल की, या धर्मांच्या धर्मग्रथांची निर्मीती मध्ये सर्व जातीधर्मांच्या महान संत, व्यक्तींचा समावेश आहे व यातून 'राष्ट्रीय एकात्मता' साधण्यास मदत होईल. भारतासारख्या धर्मनिरपेक्ष राष्ट्राला याची मदत होईल. व त्यातून धार्मिक दरी कमी करण्यास मदत होईल.

## ६.७ संदर्भ ग्रंथ सूची


१) Cunningham, Joseph Davey - A History of The Sikhs, John Murray, London.

२) Christopher Shelke, (२००९). Divine covenant: Rainbow of Religions and cultures, Gregorian Press, ISBN ९७८-८८-७८३९-१४३-७.

३) Mohindar Pal Kohli, (१९९२). Guru Tegh Bahadur:Testimony of Conscience, Sahitya Akademi, ISBN ९७८-८१-७२०१-२३४-२.

४) Surjit Singh Gandhi, (२००७). History of Sikh Gurus Retold:१६०६-१७०८ C.E., Atlanatic Publishers & Dist., ISBN ९७८८१२६९०८५८५.

५) Phyllis G. Jestice, (२००४). Holy People of the World : A Cross-cultural Encyclopedia, Volume १, ABC-CLIO, ISBN ९७८१५७६०७३५५१.

६) Translated by Gopal Singh, Mahalla Nawan:Compostitions of Guru Tegh Bahadur-The Ninth Guru(from Sri Guru Granth Sahib):Bani Guru Tega Bahadara - Tegh Bahadur, Allied Publishers. ISBN ९७८-८१-७७६४-८९७-३.

७) Mahajan V.D., (१९७०). Muslim Rule In India, S.Chand Publication, New Delhi.

८) Syan HS, (२०१३). Sikh Militancy in the Seventeenth Century, IB Tauris,2013. ISBN 978-1780762500.

९) Grewal J.S., (१९९८). The Sikhs of the Punjab, Cambridge University Press, ISBN ९७८-०-५२१-६३७६४-०.

१०) Winnand Callewaert, (२०१३). The Hagiorgaphies of Anantadas : The Bhakti Poets Of North India, Toutledge.

११) Dhavan P.,(२०११). When Sparrows Became Hawks:The Making of the Sikh Warrior Tradition १६९९-१७९९, Oxford University Press, ISBN ९७८-०-१९-९७५६५५-१.

१२) Winand M. Callewaert ; Rupert Snell, (१९९४). Bhakt Religion in North India : Community Identity and Political Action, State University of New York, ISBN ९७८-०-७९१४-२०२५-६.

१३) Marty, Martin E.; Appleby R. Scott, (२००४). Fundamentalisms Comprehended, University of Chicago Press, eds. ISBN ९७८०२२६५०८८८७.

१४) Louis E. Fenech ; W.H.McLeod, Historical Dictionary of Sikhism, Rowman & Littlefield Publishers. ISBN ९७८-१-४४२२-३६०१-१.

१५) Translated by Thackston, Wheeler M, (१९९९). Jahangirnama : Memoirs of Jahangir-jahangir, Emperor of Hindustan, Oxford University Press, ISBN ९७८-०-१९-५१२७१८-८.

१६) Singh, Kirapala ; Prithipala, (२००४). Janamsakhi Tradition : An Analytical Study, Singh Brothers.

१७) The Sikhism Home Page : Guru Nanad - www.Sikhs.org Retrived ९ August २००९.

१८) Shiromani Gurdwara Prabandhak Committee, (२०१०). TEN GURUS Archived, २७ January २०१० at the Wayback Machine.

१९) Dawe, Donald G.,(२००५). Sri Guru Nanak Dev Encylopedia of Sikhism, Panjabi University Patiala. Retrieved १८ August २०१५.

२०) Arvind Pal Singh Mandair, (२०१३). Sikhism : A Guide for the Preplexed, Bloomsbury Academic. ISBN ९७८-१४४११०२३१७.

२१) Nayar Kamala Elizabeth, (२००४). The Sikh Diaspora in Vancouver : Three Generations Amid Tradition, Modernity, and Multixulturalism, (Illustrated ed.), University of Toronto Press. ISBN ९७८०८०२०८६३१०.

२२) Christopher Shackle, Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, Routledge, ISBN ९७८-१-५८३४०-४६९-०.

२३) William Owen Cole and Piara Singh Sambhi, (१९९५). The Sikhs : Their Religious Beliefs and Practices, Sussex Academic Press. ISBN ९७८-१८९८७२३१३४.

२४) Shackle, Christopher, Mandair, Arvind Pal Singh, (२००५). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, United Kingdom : Routledge. ISBN०-४१५-२६६०४-१.

२५) Singh Kushwant,- Amar Das (१४७९-१५७५)-Encyclopedia of Sikhism, Punjab University, Patiala.

२६) W.H.McLeod, (१९९०). Textual Sources for the Study of Sikhism, University of Chicago Press. ISBN ९७८०२२६-५६०८५-४.

२७) Singh Pashaura; Louis E. Fenech, (२०१४). The Oxford Handbook of Sikh Studies, Oxford University Press. ISBN ९७८-०-१९-९६९९३०-८.

२८) Christopher Shackle, Arvind Mandair, (२०१३). Teachings of the Sikh Gurus : Selections from the Sikh Scriptures, Routledge. ISBN ९७८-१-१३६-४५१०१-०.

२९) Singh Jagjit, (२००६). The Sikh Tree, Published by : JCS Publications, New Delhi, second edition १५ August २००६.ISBN ८१-७६६०-७८६-८.

३०) Nashter Nanak Singh, (२००१). Selections from Guru Granth Sahib, Published by International Sikh Centre For Interfaith Relations, Hyderabad, First edition August, २००१.

३१) Singh Gurbakhsh, (२००२). The Message of Jap Ji, Published by Hemkut Press, New Delhi, First Edition २००२. ISBN ८१-७०१०-३१६-९.

३२) Doabia Harbans Singh, (१९७४). Sacred Japji, Publishers : Singh Brothers, Mai Sewan, Amritsar, First edition Nov १९७४ Reprints Jan.१९९६. ISBN ८१-७२०५-०३९-९.

३३) Singh Kartar, (२००८). Life of Guru Gobind Singh, Published by : Lahore Book Shop, Ludhiana,Printed at : Sartaj Printing Press, Jalandhar, First edition २००८. ISBN ८१-७६४७-००७-४.

३४) Singh Gurbakhsh, (२००९). Sikh Faith Question & Answer, Directorate of Publications Guru Gobind Singh Study Circle, Ludhiana,Third edition December २००९.

३५) Alag Sarup Singh, (२००७). Blassings of The Sikh Gurus, Publisher : Dr. Sarup Singh Alag, Alag Yug Charitable Trust, Ludhiana, Fourth Deluxe Edition, First January, २००७.

३६) Singh Ganda, (१९५६). A Brief Account of The Sikh People, Delhi Sikh Gurdwara Management Committee, New Delhi, Printed at Guruupdesh Printers New Delhi, First Edition February १९५६., Reprinted १९९९.

३७) Editor Dr. Singh Kharak, Ass. Editor Dr. Singh Jaswant, (२००४). Abstracts of Sikh Studies, Published by Institute of Sikh Studies, Chandigarh, April-June २००४ vol VI, Issue २.

३८) Rahi Malkiat Singh, (२००८). The Granth As the Eternal Guru, Published by Singh Legal Fundation, Chandigarh, First Edition. ISBN ८१-९०२८८११-३.

३९) Editor Bal Sarjit Singh, (१९६९). Guru Nanak in the Eyes of Non-Sikhs, Publication Bureau Panjab University Chandigarh, First Edition,Reprint १९८४.

४०) Singh Sir Jogendra & Singh Raja Sir Daljit, (१९७०). Guru Nanak, Publication Director, Languages Department Punjab, Offer Master Printers, Delhi.

४१) Compilation of Articles of Eminent writers, (१९९७). Guru Tegh Bahadur Hind Ki Chadar, Published by Vijay Publications, New Delhi.

४२) Kaur Gurwinder, (२००८). The Concept of Ideal Man in Guru Nanak Bani, Publication : Gurmat Prakashan, Patiala. ISBN ८१-९०४०२१-७-X.

४३) Nashter Nanak Singh, (२०१४). Sikhs - Rich Community & Poor People Causes and Cures, Published by International Sikh Centre For Interfaith Relations, Hyderabad. १st Edition ३०th Anniversary of Operation Bluestar २०१४. ISBN ९७८-८१-९२०७५३-७-२.

४४) Tuli Pritpal Singh,(२०१४). The Honoured Saints of Sri Guru Granth Sahib, Published by B. Chattar Singh Jiwan Singh, Amritsar, First edition २०१४. ISBN ९७८-८४११९४-०८-६.

४५) Singh Dalbir, (२००६). Sri Guru Arjan Dev, Published by Sikh History Research Board, Amritsar १st Edition June २००६.

४६) Sidhu Choor Singh, (२००५). Who Is A Sikh ? , Published by B. Chattar Singh Jiwan Singh, Amritsar, Second Reprint : April २००५. ISBN ८१-७६०१-६९३-४.

४७) Editors Dr.Singh Ajit ; Singh Rajinder, (१९८६). Studies In Guru Nanak, Published by National Book Shop, Delhi, First Edition १९८६.

४८) Kaur Rajinder, (२००३). God In Sikhism, Published by Secretary Shiromani Gurdwara Parbandhak Committee, Amritsar, Second Edition June २००३.

४९) Dilgeer Singh Harjinder, (१९९५). Akal Takht Sahib, A.T.Kerr(Edited by), Published by The Sikh Educational Trust, Canada. Second Edition. ISBN ०-९६९५९६४-१-३.

५०) Sagoo Harbans Kaur, (१९९२). Guru Nanak And The Indian Society, Published by Deep & Deep Publications,New Delhi. First Edition. ISBN ८१-७१००-४६७-९.

५१) Singh Bhagar Lakshman, (April २००३). Guru Gobind Singh, Publisher B.Chatter Singh Jiwan Singh, Amritsat, Second Edition, ISBN ८१-७६०१-५४४-X.

५२) Dr.Alag Sarup Singh, (October,२००५). Guru Granth Sahib A Supreme Treasure, Publisher Dr Sarup Singh Alag, Ludhiana, १०th revised Deluxe edition.

५३) Dr.Alag Sarup Singh, (September,२००५). An Introduction To Sri Guru Granth Sahib, Publisher Dr Sarup Singh Alag, Ludhiana, १६th revised Deluxe edition.

५४) Dr.Matharu Rattan Singh, (२०१०). A Glimpse on the Life of GURU GOBIND SINGH, Publisher : Vishwabharati Prakashan, Nagpur. First Edition.ISBN ८१-७४९९-०४६-१.

५५) Singh Gopal, (१९९२). GURU GOBIND SINGH, Published By National Book Trust, New Delhi, First Edition १९६६ Fifth Reprint.

५६) Dr.Singh Jodh, (१९९०). A Few Sikh Doctrines Reconsidered, Published By National Book Shop, New Delhi, First Edition, ISBN ८१-७११६-०९९-९.

५७) Alag Sarup Singh, (Jan १९९९). Bhagat Contributors Of Guru Granth Sahib, Publisher : Alag-Shabad-Yug, Ludhiana, IInd Edition.

५८) Johar Srinder Singh, (१९६९). GURU GOBIND SINGH, Published By : S.Harjit Singh, For New Book Co., Julludur City. First Edtion.

५९) Aulakh Ajit Singh, (May २०११). Life Stories of SHIKH GURUS, Published By : B Chatter Singh Jiwan Singh, Amritsar, Third Edition. ISBN ८१-७६०१-६२८-४.

६०) थोलंबिया बालकृष्ण, (१९९५). नामदेव निर्माल्य, प्रकाशक : नामदेव टाँक क्षत्रिय चेरिटेबल ट्रस्ट, जयपुर.

६१) मान ज्ञानी ज्ञान सिंघ जी, टीकाकार : सोढी तेजा सिंघ जी, (१९९९). जन्म साखी दस गुरू :अर्थात् : सूरज प्रकाश :कृत-श्री मान कवि चूडामणि भराई संतोख सिंघ जी : वारतक टीका : मुकम्मल तवारीख गुरू खालसा, प्रकाशक भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर. ISBN ८१-७६०१-०६६-९.

६२) तपस्वी मोरेश्वर गणेश, (२००४). संत नामदेव गाथा (हिंदी), प्रकाशक : किसनलाल सारडा विश्वस्त श्रीमान् बस्तीराजी सारडा सद्गुरू श्री गंगेश्वरानंदजी प्रतिष्ठान, नाशिक.

६३) शर्मा चन्द्रधर - भारतीय दर्शन आलोचन और अनुशीलन,

६४) सिख मिशनरी कॉलेज (रजि:)-सिख धर्म की प्राथमिक जानकारी, लुधियाना

६५) टिकाकार सोढ़ी तेजा सिंघ जी,(२००२). सलोक भक्त कबीर जी सटीक, प्रकाशक भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, तीसरा संस्करण सितम्बर २००२. ISBN ८१-७६०१-२२८-९.

६६) कर्ता ज्ञानी नरैण सिंघ जी, (२००९). जन्म साखी भक्त नामदेव जी, प्रकाशक भाई चतर सिंघ जीवन सिंघ, अमृतसर, प्रथम संस्करण जुलाई २००९. ISBN ८१-७६०१-९८६-६.

६७) गुरमति साहित्य चैरीटेबल ट्रस्ट, (२००८). दौलत राए की दृष्टि में साहिबे कमाल गुरू गोबिन्द सिंघ, प्रकाशक : गुरमति साहित्य चैरीटेबल ट्रस्ट, अमृतसर, सतारहं संस्करण २००८.

६८) सिंघ साहिब, (२०१४). गुरू-इतिहास पातशाही २ से ९ , प्रकाशक सिंघ ब्रदर्ज, अमृतसर, प्रथम संस्करण अप्रैल २०१४. ISBN ८१-७२०५-४९९-८.

६९) सिंघ साहिब, (२०१४). जीवन वृत्तांत श्री गुरू नानक देव जी, प्रकाशक सिंघ ब्रदर्ज, अमृतसर, प्रथम संस्करण अप्रैल २०१४. ISBN ८१-७२०५-४९८-X.

७०) सिंघ साहिब, (२००६). भक्त बाणी टीका-३ बाणी भक्त नामदेव जी टीका, प्रकाशक सिंघ ब्रदर्ज, अमृतसर, प्रथम संस्करण अगस्त २००६. ISBN ८१-७२०५-३६७-३.

७१) सिंह सत्येन्द्र पाल, (२०१०). सिख धर्म दर्शन के मूल तत्त्व, किताबघर प्रकाशन, नयी दिल्ली, प्रथम संस्करण २०१०. ISBN ९७८-९३-८०१४६-५६-०.

७२) नरैण सिंघ जी, (२००९). श्री गुरू भगत माल सटीक, प्रकाशक : भा. चतर सिंघ जीवन सिंघ , अमृतसर, तृतीय संस्करण : दिसंबर २००९. ISBN ८१-७६०१-१०५-३.

७३) धर्म प्रचार कमेटी (एजु. एण्ड यूथ विंग) दिल्ली सिक्ख गूरव्दारा प्रबंधक कमेटी, (२००४). गुरू ग्रंथ साहिब जीवन युक्ति, गुरूउपदेश प्रिंटर्स, न्यू दिल्ली, प्रथम संस्करण २००४.

७४) सिंघ रुप ; सिंघ गुरशरणजीत, (२०१४). भक्त रविदास जी जीवन और विचारधारा, प्रकाशन : सचिव, धर्म प्रचार कमेटी, (शिरोमणी गुरूव्दारास प्रबंधक कमेटी) श्री अमृतसर, प्रथम संस्करण नवंबर २०१४.

७५) धर्म प्रचार कमेटी (शिरोमणी गु:प्र:कमेटी) श्री अमृतसर, (२०१६). सिक्ख रहत मर्यादा, प्रकाशक : सचिव, धर्म प्रचार कमेटी (शिरोमणी गु:प्र:कमेटी) श्री अमृतसर, प्रथम संस्करण सितंबर २०१६.

७६) कौर जसविन्द्र, (२०१७) - भक्त नामदेव जीवन और चिंतन, प्रकाशक : सिक्ख धर्म प्रचार कमेटी, (शिरोमणी गुरूव्दारा प्रबंधक कमेटी) श्री अमृतसर.

७७) साबर सिंह जसबीर, (२००४). श्री गुरू ग्रंथ साहिब और भक्त कबीर, प्रकाशक : धर्म प्रचार कमेटी (शिरोमणी गु.प्र. कमेटी) श्री अमृतसर.

७८) गोगटे दिलीप, (२००८). श्री गुरूग्रंथसाहिब : एक चिंतन, प्रकाशक त्र्यंबक प्रकाशन, नांदेड, प्रथमावृत्ती गुरूपौर्णिमा .

७९) मूळ लेखक नानक सिंघ निश्तर, अनुवाद विद्या मक्तल, (२००८). श्री गुरू ग्रंथ साहिब निवडक अभंग मौक्तिके, प्रकाशक : सेवा सिंह (संत), गुरूव्दारा रामपुर खेड़ा , होशियारपूर.

८०) विष्णुपूरीकर वामनराव, (२००४). गुरू-वाणी गुरूमुखी-हिंदी-मराठी, प्रकाशक : आनंद साधू, उदय ऑफसेट, नांदेड .

८१) रोडे सोमनाथ, (१९९९). शिंखाचा इतिहास, प्रकाशक : विद्याभारती प्रकाशन, लातूर.

८२) गोसावी र.रा., (१९९८). पाच भक्तिसंप्रदाय, प्रकाशक : मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, व्दितीय आवृत्ती जानेवारी, १९९८. ISBN ८१-७१६१-६६८-२.

८३) डांगे सिन्धू स., (१९८०). जैन धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळाकरीता, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथम आवृत्ती १ नोव्हेंबर, १९८०.

८४) कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू नानकदेव, प्रकाशक : गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती गुढी पाडवा, २००६. खंड १.

८५) कामत अशोक प्रभाकर, (२००६). गुरू अंगददेव ते गुरू तेग़बहाद्दूर, प्रकाशक : गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, दुसरी आवृत्ती १ ऑगस्ट २००६. खंड २.

८६) कामत अशोक प्रभाकर, (२००७). गुरू गोविंदसिंह ते खालसापर्व, प्रकाशक : गुरूकुल प्रतिष्ठान, पुणे, प्रथम आवृत्ती सन २००७. खंड ३.

८७) मूळ लेखक नानक सिंघ निश्तर, अनुवाद : विद्या मक्तल, (२००९). श्री गुरूग्रंथ साहिब (निवडक अभंग मौक्तिके), प्रकाशक : इंटरनॅशनल सिख सेंटर फॉर इंटरफेथ रिलेशन्स, हैद्राबाद, प्रथम आवृत्ती बैसाखी २००९.

८८) गोरोवाडा तारासिंह आणि लिमये विनायक, (२००९). श्री गुरू ग्रंथ साहिब:मराठी अनुवाद, प्रकाशक-सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, ऑगस्ट २००९,खंड १ ते ७.

८९) शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई - महाराष्ट्र शासन, (१९७०). श्रीनामदेव गाथा, प्रकाशक : संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई, ९ नोव्हेंबर १९७०.

९०) दीक्षित श्रीनिवास हरि, (२०१५). भारतीय तत्त्वज्ञान , फडके प्रकाशन, कोल्हापूर, बारावी आवृत्ती ऑक्टोंबर २०१५.

९१) कर्वे इरावती, (१९५१). मराठी लोकांची संस्कृति, प्रकाशक : रा.ज.देशमुख, देशमुख आणि कंपनी, पुणे. दुसरी आवृत्ती १९६२.

९२) गोंदकर दादा, (२०१२).संत नामदेवांची अभंगगाथा मराठी, गीताप्रेस, गोरखपूर,सं.२०७३.

९३) कानडे मु.श्री. ; नगरकर रा.शं., (२००५). संत नामदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा, रामकृष्ण प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती : दि. २७-०३-२००५.

९४) तांदळे ज्ञानेश्वर, (२०१२). श्री नामदेव गाथा, आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे .

९५) काळे भगवान, (२०१०). मराठवाड्यातील संत-महंत, प्रकाशक-संकेत प्रकाशन, जालना.

९६) जोशी पी.जी., (२०१३). प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर.

९७) रोडे सोमनाथ कार्यकारी संपादक, (२०१७). मराठवाडा इतिहास परिषद,औरंगाबाद इतिहास संशोधन पत्रिका, प्रकाशक डॉ. ओमशिवा लिगाडे, सचिव मराठवाडा इतिहास परिषद, औरंगाबाद, ०८ डिसेंबर २०१७.

९८) लळीत बाळष्कृष्ण, (२००७). श्री संत नामदेव महारज चरित्र, अमोल प्रकाशन, पुणे.

९९) बेडेकर उमा, (२०१२) - महाराष्ट्रातील निवडक संतांची चरित्रे, गीताप्रेस, गोरखपूर, बारावी आवृत्ती सं.२०७२.

१००) डॉ. रोडे सोमनाथ - शिखांचा इतिहास, विद्याभारती प्रकाशन, लातूर.

१०१) मार्डीकर मदन, (२०००). शिखांचा इतिहास, विद्या बुक्स पब्लिशर्स, औंरगाबाद.

१०२) पटेल सय्यद जब्बार, (२००९). संत नामदेव चिंतन, अंकुर प्रकाशन, कौलखेड-अकोला.

१०३) पटेल सय्यद जब्बार, (२००७). संत नामदेवजीका उपदेश, प्रकाशक : मुख्य सचिव, शिरोमणी भगत नामदेवजी मुळव्दारा नर्सी नामदेव ता.जि.हिंगोली.

१०४) इनामदार हे.वि., (२००१). संत संकीर्तन, प्रतिमा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती २ सप्टेंबर २००१.

१०५) देशमुख गोपाळ माधव, (१९७०). भारतीय साहित्याचे निर्माते नामदेव, साहित्य अकादेमी, न्यु दिल्ली, प्रथम आवृत्ती १९७० पुर्नमुद्रन : १९९०, २००४, २००८, २०११, २०१३.

१०६) गोरोवाडा तारासिंह व लिमये विनायक, (२०१३). श्री गुरु ग्रंथसहिब मधील संत नामदेव यांची वाणी नामा म्हणे, प्रकाशक गोरोवाडा तारासिंह , सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, सप्टेंबर २०१३.

१०७) गोरोवाडा तारासिंह व लिमये विनायक, (२००६). ओअंकार आणि सिधगोसटि, प्रकाशक गोरोवाडा तारासिंह , सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे, व्दितीयावृत्ती ऑक्टोंबर २००६.

१०८) गोरोवाडा तारासिंघ, (२०१३). सिक्खों की कुर्बानियाँ और उनका इतिहास सचित्र, प्रकाशक गोरोवाडा तारासिंह , सिख धर्म प्रचार कमिटी, पुणे.

१०९) व्यास पी.जी., पटेल सय्यद जब्बार, भालेराव गो.प., (२००९). श्री संत नामदेव महाराज मंदीर परिचय पुस्तिका, प्रकाशक :श्री संत नामदेव महारासज संस्थान नर्सी नामदेव ता.जि.हिंगोली.

११०) लोखंडे शशिकान्त, (२००८). संत नामदेवांची भावकविता : एक अभ्यास, प्रज्ञाप्रबोध प्रकाशन सांगली.

१११) स्वामी श्रीधर भगवान, श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान, (१९९७). आर्य संस्कृति, प्रकाशक : ज्योती धनंजय ढवळे, केशव भिकाजी ढवळे, गिरगाव, मुंबई, तृतीयावृत्ती : दत्तजयंती, १९९७.

११२) रहाणे नंदन नामदेवचरणरज, (२०११). संतशिरोमणी भक्तसम्राट श्री नामदेव महाराज यांचा अभिनव हरिपाठ, नामदेव प्रकाशन, नामदेव भक्तिपीठ, पुणे.

११३) भागवत दीपक, (२०१२). जगद्गुरू श्री तुकाराम महाराज (मराठी), गीताप्रेस, गोरखपूर., चवथी आवृत्ती सं.२०७२.

११४) देसाई विनायक गोविंद, (२०१०). - श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांच्या भावार्थदीपिका भाष्यानुसार सार्थ श्रीज्ञानदेवीगीता, गीतापूर, गोरखपूर, सहावी आवृत्ती सं.२०७०.

११५) भागवत दीपक, (२०१३). श्री ज्ञानेश्वर माउली, गीताप्रेस, गोरखपूर, सहावी आवृत्ती सं.२०७३.

११६) भागवत दीपक, (२०१३). संतश्रेष्ठ नामदेव, गीताप्रेस, गोरखपूर, सहावी आवृत्ती सं.२०७३.

११७) भागवत दीपक, (२०१३). संतश्रेष्ठ एकनाथ मराठी, गीताप्रेस, गोरखपूर, पाचवी आवृत्ती सं.२०७३.

११८) दासफुले महाराज, श्री नामदेवाचे लग्न, विनय प्रकाशन, अकोला.

११९) धारूरकर वि.ल., (२०१०). कृष्णभक्तीचा दीपस्तंभ संत श्री रमावल्लभदास, चैतन्य प्रकाशन, औरंगाबाद.

१२०) देव प्रभाकर, (१९९७). प्राचीन भारतीय संस्कृती, विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती १९९७.

१२१) बुटे शांताराम गोवर्धन, (२०००). संत चोखामेळा महाराज सार्थ गाथा, सुनंदा प्रकाशन, अकोला.

१२२) भगत रा.तु., (२००५). संतसाहित्य आणि समाजप्रबोधन, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि., पुणे.

१२३) इनामदार हेमंत विष्णु, (१९८७). संत नामदेव काव्यसंभार आणि संतपरिवार, संजय प्रकाशन, पुणे.

१२४) मोरजे गंगाधर नारायण, (१९९३). लोकसाहित्य एक स्वतंत्र अभ्यासक्षेत्र, प्रकाशक : दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे.

१२५) जुनेजा प्रीतमसिंग, (१९९७). नामा म्हणे त्रिलोचना, भक्त नामदेव, भक्त त्रिलोचन, भक्त परमानंद, प्रकाशक : प्रीतमसिंग जुनेजा, जनवाणी मुद्रणालय लि. पुणे.

१२६) भालेराव गोविंद, डॉ.पजई शंकर, (२०१५). संत नामदेवांचे चरित्र आणि श्री गुरू ग्रंथसाहिब, चिन्मय प्रकाशन औरंगाबाद.

१२७) तांदळे ज्ञानेश्वर, (२००८). विश्वसंत श्रीनामदेवमहाराजांची सार्थ अभंगगाथा, मे.आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे.

१२८) बिचेवार सचितानंद, (२०१५). परिवर्तनाचा महामेरू महात्मा बसवेश्वर, प्रकाशक रॉयल ऑफसेट, कोल्हापूर. ISBN ८१-९०१८६१-६-७.

१२९) पठाण यु.म., (२०१२). महाराष्ट्राची संतपरंपरा, प्रकाशक : दिलीपराज प्रकाशन प्रा. लि., पुणे.

१३०) नेटके भाऊसाहेब, (२०१३). परमार्थ रुपासि आला, प्रकाशक : कल्पना प्रकाशन, बीड.

१३१) सिंह खुशवंत अनुवाद : प्रशांत तळणीकर, (२०१३). शीख, प्रकाशक : चिनार पब्लिशर्स, पुणे. ISBN ८१८७५२०८६-८.

१३२) नहार संजय, (२०१२). दशमेश, प्रकाशक : चिनार पब्लिशर्स, पुणे.

१३३) सबनीस श्रीपाल, ज्ञानेश्वर ते आंबेडकर, प्रकाशक : दिलीपराज प्रकाशन प्रा.लि., पुणे.

१३४) जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७७). मराठी विश्वकोश, खंड ७, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथमावृत्ती १९७७. (**मराठी विश्वकोश)**

१३५) जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९७९). मराठी विश्वकोश, खंड ८, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथमावृत्ती १९७९.(मराठी विश्वकोश)

१३६) जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८०). मराठी विश्वकोश, खंड ९, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथमावृत्ती १९७८०.(मराठी विश्वकोश)

१३७) जोशी लक्ष्मणशास्त्री, (१९८२). मराठी विश्वकोश, खंड ११, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथमावृत्ती १९८२.(मराठी विश्वकोश)

१३८) महाराष्ट्र राज्य गॅझेटियर, हिंगोली जिल्हा, महाराष्ट्र शासन, मुंबई.( गॅझेटियर)

१३९) महाराष्ट्र राज्य गॅझेटियर, नांदेड जिल्हा, महाराष्ट्र शासन, मुंबई.( गॅझेटियर)

१४०) महाराष्ट्र राज्य गॅझेटियर, सोलापूर जिल्हा (ई-बुक) महाराष्ट्र शासन मुंबई . डिसेंबर २००६. ( गॅझेटियर)

१४१) लोकमत समाचार, दिनांक १७ जुन २०१८.(मराठवाडा आवृत्ती).(वृत्तपत्र)

१४२) www.shikhs.org